पॉलिनेशियन स्वरूपाच्या असाव्यात. परंतु पॉप्युअन या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या भाषांचा मलाया पॉलिनेशियन अथवा ऑस्ट्रेलियन लोकांच्या भाषेशीं संबंध दिसत नाहीं. यांतील कांहीं भाषा अत्यंत लहान क्षेत्रांत म्हणजे थोड्याशा चौरस मैलांतच वावरत आहेत. पी. डब्ल्यू. श्मिट यानें यांतील ध्वनिविशेष व व्याकरणविशेषांवरून त्यांचें वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्यास त्यानें केवळ तात्पुरतें असें म्हटलें आहे.

**आस्ट्रेलियन देश्य भाषा**--ऑस्ट्रेलिया खंडामध्यें प्रचलित असलेल्या निरनिराळ्या भाषांचा परस्परसंबंध अद्यापि निश्चित झाला नाहीं. ऑस्ट्रेलियांतील साठ लक्ष लोकसंख्येमध्यें फक्त साठ हजार देश्यलोक आहेत. व त्यांचीहि संख्या हळू हळू कमी होत चालली आहे. या भाषा मृत होण्याच्या पूर्वी त्यांचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास होणें फार अगत्याचें आहे. त्यांच्यासंबंधीं जी तुटपुंजी माहिती मिळते तीवरून या सर्व भाषांचें मूळ स्वरूप पूर्वी एकच असून त्या परस्परांमध्यें निकट संबंध असावा असें दिसतें. श्मिट यानें त्यांचे उत्तर व दक्षिण असे दोन संघ पाडले आहेत. त्यांतील दक्षिण संघांतील भाषांत कांहींसें साम्य आढळतें.

**टॅस्मॅनियन**--ही एक स्वतंत्र भाषा असून ती टॅस्मानिया बेटावर प्रचलित होती. परंतु आतां ती नष्ट झाली आहे.

**अमेरिकन इंडियन भाषा**--या वर्गामध्यें युरोपियन लोक येण्यापूर्वी उत्तर व दक्षिण अमेरिकेंत ज्या देश्य भाषा प्रचलित होत्या त्यांस घालण्यांत येतें. कोलंबसाच्या आगमनाच्या वेळीं अमेरिकन लोकाची अधिकांत अधिक लोकसंख्या चार-साडेचार कोटी असावी असें पी. रिवेट यानें अनुमान केलें आहे. त्यांपैकीं सुमारें पंधरा लाख मेक्सिकोच्या उत्तरेकडील भागांत असावे व त्या विस्तीर्ण प्रदेशांत ते दूरवर तुरळक तुरळक पसरलेले असावे. व त्यामुळें त्यांच्यामध्यें भाषाविषयक फरक अतिशय पडले असावे. सांप्रत उत्तरअमेरिकेमध्यें सुमारें पांच लक्ष इंडियन लोक आहेत तर मध्यअमेरिकेंत ६५ लक्ष व दक्षिण अमेरिकेंत ८५ लक्ष इंडियन लोक आढळतात. हे आंकडे अंदाजानें खरे मानले तर त्यांची लोकसंख्या पूर्वीच्या मानानें एकतृतीयांश पर्यंत घटली आहे. मानववंशशास्त्रदृष्ट्या विचार केला असतां अमेरिकन इंडियन लोकांची पूर्वी एक मूळ भाषा असून तिच्यापासून सध्यांच्या अनेक बोली निघाल्या असल्या पाहिजेत. परंतु भाषाशास्त्रदृष्ट्या तसा पुरावा आढळत नाहीं. या लोकांमध्यें मध्य अमेरिकेंतील कांहीं थोडे समाज सोडले तर लेखनकला कधींच प्रचलित नव्हती. यांनीं दगडावर, अस्थींवर किंवा लांकडावर वगैरे काढलेलीं जीं निरनिराळीं चित्रें आढळतात त्यांचा अर्थ फक्त त्या त्या जमातींतील लोकांसच कळत असला पाहिजे. परंतु भाषाशास्त्रदृष्ट्या त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. खरी लेखनपद्धति फक्त अझ्टेक व त्यांच्या आसपासच्या कांहीं जमाती आणि मध्यअमेरिकेंतील मय लोकांत आढळते. यांतील बरेचसे लेख शाबूत असून नवीन नवीन उपलब्ध होत आहेत. परंतु त्यांचाहि उपयोग मर्यादितच होतो. अझ्टेक लोक एका चित्रलिपींत हरणाच्या कातड्यावर किंवा बुरणुसावर लिहीत असत व कांहीं ठिकाणीं त्यांचें स्पॅनिश भाषेंत किंवा रोमन लिपींत रूपांतर केलेलेंहि आढळतें. तथापि या लेखाचा अर्थ निश्चितपणें लावतां येत नाहीं. मय लोकांतहि चित्रलिपीच प्रचारांत असून त्याचे लेख स्मारकांवर आढळतात. या लिपीचा अद्यापि पूर्णपणें उलगडा झाला नाहीं. तथापि संख्यावाचक शब्द व दिवस आणि महिने यांचीं नावें व त्यांची कालगणनापद्धति माहीत झाली आहे, याखेरीज मिशनरी व संशोधकांनीं जमविलेल्या कांहीं शब्दांच्या याद्या व अगदीं अलीकडे लिहिलेले लेख व बनविलेलीं कांहीं व्याकरणें आज पहावयास सांपडतात. सांप्रतच्या या अमेरिकन बोलींच्या स्वरूपांत इतका भिन्नपणा आढळतो कीं, त्यांमध्यें वांशिक संबंध जोडणें अशक्य नसलें तरी अतिशय कठिण काम आहे. याच्या अभ्यासाची सामुग्री म्हणजे केवळ कांहीं शब्द एवढीच असल्यामुळें व त्यांचें स्वरूप अथवा ध्वनि किंवा उच्चारपद्धतिविषयक कोणतेंहि साम्य या निरनिराळ्या भाषांत दाखविण्यांत येत नसल्यामुळें त्यांचें तौलनिक व्याकरण करण्याचा अद्याप कोणीहि प्रयत्न केला नाहीं. या सर्वच बोलींत अंतर्ग्राहकता अथवा समावेशकत्व आढळत नाहीं. उदा. मय भाषेची रचना अतिशय साधी आहे. हिचें स्वरूप संयोजक नसून पृथक्करणात्मक आहे. यांतील बहुतेक मूळ शब्द अथवा धातु एकाक्षरी किंवा द्व्यक्षरी आहेत व त्यांची वाक्यरचनापद्धति इंग्रजी पद्धतीप्रमाणें आहे असें ब्रिंटन यानें दाखविलें आहे. तसेंच या निरनिराळ्या भाषांतील परस्परसंबंध दाखविणाऱ्या कांहीं दुव्याच्या स्वरूपाच्या बोली अजीबात नष्ट झाल्या आहेत व कांहीं झपाट्यानें नष्ट होत आहेत. यामुळें ज्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध लागत नाहीं अशा बोलींची संख्या बरीच मोठी आहे. रिवेटच्या गणतीप्रमाणें ती १२३ आहे. एकट्या उत्तर अमेरिकेंत त्यांची संख्या उह्लेनबेक यानें ५४, तर रिवेट यानें २६ दिली आहे. यांत एस्किमो भाषेचा अंतर्भाव करितात परंतु ती फिनोउग्रिक किंवा उरलियन भाषेशीं संबद्ध असावी असें मानतात. रेडिन यानें उत्तर अमेरिकेंतील भाषांचें तीन कुळींमध्यें वर्गीकरण केलें आहे. परंतु त्यास एक केवळ धाष्टर्याचा प्रयत्न असें मानतात. तथापि अर्वाचीन अभ्यासकांनीं तौलनिक पद्धतीनें पूर्वी ज्या भाषांस स्वतंत्र मानीत असत त्यांना एका वर्गांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. उदा. नादेनेसंघ यामध्यें अटलांटिक किनाऱ्यापासून उत्तर मेक्सिकोपर्यंत आणि पॅसिफिक किनाऱ्यापासून हडसन उपसागरापर्यंतच्या सर्व भाषांचा समावेश होतो. याच्या अथापास्कन, हैदा आणि त्लिन्गित या

तीन शाखा आहेत. दुसरा युटो अझ्टेक संघ. यामध्यें शोशोनियन पायमासोनोरन आणि नहुआतल या तीन शाखा येतात. या उत्तर व मध्य अमेरिकेमध्यें विस्तीर्ण प्रदेशावर पसरल्या आहेत. कधीं कधीं यांतील एखाद्या बोलीस महत्त्व प्राप्त होऊन तिचें आजूबाजूच्या बोलींवर वर्चस्व स्थापन होत असे व त्याचें स्थान ती घेत असे. अशा तऱ्हेनें क्वेचुअन अथवा रुनासिनी ही दक्षिण अमेरिकेंतील कोलंबसापूर्वीची थोडाफार संस्कार पावलेली भाषा होती. ही इंका साम्राज्याची राजभाषा असून स्पॅनिश लोकांच्या कारकीर्दीत ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं तिचा धर्मप्रसाराच्या कामीं उपयोग केल्यामुळें तिचें क्षेत्र अधिकच वाढत गेलें. हीच गोष्ट टुपिग्वारानी नांवाच्या दुसऱ्या एका भाषाकुलाची आढळते. १६ व्या शतकाच्या आरंभीं ही भाषा पॅराग्वे व त्याभोंवताल च्या प्रदेशांत रूढ होती. परंतु ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आपल्या प्रचाराकरितां तिचा उपयोग केल्यामुळें सर्व ब्राझिल देशामध्यें स्थानिक भाषेबरोबरच तिचा स्वीकार सर्व लोकांनीं करून बहुतेक लोक द्वैभाषिक बनले. अशा तऱ्हेचें एक विचित्र उदाहरण अँटिलिस या बेटांत आढळतें. या ठिकाणीं पूर्वी दक्षिण अमेरिकेंतील अरावाकन जातीचे लोक रहात असत परंतु कांहीं काळानें कॅरिब नांवाच्या दुसऱ्या एका टोळीनें हें बेट जिंकून आरावाकी लोकांस घालवून दिलें किंवा मारून टाकलें परंतु त्यांच्या बायकांस जिवत ठेवून त्यांच्यांशीं लग्नें लावलीं. त्यामुळें तेथील स्त्रिया आरावाकी भाषा बोलत तर पुरुष कॅरिब भाषा बोलत. व मुलांस जरी दोन्ही भाषा येत असत तथापि आरावाकी ही स्त्रियाची भाषा व कॅरिब ही पुरुषाची भाषा म्हणून दीर्घकालपर्यंत अस्तित्वांत राहिली व अद्यापहि ही स्थिति पूर्णपणें नष्ट झाली नाहीं त्यांतल्यात्यात आरावाकी भाषेचेच विशेष कॅरिब भाषेनें उचलले आहेत यावरून स्त्रियांच्या भाषेचा परिणाम पुरुषांच्या भाषेवर अधिक झाला ही गोष्ट स्पष्ट होते. उत्तर अमेरिकेंतील महत्त्वाच्या इंडियन भाषा म्हटल्या म्हणजे एस्किमो, अल्गोंकियन, होकन, इरॉक्विअन, नादेने, पेनुशियन, सिओवन, युटो अझ्टेक ह्या होत.

**आफ्रिकेंतील नीग्रो भाषा**--अमेरिकेच्या उलट आफ्रिकेंतील भाषा अधिक एकस्वरूपी आढळतात. उत्तरेकडील प्रदेशांत प्रचलित असलेल्या हॅमिटो सेमिटिक भाषा सोडून दिल्या व हॉटेंटॉट, बुशमेन, आणि पिग्मीज या दक्षिणेंतील भाषा वगळल्या तर बाकी राहणाऱ्या विस्तीर्ण प्रदेशामध्यें या निरनिराळ्या बोली आढळतात. त्यातील निकट संबंध स्पष्ट दिसून येतो. जरी आज सुदानी भाषांत बांटु भाषेपेक्षां अधिक वैचित्र्य आढळतें तथापि मॉरिस द ला फॉसे याच्या मतानें त्या सर्वांत इतक्या महत्त्वाचीं साम्यें आढळतात कीं त्या मूळच्या एका आफ्रिकन नीग्रो भाषेपासून निघाल्या असाव्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु पी. डब्ल्यु. श्मिट ही गोष्ट मान्य करीत नाहीं अमेरिकेंतील इंडियन लोकांपेक्षां आफ्रिकन लोकांची वस्ती अधिक दाट आहे. कदाचित हॉटेंटॉट, बुशमेन व नेग्रिटो या लोकामध्यें प्रचलित असणाऱ्या भाषा या मूळच्या भाषेचें थोडेसें प्राथमिक रूप असून सुदानी व बांटु या तिच्या थोडेसें अर्वाचीन स्वरूप दर्शवीत असतील या भाषांचें क्षेत्र व स्वरूप गेल्या ४।५ शतकांत कायम राहिलें आहे एवढेंच नव्हेतर त्याच्या शब्दांतहि फारसा बदल झालला नाहीं—ही गोष्ट महत्त्वाची आहे. पॅलिआ—आफ्रिकन भाषांमध्यें हॉटेंटॉट ही अधिक परिचित आहे. तिचा बुशमेन भाषेशीं निकटचा संबंध दिसतो बुशमेन भाषेत मूळच्या भाषेचें स्वरूप अधिक स्पष्ट दिसतें तर हॉटेंटॉट भाषेवर हॅमिटिक भाषांचा काहींसा परिणाम झालेला असावा. हॉटेंटॉट लोकांनीं पूर्वी फार मोठा प्रदेश व्यापला असून एका काळीं ते हेमाइट लोकांचे शेजारी असावे. हॅमिटिक भाषेचा परिणाम आफ्रिकन नीग्रो लोकांवर फार प्राचीन काळापासुन झाला असावा. नाईल नदीच्या वरच्या भागापासून कॅमेरून पर्यंतच्या प्रदेशात असणाऱ्या नीग्रो लोकांच्या बोलींबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे हे खुजे लोक अतिशय मंद बुद्धीचे असून बहुतेक आपल्या शेजाऱ्याच्या नीग्रो भाषा बोलतात. परंतु मधून मधून ते जे काहीं नीग्रोशब्द वापरतात त्यांच्या उच्चारावरून त्यांची हॉटेंटॉट व बुशमेन भाषांशी संबद्ध अशी एखादी स्वतःची भाषा असावीसें वाटतें. हॉटेंटॉट भाषांपैकीं बहुतेक सर्व शब्द एकाक्षरी असतात. या भाषांत प्रथमपुरुषी द्विवचन व बहुवचन असून पर संग्राहक व व्यावर्तक सर्वनामें आहेत. व त्यातील क्रियापदें अनेक तऱ्हेनें व करणरूपी व अकरणरूपी निरनिराळीं चालतात. ह्या सर्वांना नीग्रो भाषा असें सामान्य नाव असलें तरी त्याचें वर्गीकरण करण्याचे कांहीं प्रयत्न झाले आहेत. यामध्यें मुख्यतः दोन शाखा आहेत. बांटु शाखा ही भूमध्यरेषेच्या दक्षिणेकडे प्रचलित असून तीमध्यें अनेक थोडा फार फरक असलेल्या परंतु सामान्यतः एकाच स्वरूपाच्या बोली आहेत सुदानी शाखा ही भूमध्यरेषेच्या उत्तरेस असून हॅमिटो—सेमिटिक भाषांच्या दक्षिणेस आहे. या शाखेत परस्परांपासुन अनेक बाबतींत भिन्न परंतु स्वतः एकस्वरूपी असे अनेक लहान लहान संघ आहेत. परंतु त्यांतील मर्यादारेषा स्पष्ट काढतां येत नाहींत. त्यांमध्यें काहींत अरबी तर कांहींत हॅमिटिक विशेषांचें मिश्रण झालेलें आहे. कांहीं अर्धवट बांटु स्वरूपाच्या भाषा कांगोचा उत्तर भाग, गॅबून, कामेरून, सुदान आणि अटलांटिक किनारा या प्रदेशांत आढळतात. यांचा कांहीं लोक पश्चिम आफ्रिकन म्हणून स्वतंत्र संघ मानतात. या भाषांचें स्वरूप अगदीं साधें दिसतें ही गोष्ट कदाचित परकीय भाषांशीं संबंध आल्यामुळे झाली असावी. ह्या मुख्य वर्गाच्यापुढें या भाषांचें वर्गीकरण करणें अतिशय कठिण आहे कारण द ला फॉसे यानें उल्लेखिलेल्या सुमारें ४३५ सुदानी भाषांपैकीं फक्त ५।६ च लेखनिविष्ट आढळतात. त्या म्हटल्या म्हणजे ( १ ) वाइ(नायगेरो सेनेगॉली संघ)—

हिची देश्य अक्षरी लेखनपद्धति आहे. ( २ ) मोम अथवा बामन ( नायगेरो कामेरून संघ )–हिची प्रथम कल्पनाचित्रलिपी होती परंतु सध्यां ध्वनिलेखनपद्धति आहे. ( ३ ) कानुरी ( नीलो चॅडियन संघ ). ( ४ ) हौसा ( नायगेरो चॅडियन संघ ). ( ५ ) पेउल ( सेनेगॅलो गिनियन संघ ),–ही अरबी लिपीमध्यें लिहितात आणि (६) न्युबियन (नीलो चॅडियन संघ) ही पूर्वी कॉप्टिक लिपींत ४ ते ७ व्या शतकापर्यंत लिहीत परंतु अलीकडे सेमिटिक पद्धतीचीं अक्षरें वापरतात. पेऊल व हौसा या भाषांत बरेंच लिखाण आढळतें. परंतु इतर ४२९ भाषामध्यें मुळींच लेख नसल्यामुळें वरील लेखांचा वर्गीकरण करण्याच्या कामीं कांहीं एक उपयोग होत नाहीं. या इतर भाषांतील कांहीं शब्द, धार्मिक लख व भाषांतरें मिशनरी व प्रवासी लोकांनीं मिळविलीं आहेत. परंतु तीं अनभ्यासी लोकांनीं लिहिलीं असल्यामुळें त्यांचा शास्त्रीय बाबतींत पुराव्यादाखल तितका उपयोग होत नाहीं. अलीकडे आफ्रिकन नीग्रो भाषांचा अभ्यास सुरू झाला असून कांहीं विश्वासार्ह व्याकरणें तयार होऊ लागलीं आहत सध्यां तरी या भाषांचें केवळ प्रादेशिक वर्गीकरण करणेंच जरूर आहे. सुदानी व बांटु भाषांतील कांहीं विशेष सदृश गोष्टी पुढें दिल्या आहेत बहुधा नामाचें त्यांनीं निर्दिष्ट होणाऱ्या वस्तुवरून गट करण्यांत येतात. या नामाचे गट दाखविणारीं ध्वनिविषयक चिन्हें उपसर्ग किंवा प्रत्ययस्वरूपाचीं असतात. कांहीं भाषांत हें वर्गीकरण सर्रास रूढ आहे तर कांहींमध्यें तें अल्प प्रमाणांत असून कांहींत अजीबात नष्ट झाले आहे. ज्या भाषांत असें नामांचें वर्गीकरण केलेलें नसतें त्यामध्यें नाम व क्रियापद यांमध्यें कांहींच फरक नसतो. व ही गोष्ट शब्दाच्या स्थानांवरून निश्चित करावी लागते. या भाषांतील मूळ शब्द व प्रत्यय यांमध्यें सर्वत्र एकवाक्यता आढळते व तसेंच यामध्यें स्वरूपविशेषांतहि बरेचसें साम्य आढळतें. द ला फॉसे यानें सुदानी संघांतील ४३५ भाषांच्या १६ शाखा पाडल्या आहेत. या भाषांत अधिक वैचित्र्य असल्यामुळें त्यांचें वर्गीकरण करणें शक्य नाहीं. परंतु बांटु संघांतील भाषांत इतकं सादृश्य आढळतें कीं, त्यांच्या शाखा पाडणें कठिण आहे बांटु या शब्दाचा अर्थ मनुष्यप्राणी असा आहे. यांतील मूळ शब्द 'न्तु' असा असून त्यास 'ब' हा जिवंत प्राणिवाचक उपसर्ग जोडण्यांत आला आहे. मुन्तु याचा अर्थ एक मनुष्यप्राणी असा होतो तर किन्तु याचा अर्थ वस्तु असा होतो. या भाषांस बांटु हें नांव देण्याचें कारण हा शब्द बहुतेक सर्व भाषात आढळतो हें होय. झांझिबार व त्याच्या लगतच्या किनाऱ्यावर प्रचलित असलेली स्वाहिली भाषा अरबी लिपीमध्यें लिहितात. याखेरीज इतर लिखाण रोमन लिपींत लिहिलेलं आढळतें. पूर्वीच्या अरब लोकांनीं उल्लेखिलेले कांहीं शब्द सोडल्यास मध्ययुगापासून या भाषांची माहिती युरोपियन मिशनरी व प्रवासी यांच्या लेखावरूनच मिळते. बांटु भाषेनें हॉटेंटॉट व पिग्मी लोकांच्या भाषांवर वर्चस्व मिळवून त्यांचें स्थान पटकाविलें असावें. परंतु तीवर इंग्रजी व डच भाषांचा बराच परिणाम झाला आहे. बांटु भाषेंतील ध्वनि नादबद्ध आढळतात. बहुतेक शब्द स्वरांत असून अक्षरांचा संयोग शिथिल असतो. त्यामुळें या भाषेंत व्यंजनें कमी असून जोडाक्षरें फारशीं आढळत नाहींत. परकीय भाषेंतील घेतलेल्या शब्दावरहि ही क्रिया होतेच त्यामुळें ख्रिस्टस याचें किरिस्ती असें रूपांतर होतें.

आफ्रिकेंतील युरोपियन लोकांच्या व्यापारामुळें अनेक मिश्र स्वरूपाच्या व्यापारी भाषा अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावर तयार झाल्या आहेत. त्यांतील मुख्य नीग्रो पोर्तुगीझ, नीग्रो इंग्रजी नीग्रो फ्रेंच असून यांमध्यें शब्द युरोपियन भाषांतील पण व्याकरणपद्धति नीग्रो भाषाची असा प्रकार आढळतो. तसेंच आफ्रिकेंतील हौसा नावाची बोली नायगर नदीपासून लेक चॅडपर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशापर्यंत पसरली आहे. या भाषेचा हॅमिटिक, सुदानी व बांटु या भाषांशीं काय संबध आहे या संबंधीं बराच वादविवाद झालेला आहे. अरबी भाषा सोडल्यास हौसा भाषेचा प्रसार आफ्रिकेंतील बऱ्याच मोठ्या प्रदेशावर झालेला आहे. व्यापारी बोली म्हणून हिचा पश्चिम व मध्य सुदानपासुन भूमध्यसमुद्रांतील बंदरापर्यंत प्रचार आहे.

**संदर्भग्रंथ**—प्रस्तुत निबंध लिहिण्याच्या कामीं अनेक ग्रंथांचा उपयोग करण्यांत आला आहे त्यांतल्यात्यांत पुढें दिलेल्या ग्रंथांचा विशेष उपयोग झाला असुन त्या ग्रंथकर्त्यांचे आम्ही आभारी आहों. विशेषतः प्रि. राजवाडे यांनीं भांडारकर इन्स्टिटयूटकरितां संपादन करीत असलेल्या निरुक्ताची अमुद्रित प्रस्तावना आम्हांस पहावयास दिली याबद्दल त्यांचे विशेष आभार मानले पाहिजेत.

१ निरुक्त–( १ ) Dr. Laxman Sarmp. ( २ ) वै. का. राजवाडे ( अमुद्रित ).

२ Language–Otto Jesperson.

३ Language & Languages–Willem L. Graff. या पुस्तकांत सहाशेंच्यावर भाषाविषयक ग्रंथांची व इतर लेखांची फार उपयुक्त यादी दिली आहे.

४ Historical Study of the Mother Tongue–H C. Wyld.

५ Census Report–India–1931.

६ A comperative grmmer of Dravidian Languages–R. Caldwell.

७ मराठी भाषा उद्गम व विकास––रा. कृ. पां. कुळकर्णी. याखेरीज वेदसंहिता, ब्राह्मणें, शिक्षा, प्रतिशाख्यें, वैशेषिकसूत्रें, न्यायसूत्रें, पातंजल महाभाष्य वगैरेंचा उपयोगहि केला आहे. कांहीं ग्रंथाचा नामनिर्देश निबंधांतच केला आहे.

यशवंत रामकृष्ण दाते

# परिशिष्ट

## १ आर्यन् अथवा इंडो-युरोपियन भाषावंश

जगांतील सर्वांत महत्त्वाचा जो आर्यन् अथवा इंडोयुरोपीय भाषावंश त्याचा विस्तार पुढें दिला आहे. बाकीच्या वंशांचा विस्तार एवढा व्यापक व महत्त्वाचा नसल्यामुळें त्यांचें वर्णन मूळांत दिलें आहे तें येथें वृक्षरूपानें दाखविलें नाहीं.

## २ जगांतील मोठ्या भाषा.

| नांव | लोकसंख्या | नांव | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| चिनी | ४० कोटी | स्पॅनिश | ७ ,, |
| इंग्रजी | २० ,, | जपानी | ६॥ ,, |
| रशियन | १४ ,, | पोर्तुगीज | ६ ,, |
| पश्चिम हिंदी | १० ,, | इटालियन | ५ ,, |
| जर्मन | ८ ,, | बंगाली | ५ ,, |
| फ्रेंच | ७ ,, | मराठी | २ ,, |

## ३ हिंदुस्थानांतील प्रचलित भाषांचें वंशवार वर्गीकरण.

| भाषा | लोकसंख्या | भाषा | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| **अ-हिंदुस्थानांतील देश्य भाषा** | ३४,९८,८७,५२७ | **आ-आशिया व आफ्रिका** | |
| **ऑस्ट्रिक भाषावंश** | ५३,४२,७०८ | **यांतील देश्य भाषा** | **३,०२,३२४** |
| ऑस्ट्रोनेशियन पोटवंश | ६,५४२ | इंडो-युरोपियन वंश ( आर्यन् पोटवंश ) | ३९,२२४ |
| ऑस्ट्रो आशियाटिक ,, | ५३,३६,१६६ | तिबेटो-चिनी वंश (तई-चिनी पोटवंश) | १,८५,८२२ |
| **तिबेटो-चिनी भाषावंश** | १,४०,१०,४९६ | सेमिटिक वंश | ५९,९५४ |
| तिबेटो-ब्रह्मी पोटवंश | १,२९,८२,८४० | हॅमिटिक वंश | ५,०३९ |
| तई-चिनी पोटवंश | १०,२७,६५६ | मोंगोलियन वंश | ११,९४३ |
| **करेण भाषावंश** | १३,४१,३३१ | मलायो-पालिनेशियन वंश | ३४२ |
| **मान भाषावंश** | ९४७ | **इ-युरोपियन भाषा** | **३,३९,७०६** |
| **द्राविडी भाषावंश** | ७,७६,४४,७८७ | इंडो-युरोपियन वंश | ३,३९,६६० |
| **इंडो-युरोपीय भाषावंश** | २५,७४,९२,८०५ | मंगोलियन वंश | १३ |
| **अवर्गीकृत भाषा** | ५४,४५३ | युरोपियन भाषा ( अनिर्दिष्ट ) | ३३ |

## ४ हिंदुस्थानांतील प्रचलित देश्य भाषा व बोलणारांची लोक संख्या.

| भाषा | लोकसंख्या | भाषा | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| **हिंदुस्थानांतील देश्य भाषा** | **३४,९८,८७,५२७** | वा | २२,१४२ |
| **ऑस्ट्रिक वंश--** | **५३,४२,७०८** | दानाव | १,१५९ |
| **( अ ) ऑस्ट्रोनेशियन पोटवंश,** | | खामुक | १९१ |
| **इंडोनेशियन शाखा, मलाया वर्ग** | **६,५४२** | यांग | ३,१५१ |
| मलायी | ४,६३४ | यांगलाम | १०,७२५ |
| सालोन | १,९०८ | पलौंग आणि पले | १,३९,६४४ |
| **(आ) ऑस्ट्रोआशियाटिक पोटवंश-** | **५३,३६,१६६** | खासी वर्ग-खासी | २,३४,३८७ |
| **मॉन्ख्मेर शाखा** | **७,२६,५७८** | निकोबार वर्ग-निकोबारी | ९,८८५ |
| मॉनवर्ग-तलैंग | ३,०५,२९४ | **मुंडाशाखा** | **४६,०९,५८८** |
| पलौंग-वा वर्ग | १,७७,०१२ | खेरवारी ( संताळी, मन्दारी, हो वगैरे ) | ४०,३१,९७० |

| भाषा | लोकसंख्या |
|---|---|
| कोर्कु | १,६९,७२८ |
| खारिया | १,५२,०१८ |
| ज्वांग | १४,५८३ |
| सावारा | १,९४,९४७ |
| गादाबा | ४४,३७१ |
| मुंडा ( अनिर्दिष्ट ) | १,९७१ |
| **( अ ) तिबेटो-चिनी वंश—** | **१,४०,१०,४९६** |
| **तिबेटो-ब्रह्मी पोटवंश--** | **१,२९,८२,८४०** |
| **तिबेटो-हिमालय शाखा** | **४,६८,४२९** |
| तिबेटी वर्ग | २,५२,०६३ |
| भोतिया ( तिबेटी ) | ९,७९९ |
| भोतिया ( बाल्टी ) | १,३७,९१४ |
| भोतिया ( लडखी ) | ४१,४४४ |
| भोतिया ( शार्पा ) | ११,६७७ |
| भोतिया ( भूतान ) | २,८१९ |
| भोतिया ( सिक्कीम ) | ११,१०८ |
| भोतिया ( इतर ) | ३७,३०२ |
| सार्वनामिक हिमालयन वर्ग | १,१३,९५२ |
| कनौरी | २६,१२२ |
| कानाशी | ३४८ |
| किरांती | ८७,४८२ |
| असार्वनामिक हिमालयन वर्ग | १,०२,४८४ |
| गुरुंग | ३,६०९ |
| मुरुमी | ४२,६७३ |
| सुंवार | ३,४३३ |
| मागारी | १७,४७८ |
| नेवारी | ९,७६६ |
| रोंग अथवा लेपचा | २५,१५१ |
| कामी | १७५ |
| मांझी | २९९ |
| **उत्तर आसाम शाखा** | **१७,८४३** |
| अका | ३३ |
| अबोर | १३,८८० |
| दाफला | १,६४४ |
| मिश्मि | २,२८६ |
| **ब्रम्हीशाखा** | |
| **आसामी ब्रम्ही शाखा** | **१,२४,७८,६११** |
| बोडो वर्ग | ९,११,२१० |
| गारो | २,३०,६७४ |
| राभा | २७,००८ |
| चुटिया | ४,३१७ |
| कूच | ९,५५२ |
| बाराबोडो ( कचारी ) | २,९१,३७६ |
| दिमासा ( कचारी ) | १४,६८० |
| लालुंग | ९,०१७ |
| टिपरा ( मूंग ) | १,९८,१२९ |
| मिकिर | १,२६,४५७ |
| नागा वर्ग | ३,४९,१११ |
| नागाबोडो पोटवर्ग | ४०,८६४ |
| काचानागा | ७,२८२ |
| काबुई | १८,४७५ |
| इतर | १५,१०७ |
| पश्चिम नागा पोटवर्ग | ९३,३६९ |
| अंगामी | ४३,६६६ |
| केझामा | ५,२८८ |
| सेमा | ३८,१४६ |
| रेंग्मा | ६,२६९ |
| मध्यनागा पोटवर्ग | ५५,७३३ |
| आओ | ३३,११७ |
| लोहटा | १८,२५४ |
| संगतम | ४,३६२ |
| पूर्वनागा पोटवर्ग | १,०२,८१५ |
| कोन्याक | ९,४७८ |
| रंगपंग | ११,०७२ |
| इतर पूर्व-नागाभाषा | ८२,२६५ |
| नागाकुकी पोटवर्ग | ४८,४२९ |
| मेमी ( माओ ) | २१,२८७ |
| तंगखुल | २७,१४२ |
| इतर अनिर्दिष्ट नागा भाषा | ७,९०१ |
| कुकीचीनवर्ग | ९,७२,८८६ |
| मारिंग | ४,२५१ |
| काये(पौन्ना) मेइथि (मणिपुरी धरून) | ३,९१,९०३ |
| जुनीकुकी पोटवर्ग | ५३,२६१ |
| ऐमोल | ५११ |
| अनाल | ३,३१४ |
| चिरु | १,२६९ |
| हलाम | १०,८६७ |
| कोल्रेंग ( कोइरेंग ) | ५२१ |

| भाषा | लोकसंख्या |
|---|---|
| कोम | २,६६२ |
| म्हार | २१,५८३ |
| रंगखोल | १,७४५ |
| इतर | १०,७८९ |
| उत्तरचिन पोटवर्ग | १,२८,८०८ |
| पैते | १४,६७४ |
| राल्ते | १६,१६३ |
| सियीन | ३,५०६ |
| सोक्ते | ३७,६४३ |
| थादो | ५६,८२२ |
| मध्यचिन पोटवर्ग | १,२७,३०९ |
| बांजोगी | ८१० |
| लई | ३९,६४६ |
| लाखेर | ६,२५० |
| लुशेइ | ६०,४७१ |
| पांखु | ८३ |
| ताशोन | २०,०४९ |
| दक्षिणचिन पोटवर्ग | ६६,२८८ |
| चिंबोक | २०,१९५ |
| चिंबोन ( शो ) | १०,२६८ |
| ख्यांग ( कुमि ) | २,८२५ |
| खामी | ३२,९९१ |
| यिंदू | ९ |
| अवर्गीकृत चिनभाषा पोटवर्ग | ६९,९९८ |
| आनू | ३ |
| ख्वाम्प्यी | ३२ |
| कौकादन | २९४ |
| लावतु | ९,७०५ |
| लेंदू | १,७१९ |
| मतु | १५४ |
| न्गोर्न | ५,८०८ |
| रोंगतु | १३,५४८ |
| सैंगबौंग | ८०३१ |
| शेन्तांग | ७,३२४ |
| सित्तु | ४,२८२ |
| तमान | ९,२२८ |
| यो | १,३६५ |
| योतुन | ८,९८५ |
| इतर चिन पोटवर्ग– | १,२१,१३६ |
| इतरे कुकी पोटवर्ग– | ९,९३५ |
| काचीन वर्ग-काचीन | १,५६,९८० |

| भाषा | लोकसंख्या |
|---|---|
| ब्रह्मी वर्ग– | ९९,६०,३९४ |
| ब्रह्मी | ८८,५३,५३८ |
| आराकानी | ३,०८,५४४ |
| तांग्यो | २२,२६१ |
| इंथा | ५६,८२९ |
| दानू | ६०,९६६ |
| मारू | १७,४४७ |
| तावोयान | १,५९,१७४ |
| चौंग्था | ३४,६१६ |
| मैंग्था | ४८७ |
| अत्सी | ५,२९५ |
| याव | ८७७ |
| मेरगुमी | १,०१,१४४ |
| यांब्ये | ३,२६,६४२ |
| लाशी | १२,५६४ |
| लोलोमुह्शो वर्ग | ९३,७३१ |
| लाहु | २६,८६४ |
| लिसाव | १९,६९८ |
| हूपून | ६७९ |
| नुंग | १०१ |
| वी | ३,८३९ |
| अखा | ४०,४०७ |
| अको | १,३४३ |
| प्यिन | ८०० |
| साक ( लुइ ) वर्ग | ३४,२९९ |
| कदु | २०,३०५ |
| गानान | ७,१४४ |
| साक | ६९१ |
| दैंनेत | ६,१५९ |
| म्रोवर्ग–म्रो | १७,८८७ |
| **( आ ) तईचिनी पोटवंश** | |
| **तइ शाखा–तइ वर्ग** | **१०,२७,६५६** |
| लाओ | ७,१६३ |
| लु | ३०,०३१ |
| खुन | ३१,२३४ |
| दाये | ६९८ |
| खामती | ४,२९५ |
| शांगाले | ९,१४,३८९ |
| शानतयोक | १८,२७० |
| शानबामा | ७,७३५ |
| शान ( अनिर्दिष्ट ) | ४,५०३ |

| भाषा | लोकसंख्या |
|---|---|
| सयामी | ८,६४८ |
| **करेण भाषावंश–करेण वर्ग** | **१३,४१,३३१** |
| मोन्नेप्वा | २,१२६ |
| ब्वे | ६,२२७ |
| करेन्ब्यू | १५,२९९ |
| ब्रेक | ६,६९५ |
| स्गाव | ४,९९,७८९ |
| पाकू | ८,६२२ |
| प्वो | ४,७३,७२२ |
| तौंग्थू | २,२२,७१४ |
| पदौंग | २६,४८५ |
| यिंबा | २,९२२ |
| घेको | ४,०७५ |
| करेन्नी | ३१,५५६ |
| झायिन | ३,७३७ |
| करेण ( अनिर्दिष्ट ) | ४७,३६२ |
| **मानवंश--** | **९४७** |
| मानवर्ग | ९४७ |
| मियाओ | ८३० |
| याओ | ११७ |
| **द्राविडवंश---** | **७,१६,४४,७८७** |
| द्राविड वर्ग | ४,१४,५४,५९३ |
| तामिळ | २,०४,११,६५२ |
| मल्याळी | ९१,३७,६१५ |
| कानडी | १,१२,०६,३८० |
| कोडगू ( कुर्गी ) | ४५,३६८ |
| तुळु | ६,५१,८४२ |
| तोडा | ६०० |
| कोटा | १,१३६ |
| मध्यमवर्ग | ३६,०९,४१८ |
| कुरुक किंवा ओराओन | १०,३७,१४२ |
| माल्तो | ७०,७६१ |
| गोंडी | ८,६४,८७८ |
| कंधी किंवा कुई | ५,८५,१०९ |
| कोलमी | २९,१८७ |
| इतर ( कोंडा ) | २२,३४१ |
| आन्ध्र वर्ग–तेलगू | २,६३,७३,७२७ |
| वायव्य भाषा–ब्राहुई | २,०७,०४९ |
| **इंडो–युरोपियनवंश--** | |
| **आर्यन पोटवंश** | **२५,७४,९२,८०५** |
| **इराणीशाखा पूर्ववर्ग** | **२२,७०,४६६** |
| पुश्तु | १६,३६,४९० |
| बलुची | ६,२८,०८६ |
| फारसी | ५,२८२ |
| इतर इराणी भाषा | ६०८ |
| **दार्दिकशाखा** | **१५,२२,९३६** |
| खोवारवर्ग ( खोवार, चित्रळी उर्फ अर्णिय ) | ६,९५६ |
| दर्दवर्ग | १५,०९,७४१ |
| शिना | ६८,१९९ |
| काश्मिरी | १४,३८,०२१ |
| कोहिस्तानी | ३,५२१ |
| काफिर वर्ग | ६,२३९ |
| बाशगली | ७ |
| इतर काफिर भाषा | ६,२३२ |
| **इंडो आर्यन शाखा** | **२५,३६,९९,४०३** |
| **बाह्यपोटशाखा–संस्कृत** | |
| **पोटशाखा–संस्कृत वर्ग** | **१,१८१** |
| **बाह्य पोटशाखा** | **१२,८५,२१,९४१** |
| वायव्यवर्ग | १,२५,७२,१९८ |
| लहन्दा ऊर्फ पश्चिम पंजाबी | ८५,६६,०५१ |
| सिंधी | ४०,०६,१४७ |
| दक्षिणवर्ग | २,१३,६१,३९३ |
| मराठी | २,०८,८९,६५८ |
| कोंकणी | ४,७१,७३५ |
| पूर्व वर्ग | ९,४५,८८,३५० |
| उरिया | १,११,९४,२८५ |
| विहारी | २,७९,२६,५५९ |
| बंगाली | ५,३४,६८,४६९ |
| आसामी | १९,९९,०५७ |
| मध्यवर्ग पूर्वहिंदी | ७८,६७,१०३ |
| **आंतर पोटशाखा** | **११,७३,०९,६७८** |
| मध्यवर्ग | ११,४५,५६,७४६ |
| पश्चिम हिंदी | ७,१५,४७,०७१ |
| राजस्तानी | १,३८,९७,८९६ |
| गुजराथी | १,०८,४९,९८४ |
| भिल्ली | २११,८९,५३१ |
| खानदेशी | २,३३,०१० |
| पंजाबी | १,५८,३९,२५४ |
| पहाडीवर्ग | २७,५२,४३२ |
| मध्यपहाडी | ७,१७० |
| पूर्वपहाडी, खसकुरा अथवा नेपाळी | ४,१२,९५१ |
| पश्चिम पहाडी | २३,२५,९१६ |
| पहाडी ( अनिर्दिष्ट ) | ६,३९५ |
| **अवर्गीकृत भाषा**--एकूण | **५४,४५३** |
| अन्दमानी | **४६६** |
| जिप्सी भाषा | **२५,९९९** |
| इतर | **१,९२१** |

॥ श्री ॥

# महाराष्ट्र शब्दकोश

## विभाग दुसरा

## ओ

**ॐ**—महानुभावी वाङ्मयांत व बाराव्या आणि तेराव्या शतकांतील जुन्या मराठी वाङ्मयांत ओ किंवा वो ऐवजीं 'ॐ' हें अक्षर लिहिण्याचा प्रघात होता. 'देॐ आत्मरमणु । मी कामबाणीं विच्छिन्नु ॥'—ऋ ८६.

**ओ**—मराठी वर्णमालेंतील तेरावा स्वर. अक्षरविकास—अशोकाच्या गिरनार लेखांत ओ आहे व पुढें १२ व्या शतकापर्यंत निरनिराळ्या आकाराचे ओ सांपडले आहेत. पण आज आपण लिहितों तसा (डोक्यावर मात्रा असणारा) ओ पूर्वी कोठेंहि आढळत नाहीं. पूर्वी पृष्ठमात्रा वापरीत.

**ओ**—उद्गा. हाक मारली असतां उच्चारावयाचा ध्वनि. —स्त्री. १ हांकेस द्यावयाचें उत्तर. (क्रि० देणें) २ ओकारी होत असतां होणारा आवाज, ओकारी, वांती. (क्रि० येणें) 'ओ येईपर्यंत जेवला.' [ध्व.]

**ओ**—सना०स्त्री. (साष्टी-कोळी) ती; वो. 'नाचत गेली ओ कांवी वनाला ।'—मसाप १.२.१९. सनापु—(खा.) हा, तो 'पन ओ टोंगेहे एहे जांईन केडो दोवडी आलो नाहा!' =पण हा ठकवितो हें जाणून कोणी धांवून आलें नाहीं. —भि १८ 'खेरो आख्यो त ओ अर्थ बरोबर होमजुनो नाहा' =खरें म्हटलें तर हा अर्थ नीट समजत नाहीं. —भि ३१. [हिं वो] **ओ कां ठो**—कांहीं देखील. (याचा उपयोग नेहमीं अकरणरूपी होतो). (वाप्र.) 'ओ म्हणतां ठो येईना' १ 'ओ चा ठो करतां न येणें' =मुलाला धुळाक्षरें शिकविण्याच्या अगोदर ॐ नमःसिद्धं हें शिकवितात. ओ म्हणजे अर्थात् अगदीं पहिलें अक्षर, तें देखील येईना म्हणजे तो अगदीं अक्षरशत्रु आहे. ठो हें अक्षर केवळ ओबरोबर ध्वनिसादृश्यासाठीं योजिलें आहे. त्याला कांहीं अर्थ नाहीं. 'त्याला ओ कां ठो देखील कळत नाहीं' म्हणजे हें अक्षर ओ आहे कीं ठो आहे हें देखील त्याला समजत नाहीं. 'संस्कृतामध्यें ओ का ठो करतां येत नसतांहि हिंदु धर्माविषयीं मख्खा सख्खा हात गप्पा ओकणार पाद्रीसाहेब कोणी पाहिले नाहींत?'—नि ८९. २ ओ म्हटल्यावर ठो—(ओ म्हटल्यावर ठो एकणारा असा) दगड, शुद्ध मूर्ख. ३ ओ चे ठो. ओ कां ठो पहा. 'वाचायला येण्याच्या नांवानें ओचं ठो म्हटलें तरी चालेल.' —पकोघे. **ओच ओळखणें**—(नुसता ओ येत असणें) ज्याला एकच गोष्ट माहीत आहे, म्हणजे कोणताहि विषय अथवा वस्तु याच्या एकाच अंगानें किंवा रीतीचें ज्याला ज्ञान आहे, त्याविषयीं निराळ्या रीतीचे विचारच ज्याच्या मनांत येत नाहींत अशा रम्याडोक्या, महामूर्खाबद्दल योजतात. **ओच्या नांवानें पूज्य, ओच्या नांवानें शून्य काढतां येत नाहीं, ओची गांड फाडतां येत नाहीं असा**—(ज्याला ओचें शून्य (गांठ)हि काढतां येत नाहीं असा), अक्षरशत्रु; मद्दड असा माणूस. **ओ देणें (देवानें, कर्मानें, प्रारब्धानें)**—नशिबानें हात देणें; दैव उदयास येणें. **ओ देणें**—(चोरानीं, भुतांनीं, वाघानीं इ०)—सुळसुळाट होणें, पाळतीवर असणें; धांवून, चालून येणें (हाक मारल्याप्रमाणें—वाघ, भूत इ० नीं.) **ओ येईपर्यंत** (जेवणें, खाणें)—ओकारी येईपर्यंत जेवणें, खाणें.

**ओइचणें**—अक्रि. (कों.) सुपांत घेऊन विशिष्ट प्रकारें हलवून धान्यातील कण्या, रव वगैरे काढणें. **०पाखडणें**—वैचणें पहा. [सं. आ+उत्+च=दाणे निवडणें]

**ओइरणें**—सक्रि (नगरी) तांदूळ आधणांत घालणें; धान्य दळावयाकरितां थोडथोडें जात्यात घालणें. वैरण, वैरणें पहा.

**ओई**—स्त्री. ओंवीचें ग्राम्य रूप. ओंवी पहा.

**ओऊळ**—स्त्री. (कों.) बकुळीचें झाड. —न. बकुळीचें फूल. [सं बकुल, बोवल] **०दोडा**—पु. बकुळीचें फळ.

**ओक**—स्त्री. १ वांती; वमन; ओकारी; उलटी. २ कर्नाटकांतील कार्तिकस्वामीच्या देवस्थानाच्या शेजारीं सांपडणारा

खडूसारखा एक पदार्थ (स्वामी पळून जात असतां पार्वती त्यांच्या मागें लागली तेव्हां त्यांनीं तिचें प्यालेलें दूध ओकून टाकलें अशी दंतकथा आहे तिला अनुलक्षून). ३ वांतीबरोबर बाहेर पडलेले पदार्थ. [ध्वनि; प्रा. ओक्किअ; का. ओक्करिसु=ओकणें]

**ओक**—पु. एक वृक्ष. मराठी बायबलांत यास अल्ला, अल्लोन, एला, एकोन असे प्रतिशब्द आढळतात. याच्या तीनशें जाती आहेत. याच्या लांकडाचा जहाजें बांधण्याकडे उपयोग करितात. याला मोरू, तिलंगसा, भारू, शिंदर वगैरे नांवें आहेत. याचे हिरवा ओक, करडा ओक, लोमेलोमा ओक, पिंगट ओक असे प्रकार आहेत. युरोपांत २९ मे रोजीं याचीं पानें अंगावर धारण करतात व त्या दिवसाला ओकदिवस म्हणतात. [इं.]

**ओकट**—वि. वकट; एक या अर्थी. 'ओकट लेंड मुंड नाल पुढें आणि लेंका । भक्तीबळें खेळ खेळे जनार्दनी एका ॥' –भज ११३ [ते. वकट; का. ओक=एक]

**ओकटा**—वि. वाईट; ज्याचा वाईट वास येतो व जो पाहिल्यानें डोळ्यांस त्रास होतो अशा पदार्थाबद्दल योजितात; घाणेरें किळसवाणें. ओखटा पहा.

**ओकटें**—न. १ (काव्य) त्रास; खेकटें; उपाधि; संकट पीडा. २ घुबड (निंदार्थक योजितात). ३ प्रेताची तिरडी ताटी. ४ एक प्रकारचें भूत अगर पिशाच्च. ५ कोणतीहि अशुभ दायक किंवा असह्य गोष्ट, वस्तु. [ओखटें]

**ओकणें**—अक्रि. १ वांती होणें; उलटी होणें. २ पाट फुटून पाणी बाहेर जाणें. –उक्रि. १ उलटून पडणें, पाडणें. २ (ल.) आवेशानें उच्चारणें, तोंडाबाहेर काढणें. (शाप, शिवी). 'मत्तेज क्षांति मला म्हणति अहाहा न ओक शापातें ।' –मोआदि ३२.२२ ३ अन्यायानें मिळविलेलें द्रव्य किंवा लांच वगैरे परत करणें; हरामानें खाल्लेला पैसा परत करणें. ४ बाहेर काढणें; ओघळणें (माळेचे मणी किंवा मोतीं). ५ मनांतील गोष्ट कोणाजवळ उत्सुकतेनें सांगणें. 'कोणाच्या जवळी ओकूं।' –संग्रामगीत १२. ६ बोलून टाकणें (पोटांत डाचत असलेलें). [का. ओक्करिसु=ओकणें; प्रा. ओक्किअ; सिं. ओकणु; तुल० सं. आवच्–आऊक–ओक; आवचनं–ओकणें (बोलणें). –भाअ १८३४; सं. उद्गिर्; प्रा. उग्गिर–भांडारकर]

**ओकती, ओक्ती**—स्त्री. (कों.) विहिरींतून पाणी बाहेर काढण्याचें एक साधन. दोन खांबांमध्यें किंवा एका बेळक्यामध्यें एक लांकडी दांडी असून एका बाजूला वजनासाठीं दगड व दुसऱ्या बाजूला वांबू जोडून त्याच्या खालच्या टोंकाला पोहरा लावलेला असतो. कोंकणकिनाऱ्याला व कर्नाटकांतहि हिचा विशेष प्रसार आहे. –लोक २.७६. [का. ओगमु=फेंकणें, फेंकविणें; ओगत=फेंकण्याची क्रिया. ओकणें ?]

**ओकबोक**—स्त्री. दुफाशीं सोंगट्यांनीं खेळण्याचा एक डाव. चारी रंगाच्या सोंगट्या एके ठिकाणीं ठेवून नंतर एकेक गड्यानें फांसे टाकावयाचे; ज्याला ज्या सोंगटीचें दान पडेल ती त्यानें घ्यावयाची व त्या रंगाची संपली असेल तर आपल्या जवळची ओकावयाची म्हणजे पुन्हां मध्यें ठेवावयाची. फांशांवरील दान पांच पडलें तर काळी, दहा पडलें तर पिंवळी, बारा पडल्यास लाल व नऊ पडल्यास हिरवी असें ठरलेलें असतें. अशा तऱ्हेनें एकेका रंगाचा कट झाला (चारी सोंगट्या मिळविल्या) म्हणजे मग ओकावयाला नको. मधील सर्व सोंगट्या अशा डावानें घेऊन झाल्या म्हणजे कोणावर किती चढले तें ठरवावयाचें. २ (ल.) हिसकाहिसकी; देणें घेणें. 'हल्लीं चाललेला ओकाबोकीचा प्रकार सुधारलेल्या राज्यपद्धतीस गैरहिताचा आहे.' –टि १.५५७. [ओक द्वि.]

**ओकरा**—वि. ओकणारा; नेहमीं ओकणारा; ओकण्याचा स्वभाव असलेला. [ओक]

**ओकसाबोकशीं, ओक्शाबोक्शीं, ओक्साबोक्शीं**–क्रिवि. उक्साबोक्शीं. रडणें अनावर होऊन उमाळा येतो तसें; मोठ्या आवेशानें आणि हेल काढून (रडणें). 'तिचा शोक तिला आवरेना, आणि ती ओक्साबोक्शी रडूं लागली.' –मायेचा बाजार. [सं. वक्षस् द्वि.]

**ओकळी**—पु. (कर्ना.) तांबडा रंग; होळी, उत्सव किंवा लग्नसमारंभांत एकमेकांच्या अंगावर शिंपडतात तो तांबडा रंग. [का; तुल० इं. ओकर=गेरू]

**ओका–के**—वि. १ उघडें; नागडें; बुच्चें; भुंडें; नेहमींचा अलंकार अगर वस्त्राशिवाय (शरीर, अवयव इ०) (सामा.) बोका या शब्दाबरोबर प्रयोग. 'नाहींतरी कान, गळे, हात ओकेबुके कधींच राहावयाचे नाहींत.' –भाऊ २.३. २ सुनें; शून्य. 'सगळें घर आपली सखी येथें नाहीं त्यामुळें ओकेंओकेंसें झालें आहे.' –रप्र ७४.

**ओकाओक, ओकाबोक**—स्त्री. अतिशय, एकसारखी वांती होण्याची क्रिया; (सामा.) वांती; ओकारी. (क्रि० होणें). [ओक द्वि]

**ओकांबा**—पु. (राजा.) कोरडी वांती; वांतीपूर्वी येणारा उमासा. ओबक पहा.

**ओकांबा**—पु. (बेळ.) रातांबा; कोकंब; कोकम. [ओक+आम्ल]

**ओकाबोक**—ओकबोक पहा.

**ओकारणें**—अक्रि. १ मळमळणें. २ (ल.) कंटाळणें; त्रासणें; किळस येणें. [ का. ओक्करिसु=ओकणें. ओक पहा. ]

**ओकारा-री**—पुस्त्री. १ वांती; कळमळून, उन्मळून येणें; उलटी. ओक पहा. २ ( विशे. ओंकारा ) तोंडांत घातलेला घांस पुरता गिळला न जातां बाहेर पडतो तो. ३ ( ल. ) त्रास; मळमळ; कंटाळा; वीट; किळस. ( क्रि० येणें ) [ ओ करणें; का. ओक्करिसु=ओकणें; सिं. ओकार ]

**ओंकारेश्वर**—१ बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक; हें नर्मदेमध्यें इंदूर संस्थानांतील मोरटक्का स्टेशनजवळच्या एका बेटावर आहे २ पुणें येथील ब्राह्मणी स्मशानाजवळील एक प्रख्यात शिवमंदिर. (सामा.) स्मशान. यावरून **ओंकारेश्वरावर गोंवऱ्या जाणें**–मरावयास टेंकणें; अति वृद्ध होणें. ' गोखले काय आणि टिळक काय दोघांच्याहि गोवऱ्या आतां बहुतेक ओंकारेश्वरावर गेल्या आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. ' –टि ३.३०१.

**ओंकीर**—पु. ( गो. ) डोळयांतून निघणारा मळ. पू. उकीर अर्थ ३ पहा.

**ओखट**—वि. ( काव्य. ) वाईट; किळसवाणें; वोखट ' कुंतीचा माद्रीचा उत्तम, माजाचि ओखटा कुसवा । ' –मोस्त्री ३.११. [ सं. उच्छिष्ट ( ? ); अवशिष्ट ]

**ओखटवण-णी**—नस्त्री. १ गुरें धुवावयाचें पाणी. २ भांडीं घासलेलें खरकटें पाणी; ( सामा. ) गढूळ पाणी; वाईट घाणेरडें पाणी. [ ओखट+वन=पाणी ]

**ओखटवणें, ओखटवाणा-णी**—वि. वाईट; घाणेरडें खराब; ओंगळ; किळसवाणें ( पाणी, जागा, माणूस, वस्तु ). [ ओखट+( कुण. ) वाणी=सारखा ]

**ओखटा**—वि. ओखट. ओखट पहा.

**ओखटा**—पु. आईबाप गांवीं गेले असतां किंवा त्यांचा वियोग झाला असतां त्यांबद्दल वाटणारी खंती (लहान मुलाची); ध्यास; हाय. ( क्रि० धरणें; करणें ). [ ओका ( ? ) ]

**ओखटी वेळ**—स्त्री. वाईट वेळ; अशुभ मुहूर्त.

**ओखटें**—ओकटें पहा. १ घुबड. २ पीडा; संकट. ' तों पुढें आणिक संकट। दैवें ओढवलें दुर्घट । जेथें चिंतावला वैकुंठनाथ । म्हणोनि ओखटें वाटलें । ' –जै ६१.६१.

**ओखड-द, ओखाड-द**—न. औषध; दवा; वखाद. 'जाणतसां द्रोणाला धृष्टद्युम्नाख्य दिव्य ओखद हो ! ' –मोभीष्म ३.१४. ' खाय हें ओखद रामनामामृत । '–ज्ञागा ६. [ सं. औषध; चि. गु. ओखड; कु. ओखाद; माण. वखाद ]

**ओखदी**—वि. औषधी; औषधविषयक; औषधोपयोगी: दुखणें नाहींसें करणारें. [ सं. औषध ]

**ओखरणें**—उक्रि. वखरणें पहा. [ सं. उत्+कृ ]

**ओखळणें**—अक्रि. ( कु. ) ( पाऊस ) ओसरणें. [ सं. आ+उ किंवा उत्+स्खलन–म. खळणें ]

**ओखयंवचें**—अक्रि. ( गो. ) समाधान पावणें.

**ओग**—पु. १ ( भि ) जुलाब. ' हातीं तो खूब ओकां आन ओगां टेक्यो '=मग त्यास पुष्कळ वांत्या व जुलाब झाले. –भि २५. २ वेग; वेदना; (विंचू, सर्प इ०) चढणें. ' वृश्चिक नांगीवरी मधुबिंदु । देखोनि धांवे मतिमंदु । चाखों जातां खेदु । ओग आला अपार ॥ ' –मुरंशु ३६३. [ सं. आ+वेग ]

**ओगटी**—ओकती पहा.

**ओगडावण**—( गो ) हुरविणें. आगडणें पहा.

**ओंगण**—न. गाडीच्या, रहाटाच्या कण्याला किंवा सांध्याच्या ठिकाणीं फार घर्षण होऊं नये म्हणून लावण्यांत येणारें तेल, वेरी, चरबी, वंगण. म्ह० घरचाहि गाडा ओंगणावांचून चालत नाहीं [ सं. अंजन ]

**ओगर**—पु. पानांत वाढण्यासाठीं मोठ्या भांड्यांतून पळीनें उकरून काढलेली ( भाताची ) रास, मूद. २ घास. ' काळयवनाचा ओगरू । पुरडैला देतुसें ढेकरू ॥ ' –शिशु ४४०. [ का. ओगर=भात; का. ओग्गर=रास ]

**ओगरणें**—सक्रि. अन्न वगैरे वाढणें. ' काळापुढें त्वदनयें ओगरिलें स्वकुल ताट कळलें कीं । ' –मोभीष्म ६.२७. ' रत्नखचित मांडिलीं ताटें । तळीं तिवई ठेविलीसे नेटें । माजी ओदन ओगराळें स्पष्टें । जेवीं कळया मोगऱ्याच्या ॥ ' –जै ९.२८ [ ओगर ]

**ओगराळें**—न. वाटीस मागें दांडी लावलेलें एक पात्र यांतून भाताच्या मुदा पाडतात व पातळ पदार्थ वाढतात. [ का. ओगर+सं. आलय; गु. ओगराळो ]

**ओंगल**—( सांकेतिक गुन्हेगार जातींत रूढ ) एक हजार; ( १००० ) संख्या.

**ओगळ**—पु. ओळक पहा.

**ओगळ-ळी-णें**—ओघळ-ळी-णें पहा.

**ओंगळ**—वि. १ वाईट; घाणेरडें; किळसवाणा; अमंगळ; घाण खपणारा ( पदार्थ, माणूस ). २ ( ल. )कडक; त्रासदायक; रागीट; अशुभकारी. ' बहिरोबा आहे ओंगळ । त्याचा नवस पाहिजे फेडला ॥ ' –ऐपो ४८. [ सं. अमंगल; कुण. वंगाळ ] ०**वाणा**–वि. अमंगल; अशुभ; वाईट; घाणेरडा; किळसवाणा. ' असें ओंगळवाणी बोलूं नये. ' [ ओंगळ+वाणा ] ०**सोंगळ**–वि. वाईटसाईट; खराब. ' तो अतिशय ओंगळसोंगळ आहे. ' [ ओंगळ द्वि. ]

**ओगा**—पु. जोंधळा काढल्यावर कणसासकट त्याच्या ताटांच्या पेंढ्या बांधून खळयांत जो ढीग घालतात तो. [ का. ओग्गु=रास, ढीग ]

**ओगोत**—पु. ( गो. ) कुण. वखत. १ वेळ. २ उशीर.

**ओघ**—पु. १ प्रवाह; घोत; लोट; लोंढा. 'तो उत्साहो न संवरे। इंद्रिय ओघां॥'–ऋ ६३. 'ऐका कैसा ओघ भारतीं यवनांचा लोटला।'–विक ३०. २ लहानशी नदी; नदीचा फाटा; ओहोळ; ओढा. 'गंगा शेंकडों ओघांनीं समुद्रास मिळते.' ३ (ल.) परिपाठी; परंपरा; वहिवाट; क्रम; लौकिक, रूढ पद्धति. ४ ( संगीत ) द्रुत ताल; जलद ताल; आलाप घेणें. ५ समुदाय, जमाव. [सं.] ०येणें–प्रवाह येणें; लाट येणें. (शब्दशः व ल०). **ओघाओघाखालीं**–चालू प्रवाहांत; (एक पद्धति) अंमलांत असतांना ( देणें, करणें इ० ) **ओघाओघाचा**–प्रवाहाचा किंवा पद्धतीचा. **ओघाओघानें**–पद्धतीनें; ओळीनें; क्रमानें **ओघांत पडणें, ओघास येणें**–पद्धतींत समाविष्ट होणें; क्रमांत सांपडणें, क्रमानें प्राप्त होणें. 'तिचा नाश करणें ओघास आलें तरती गोष्ट निराळी.'–विवि १०.५–७ १२३. **ओघाबरोबर वाहात जाणें**–प्रवाहाप्रमाणें जाणें, सामान्य जनरीतीप्रमाणें वागणें. 'तथापि ओघाबरोबरच जाणारे लोक अधिक असतात'–टि २.४५०.

**ओघरणें**—अक्रि. फोडणी देणें. 'तकें ओघरिलीं।'–राक [का. ओग्गरण=फोडणी, मसाला; ओग्गरिसु=फोडणी देणें, मसाला लावणें]

**ओघळ**—पुस्त्री. पाण्याचा लहानसा प्रवाह, ओहोळ; ओढा; पर्हा; झिरपा; झरा; पाट २ पाट, झरा, पातळ पदार्थ वाहिल्याची खूण. 'तोंडावरचा ओघळ तसाच आहे, जा धुवून ये!' ३ डोंगरांतील पाणी वाहून पडलेला चर; ओघळण; हरळ. [सं. ओघ+गल्; अवगल=अहान दरी, प्रा. ओग्गाल]

**ओघळणें**—उक्रि. १ माळेंतून निसटणें; बाहेर काढणें 'सरांतून त्यां दहा मोतीं ओघळलीं' 'हातांतून बांगडया ओघळल्या' २ ढिगांतून थोडासा अंश काढून घेणें; 'तांदूळ ओघळले' 'शेरभर ओघळला.' 'पांच रुपये ओघळले.'-अक्रि. १ पाझरणें; बारीक प्रवाहानें सरणें; गळणें २ मोत्याचें वेज मोठें होणें; दागिन्याच्या वजनाच्या भारानें कान, नाक यांचें भोंक मोठें होणें, खालीं उतरणें. ३ माळेंतून मणी, मोतीं वगैरे बाहेर पडणें; गळून पडणें; तुकडे पडणें ४ गुटणें; बारगळणें; वगळला जाणें. [ओघळ]

**ओघळनिघळ**—पु. ( भिंतीवरून, तोंडावरून, जमिनीवरून ) वेडावांकडा, अनियमित मार्गानें वाहणारा प्रवाह [ओघळ द्वि.]

**ओघळी**—स्त्री. १ लहानसा ओघळ; झरा; पाट; स्राव. २ पाण्याच्या प्रवाहामुळें पडलेला चर; घळण; हरळ. [ओघळ लघुत्वदर्शक. स्त्री.]

**ओचका**—पु. एखाद्या गोष्टीचा उत्कट ध्यास, भीति, अगर ती हटकून होईल असें वाटण्यामुळें होणारा खरोखरीचा भास; स्वप्न पडण्यास कारण होईल इतका मनावर पडलेला पगडा. उचका पहा. [वचक]

**ओंचणें**—ओइंचणें, वेंचणें पहा.

**ओंचा**—पु. १ वस्त्राचा लोंबता घोळ; नेसलेल्या वस्त्राचा सोगा. २ धोतराचा किंवा लुगडयाचा सोगा कमरेशीं खोंवल्यानें पडणारी घडी; वस्त्राचा कांठ धरून मध्यें थोडासा मोकळा सोडून पुढें दुसरे स्थळीं धरून तेथेंच घ्यावे या प्रकारें केलें असतां जे अवच्छेद पडतात ते प्रत्येक. -शास्त्रीको. [सं. अंचल; अवचय–ओचअ–ओंचा–राजवाडे ( भाअ १८३२ ) ?]

**ओच्छेद**—स्त्री ( कों ) छाया; सावली. [आदि+च्छद?]

**ओज**—स्त्री. १ काळजीपूर्वक केलेला उपचार, संस्कार, पदार्थ उत्तमप्रकारें टिकावा म्हणून घेतलेली काळजी, सांभाळ, निगा ( क्रि० राखणें ) 'शरीरसुखाचेनि ओजें। सत्य संसार भाविला॥'–मुआदि २०.६६. २ (एखाद्या कामाची) आस्थेनें पूर्तता करणें; नीट उरकणें, पार पाडणें. ३ कुशलता; चातुर्य; व्यवस्था; टापटीप. ४ नीट, व्यवस्थेशीर मांडणी, रचना, स्थिति; बरी रीत. म्ह० घराची ओज आंगण सांगतें. ५ ( राजा. ) सवय [का. ओजिसु=काळजीपूर्वक, व्यवस्थेशीर बनणें; ओजे=व्यवस्थितपणा, सदभिरुचि]

**ओज**—न. १ चैतन्य; उत्साह; तेज, प्राणशक्ति; जीवन. २ धातूवरील चमक, झिलई. ३ पाणीदारपणा; धैर्य; पुरुषार्थ; पौरुष. ४ कळा; तेज; पाणी. ५ ( साहित्य ) एक काव्यगुण, काव्योत्कर्ष साधक असे भाषेचे जे तीन गुण ( माधुर्य, ओज, व प्रसाद ) सांगितले आहेत त्यांतील एक; भाषेंतील जोरदारपणाचा गुण. उदा० वामनाच्या नृसिंहअवतारामधील श्लोकांपैकीं पुढील एक असा -' अमर तो मरतो अति लौकरी। चपळ तो पळतो परितां करी। उखळला खळ लाघवलक्षणीं। विलपती लपती सुर त्या क्षणीं॥' [सं. ओजस्]

**ओजभी**—( राजा. ) अशोक वृक्ष.

**ओजणें**—अक्रि. काळजीची निगा राहणें, काळजीच्या संपादणुकीचा विषय होणें. 'शेत ओजलें तर पीक येईल.' [ओज]

**ओजली**—वि. ( गो. ) वजनदार, जड; ओझें पहा. [सं. वर्य; प्रा. वज्ज=श्रेष्ठ, प्रधान ?; म. ओझें; का. ओज्जे; म. ओझील]

**ओजविणें**—सक्रि. काळजीनें, आस्थेनें संपविणें, पुरें करणें; ( एखादा धंदा किंवा गोष्ट ) योग्य रीतीनें करणें; ( माणसें ) गुणसंपन्न किंवा तयार ( लायक ) करणें. [ओज]

**ओंजळ**—ओंझळ पहा. 'पुत्र देईल पितया ओंजळी।' -वसा १७. [ सं. अंजलि ]

**ओजार**—अवजार पहा.

**ओज्यें**—(गो.) ओझें पहा.

**ओझडणें**—ओझरणें पहा. 'त्यांची पर्जन्याधारीं देखा। पुष्पें ओ(वो)झडी झाली रुखा॥' -मुआदि ८.१०५.

**ओझर**—पु. १ धार; झिरपा; पाझर; ओघळ, पाट. २ लोंढा; प्रवाह; ओढा. [सं. अव+क्षर्; तुल० निर्झर; प्रा. ओज्झर= झरणारा, प्रवाह ]

**ओझरणें**—अक्रि. १ पाझरणें; स्रवणें; गळणें; झिरपणें. २ पाट वाहणें; ओढ, नाल, बनणें. ३ (सूज) कमी होणें; उतरणें; ओसरणें. [ ओझर ]

**ओझरणें**—उक्रि. घासटणें; पुसून टाकणें-जाणें. झाजरणें पहा

**ओझरता, ओझडता**—क्रिवि. अर्धवट; निसटता; कांकरता; वरवर, निसुरता (क्रि० पाहणें, लागणें; पडणें; जाणें, दिसणें; (क्वचित्) दाखवणें; देखणें.) [ सं. अव+क्षर्=प्रा. उज्झरिअ, ओज्झर ]

**ओंझळ**—स्त्रीपु. १ दोन्ही हात जोडून झालेली पोकळी, पुडा; जुळलेले दोन पसे. २ पितरांस द्यावयाची तिलांजलि. **म्ह०** ओंजळीनें पाणी पिणें=तंत्रानें, कलानें, मिनतवारीनें, मिंधेपणानें वागणें; परस्वाधीन असणें. [ सं. अंजलि ]

**ओझा**—पु १ उपाध्याय. २ एक हिंदी आडनांव; मराठी ओझे (आडनांव). [ सं. उपाध्याय; प्रा. उवज्झाअ-ओज्झाय हिं. ओझा; का. ओज=गुरु, शिक्षक ]

**ओझीक-ल**—वि. १ ओझें वाहणारा; हमाल. २ न दमतां नेणारा; भारी वजन सहन करणारा. ३ (ल.) न कुरकुरतां कुटुंबाच्या अडचणी पार पाडणारा, (विशेषतः ओझिक याचा अर्थ) [ ओझें ]

**ओझीगंखण**—स्त्री. (कु.) सुताराचें एक हत्यार; एक प्रकारचा रंधा.

**ओझें**—न. १ भार; बोजा; वजन; जड पदार्थ. २ (ल.) एखाद्यानें आपल्यावर केलेल्या उपकाराचा भार; काळजी, जबाबदारी, कर्तव्य यांचा भार. 'तुजवर घातलें गडाचें ओझें।' -ऐपो ४२. ३ धान्य, गवत, वगैरेचा बांधलेला बोजा, गठ्ठा; मनुष्य किंवा पशु इत्यादिकांनीं वाहावयाजोगा काष्ठ, दगड इ० परिमित असा पदार्थ. ४ (गो.) टोपली किंवा हारा. [ सं. वाह्य; दे. ओझ्झ तु. का. ओज्जे ]

**ओझेकरी**—पु ओझें वाहणारा; हमाल; हेलकरी.

**ओझेरी, ओझेल-ली**—वि. १ (गो.) ओझेकरी; हमाल २ पुष्कळ ओझें नीटपणें वाहणारा (तट्टू, बैल इ०). ३ कोणतेहि कामाचें ओझें अंगावर पडलें तरी न कंटाळतां निर्वाह करणारा. [ ओझें ]

**ओझोन**—पु. हा वायु प्राणवायूचें रूपांतर आहे. हें रूपांतर प्राणवायूमध्यें विजेच्या ठिणग्या सोडून किंवा अन्य तऱ्हेनें घडवून आणतां येतें. या वायूचें गुरुत्व प्राणवायूच्या दीडपट असतें. यास एक प्रकारचा चमत्कारिक वास येतो. [ इं. ]

**ओट**—न. एक प्रकारचें थंड हवेंत उगवणारें धान्य व गवत. हें घोडा व मनुष्य यांना खाण्यास उपयोगी पडतें. [ इं. ]

**ओट**—पु. गाडीच्या चाकास टेकण्यासाठीं लावलेला दगड. उट, उटी पहा. [ सिं. ओथ ]

**ओंट, ओंटंब**—पुस्त्री. ओटआंबा; गोमांतक व कर्नाटकमधील एक आंब्यासारखें झाड; याचीं पानें कुडयाच्या पानासारखीं असून फळें कार्तिकांत येतात, त्यास ओटआंबा म्हणतात. त्याच्या सुकविलेल्या कापट्यांना ओटाचीं सालें म्हणतात. चिंच किंवा कोकंबाऐवजीं सांगत तीं वापरतात. पिकलेल्या ओटांचें लोणचें, रायतें व सार करतात. [ सं. ओष्ठ; का. ओंटे; लॅ. गार्सिना कांबोगिआ ]

**ओटंगण**—पुन. टेकावयाचा लोड, गिर्दी, तक्क्या वगैरे; टेकण. [ ओट=उट ]

**ओंटभरण-णी**—नस्त्री. ओंटीभरण पहा.

**ओंटवणी**—न. ओंटाच्या तुकडयांचें सार. [ ओंट+वणी= पाणी ]

**ओंटळा**—पु (कों.) धोतराची अथवा लुगडयाची ओंटी, जींत पुष्कळसे पदार्थ भरल्यामुळें मोठी दिसते ती. [ ओंटी ]

**ओटा**—पु. १ दगड विटा वगैरेंनीं बांधलेला घरापुढील कट्टा, चबुतरा. २ ओटी; ओसरी. ३ गच्चीपुढील वरवंडी किंवा लहानशी भित ४ पार. वरंबा; उंच ताटवा. 'ओटे लावीं रत्निकांत्। पार्यातिकांचे॥' -शिशु २५८. [का. ओट्टु=एकत्र करणें; ढीग, रास; तुल० सं वृत्त=गोल ]

**ओटा**—पु. कोबी इ० वनस्पतीस लागणारा पांढरा किडा. -बागेची माहिती २३.

**ओंटा**—पु १ धोतराचा किंवा लुगडयाचा घोळ, झाल; ओंटी पहा [का उडि=ओंचा ] **म्ह.** १ ओटयांत घालणें= दत्तक देणें; स्वाधीन करणें; पदरीं बांधणें. २ ओटयांत घेणें= दत्तक घेणें.

**ओटारणें**—अक्रि (डोळे) वटारणें पहा.

**ओटारणें**—अक्रि १ ओटा नांवाच्या किडयानें खाल्ल्यामुळें झाडाची वाढ खुंटणें. २ (ल.) कोणत्याहि कारणानें वाढ खुंटणें; (लहान मूल, रोप, इ०) ; अवथणणें. [ ओटा ]

**ओटाळी**—स्त्री. दोन दोन, तीन तीन ऊंस एके जागीं बांधण्याचें काम. (क्रि० करणें). [ वट; सं. वृत; का. ओट्टु=एकत्र करणें ]

**ओटी**—स्त्री. घराच्या माजघरापुढें किंवा मागें भित न घातलेली पडवी; ओसरी; सोपा. [ ओटा; गु. ओटली ]

**ओंटी, ओरटी**—स्त्री. १ ( गाय, म्हैस इ० ) जनावराची कांस. २ बेंबीच्या खालचा व गुह्यांगाच्या वरचा भाग. [ का. उडि=कंबर, कटिप्रदेश; तुल० सं ऊधस् ]

**ओंटी, ओटी**—स्त्री. १ लुगडें किंवा धोतराचा घोळ, खोळ; पदराचा किंवा उपरण्याचा घोळ; खोलगट भाग; ओंटा. 'फुलें ओंटींत घेऊन ये.' २ स्त्रीच्या नेसलेल्या लुगड्याच्या ओच्यांत किंवा पदरांत तांदूळ, सुपारी, हळकुंड, नारळ इ० घातलेले पदार्थ; ओंटींत घालावयाचे पदार्थ [ का. उडि=ओंचा, ओटी; प्रा. उअट्टी=लुगड्याची गांठ, नीवि. ] ०**भरणें**–१ सुवासिनीच्या ओंटींत फळें, फुलें तांदूळ वगैरे घालणें; ओंटीभरणविधि करणें. 'गतधवा स्त्रिया येउनि। ओंटी भरिति मृत्तिका घेउनि।' 'आजचा ओटी भरण्याचा समारंभ कांहींसा मामींच्या हौसेखातर .. ... व्हावयाचा होता.' –ह्यांमु २ वाङ्निश्चयाच्या वेळीं वधूच्या ओंटीचा विधि करणें. –ऐरापुप्र ३३७. ३ ( ल. ) जीवदान देणें ( मुलास, नवऱ्यास ). 'वैद्य बोवा माझ्या मुलाला बरें करून माझी ओंटी भरा.' **भरल्या ओंटीनें**–१ सुखरूप प्रसूत होऊन मुलासह. २ सवाष्णपणीं ०**करणें** ( गाय इ० कांनीं )–गरोदरपणीं विण्याच्या पूर्वी त्यांची ओंटी ( कांस ) परिपुष्ट होणें. **ओंटींत घालणें**–सक्रि. १ दत्तक देणें. 'तीकशी वरं आपला मुलगा तुझ्या ओंटींत घालील?' २ पदरीं बांधणें. 'हा अन्याय तुम्ही उगीचच्या उगीच माझ्या ओंटींत घालीत आहां!' ३ आश्रयार्थ स्वाधीन करणें, हवालीं करणें. 'पोरीला मी तुमच्या ओंटींत घालीत आहे, तिचा पोटच्या मुलीप्रमाणें सांभाळ करा.' **ओंटींत घेणें**–सक्रि. १ दत्तक घेणें २ आपलासा म्हणणें; आपुलकीचा भाव ठेवणें. **ओंटींत देणें**–सक्रि. दत्तक देणें; स्वाधीन करणें.

**ओंटीभरण**—न. १ गर्भाधान. २ गर्भारशीच्या आठव्या महिन्यांत ( किंवा आधींहि ) अनेक सुवासिनी मिळून पतिसमवेत तिच्या ओंटींत तांदूळ, नारळ वगैरे पदार्थ घालतात तो विधि ( सुखानें प्रसूति व्हावी म्हणून ). ओंटीभरणें पहा.

**ओटो**—( इं. ) अत्तर; सुवासिक तेल उ० ओटो दिलबहार–मोहिनी [ अर इत्र. इं ]

**ओटोळा**—शेतांतील माळा; भटाळी, अटोळी पहा 'ओटोळ्या जवळी पातला।' –दावि ३४७.

**ओठ, ओंठ**—पु ज्यानें दांतांची कवळी झांकली जाते असा नाकाच्या खालचा व हनुवटीच्या वरचा मांसल भाग; अधर. [ सं. ओष्ठ; ज्सीगन उष्ठ, वुष्ठ; प्रा. ओठ्ठ ] ( वाप्र. ) ०**करपणें**–फजिती होणें; पराभव होणें. 'कुरुगुरुसवें झगडतां त्या सुरगुरुचेहि ओठ करपावे।' –मोविराट ६.९०. ०**चावणें**–( अतिशय राग आला असतां मनुष्य स्वतःचा ओठ चावतो ) त्वेष येणें; मोठा राग येणें. 'त्याउपरि ओंठ चावुनि शकुनि प्रेषी कराल करवाल।' –मोशल्य ४.२९. 'चावती मराठे ओठ' –संग्रामगीतें ३३. ०**फुटणें**–थंडीनें ओंठाला चिरा, भेगा पडणें. **ओठाचा जार न वाळणें**–बाल्यावस्थेंत असणें, लहानपण न संपणें; तरुणपणांत येण्यापूर्वीच्या स्थितींत असणें. 'ओठाच्या वरचाहि जार अजुनी नाहीं तुझ्या वाळला।' –कुशलवाख्यान ४१. **म्ह०** १ ओठ पिळला तर दूध निघणें=लहान वयाच्या माणसानें शक्तीबाहेर काम केल्यास त्याला हिणविण्यासाठीं योजतात. 'ओंठ पिळला असता तर खरंच दूध निघालं असतं' –तोबं २०. २ ओठांतून कीं पोटांतून–( व. ) अंतःकरणापासून कीं नुसतें वरवर ( बोलणें ) **ओठाबाहेर काढणें**–बोलून दाखविणें. **म्ह०** ओंठाबाहेर तें कोठाबाहेर. **ओंठापर्यंत येणें**–( कोणतीहि गोष्ट ) प्राप्त होण्याची संधि येऊन पोचणें. ( टीप–देशावर ओठ याऐवजीं होट हा शब्द विशेष प्रचारांत आहे. )

**ओंठंगण-णें**—न १ ज्यावर तोल टाकतां येईल, टेकतां येईल, रेलतां येईल असा ( लोड, भिंत, खांब वगैरे ) पदार्थ. २ ( ल. ) आधार; आश्रय; पाठिंबा; टेकू; आश्रयदाता; पुरस्कर्ता. [ सं. अवष्टंभन ]

**ओंठंगणें**—अक्रि. १ रेलणें; टेकणें; तोल देणें. 'दूर वनीं जाउनि तो ओठंगुनि तरुसि बैसला क्षत्ता.' –मोआश्रम ४.४४. २ ( ल ) अवलंबून राहणें (आश्रय, संरक्षण, आधार यासाठीं); उत्सुक असणें; भिस्त ठेवणें. ३ झेंपणें; आहारांतील असणें; उरकण्यासारखें, व्यवस्था लावतां येण्यासारखें असणें. 'जें काम ओठंगेल तें करावें.' [ ओठंगण ]

**ओठणें**—अक्रि वर येणें; बाहेर पडणें, उठणें; ठळकपणें दिसणें ( शिक्का किंवा ठसा); इतर अर्थासाठीं वठणें पहा. [उठणें]

**ओठरणें**—अक्रि. १ 'ओटारणें' पहा ( दोन्ही अर्थी ). २ दुर्मुखणें; आठरणें, अटरणें पहा. 'नेहमीं पहावें तेव्हां तूं ओठरलेला, कधीं चेहऱ्यावर तजेला नाहीं.'

**ओंठविणें, ओठाविणें**—उक्रि. ( कों. )(वेडाविण्यासाठीं ओठ काढून दाखविणें ) वर्मायाजोगें बोलणें; टोमणा मारणें; खरडपट्टी काढणें; दोष देणें; टिंगल करणें. 'एक दिवस तुम्हांस बोलवावयास विसरलों म्हणून इतकें ओठावता कशास.' [ओंठ]

**ओठाळ**—वि. जाड ओठाचा; बाबर ओठ्या. [ ओष्ठ ]

**ओंठाळी**—स्त्री. घोड्याच्या खालच्या ओठास बांधावयाची काढणी; दोरी ( चरावयास सोडतांना ). [ ओठ+आळा ? ]

**ओंठिंग, ओंठिंगणें**—ओठंगण, ओठंगणें पहा.

**ओड, ओडक, ओडकर, ओडगस्त, ओडघस्त, ओडगस्ती, ओडघस्ती, ओडण, ओडणी, ओडणें. ओडदोरा, ओडव, ओडवणें, ओडा, ओडाताण, ओडाळ इ०**—ओढ या शब्दाखालीं पहा.

**ओंड**—स्त्री. १ सुरमाडाची पोय, लोंगर, फलसमुदाय. २ ( नाचणीवरील ) टरफल; टरफलासह नाचणीचे दाणे. [ ? ]

**ओंड**—स्त्री. एक झाड.

**ओंड**—वि. खोल ( पाणी, विहीर, खड्डा, खाचर ). 'महाराष्ट्र भाषेचे प्रयोग ठरविण्याच्या ओंड पाण्यांत त्यांनीं शिरणें म्हणजे पुष्कळ अंशीं हितोपदेशांतील अव्यापारेषु व्यापार करूं जाणाऱ्या वानरासारखीच अवस्था होय ' –नि ९१७ 'ती ओंड शब्दानें म्हणाली 'समाचार बहुत वाईट आहे.' ' –बाळ [ का. ऑडु=गढूळ पाणी, तळचें पाणी, गाळ ] ०करणें– (कों ) जास्त खोल करणें. ०पणा–खोली. ' एके बाजूचा ओंडपणा कमी केला. ' –भू ९९.

**ओंडकर, ओंडका, ओंडकी, ओंडकूर, ओंडकें, ओंडी**—पुस्त्रीन लांकडाचा टोकळा, खोड. ' खांद्यावर एक मोठें ओंडकर घेऊन येतो. ' –तुफान नाटक ७१. [ का. ओडक=फोड लेली, मोडलेली स्थिति ]

**ओडण**—न. १ ( काव्य. ) ढाल. ' कोणी शिर्गी धर्गिती ओडण । ' –जै ३३.४५. २ ( ल. ) पांघरूण. ' जडेचे ओडण । करीत पळती तपोधन ॥ ' –शिशु २७१. ३ ' ओढण ' पहा [ सं. अवगुंठन=ओढण ]

**ओंडण**—वि. ( कों. ) ओंड; खोल आणि पुष्कळ पाणी मावण्याजोगें ( भातखाचर ); उखरच्या उलट. –न. खोलगट शेत, खाचर. ' डोंगरांतून ओंडण तुडवीत तो किल्ल्यावर पोहोंचला ' [ ओंड=खोल ]

**ओडणी**—स्त्री. ( राजा. कुण. ) ( पोटांतील ) वेग; कळ [ ओढणें ? ]

**ओडप**—पु. ( तंजावरी ) भंग. ' पाऊस अतोनात पडल्यानें नदीस ओडप ( वडप ) आला आहे. ' [ ता. ओडप्पु=तूट, भंग. का. ओडक=भेग; भग्नावस्था ]

**ओडंबर**—न. चमत्कार. आडंबर पहा. ' निजशक्तीचेनि ओडंबरें । ' –विपू ७.४९. ' नभीं धूम्राचे डोंगर । उचलती थोर थोर । तैसें दावी ओडंबर । माया देवी ॥ ' –दा ७.४.४०.

**ओडंबरी**—स्त्री. ( काव्य. ) गारुडीविद्या; माया; ऐंद्रजाल; जादू. ' कीं विषाचें शीतलपण । कीं ओडंबरीचें भूपण । कीं गंधर्वनगरीचें सैन्य । तैसें जाणू स्वर्गसुख ॥ ' –ह १३.२६. **ओडंबरीचें लेणें**–जादूनें उत्पन्न केलेला अलंकार, वस्तु; तकलादी वस्तु.

**ओंडवा**—स्त्री वाळवी; वाळिवा, (गो.) अळंवा, ओळंयो आळंवा पहा.

**ओडवण**—स्त्रीन १ ढाल. ओडण अर्थ १ पहा. २ ( ल ) आडकाठी; संरक्षण. ' जन अुगाग्नी निंदेचे पाषाण । पुढें केलें क्षमा ओडवण ॥ ' –ह २०.१५.

**ओंडवण**—न. ( कों. ) खोलगट व खळखळट अशी जमीन, तळ, खाचर. [ ओंड ]

**ओडवणें**—अक्रि. १ पुढें होणें; पुढें करणें; प्राप्त होणें. ' कलिकापात्रें ओडवीलि भली । जाति कलिकाची ॥ ' –शिशु ७६८. ' शुद्धमती घाली जीवन । राजा प्रक्षाळी चरण । सकलतीर्थे आलीं धावोन । तळीं माथा ओडविती । ' –ह २८ १३८. २ (ल.) वर्णन करणें. 'नमी ओडवीं कथासंगती ॥' –दाव १५.

**ओडवणें**—क्रि. भोगास येणें ओडवणें अर्थ २ पहा. ' बहु वय भरलें, उरलें थोडें तों काय कर्म ओडवलें । ' –मोद्रोण २२. २०.

**ओडवी**—स्त्री. ( गो. ) देवीच्या नांवानें जेवावयास घालण्यांत येणारी कुमारी. –हिंदु ११।२।१९३०.

**ओडसणें**—( गो ) झाडझुडप छाटून मोकळी जागा करणें. अडसणें पहा.

**ओंडा**—वि. खोल ( पाणी इ० ). ओंड पहा.

**ओंडा**—पु. १ लांकडाचा टोकळा, तुकडा, खांड. २ (कों.) केळीचे लोंगर तोडून घेतल्यानंतर जमिनीवर वाढलेला जो केळीचा भाग असतो तो हा भाग तोडला म्हणजे त्यालाहि ओंडाच म्हणतात ३ झाडाचें खोड, खोडाचा भाग, तुकडा. ४ मूर्ख; मठ्ठ. [का. ओडि=तोडणें, मोडणें; ओडे=खांड, तुकडा] ०पट्टी–स्त्री. सरकारी कामासाठीं जे ओंडे कापतात त्याची मजुरी भागविण्यासाठीं बसविलेला कर.

**ओंडा**—पु. गोंवर, माती वगैरे घालून तयार केलेली जागा, जसें–अळवाचा ओंडा, भाजीचा ओंडा. [ ओंडा ? ]

**ओंडा**—पु. पाण्याचा लोंढा; ओंढा. [ का. ओडि=झुळुझुळु वाहणें, झिरपणें ]

**ओडाण, ओढाण**—वि. ( राजा. ) ओढाळ; भटक्या; उनाड. [ ओढणें ]

**ओढ**—स्त्री. १ खेंच, आकर्षण; हिसका ( घट्ट करण्यासाठीं किंवा ओढण्यासाठीं ). ( क्रि० देणें ). ' इतर धर्माचे पाद्री लोक नीच मानलेल्या लोकांवर प्रेमाचें जाळें पसरून त्यांस आपल्यांत ओढीत. या त्यांच्या ओढीला विरोध करणारा आजपर्यंत कोणी नव्हता. ' –दयानंदसरस्वती २३९ २ ताण, जोर, दाब ( लांबविण्यासाठीं ); आंवळ. ( क्रि० घालणें; बसणें; पडणें ). ' तुरटीच्या पाण्यानें माझ्या दांताला ओढ बसली आहे. ' ३ ओढा-

वयाचा दोर; ओढण्याचें कोणतेंहि साधन, सामान. ४ ओढीत नेण्याचा किंवा वर काढण्याचा पदार्थ. ५ ओढण; वजन; ओढण्याची शक्ति. 'हा दगड सहा बैलांच्या ओढीचा आहे.' ६ ज्या वरून ओझें ओढीत नेतात तो रस्ता; रस्त्यावर त्या वजनानें उमटणारा चर, रेघ, घांसर, खरड. ७ अडचणीची परिस्थिति, पैशांची चणचण; सावकारांचा तगादा, निकड, चिमट. 'या महिन्याला माझी खर्चाची फार ओढ झाली आहे.' ८ अतिशय मेहनतीमुळें व थकव्यामुळें शरीराला येणारा ताठरपणा. ९ नदी किंवा प्रवाह यांचा जोर, ताण. 'इंद्रायणीचे पाण्यास फार ओढ आहे.' १० सुरमाडाची पोय; जेथें पावसांत किंवा ओलींत एखादा बांधकामाचा भाग येत असेल तेथें याचा बांधावयाच्या दोरीसारखा उपयोग करितात तो. ११ कल, प्रवृत्ति; गति; झोंक; -कडे प्रयत्न. 'उदकाची ओढ स्वभावतः खोल प्रदेशाकडे असते.' १२ आकर्षण; मोह; पाश; आंगावर घेतलेलें काम वगैरेचा जोर (जग, धंदा, कुटुंब यांबाबत); ओढणारी शक्ति (माया, प्रेम, इच्छा, आशा इ०); कळकळ; स्नेह; सहानुभूति. 'कां गे बाई रोड। तर गांवाची ओढ' १३ मागें राहाणें; जोराचा विरोध करणें; निष्ठुरपणें प्रतिबंध करणें; वेगानें सुटणें; प्रवाह, जोराचा ओघ. (क्रि० घेणें). १४ जनावर लावून एका वेळीं ओढीत आणलेला एक किंवा अनेक लाकडांचा समुदाय. १५ वरील लाकडांना बांधावयाची दोरी. १६ बैलरहाट किंवा तेल्याचा घाणा यांच्या जोखडास व बैलाच्या मागें जो बेसनेकड असतो त्यास बांधावयाची दोरी किंवा दांडी; ओढाळा. १७ तहान 'मला पाण्याची ओढ लागली आहे.' [उदन्या (तृष्णा)-उडण्ण-ओढणी-ओढ. भाअ १८३४.] १८ मनाची हौस. 'प्राणसखे राजसे रोज गडे तुझ्या मनाच्या ओढी। आम्ही तृप्त करूं या घडीं।'-सला १८. [ओढणें; तुल० दे. ओड्ढ= अनुरक्त; सं. अवकर्ष-अउअढ-ओढ; आकृष्ट-आउड्ढ-ओढ किंवा सं. उपधा] ०**काढणें**-(हिं.) संकटांत दिवस काढणें **एक ओढ** किंवा **एके ओढीनें**-एका हिसक्यासरशी; पहिल्याच प्रयत्नास, जोरास, दणक्यांत. **ओढीं ओढ असणें**-दुःखावर दुःख येणें; संकटांवर संकट येणें. **ओढींत ओढ** (मारणें, करून घेणें इ०)-एक संकट भोगीत असतां दुसरें मारणें किंवा दुसरें ओढवून घेणें. वोढ पहा.

**ओढक**--वि. १ खेंचणारा; प्रतिबंध करणारा; मागें मागें घेणारा (इष्ट कृत्यांत मूर्खपणें नसते अडथळे आणणारा). २ पुढें ओढणारा खेंचणारा पहा. 'परि ओढुनि ने त्यासि देव ओढक सा।'-मोभीष्म ४.४२. ३ (ल) तक्रारी; हट्टी; दुराग्रही. [ओढणें]

**ओढकर**--पु. लाकूड; दगड वगैरे बाजारांत बैलावरून अगर स्वतः ओढीत नेऊन त्याच्या मजुरीवर उपजीविका करणारा; गाडीवान. [ओढ+कर]

**ओढकाठी**--स्त्री. (कों.) उंसाच्या चरकाचा (जोखडाच्या दोन भागांना जोडणारा) दांडा. [ओढ+काठी]

**ओढगस्त-घस्त**--वि. अडचणींत अगर बिकट परिस्थितींत असलेला; अडकित्त्यांत सांपडलेला; द्रव्याच्या अभावामुळें पेचांत आलेला. [ओढ+ग्रस्त]

**ओढगस्ती-घस्ती**--स्त्री. पैशाची टंचाई; अडचण; नड; ताणाताण.

**ओढण**--नस्त्री. १ संपविलेल्या हिशेबाची बाकी पुढील मितीस ओढणें. 'मागील खात्यावरील ओढण पुढील खातीं घेऊन' २ पिढीजाद अथवा वर्षानुवर्षे चालत आलेली (वहिवाट, पद्धत, मत, परंपरा, चाल, रूढी). 'वडिलांचें ओढण असेल त्याप्रमाणें चालावें.' 'या कुळीं बायकोस प्रथम कन्या व्हावी अशी ओढण चालत आली.' ३ जोराचा अडथळा; मागें पाय. (क्रि० घेणें). ४ बायकांच्या नेसलेल्या लुगडयाचा आंतल्या पदराचा जो एक कोन ओढिला असतां नेसणें घट्ट होतें ती; लुगडयाच्या पदराचीं दोन टोकें जवळजवळ आणुन नेसणें घट्ट करण्यासाठीं एके ठिकाणीं बांधतात त्यास ओढील असें म्हणतात, ओढणाच्या शेवटास जी गांठ दिली असते ती ओढणगांठ. -न. १ सामान्यत. वर खेचण्याचा दोर; ओढणदोर; तंबूच्या ताणाव्याचा दोर; कमणी; ढोलाचा ताल वर-खालीं उतरविण्याची दोरी; गाडीचा दोर २ प्रयासानें, श्रमानें ओढणें; खेंचण्यास पडणारा अतिशय त्रास. 'गाडीला (अथवा बैलांना) वाळूमध्यें ओढण लागते.' [ओढणें] ०**गांठ**-स्त्री. ओढण अर्थ ४ पहा. ०**बाकी**-स्त्री. सालोसाल पुढें ओढलेली बाकी (सरकारी वसुलामधील); चुकीनें ओडबंकी ०**शिल्लक**-स्त्री. नवीन हिशोबापर्यंत ओढलेली मागची शिल्लक.

**ओढण**--न. ढाल. ओडण पहा. 'माझ्या देहाचें ओढण। आड असतां तुम्हां विघ्न। स्वप्नींही परि नाहीं जाण।'-मुरंशु ९.

**ओढण**--न. एक चर्मवाद्य; ड्रम. [ओढणें]

**ओंढण, ओंढाण-णी**--ओंडण पहा.

**ओढणी**--स्त्री. १ डोक्यावरून व खांद्यावरून घेण्याचा जरीच्या कापडाचा अथवा शालीचा किंवा शेल्याचा बुरखा (स्त्रियांचा); चादर; पदर. २ (मारवाडी, मुसलमानी) लहंगा किंवा झगा यावरून घ्यावयाचें वस्त्र. [सं. अवगुंठन; दे. ओड्ढण=उत्तरीय; सि. ओढिणी, हिं. ओढन; दे. अवघाडनी; प्रा. ओहाडणी]

**ओढणी**--स्त्री. १ ओढ; हिसका. २ दोरी (बटव्याची वगैरे). ३ (क.) औताची सर्वांत पुढची जागा. 'ओढणीला पाडे जुंपा.' 'ओढणीच्या बैलावर लक्ष ठेव.' ४ रांगोळयाचा लोखंडी आंकडा. [ओढणें]

**ओढणें**—उक्रि. १ खेचणें; सरकविणें; लोटणें; जवळ घेणें, करणें; आपल्याकडे आणणें; ताणणें. 'परि ओढुनि ने त्यासि दैव ओढकसा ।'–मोभीष्म ४. ४४. 'तूं पाणी ओढ, मी आंघूळ करतों.' २ (शेत जमिनींतील डिखळे फोडून साफ करण्यासाठीं दाताळें किंवा गुठें वगैरे जमिनीवर) फिरविणें. ३ रेघा, ओळी काढणें; आंखणें. 'काय रेघा ओढल्यास! सरळ ओढ.' ४ ओढ बसणें (फोड, उष्णता, रोग वगैरेपासून डोळे इ०). ५ (दुखणें, आजार, दारिद्र्य यांमुळें शरीर) क्षीण होणें. ६ (गुडगुडी, विडी इ० चा) धूर काढणें, अंमल करणें. ७ (थान) पिणें; चोखणें. (गाय, म्हैस इ० चें) दूध काढण्याकरितां आंचळ ओढणें; धार काढणें. ८ (तपकीर) हुंगणें; सुंगणें ९ (भाषेची–अर्थाकरितां) ओढाताण करणें; वाटेल तो अर्थ बसविणें. १० लावणें; बंद करणें (दार, खिडकी इ०). [सं. वह्–वोढ–ओढ] (वाप्र.) **ओढून आणणें**–१ गर्वानें किंवा रागानें ताठून बसणें. २ कां कूं करीत मागें राहणें. **ओढून काढणें**–बाहेर खेंचणें; मोठ्या युक्तीनें बाहेर काढणें; जबरीनें जवळ आणणें, घेणें. **ओढून घेणें**–(एखादें संकट अथवा अडचण) स्वत:वर वळेंच आणणें. 'भरतानें रामासारखाच वनवास आपल्यावर ओढून घेतला.' २ आपल्या बाजूचें करणें. 'हींच मुलें आपल्याकडे ओढून घ्यावयाचीं आहेत.' –इंप ४२. ३ (गंजिफा) घेणी घेणारानें राजाबरोबर जें पान टाकलें असेल त्यावरील बंद दुसऱ्याजवळ असल्यास त्यानें राजाबरोबरचें पान मारून ओढून घेणें. हा ओढून घेण्याचा हक्क देणी घेणाऱ्याच्या उजव्या हातच्या मनुष्यास असतो. **ओढून बळकट करणें**–(दोरीची सैल व मोकळी गांठ घट्ट व न सुटेल अशी आंवळणें). फाजील शहाणपणानें स्वत:ला फसविणें; उद्देश बाजूला सारणें; हट्टानें किंवा पड न खाल्ल्यामुळें (अटी, करार, परिस्थिति) अधिक विकट करून घेणें. **ओढून विकणें**–१ जास्त किंवा अवाच्यासवा किंमतीस विकणें. २ (ल.) स्वत:ची योग्यता फार मोठी मानणें; अभिमानानें आत्मप्रतिष्ठा चढविणें. **कर्ज ओढणें**–कर्जावर कर्ज काढणें. **चाबूक**०–एखाद्याला चाबूक लगावणें. **जर्मान**०–शेतजमीन लागवडीस आणणें. **जीभ** ०–कांहीं विकृतीनें जीभ कोरडी होणें. **बाकी**०–१ हिशेबाची शिल्लकबाकी पुढील सालच्या कीर्दीवर नेणें. २ देणें न देतां कांहीं काळ राखणें. **वरून ओढून टाकणें–ताणणें**–(जसें–शास्त्रावरून ओढणें, विद्येवरून ओढणें) थोडेंसें, वरवरचें ज्ञान असणें. **श्वास**०–श्वास घेणें. **ओढून टाकणें**–रागानें, दांडगाईनें ओढून ढकलणें किंवा झुगारून देणें (मनुष्य, वस्तु इ०).

**ओढणें**—अक्रि. १ मागें घेणें; ओढून धरणें; घासघीस करणें; हट्ट धरणें; हेका धरणें. २ (भात शिजतांना) आकसून जाणें. ३ पेटक्यामुळें (अवयव) आखडणें; आकुंचित होणें. ४ एखाद्याचा भाग असणें; एखाद्याच्या खालीं येणें, मोडणें; समाविष्ट असणें. 'हा प्रांत पुण्याखालीं ओढतो.' ५ मन इ० मोहित होणें, एखाद्याकडे वळणें, जाणें; कल ओढा, असणें. 'बुडत्याचे पाय खोल पाण्याकडे ओढतात.' (वाप्र.) **ओढता घेणें**–१ अडवून घेणें; घासाघीस करणें; ताणून धरणें. २ एखाद्या गोष्टीपासून मागें घेणें, सरणें. **ओढता (अथवा) ओढून धरणें**–१ अडचणी आणि अडथळे दाखविणें, आणणें. २ (एखादा सौदा किंवा व्यवहार जुळविण्यांत) आपल्याच मूळच्या अटीला चिकटून राहणें. **ओढून पाहणें**–आपल्याच अटी खऱ्या, पुऱ्या करण्याबद्दल प्रयत्न करणें, घासाघीस घालणें. **ओढून बोलणें**–लांब हेल काढून बोलणें. **ओढून येणें**–१ (गळवामध्यें पू) जमणें; मुख धरणें; तोंड पडणें. २ अकस्मात येणें; ओढवणें (एखादी आपत्ति). **जीव ओढणें**–१ भूक, तहान, श्रम इत्यादिकांमुळें उत्साहहीन होणें. २ प्रेमानें एखाद्याकडे मनाचा ओढा असणें. **देवी, गोवर ओढणें**–देवी वगैरे वाळणें. **मृत्यु–मरण–काळ**० –शेवटीं नाइलाज होऊन मृत्यूच्या जवळ जाणें; कपाळीं असलेलें प्राप्त होणें.

**ओढणें**—सक्रि. (राजा. नाविक) गलबत पावसाळ्याच्या दिवसाच्या प्रारंभीं किनाऱ्यावर ओढून आणून ठेवणें.

**ओढणें**—क्रि. नेसणें; वेढणें; पांघरणें. 'नित्य ओढिती धौत वस्त्रें।' –मुसभा १४.६७. [सं. वह्]

**ओढत**—स्त्री. हलाखीची, ओढगस्त स्थिति. [ओढ+सं. ग्रस्त–म. गस्त]

**ओढदोरा**—पु. पिशवीचें तोंड उघडझाप करण्याचा दोरा; कसणी; कशाचा दोरा.

**ओढप**—स्त्री. जोराचा ताण; ओढतांना लागणारा जोर, शक्ति.

**ओढपट्टी**—स्त्री. (विणकाम) कापड गुंडाळावयाच्या दांड्याला लावलेली अडकवणी. [ओढणें+पट्टी]

**ओढमाणकी**—स्त्री. गाडी भरल्यानंतर वरील वेष्टण आवळण्याकरितां एक लांकडाचा छिद्रें व कण्वी असलेला ठोकळा असतो त्यातून दोरी दोहीं बाजूनें ओढून बांधतात तो. [म. ओढ+मणि–मणका] यावरून **ओढमाणक्या घेणें**–ताणून धरणें; आढेवेढे घेणें, एखाद्या गोष्टीस संमति देतांना पुष्कळ वांधे घालीत बसणें. [ओढ+मणि–मणका]

**ओढव**—स्त्री. मोटेच्या विहिरीची धांव (उतरती जमीन). –पु. गायनांतील चढता सूर. (क्रि० करणें). [ओढ]

**ओढवण**—न. पर्वतावरून निघणाऱ्या ओढ्याचें कोरडें पात्र. [ओढा+वन=पाणी]

**ओढवण**—न. पांघरूण. वोढवण पहा.

**ओढवणें**—अक्रि. १ आपोआप घडणें–कडे जोरानें वळणें; नाइलाजानें ओघास येणें; जोरानें हलणें, सरणें, येणें; गुदरणें; प्राप्त होणें; झोका बसणें; अकस्मात येणें; (दैव, मृत्यु, संकट, पीडा, उपाधि इ० संबंधीं योजितात व त्यांत प्रेरकत्व, अधीश्वरत्व गर्भित असतें). 'वाटे ओढवला प्रळयकाळ।' 'दुःख सुख जें ओढवेल तें भोगणें प्राप्त.' (टीप–दैव, प्रारब्ध या अर्थी योजले असतां नेहमींच दुःख किंवा संकट असा अर्थ होत नाहीं. जसें– मूर्ख जरी असला तरी दैव ओढवलें म्हणजे ऐश्वर्य भोगावयास सांपडतें.) २ (व्यापक) निश्चयपूर्वक, बेत ठरवून अंगावर येणें, कोसळणें (संकटें, शत्रु, रानटी जनावरें, भिकार अथवा अपरिहार्य अडचणी वगैरे संबंधानें योजतात); भोगास येणें. ३ वळणें; जाणें; कलणें; प्रवृत्त होणें; (कोणत्याहि दिशेकडे) ओढणें; होरा वाहणें (मन, अंतःकरण, चित्त वगैरे संबंधानें योजितात); (रागानें व निंदापूर्वक) आगमन करणें; येणें. (आपल्या स्वतःची धाड आणणें). –सक्रि. (ओढविणें) १ (काव्य). (एखादा पदार्थ घेण्यासाठीं) हात पुढें करणें. 'ओढवितो हात भाजिच्या पाना।' [सं. वह्; तुल० का. ओडु=हात पुढें करणें] २ आटवून टाकणें; क्षीण करणें. 'शरीर ओढवी पांचाजणा। म्हणवी पवित्र कुलांगणा।' –मुसमा १५.२२. [ओढणें]

**ओढवणें**—अक्रि. ओणवा होणें.

**ओढा**—पु. १ ओढ मधील १,२,९,११,१२ हे अर्थ पहा. २ (दोर, गज) बळकट व स्थिर करणें. ३ दुसऱ्या ठिकाणीं लावलेल्या भाताच्या रोपांतून वाळलेल्या पात्या ओढून काढणें; लावणी केल्यानंतर नवी पात फुटूं लागते तेव्हां जुनी सुकलेली पात काढून टाकितात, हा जो व्यापार तो. ४ घरगुती कामें; कामाचा रगाडा, ढीग. (क्रि० ओढणें). 'सारा दिवस घरांतला ओढा ओढला पाहिजे.' ५ खांब व तुळई यांना बळकटीसाठीं जें एक जोड लाकूड जोडतात तें. ६ (फोड वगैरेचें) आकर्षण; त्यावर देण्याचा औषधीचा लेप. (क्रि० घालणें; लावणें; शेकणें; धरणें). 'तुमचे पायाचे सुजेवर चांगला ओढा घाला.' [सं. उपधा (वर ठेवणें)–ओढा. भाअ १८३४]. ७ नारळ, सुपाऱ्या वगैरे एका ठिकाणीं जमा करणें. ८ पऱ्ह्या; नाला; हरळा; विशेषतः पावसाचा बरड जमिनींतील वाहणारा लहानसा प्रवाह व त्याचें कोरडें पात्र. 'ओढु' –पाटण शिलालेख शके ११२८. 'ओढा वदे तो तरि काय एका।' ९ खोगीराच्या तंगाची अथवा पटाडीची दोरी. १० रहाटाला बैल अगर रेडा जोडण्याकरितां बांधलेल्या जोखडास मागें जो बांबू दोरांनीं बांधून बेसनेकडास जोडलेला असतो तो. [सं. अवकर्षक–अउअढअ–ओढा रा. ग्रंथमाला]
•**ओढणें**–(वाप्र.) एखाद्याच्या विषयीं प्रीति बाळगणें. **ओढ्यांत ओढा वारणें**–एक गोष्ट करीत असतां दुसरी जरूरीची करणें.

**ओंढा**—ओंडा पहा.

**ओढाओढ-ढी**—स्त्री. १ चोहोंकडून किंवा जोराची खेचाखेच, ओढ. २ (ल.) सर्व बाजूनीं निकड, तारांबळ, त्रास. [ओढ–द्वि]

**ओढाखोडा**—पु. लहान ओढे अथवा डोंगराच्या घळींतून वाहणारे प्रवाह व त्यांचीं सुकलेलीं पात्रें, घळण, चर वगैरेंना व्यापक संज्ञा. [ओढा द्वि.]

**ओढाताण**—(अपभ्रष्ट ओढाटाण, ओढाताड). स्त्री. १ जोराची खेचाखेच; इकडून तिकडून ओढणें; वाटेल तसें खेचणें. २ (ल.) मानसिक खळबळ, गोंधळ, (सर्व बाजूंनीं कामाचा ताण लागला असतां किंवा उद्दिष्टांमध्यें परस्पर विरोध असतां होणारी) तारांबळ, धांदल. ३ घासाघीस; खाराखीर; कां कूं करणें; जिकीर. [ओढणें+ताणणें]

**ओढामाणकी-क्या**—स्त्रीअव. बळेंच मागें घेणें; नको नको म्हणणें; इच्छा असतां ती नाहीं असें ढोंग करणें. (क्रि० धरणें; लावणें; करणें) ओढमाणकी पहा. [ओढा+मणि–मणका]

**ओढावण-णें**—न. १ एक प्रकारची हातगाडी. २ लाकडाचा ओंडा. (?). –शर. ३ ओढ्याचें कोरडें पात्र. –स्त्री. वंशपरंपरेनें चालत आलेली पद्धति, रीत, वहिवाट. [ओढणें]

**ओढावारा**—पु. प्रतिबंध; मर्यादा. 'नाहीं ओढावारा। पडिला प्रसंग तो बरा॥' –तुगा २०२७.

**ओढाळ**—वि. १ अनिर्बंध; उनाड; भटक्या; गोठ्यांतून पळून जाणारें; कळपांतून निसटून एकटें चरणारें; स्वतःची गव्हाण सोडून शेजारच्या गव्हाणीवर हल्ला करणारें. 'नाहीं त्या यमासी करुणा। बाहेर काढितां कुडी प्राणा। ओढाळ सांपडे जैसें धान्या। चोर यातना धरिजेतो॥' –तुगा ७०२. 'मन हें ओढाळ गुरूं परधन पर कामिनीकडे धांवे।' –मोरो. २ (ल.) निष्प्रतिबंधक; चंचल; भटकें (मन); उनाड; द्वाड; स्वैर (मूल). [ओढणें]

**ओढाळकी, ओढाळगिरी, ओढाळी**—स्त्री. स्वैराचार; भटकेपणा; ओढाळपणा (ओढाळ पशू, वगैरेचा). [ओढाळ]

**ओढाळा**—पु. (कों.) जोखड व बेसनेकड यांचे टोकांस दोरीनें बांधावयाची दांडी. ओढ अर्थ १६ पहा. [ओढ]

**ओढाळी**—स्त्री. प्रेम; प्रीति; लघळपणा. 'भ्रताराचें भाग्य देखती। लटकीच प्रीति वरिवरि दाविती। ज्या ओढाळी अत्यंत करिती। भ्रताराशीं वंचनार्थ॥' –ह २९.१७. [ओढ]

**ओढियाण**—पु. (योग.) उड्डीयानबंध पहा.

**ओढिस्त**—वि. १ अडचणीची; टंचाईची; ओढगस्त (परिस्थिति इ०). २ अडचणींत सांपडलेला; कावलेला; पेंचांत सांपडलेला; मध्यास आलेला; ओढगस्त. [ओढ+स्थ]

**ओढी**—स्त्री. १ संवय; कल. 'ओढाळाची ओंगळ ओढी। उगी खोडी नवजाय।' –तुगा ३११९. २ धनुष्याची दोरी; गुण. 'वोढूनि धनुष्याची ओढी। त्र्यंबक मोडिलें कडाडी।' –एभा ११.७३५. ३ (गो.) लळा; माया. ओढ पहा. ४ हिसका; खेंच; ओढ पहा. 'ओढी घेतां तडाडी।' –आसी ६५. [ओढणें]

**ओढीक**—वि. १ ओझें चांगल्या रीतीनें ओढणारा. २ अडकित्त्यांत सांपडलेला; अडचणलेला; ओढगस्त; संकटग्रस्त; चारी बाजूंनीं कावकाव झालेला; कावलेला. ३ आपलें म्हणणें न सोडणारा; ओढून धरणारा (दुकानदार). ४ हळुहळु पैसा सोडणारा; घट्ट मुठीचा; चिकट; कद्रू; कृपण. [ओढ]

**ओढीताड**—ओढाताड; ओढाताण पहा. 'काया करोनि कडोविकडी। ओढीताडीं पीडियलें।' –मुसभा १५.१३३ [ओढ]

**ओढील-ळ**—स्त्री. ज्यांनीं कमरेभोंवतीं लुगडें आवळतात त्या लुगडयाच्या दोन टोकांपैकीं प्रत्येक. ओढण अर्थ ४ पहा. [ओडणें]

**ओढून चंद्रबळ**—न. १ आवडणाऱ्या वस्तूविषयीं वरून वरून नावड दाखविण्याचें ढोंग करणें; आग्रहाची आवश्यकता. (क्रि० आणणें). 'हं तोडा विडया, ओढूनचंद्रबळ नको आणायला.' –मोर ३२. २ महत्त्वाचा, परिणामाचा उगाच बाऊ दाखविणें. (क्रि० आणणें). ३ भाषणाची, वाक्यांची ओढाताण करणें; दूरान्वय लावणें. (क्रि० आणणें). ४ मारून मुटकून बळेंच संपादन केलेली गोष्ट (धैर्य, उमेद); नसतें अवसान. ५ (शब्दशः) कोणत्याहि शुभ कार्याच्या वेळीं अवश्य लागणारें लग्नकुंडलींतील चंद्राचें बळ अनुकूल नसतांना ओढून ताणून तें अनुकूल करून घेणें. (वाप्र.) **ओढून चंद्रबळाचा**-१ बळेंच आणलेला; वर दाखविलेला, धरलेला; कृत्रिम. २ अयोग्य रीतीनें हक्क सांगितलेला, दाखविलेला. ३ बळेंच ओढाताण केलेला; बळजबरी केलेला; दूरान्वित.

**ओढून-ताणून**—(अपभ्रष्ट ओढूनताड्न-ढून). –क्रिवि. १ जोरानें खेंचून; वेडेवांकडे प्रयत्न करून; कांहींतरी जुळवाजुळवी करून. 'ओढूनताणून मोजलें असतां दहा हात भरेल.' २ कांहींतरी करून; कष्टानें; बळेंच; मोठया मेहनतीनें. [ओढणें+ताणणें]

**ओढें**—न. १ उट्टें; सुड. (क्रि० काढणें; घेणें. उगवणें), 'नगर पीडिलें त्याचें ओ(वो)ढें। आज काढीन एकदां।' –मुआदि ३८.८३. २ (व्यापक) वचपा; मोबदला. (क्रि० घेणें; काढणें). [ओढणें ?]

**ओढ्या**—वि. (विनोदानें) पाट किंवा मोहतुर लावलेल्या बायकोचें पहिल्या नवऱ्यापासून झालेलें मूल; पोटाखालील मूल. [ओढणें]

**ओंढ्यालोंबी**—स्त्री. गव्हाचें कणीस.

**ओणखुचें**—सक्रि. (गो.) पाठ टेकणें.

**ओणत-थ**—स्त्री. (गो.) भिंत.

**ओणव**—स्त्री. शरीर पुढें कलणें; झोंक; ओणवी स्थिति.

**ओणवणें, ओणावणें**—अक्रि. १ पुढच्या अंगाला कमरेशीं खालीं वांकणें. २ शरीराच्या दुर्बलतेमुळें अथवा म्हातारपणामुळें पाठीस बांक येणें. [सं. अव किंवा उप+नमन; प्रा. ओणाविय]

**ओणवा**—वि. १ कमरेपाशीं शरीर वांकून उभा राहिलेला; वांकलेला. [सं. अवनत; प्रा. ओणय; सं. अवनमित; प्रा. ओणविय]

**ओणवा**—पु. वणवा; रानांतील आग. 'ओणवा वाढे लागतां वात।' –पांप्र १५.२६. [वणवा]

**ओणोली-ळी**—स्त्री. (गो.) हनुवटी.

**ओत**—पु. १ (सामा.) ऊत; कढ वर येणें; ओतास जाणें. २ पूर आलेल्या नदीचा एक फुटलेला प्रवाह, ओघ; जो जमिनींत बाजूच्या नाल्यांतून आंत दूर वर जातो तो. (क्रि० फुटणें). [सं. अवस्तृत; प्रा. ओत्थअ; का. ओत्तु=पूर]

**ओत**—पु. मागावर विणण्याचें आडवें सूत. 'ये अंता यावतीः सिचो य ओतवो येच तंतवः।' –अथर्ववेद १४.२.५१. 'मी आघवियेचि सृष्टी। आदिमध्यांतीं किरीटी। ओत प्रोत पटीं। तंतु जेवीं।' –ज्ञा १०.२६४. [वै. ओतु]

**ओतकाम**—न. धातूचा रस सांच्यांत ओतण्याचें वगैरे काम. [ओतणें+काम]

**ओतणी**—स्त्री. १ उंचावरून भांडयांतील पातळ पदार्थ खालीं (भट्टींत, साच्यांत) ओतणें; स्राव; लोट. २ वितळलेल्या धातूकरितां केलेला सांचा. [ओतणें]

**ओतणें**—उक्रि. १ वरून पातळ पदार्थ खालीं सोडणें; धार पाडणें. २ साच्यांत धातूचा पातळ रस ओतून आकार देणें; प्रतिमा तयार करणें. 'मुकुट कुंडलें श्रीमुख शोभलें। सुखाचें ओतलें सकळही।' –तुगा २. –अक्रि. ऊत येणें. उतणें पहा. [सं. अव+स्तरण; प्रा. ओत्थरण; का. ओत्तु; सिं. ओतणु]

**ओत देणें**—सक्रि. (व.) भर देणें; साहाय्य करणें.

**ओतना**—१ सैन्य; पृतना. 'यादवु होतें थोकलें। ऐसा हीं तिनि ओतनें जुंझीनिलें॥' -शिशु ९७५. २ युद्ध. [वै. पृतना=युद्ध ?]

**ओतप्रोत**—(अप. रूप ओतपोत). क्रिवि. (ओत म्हणजे आडवा धागा, प्रोत म्हणजे उभा धागा). १ उभे आणि आडवे;

लांबीकडून व रुंदीकडून; एकमेकाशीं काटकोनांत असणाऱ्या दिशांना. २ (काव्य) अंतर्बाह्य; सर्वत्र; चोहों बाजूंनीं. 'घायाळ कीजे तरटमार। तैसें ओतप्रोत दुःख फार।' –एभा १०.६७५. 'सेना उतरली ओतपोता।' ३ सढळ; पूर्ण; पुष्कळ; भरपूर. 'त्या गोष्टींत करुणरस ओतप्रोत भरला आहे.' –पाव्ह (प्रस्ता.) –पु. उभे–आडवे तंतू; बाणा आणि ताणा. 'मी आधवियेचि सृष्टी। आदिमध्यांतीं किरीटी। ओतप्रोत पटीं। तंतु जेवीं॥' –ज्ञा १०.२६४. [वै. ओतु+प्रोत]

**ओतल**—पुन. (सोलापूर) पाणी तापविण्याकरितां मातीच्या चुलाणांत कायमचें बसविलेलें कढई किंवा गंगाळासारखें मोठें पात्र; वतल; कांहीं ठिकाणीं पाणी भरण्याच्या अथवा तापविण्याच्या रुंद तोंडाच्या भांड्यास किंवा माटासहि म्हणतात. [ओतणें]

**ओतवरा**—वि. उतावळा; अतिशय उत्सुक. 'नाना फळीं ओतवरा होतु। श्रीकृष्णभेटी लागीं॥' –दाव १५८. [म. उत; का. ओत्तु]

**ओतशाळा**—स्त्री. १ (सामा.) ओतकामाचा कारखाना. २ टाईप (टंक) ज्या ठिकाणीं पाडले जातात ती जागा; टंकशाळा. (इं.) फाउंड्री. –चित्रमयजगत् ९.१९१८.

**ओताऊ**—वि. ओतींव; ओतलेलें; तयार केलेलें. [ओतणें]

**ओताणा**—पु. सोनाराचें एक हत्यार; काकता. काकणता पहा.

**ओताम**—क्रिवि. (भि.) इतक्यांत? 'आन तियाल मारा आं ओताम उंदऱ्यो तियाल आख्यों' =व त्याला मारणार इतक्यांत उंदीर त्याला म्हणाला. –भिल्ली १७.

**ओतारी**—पु. ओतकाम करणारा; धातूचा रस ओतून वस्तू बनविणारा; भांडीं घडविणारा; धातूच्या मूर्ती तयार करणारा. 'देव घडिला सोनारीं। देव ओ(वो)तिला ओ(वो)तारीं॥' –दा ६.६.३७. [ओतणें]

**ओतींव**—वि. १ ओतून बनविलेलें; साच्यांत घालून तयार केलेलें; ओताऊ. 'ओतीव हे न–घटिताकृति बोलिजेली।' –नल ७३. २ (ल.) सुंदर; शुद्ध; अस्सल. 'जें मायेचें शुद्धत्व। तेंचि ओतीव महत्तत्त्व।' –विपू ३ ६८. 'ओंतीव श्रीमुख सुखाचें सकळ। वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी।' –तुगा ३. ०**थाली-पीट**–न. भांड्यांत फोडणीस टाकलेली पातळसर भाजणी शिजून जें थालीपीठ तयार होतें तें. तव्यावर थापून केलेलें थालीपीठ नव्हे. ०**लोखंड**–न. बीड. (इं.) कास्ट आयर्न.

**ओतु**—पु. आडवा धागा; ओत पहा. 'ऋग्वेदांतील मंत्रांत (६.९.२) तंतु (उभा धागा), ओतु (आडवा धागा), हीं पदें आलीं असून तीं वस्त्रासच लाविलीं आहेत.' –टि ३.४६.

**ओतु**—पु. मांजर; बिडाल; मार्जार. 'नकुळ म्हणे व्याघ्र शिरीं दिधला हा वामपाद ओतूनीं।' –मोसभा ७.२६. [सं.]

**ओतू**—उतू पहा.

**ओत्सा**—वि. १ क्षुद्र; कमीपणाचा; कमी योग्यतेचा; हलका. २ (गुज.) कमती; उणा; पाहिजे त्यापेक्षां थोडा; किमतींत हलका; लहान बांध्याचा. [हिं. ओछा=हलकें; गु. ओच्छा]

**ओथंबणें**—अक्रि. १ वाकेपर्यंत लोंबणें (फांदी). २ फळांच्या भारानें खालीं वांकणें (फांदी); स्वतःच्या भारानें खालीं वांकणें (पिकलेलें फळ); खालीं लोंबणें (पोट, ढग). ३ पासून लोंबणें; झोके घेणें; ४ एखाद्या पातळ पदार्थानें, रसानें वगैरे थबथबणें. ५ (कों.) (रक्तातिशयामुळें) शरीराचा अवयव अतिशय खालीं लोंबणें. ६ वर चढणें; टेकणें; आश्रय मिळविणें. –उक्रि. (क.) खालीं दाबणें; वांकविणें (तक्ता, फळी, फांदी इ०). [सं. अव किंवा उत्+स्तंभ्; प्रा. उत्थंभ]

**ओथंबा**—पु. १ (झाडाला, वेलीला) आश्रयासाठीं लावलेला डांब, मेढ. २ (ल.) आश्रय; आधार; आश्रयदाता; आधारकर्ता; ठेपा 'तोहि सर्वसाक्षी ओथंबा।' –निगा २९. ३ झोक; हेलकावा. (क्रि० घेणें). ४ (गो.) ओथेंबे; पावसाची सर सपल्यावर झाडाच्या पानांवरून पावसाचें पाणी टपटप गळतें ते थेंब. [ओथंबणें]

**ओथळा–थिळा–थिवळा**—पु. (कों. चि.) ठिपकणें; ओथंबा अर्थ ४ पहा. 'शेत ओथिवळ्यांनीं मेलें.' 'म्यां पाऊस निवारला परंतु ओथळ्यांनीं भिजलों.'

**ओंदण**—न. (कों.) कोठार, दुकान इ० च्या फळ्या (दाराऐवजीं) बसविण्याकरितां खांचणी घेतलेलें वरचें, खालचें व बाजूचें लाकूड. [कोंदण?]

**ओदन**—पु. शिजविलेले तांदूळ; भात. उ० शाल्योदन, दध्योदन. [सं.] **ओदनाचें**–न. (ल.) जेवण; भोजन.

**ओदर**—पु. धूर; वास; घाम (?). 'न ल्वीं वो कुर्दुरू। सार्वांगीं येतुसें ओदरू॥' –शिशु ८३२. [सं. उद्+धृ; म. धूर; तुल० इं. ओडर]

**ओदुण**—न. गुंडाळी; दुघडी. 'कृष्णाजिनाचें ओदुण केलें.' –शिशु १४२. [सं. द्विगुण; म. दुणें]

**ओंध–द**—स्त्री. (कों.) मळभ; अभ्रामुळें आलेली अंधारी; झापड; काहूर. (क्रि० घालणें). 'अभ्रानें अथवा पावसानें ओंध घातली.' –वि. ओंधट पहा. [सं. अंध]

**ओंधट**—वि. (कों.) १ काळोखीचा; अंधारी आलेला; उदासवाणा (दिवस); अंधारी; अंधाराची (खोली). २ अंधुक; अस्पष्ट; सहज न ओळखूं येणारा (पदार्थ, वस्तु). ३ कोंदट; मलिन. [ओंध]

**ओनव-वा-वणें, ओणावणें**—ओणव-वा-वणें पहा.

**ओनवा**—पु. रानांतील वणवा; आग. ओणवा पहा [वणवा]

**ओनामा, ओनामासीधं**—१ ॐनमः सिद्धम् चा संक्षेप किंवा अपभ्रष्ट रूप ( ॐ=ब्रह्म; नमःच्या योगीं चतुर्थी असावी परंतु ॐ अव्यय असल्यानें चतुर्थीची जरूर नाहीं. सिद्ध शब्द मंगलवाचक आहे. ॐनम.सिद्धम् म्हणजे ( शब्द )ब्रह्मास नमस्काररूप मंगलवर्ण. पण हा वाक्प्रचार जैन आहे. अर्थ-सिद्धास नमस्कार-जिनास नमस्कार. श्रीगणेशायनमः हा सनातनी, त्यास प्रतिरूप असा जैन वाक्प्रचार. २ ( ल. ) प्रारंभ; पहिला धडा; सुरवात; मूलतत्त्व. 'संस्थानें वगळून बाकीच्या राहिलेल्या हिंदुस्थानाला डोमिनियन स्टेटस लागू करतां असें कोणी म्हणेल तर त्याला राज्यघटनेचा ओनामाहि कळत नाहीं असें म्हणावें लागेल.'–सासं २.४५०. 'म्हणता कशास ओनामा। जनहो घ्या हरिच्या नामा।' **ओनाम्या**–वि १ ओनामा शिकणारा; कोणत्याहि विद्येला ज्यानें नवीनच सुरवात केली आहे असा. २ ओनामा शिकविणारा; पंतोजी. [ ओं नमः ]

**ओप**—स्त्रीपुन. १ उजळा; जिल्हई, चकाकी. ( क्रि० देणें, घेणें; बसणें ). 'बाळसूर्याची ही ओप। जया पाहतां पारुषे॥' –मुसभा १४.४९. २ जिल्हई; मुलामा; वर्ख; गिलीट ( अलंकार, दागिने वगैरेस ) ( क्रि० देणें; घेणें; बसणें ). 'प्रभु सदेहा, गेहा शोभा दे, कुशलें जेविं ओप नगा.' –मोअनु ७.९९. 'जाणों हटकासि ओप दीधलें।' –अनंत सीतास्वयंवर ३१. ३ धुणें; निर्मळ करणें; शुभ्रता; निर्मळपणा ( कापड धुवून उन्हांत टाकून वर पुन्हां पुन्हां पाणी शिंपडून खळ वाळविणें ). ( क्रि० देणें; घेणें; बसणें ). 'दुग्धसमुद्रीं ओपिलें। कीं निर्दोष यश आकारलें। तैसें शुभ्र वस्त्र परिधान केलें। ध्यानीं मिरवलें भक्तांच्या।' –ह १.८. ४ ( चि. कों. ) सकाळचा व थंडीच्या दिवसांतील मंद सूर्यप्रकाश; कोंवळें ऊन्ह, उन्हाचा ताव, ( या सूर्यप्रकाशांत लोक आनंदानें उन्ह खात बसतात ); सूर्यस्नान, ( क्रि० घेणें; घेत बसणें ). 'आभाळ आलें म्हणजे वस्त्राला ओप बसायची नाहीं आणि तुला देखील ओप घेववणार नाहीं.' ५ वाफ; बाष्प. [ दे. ओप्पा=झिलई देणें; का. वोप्प=सुंदर, नीट; गु ओप=चकाकी ] **०देणें**–सुशोभित करणें; नटविणें; खुलविणें; चकाकी देणें; शोभा आणणें. 'तूं मत्स्यवंशी कुळदीपकीरे। न हें तुला देइल ओप कीर।' –वामन विराट ६.२९. 'गोऱ्या मनुष्यास काळा पोषाख ओप देतो.'

**ओपटणें**—अक्रि. ( कों. ) कृश, अशक्त, किरकोळ होणें; खंगणें; फिकटणें. [ ओप ]

**ओपणी**—स्त्री. ओप देण्याचें हत्यार; सळई. [ ओप ]

**ओपणी**—स्त्री. विकणें; विक्री. ओपणें पहा.

**ओपणी**—स्त्री. ( वपणें ) पेरणें; लावणी टुपणी; लावणी वेणणी. [ सं. वप् ]

**ओपणें**—उक्रि. १ एखाद्याच्या हवालीं करणें, हातीं देणें; सोंपविणें. 'नृपें तयाच्या करीं ओपिला निज कन्येचा कर।' –विक २७. 'प्रधानास कारभार ओपून आपण अनेक देशाटन करीत असावें.' –सिंब २६. २ ( सामा. ) देणें, अर्पण करणें; नजर करणें; वाढणें; घालणें. 'जें जयासी पाहिजे अन्न। तें तें तयांसी ओपित।' –ह ३४.५८ ३ ( कुण. गो. ) विकणें; विकत देणें. [ सं. अर्पण; प्रा. ओप्पण; का. ओप्पिसु=देणें ]

**ओपणें**—उक्रि. ( तंजावर ) तोंडपाठ म्हणून दाखविणें. **ओपून घेणें**-कबूल करून घेणें.

**ओपणें**—अक्रि. १ निर्मल, शुभ्र, स्वच्छ करणें; धुणें. 'दुग्धसमुद्रीं ओपिलें। कीं निर्दोष यश आकारलें। तेंसें शुभ्र वस्त्र परिधान केलें। ध्यानीं मिरवलें भक्तांच्या॥' –ह १.८. ओप अर्थ ३ पहा. २ वाळत घालणें, ऊन देणें. [ ओप ]

**ओपणें**—न. देणें; देणगी; लाभ. 'घेओनि जाय ओपणें धर्ममोक्षाचें।' –भाए ७५३.

**ओपनें**—न. ( कों. ) ओपण्यासाठीं ठेवलेलें कापड; धुण्याचें वस्त्र. [ ओप ]

**ओपल**—न ( इं. ) एक उपरत्न. शिवधातु पहा.

• **ओपला येणें**--( क. ) ( जनावर ) वाफेला येणें; संभोगाची इच्छा उत्पन्न होणें. 'कुत्री ओपला आली आहे.'

**ओपवणी**—स्त्री. ओप, झिलई, चकाकी, मुलामा देणें; ओपविणें. [ ओप ]

**ओपविणें**—सक्रि. १ निर्मळ करणें; उन्हांत वाळविणें, शुभ्र करणें. ओप अर्थ ३ पहा. २ झिलई, मुलामा देणें. ३ उजळ करणें, लखलखीत, चकाकीत करणें. [ ओप ]

**ओपसर-रा**—पु. १ रत्नाच्या खालीं त्याचें तेज वाढविण्यासाठीं जो चकाकित वर्खाचा तुकडा किंवा पूट देतात तें. २ झिलई, उजळा, झकाकी, ओप देणें. ( क्रि० देणें ). [ ओप ]

**ओपसळई**—स्त्री. धातूंना झिलई देण्याची गारेची किंवा शिंपेची कांडी अथवा कवडी; ओपणी. या गारेच्या सळईस एका बाजूस निमुळतें टोंक असतें आणि दुसऱ्या बाजूस दांडी असते; [ ओप+सळई ]

**ओपळी, ओपाळी**—स्त्री. हिवाळ्यांतील सौम्य ऊन; उन्हाची तिरीप. ओप अर्थ ४ पहा. ( क्रि० घेणें; बसणें ). 'ओपळीस बस.'

**ओपा**—पु. तेज; तजेला; झिलई. ओप पहा. 'छत्र चामरें ढळती ज्यावर कनक ओपा ओपती।' –प्रला ११७. [ ओप ]

**ओपार**—स्त्री. (गो.) तिखटमिठाचा सांजा; उपमा. [ का. उप्पु=मीठ ]

**ओपारा, ओपारेकरी** —ओवांडा-ओवांडेकरी पहा.

**ओपावणें**—अक्रि. (राजा.) पायाच्या चवड्यावर उभें राहणें. [ सं. उत्+पद; हिं. पाव ]

**ओपास्ती**—स्त्री. उपासना. '१ मंले ओपास्ती देवें फुल १.' –पंढरपूर ८४ चा शिलालेख. [ सं. उपास्ति ]

**ओपीव**—वि. ओप, मुलामा, झिलई दिलेलें. [ ओप. ]

**ओफटणें**—क्रि. पांढरें, फिक्कें पडणें; उफटणें पहा.

**ओफरें**—न. (प्रां.) १ भूत; पिशाच्च इ० चें अंगांत येणारें वारें; फेपरें; चाळे; वेडेचार; झटका; भूतबाधा. २ (ल.) मनाचा उच्छृंखलपणा; रागाचा झटका. (क्रि० येणें; चढणें; जाणें; उतरणें). 'आईबापाला ओफरें आलें म्हणून लेंकराचें ओफरें जाईल काय?'

**ओफाडा**—पु. (कों.) भाजी लावण्यासाठीं केलेलें खांचर. १०–१५ रोपें ज्यांत लावतात ती बाडी व १०–१५ बाड्यांचा ओफाडा; वाफरें; लहान शेत. [ सं. उत्+पट्–पाटय्–उप्पाड ? ]

**ओंब**—पु. एक इमारती लांकडाचें झाड.

**ओबक**—पु. ओकारी; ओकारीमधील आवाज; ओकांवा. (क्रि० करणें; होणें). [ ओ ध्वनि ]

**ओंबकळणें**—अक्रि. झोकें घेणें; हेलकावणें; लोंबकळणें; ओळकंबणें पहा.

**ओंबकळा-काळा**—पु. लोंबकळा; झोका; ओळकंबा. (क्रि० घेणें).

**ओंबट**—न. कणीस (राळा, वरी, सांवा इ० चें). [ ओंबी ]

**ओंबट**—वि कोंबट; सोमट; सोमाळा; गरमनरम. [ उबट, कोंबट अप. ]

**ओबडधोबड**—वि. वेडेंवांकडें; प्रमाणरहित; घस्मर; रांगडा; सरासरी; खरखरीत; वेढब. आबडधोबड पहा. 'ओबड-धोबड वायकोला कसली भीती नाहीं.' –मोर १९. [ सं. उद्भट; प्रा उब्भड; ओबड द्वि ; उद्‌बद्ध(=लठ्ठ)–उब्बड–ओवड–ओभड; हिं. अवडधवड ]

**ओंबण**—न. घराच्या छपरावर आडव्या रचलेल्या कारव्या, रिफा, कामट्या इ० (गवत किंवा कौलें घालण्यासाठीं), पांझरण. [ सं. उद्‌बंधन; प्रा. उब्बंधण. किंवा सं. उल्ब=(गर्भवेष्टन)–ओब्ब-ओंवण; ओंब=लाकूड ? ]

**ओंबण**—न. अंबोण; अंबवण पहा.

**ओंबणें**—उक्रि. १ ओंवण पसरणें; वाशांवर ओंवण घालणें. २ (कु.) ओमणें; बांधणें. [ ओंवण ]

**ओबरट**—वि. (प्रां.) खडबडीत; जाडेंभरडें (कापड, सूत वगैरे). [ अरबट ? ]

**ओंबळणें**—उक्रि. खळबळणें; चुबकणें; हलु हलु धुणें; बुच-कळून काढून वाळत घालणें, पिळणें. [ प्रा. ओंबालइ=सं. प्लाव-यति=अंघोळणें ? ]

**ओंबी**—स्त्री. १ गव्हाचें कणीस, लोंगर; लोंबी; ओला दाणा. २ (अव.) ओंब्या; ओंबींतील काढून भाजलेले गहूं, हुरडा केलेले ओले गहूं. [ सं. दे. उंबी=भाजलेलीं गव्हाचीं कणसें ] ०टाकणें–(गव्हाला) कणीस येणें.

**ओंबील**—पु. एक प्रकारचा तांबडा मुंगळा, डोंगळा (बहुधा झाडावर आढळणारा); वाळिंबा. उंबील पहा.

**ओब्जाडणें**—क्रि. (गो.) लाथांनीं बडवणें अथवा मारून जेरीस आणणें. [ ? ]

**ओभाणें**—न. पूर; वेग. –शर.

**ओभावणें**—सक्रि. नाहींसें करणें. उभविणें पहा. 'ओभावी वो मधुकरू। विसारीं वो चकोरू।' –शिशु ८३९. [ उभविणें, अभाव ? ]

**ओम्, ॐ**—अ. अ=विष्णु, उ=शिव, म=ब्रह्मा. ह्याप्रमाणें तिन्ही देवांचें वास्तव्य या शब्दांत आहे. १ वेद, पुराण, पोथी, स्तोत्र इ० म्हणण्यापूर्वी व संपविल्यानंतर जो पवित्र शब्द उच्चार-तात तो; प्रार्थनेच्या वेळीं प्रारंभीं उच्चारावयाचा शब्द. 'ओम् नमोजी गणनायका।'; 'ओम् श्रीरामरक्षास्तोत्रमंत्रस्य।' २ आरंभ; उपक्रम. ३ प्रणवब्रह्म; शब्दब्रह्म; एकाक्षर ब्रह्म. 'ॐ नमोजी आद्या॥' –ज्ञा १.१. ३ वैदिक काळीं (मांडुक्य उपनिषदांत), अ=वैश्वानर, उ=तैजस, म=प्राज्ञ, ओम्=अतर्क्य, अवाच्य व ज्यामध्यें सर्व जगाचा समावेश होतो असें ब्रह्म, असा अर्थ होता. ओम् हें अक्षर प्रथम उपनिषदांत आढळतें. ०**कार**–ओम् पहा. ०**तत्सत्**– ॐ(=ब्रह्म), तत्(=तें), सत्(=खरें,) फक्त ब्रह्म हें खरें किंवा शाश्वत आहे. 'ओम्, ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु।' मंत्र किंवा एखादें कर्म संपविल्यानंतर हें वाक्य म्हणण्याचा परिपाठ आहे. लक्षणेनें याचा अर्थ संपविणें, पाणी सोडणें असा आहे. 'ॐ तत्सत् ब्रह्मार्पणं सेवट।' –दावि २६. ०**पुण्या–पुण्याहम्**– १ मी प्रणवरूप, पुण्यस्वरूप आहें अशा अर्थाचा मंत्र. एखाद्या मंगल संस्कारापूर्वी स्वस्तिवाचन नांवाचें कर्म केलें जातें त्यामध्यें संस्कारकर्त्या यजमानास ब्राह्मण 'ओं पुण्याहं' असा आशीर्वाद देत असतात. 'चिद्‌ब्रह्मेंसि लग्न लाविशी। ओं पुण्येसी तत्त्वता।' –एभा ८१. २ लग्न मंत्राचा आरंभ, पुण्याहवाचनाचे वेळीं म्हणण्यांत येणारे मंत्र. 'ॐ पुण्याह म्हणोनियां जाण। लाविलें उभयतांचें लग्न॥' –जै ५६.२०. ०**फस**, ०**फस होणें**– १ निष्फळ होणें; फसणें. 'परीक्षा नापास झाल्यामुळें त्याचे सारे बेत ओंफस झाले व पुन्हां तो कॉलेजची वारी करूं लागला.' २ लयास

जाणें, नायनाट होणें. [ ओम्+फस्=फुगा फुटल्याचा आवाज ] ०**भवति**-१ ( भिक्षां देहि ). बाई भिक्षा वाढा, असा भिक्षा-मागतांना म्हणावयाचा मंत्र. २ (ल.) भिक्षा (मागणें); भिक्षाटन. 'नीट वागला नाहींस तर ओंभवती करीत फिरशील बरें ! ' ०**भवति पक्ष**-१ भिक्षावृत्ति; भीक मागण्याचा पेषा. ' ब्राह्मणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। ओं( वों )भवति या पक्षा ! रक्षिलें पाहिजे॥ '-दा १४.२ १. २ ( ल. उप. ) अर्ज विनंत्या करून ( स्वराज्य ) मागणाऱ्यांचा एक पक्ष; मवाळ पक्ष.

**ओम**—स्त्री. ( व. ) १ प्रकाशाची पूर्वप्रभा, तेज. ' चंद्राची ओम पडली. ' ०**जिंकणें**-पाणी जोखणें; सामर्थ्य ओळखणें. ' तिनें नवऱ्याची ओम जिंकली. ' [ ओप ? ]

**ओमण-णें, ओमळणें**—ओंवण, ओंवणें, ओंवळणें पहा. ( कु. ) ' दोरयेन ओमून घे. '

**ओमेरा**—( कऱ्हाड ) मुलींचा एक खेळ ( मुलांच्या हुतुतु सारखा ), शिवावयास जाणाऱ्या मुलींनीं ' ओ मेरा। चक्की भोरा। भो-भोरा। भो-भोरा। ' असें म्हणावयाचें [ ध्व. ]

**ओय**—उद्गा. कळ उठली किंवा कांहीं दुःख झालें असतां एकदम उच्चारला जाणारा शब्द; दुःखोद्गार; दुःसह वेदना झाली असतां हा उद्गार निघतो. [ ध्व. ]

**ओयरण-णें**—वैरण-णें पहा.

**ओयरा**—पु. १ वैरा; एका दिवसाच्या स्वयंपाकासाठीं डाळ, तांदूळ इ० काढून टेवलेला शिधा. म्ह० १ जों जवळ ओयरा तों जग सोयरा. २ निराळा ओयरा कोणकोणाचा सोयरा. २ ह्या शिध्यांपैकीं (बायकांनीं) संचय म्हणून काढून टेवलेला भाग. [ सं. अभ्यवहार. ( धातु अव+हृ ) वैरणें, वैरा ]

**ओयरा**—पु. १ ( कों. ) स्वयंपाकघर. ओवरा पहा. २ ( कांहीं प्रांतांत ) माजघर. [ ओवरी ? ]

**ओयल**—वि. ( गो. ) रागीट.

**ओर**—स्त्री. ओरी, ओवरी पहा.

**ओर**—पुन. ( पाण्याचा ) पूर; लोंढा. ओर पहा. [सं. आ+पूरय; प्रा. आऊर )

**ओरक-ग**—न. मोठा हातवाजा: हारमोनियम. [ पोर्तु. ओर्गाव; इं. ऑर्गन ]

**ओरकल**—पुस्त्रीन. सोन्याचा कस लावण्याची कसोटी ( चौकटींत बसविलेली ); कसोटीचा दगड; निकष. [ का. ओरे-कल, ओरे=कस लावणें, घांसणें; कल्लु=दगड ]

**ओरखडणें, ओरखाडणें**—उक्रि. १ चीर पाडणें; रेघ ओढणें; पृष्ठभाग किंचित दुखविणें; ओरबाडणें; ओरखाडा काढणें; ओचकारणें. २ (ल.) जमीन वरवर नांगरणें. ३ वेडेंवांकडें, आडवें-तिडवें लिहिणें; रेघोटया मारणें; खरडणें; तासणें. -अक्रि. अपक्व ज्ञान असणें; शास्त्रादिकांचा वरवर अभ्यास करणें; कसेंतरी ओर बडलें जाणें. ' हा केवळ निरक्षर नव्हे, कांहीं ओरखडला आहे. '

**ओरखडा**—पु. चिर ( शरीरावर नख, काटा इ० कांनीं पाड-लेली ); जोरानें ओढल्यावर पडणारी चीर, रेघ; ओचकारा. [ सं. आ+रेखा ]

**ओरँगउटँग, ओरँगोटँग**—पु. शेंपूट नसलेला लांब हाताचा एक वानर. हा मलाया, बोर्निओ, सुमात्रा इ० अरण्यांत आढळतो. [ मलाई ओ० उतन=रानमाणूस; तुल० सं. उरु+अंग+उत्तान= मोठा ]

**ओरंगणें**—उक्रि. विटणें; त्रासणें. वोरंगणें पहा. [ अव+रंग ]

**ओरंगळ**—स्त्री. वरंघळ; उतार. [ का. वार=उतार ]

**ओरट-ड**—पु भाजल्या जाणाऱ्या मिरच्यांचा वास; खकाणा; मिरच्या दळतांना येणारा दुःसह वास; त्यांचे नाका तोंडांत जाणारे बारीक कण; विझणारी मेणबत्ती इ० चा तीव्र, असह्य वास. [ का. उरुडु=मर्यादा सोडणें; दुःसह होणें ] ०**घाण, ओरटाण, ओरढाण**-स्त्री सहन न होणारी घाण; उग्र वास; दुर्गंधि.

**ओरंट**—पु. ( प्रां. ) आचका; पेटका; कळ; चमक. [ ? ]

**ओरड-णें, ओरडा, ओरडाओरड**—तक्रार. अरड-णें, अरडाअरड पहा. ' हिंदुस्थानांतील इंग्रज राज्यकर्ते यांच्या-जवळ ओरड करून कांहीं एक मिळायचें नाहीं. ' -टि १.२५७.

**ओरंडी**—स्त्री गोट; कांठ; कठडा, कठड्याची भिंत; वरवंडी पहा. [ का. ओर=कांठ, शेवट ]

**ओरडी**—स्त्री. ( गु. ) ओवरी; खोली. ' मुलगा तोफान करतो म्हणून त्याच्या आईनें त्यास मारलें आणि त्यास ओर-डींत पुरून टेवून बाहेरच्या बारण्यास साकळ दिली. ' -मौज २-६-३०.

**ओरडेल**—न. घाणेरडें तेल; तळणांतील शिल्लक राहिलेलें तेल. [ ओरट-ड+तेल ]

**ओरण-णें**—वैरण-णें पहा.

**ओरप**—पुस्त्री. १ ( केसांतील उवा मारण्यासाठीं ) केसां-तून फणी जोरानें ओढणें, विंचरणें. ( क्रि० करणें; घालणें ) २ ( सामा. ) ओरपणें या अर्थी प्रयोग; जोरानें ओढणें, खेचणें. ३ नागवणूक; लूट; लुबाडणी. (क्रि० घेणें; करणें). ४ ओरपण्या-पासुन मिळालेली गोष्ट; लूट; बुचाडलेलें द्रव्य. ( क्रि० काढणें ). [ ओरपणें ]

**ओरपणें**—उक्रि. १ जोरानें भुरका मारणें; भुरक्याचा आवाज काढून खाणें. २ ( डहाळीचीं पानें फुलें इ० ) ओरबा-डणें; ( जटा झालेल्या केसांतून दोऱ्यांतून इ० ) जोरानें बोटें ओढणें; ( शेत जमीन ) वरवर नांगरणें; त्यांतील गवत, झुडपें,

कुंदा इ० काढणें. ३ ( दुखवलेल्या भागावर डागण्यासाठीं ) तापविलेली लोखंडाची सळई जलदीनें ओढणें. सर्दीसारख्यावर उपाय–पावसाळ्यांत दिवसभर गारठ्यांत राहिल्यामुळे पायास होणारी सरदी घालविण्यासाठीं तळव्यावर ओला कपडा ठेवून अगर ताक लावून वरून तापविलेली लाल लोखंडाची सळई वगैरे फिरविणें. ४ जोरानें, ओबडधोबड रीतीनें बोचकारणें; खाजवणें. ५ ( ल. ) लुटणें; नाश करणें; बुचाडणें ; नागवणें. [ सं. ओरंफ= जोराचा ओरखडा ( धातु रफ्–रंफ् = जाणें ); दे. ओरंपिअ= तासलेलें; नष्ट ]

**ओरफडणें, ओरबडणें, ओरबाडणें**––ओरपणें अर्थ २, ३, ४ पहा.

**ओरफुल**—न. ( गो. ) गिलीट; मुलामा.

**ओरबडा–बाडा**—पु ओचकरा; ओरखडा पहा

**ओरंबा**––पु. मातीचा ढीग; ( बागेला घातलेला ) मातीचा वरंबा, धक्का, वरवंडी; ( क्रि० घालणें ) [ वरंबा; का. ओर=कांठ, कड ]

**ओरय, ओरी**––स्त्री. ( गो. ) एक डोंगरी धान्य; वरी. [ वरी ]

**ओरवा**—पु. वरवा. १ पाण्यांत जहाज ( कांहीं दिवसांकरितां ) नांगरणें. ' जेथें ओरवा करावयाचा तेथें ओल म्हणजे नांगर खालीं सोडितात ' –मराठी ३ रें पुस्तक, आवृ. ८, पृ. ६१. २ ( जहाज ) नांगरून केलेला मुक्काम. ' मार्गांत दोन तीन ठिकाणीं ओरवा करावा लागला. ' –अद ४९. ३ ( जहाज ) नांगरण्याची जागा. ०**करणें**–जहाज नांगरणें.

**ओरघाण**—स्त्री. ( कों. ) ओरटघाण पहा.

**ओरस**—पु. ओहोटी. ' तेव्हां पंचतत्त्वांचा नाश । दश प्राणांचा ओरस । होवोनि राहे येक अंश । सर्वात्मपणें ॥ ' –कथा ७.२.४२. [ सं. अव+सृ; ओसर अप. ]

**ओरस**––पु. १ उत्साहाचा उत्कर्ष; अत्यानंद. ' तसा भरला ओरसु । करितां मठ प्रवेशु । ' –ऋ ६१. २ स्नेहोत्कर्ष; ( गाई इ० चा ) पान्हा फुटणें. ' जैसी ओरसें धेनु । हुंबरत ये वच्छा लागौनि ॥ ' –ऋ २७. ' गोवर्धनीं ज्या गाई चरती । त्या ओरसा येऊनि वत्सें चाटिती । ' –ह १०.२६७. ' ओरसेंवेळा पाजी प्रेत पान्हा । ' –नागा १५३५. ( क्रि० येणें ). [ सं. अव+रस किंवा औरस्य=हृदयोत्पन्न; प्रा. ओरस्स ]

**ओरसणें**—अक्रि. पान्हा फुटणें. वोरसणें पहा.

**ओरळी**––स्त्री. बांध; वरुळी. ओरंबा पहा. ' जेयां कस्तुरिअेंची बुडवती । कापुराची ओरळी भवंती ॥ ' –शिशु ३०८ [ का. ओर=कांठ; म. वरळी ]

**ओरा, ओंरा**––ओयरा पहा.

**ओरा**––पु. (हिं.) विशिष्ट मिठाई; साखरेचा लहानसा लाडू. ' पाण्यास लागलेला साखरेचा ओरा ( म्हणजे लाडू ) जसा पाणी शोषून घेतो ... ' –मराठी ६ वें पुस्तक, पृ. २२७. ( १८७५ ). [ हिं. ओला ]

**ओरा**––पु. ओहरा. १ ( कों. ) मोठ्या शेतामध्यें नांगरण्याच्या सोयीसाठीं पाडलेले जमिनीचे जे मोठे तुकडे ते प्रत्येकी. २ नांगराची एक अथवा थोड्याशा रेघा ( तास ). ३ अशा प्रकारें नांगरलेला शेताचा अंडाकृति भाग. आरा पहा.

**ओरी**––ओवरी पहा.

**ओर्क**––ओरक–ग पहा.

**ओल**—स्त्री. १ भिजलेली स्थिति; ओलावा; दलदल; आर्द्रता. ' दानव रुधिराचिया ओला. ' –शिशु २. २ ( ल. ) साध्यता; सुलभपणा ( काम करण्यास जागा, सवड ). उ० तेथें कांहीं ओल आहे=आशा करण्यास कांहीं जागा, अनुकूल स्थिति, साधन, सोयी आहेत. [ सं. आर्द्र; प्रा. उल्ल–ओल्ल ] **म्ह०** १ ओल आहे कीं पो(फो)ल आहे, ओल ना पोल, ओल कीं पोल ( कांहीं ओलावा आहे ? कां सगळा सुसाच ), तेथें कांहीं लभ्यांश आहे किंवा नाहीं. २ मुलांचा एक खेळ, ( चार, पांच मुलें एकत्र बसून उभी पोकळ मूठ करितात, एक मुलगा आपल्या हातांतील खडा कोणातरी एकाच्या मुठींत टाकतो व मग ओल कीं पोल असें डाव आलेल्या मुलाला विचारतो व त्यानें ज्याच्या हातांत खडा असेल त्याचा तो हात धरल्यास त्याची हार जाऊन खडा धरणाऱ्यावर येतें. ) ३ ( ल. ) दयाळूपणा, दयार्द्रता. ' भीतरि नाहीं प्रेमाची ओ( ल )ळ । तया केवि बोलवती वियोगिचे बोल । ' –ऋ ९९. ०**धरणें**–जमिनींत पडलेल्या पावसाच्या पाण्याची वाफ होण्यापूर्वी जमीन नांगरणें. **ओलीला ओल मिळणें**–जमिनींत ओलावा वाळून गेला नाहीं तों पुन्हां पाऊस पडणें.

**ओल**—स्त्री. कापडाचा तुकडा ( एकेरी पन्ह्याचें ५–७ हात लांब उपरणें, पलंगपोस ), ( गो. ) ख्रिश्चन बायांची ओढणी.

**ओल**—स्त्री. हमीदाखल ठेवलेली वस्तु ( गुरें, माणसें इ० ); तारण; शत्रूनें तहाच्या अटी पाळाव्या म्हणून त्याजकडून खातरजमेसाठीं मनुष्य, गुरें, द्रव्य इ० मागून घेऊन त्यांस अटी पूर्ण होईपर्यंत अडकवून ठेवणें. ' कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठीं । ' –ऐपो ३८३. [का. ओलु=हमी, तारण; दे. उल्ल=कर्ज]

**ओलंगार**––पु. ( प्रां. ) झिरप; पाझर; हळु हळु ( पाणी ) वाहणें, ठिपकणें.

**ओलट**—वि. दमट; भिजलेलें; ओलसर; सर्द. [ ओल ]

**ओलट**—स्त्री. ओलीं जळाऊ लांकडें. [ ओलें+काष्ठ ]

**ओलटा**––पु. ( कों. ) होलटा; हिरवी फांदी; ओल्या लांकडाचा बारीक तुकडा; दांडकें; दंडुका ( हा फळ पाडतांना वापरतात ). **म्ह०** पडला तर आंबा नाहीं तर ओलटा. [ ओलें+काष्ठ ]

**ओलँडणी**--ओलांडणी पहा.

**ओलं(लां)डणें**--१ ओलांडणें पहा. २ उलंडणें ( उलटा होणें ) या अर्थी चुकीनें योजतात.

**ओलंडा**--ओलांडा पहा.

**ओलतेर**--न. ( गो. ) निजण्यासारखी खुर्ची; ईझी चेअर [ पोर्तु. इं. आर्मचेअर ]

**ओलपटणें**--उक्रि. ( कों. ) ओलटा किंवा अर्थाच वस्तु फेकणें; अथवा फेंकून मारणें.

**ओलपटणें, ओलपटा**--नपु ( कों. ) होलडा. ओलटा पहा. [ ओल+पटा ]

**ओलपाटा**--पु ( माना. ) काठी; लहान लांकूड, लांकडाचा तुकडा. [ ओलपटा ]

**ओलवट**--स्त्री. १ ओलट; ओली जागा; किंचित् ओलसर असलेली जमीन. २ ( कु. ) ओलें लांकूड. [ ओल ]

**ओलवण-णी**--नस्त्री. ओला करण्याचें साधन. ( भात, भाकरी इ. कोरडें अन्न खातांना ) तोंडाला ओलावा आणण्यासाठीं खावे लागणारे ओले पदार्थ, उ० दहीं, दुध, ताक; तोंडाला चव येण्यासाठीं ( चटणी, लोणचें इ० ); पाणी ( माती अगर कणिक भिजविण्यासाठीं ). --स्त्री ( राजा. ) हिरवळ जमीन; चराऊ रान, वालुकारण्यांतील हिरवळ प्रदेश. [सं. आर्द्रयण; प्रा. ओल्लण]

**ओलवणें-विणें**--सक्रि. १ ( माण. ) पीठ इ० पदार्थ दुध अथवा पाण्यानें भिजविणें; ( गव्हास ) पाणी लावून ते ओले झाल्यावर एखाद्या जाड फडक्यांत घट्ट बांधून सुमारें बारा तास दडपून ठेवणें. २ ( स्नानाच्या वेळीं ) नेसलेलें वस्त्र भिजविणे किंवा भिजविण्यासाठीं दुसरें वस्त्र वापरणें. [ ओलवण ]

**ओलवत**--स्त्री. ( कों. ) दलदलींतील मधून मधून आढळणारी हिरवळ, भाजीपाला, झाडेंझुडपें; ओलवण. [ ओला+वन ]

**ओलवा**--ओलावा पहा.

**ओलवाहू**--वि. पाणी मिळणारी जमीन, बागाईत, ओलावा धरणारी जमीन; अशा जमिनींतील पीक; कोरडवाहूच्या उलट [ ओल+वाहणें ]

**ओलसर**--वि. थोडासा ओला; दमट; भिजट; सर्द --स्त्री. ओलावा; दमटपणा. [ सं. आर्द्र+सदृश ]

**ओला**--वि. १ भिजलेला; न वाळलेला, कोरडा याच्या उलट. २ ताजा; हिरवा; न सुकलेला. ' पान ओलें आहे तोंच रस काढा. ' ३ (ल.) फलदायक (कोरडा = फल रहित याच्या उलट); लाभदायक; किफायतशीर; उत्पादक. ' हा व्यापार पहिल्यासारखा आतां ओला राहिला नाही.' ४ भरभक्कम; भरगच्च; पुष्कळ दळ, गर असलेलें; रसाळ; रसभरित. ५ पैकेवाला; मालमत्ता असलेला. ' रामचंद्रपंत दिसतो भिकाऱ्यासारखा पण तो आंतून ओला आहे हो ! ' [ ओल ] म्ह० हात ओला तर मित्र भला = जोंपर्यंत कांहीं लभ्यांश आहे तोंपर्यंतच मित्राची मैत्री टिकते. **ओलें कोरडें पहाणें**--( खाण्यामध्यें ) चव घेत, चाखतमाखत बसणें; चोखंदळपणा करणें. **ओलें जाळणें**--१ हिरवें, कच्चें ( जिवंत ) जाळणें २ (ल.) फार जुलूम करणें. **०इसब**--इसबाची एक जात--ज्यांतून सारखें पाणी गळतें असें. **०कच्चकच्चीत**--वि. अतिशय भिजलेला; ओला चिंब. **०गोळा**--पु. ( ल. ) मढ; मद्दड; फार कच्चा; अडाणी. **०चिंब-तिंब**--वि. अतिशय ओला; थबथबणारा; ओला कचकचीत. **०दंड**--पु. १ पाण्याचा सतत वाहणारा पाट २ ( ल. ) सतत, वर्षभर असणारा बाग, आगर. ' त्याचे घरीं ओला दंड आहे. ' **०दुष्(का)ळ**--पु. अतिशय पावसानें पिकाची हानि झाल्यामुळें पडलेला दुष्काळ. **०देठ**--पु. हिरवें रोपटें किंवा झाड, कोंवळें गवत; किंवा एखाद्या धान्याचें पीक. **०नायटा**--१ वाहणारा व चरत जाणारा नायटा; गजकर्ण. **०मसाला**--पु. रोज तयार करावयाचा मसाला; विशेषतः मांसान्नात हा वापरतात. त्याचें मिश्रण असें--कांदे १० तोळे, लसूण, आलें प्रत्येकीं अर्धाच तोळे, सुकी मिरची १ तोळा, अर्धे लिंबू व अर्धाच तोळे कोथिंबीर. --गृशि २.५३.

**ओलावा**--वि पाटबण किंवा पावसाच्या पाण्याखेरीज केवळ जमिनींतील ओलीमुळें उगवलेला, लावलेला ( ऊस इ० ).

**ओलांडणी**--स्त्री उतरण; उल्लंघन; पलीकडे जाणें. [ ओलांडणें ]

**ओलांडणें**--उक्रि. १ स्पर्श न करतां ( मध्यें आलेल्या वस्तू )वरून पलीकडे जाणें; पलीकडे पाय टाकणें; उल्लंघन करणें. २ नदी वगैरे उतरणें; पार जाणें. ३ देश उल्लंघित करणें; पादाक्रांत करणें, मढून जाणें. [ सं. उल्लंघन. प्रा. ओलंडण; दे उल्लुडिअ ]

**ओलांडा**--पु. १ गर्द, करट. २ केसतूड आलेल्या माणसानें ही जावी म्हणून सात गांठी मारलेल्या एका पिवळ्या चिंधींत सात बिब्बे, हळकुंड, तांदूळ घालून जी रस्त्यांत फेकतात ती. ' रस्त्यांत कोणी तरी ओलांडे टाकले आहेत, ते ओलांडूं नकोस.' ३ ही चिंधी ओलांडली असतां होणारा रोग; विशेषतः उपदंशादि रोग; ओलांडा ओलांडल्यानें अथवा उपदंश झालेल्या रोग्यानें जेथें लघुशंका केली असेल तेथें दुसऱ्यानें लघुशंका केली असतां त्यास तो रोग चिकटतो. ( क्रि० बाधणें ). ४ (विशेषतः हमालांत ) रस्त्याच्या मधोमध येणारा खड्डा ( जो ओलांडणें भाग असतें तो ); चर. [ सं. उल्लंघ्; प्रा. ओलंड ]

**ओलांडा**--उलंडी पहा.

**ओलाणी**--स्त्री. वस्त्रें वाळविण्यासाठीं, ठेवण्यासाठीं बांधलेली दोरी. [ सं. अवलंबिनी ]

शाको. २. ३

**ओलाणी-णें**—स्त्रीन. चार्डे सोडून बाकीचा ओलाणा दिवा, दिव्याची सांखळी; ओंळाणें. [ सं. अवलंबिनी ]

**ओलाणी-णें**—स्त्रीन. स्नानाच्या वेळीं भिजविण्याकरितां घेतलेलें वस्त्र; ओलेतें; पडदणी. [ सं. आर्द्रयण; प्रा. ओल्लण ]

**ओलावण-विणें**—ओलवणें-विणें पहा.

**ओलावणी**—स्त्री. १ भिजविणें; पाणी शिंपडणें; ओले करणें. २ (ल.) शांति -शर. [ ओलें ]

**ओलावा, ओलास्त्रा**—पु. १ ओल; ओलसरपणा; दमटपणा; आर्द्रता. 'जीवनाचा झाला ओलावा अंतरीं। विश्व विश्वंभरीं मावळलें ॥' -तुगा ४०५५. २ (ल.) किफायत; लाभ; नफा. ३ फायद्याचा-यशाचा संभव, शक्यता; आशादायित्व; आशेला जागा; उ० धनाचा अथवा पैक्याचा ओलावा. ४ अंतःकरणांत असलेली सदयता; दयार्द्रता; कनवाळूपणा; जिव्हाळा. 'स्नेहाचा निजचित्तीं लेशहि येऊं न देचि ओलावा।' -मोआदि ५. १०५. 'ममतेचा अथवा कृपेचा ओलावा.' ५ अप्रकट द्रव्यांश, तत्त्वांश, तत्त्व, सत्त्व. उ० बुद्धीचा, शहाणपणाचा ओलावा [ ओल ] **ओलाव्याचा**-वि. १ भिजट; दमट, सर्द; ओलसर २ भरींव; फायदेशीर इ० अर्थी ओला अर्थ ३ ते ५ पहा. उ० ओलाव्याचा व्यवहार-व्यापार-धंदा-रोजगार-चाकरी, ओलाव्याची ममता-प्रीति-मैत्री-बोलणें. याच्या उलट कोरडा.

**ओलास्त्रा**—१ ओलावा पहा. २ ओलीचा आश्रय. 'ही भाजी ओलास्त्र्यास ठेव म्हणजे वाळणार नाहीं.' -वि. ओलीचा आसरा असलेलें; आर्द्रतायुक्त. [ ओल+आसरा ]

**ओलिसेलें**—न. तलम वस्त्र; अतिशय मृदु व नाजुक वस्त्र. 'मृणाळसुतांचे ओलिसेलें। तुआं खांचर्टे मणौनि वेढूं सांडिलें। तिअें चंद्रकळेसी काइं जालें। कैसी धोटं साहतीसें।' -शिशु ६९३. [ का. ओळि=लहान पंचा+शेला ]

**ओली**—स्त्री. (वस्त्राचा) कांठ; शेवट, पदर. 'वालिपेचिआं ओली।' -शिशु १७५. [ जु. का. ओळि=रेघ, रांग; दे. ओली=ओळ; सं. आलि, आवलि ]

**ओली**—वि. ओला पहा. **०आग**-स्त्री. पुष्कळ पाऊस पडल्यानें आलेली आपत्ति; ओला दुकाळ. **म्ह०** कोरडी आग पुरवेल, ओली आग पुरवणार नाहीं. **०काडी**-स्त्री. हिरवें पीक, शेत, गवत; धान्याचीं हिरवीं रोपें. **०कूस**-स्त्री बाळंत झाल्यानंतरचा स्त्रियेचा गर्भाशय (अशा वेळीं पुन्हां लवकर गर्भ राहण्याचा संभव असतो). **०कोरडी भाकर**-स्त्री. अल्पस्वल्प, जाडेंभरडें अन्न. 'प्रामाणिकपणानें मिळविलेल्या ओल्याकोरडया भाकरीला जी रुचि असते ती दुसऱ्याचें मिंधें होऊन मिळविलेल्या पक्वान्नाला नसते.' -निबंधचंद्रिका. **०खरूज-पू**-स्त्री. १ वाहणारी खरूज. २ (ल.) सतत त्रास देणारा इसब, व्याधि, जंजाळ. **०भांग**-स्त्री. ही कोरडीपेक्षां जास्त अमली असते त्या-वरून (ल.) दुष्ट, स्वच्छंदी, तामसी मनुष्य. **०भिक्षा**-स्त्री. शिजविलेल्या अन्नाची भिक्षा; मधुकरी; याच्या उलट कोरडी भिक्षा म्हणजे धान्य, दाणे वगैरे. **०ममता**-स्त्री. खरेंखुरें, सात्त्विक प्रेम; ज्यापासून कांहीं लाभ होतो अशी प्रीति. **०सवाशीण**-स्त्री. न्हाती-धुती सवाशीण (कोरी म्हणजे नहाण न आलेली). -मसाप १.१.१.

**ओलें**—न. १ ओलेतें; भिजलेलें वस्त्र. २ ओला चारा (गुरांकरितां). [ सं. आर्द्र; प्रा. उल्ल-ओल्ल ] -वि. ओला पहा. **०अंग**-न. नुकत्याच बाळंत झालेल्या स्त्रीचा देह, शरीरावस्था. **०कुष्ठ**-न. रक्तपिती; पू वाहत असलेलें कोड; महारोग. **०जाळणें**-(वाळवल्याबरोबर ओलें जाळणें किंवा नुसतें ओलें जाळणें) जुलूम करणें. **०हळदकुंकुं**-न. (सुगंधी) खोबरेल किंवा फुलेल यांत हळद किंवा कुंकुं चांगलें घोटून तयार करितात तें.

**ओलेटा-ता**—वि. (स्नान करण्याकरितां अथवा झाल्यानंतर) ज्यानें ओलें वस्त्र वेढलें आहे असा; ओलें अंग असलेला. [ सं. आर्द्रवत् ]

**ओलेतें-तें**—न. भिजलेला कपडा; ओलें वस्त्र. [ ओला ]

**ओलेंपालें**—न. ओला चारा. ओलें अर्थ २ पहा. [ ओला+पाला ]

**ओल्ली**—स्त्री. (गो.) बांबूच्या कांबींची केलेली टोपली, रोळी; (पदार्थ ठेवण्यासाठीं) बांबूचें पात्र.

**ओल्लो**—उद्गा. ओहो ! आश्चर्यार्थी उद्गार. 'ओल्लो, बचंभट, आम्हीं तुमचीच इच्छा केली होती.' -मोर २२. [ इं. ओ+लो=पहा ]

**ओल्हांटणें, ओल्हांटा**—ओलपटणें, ओलपटा पहा.

**ओल्हांडणें-ओल्हांडा**—ओलांडणें, ओलांडा पहा.

**ओल्हावण**—न. ओलवण; उत्तेजन. 'कीं प्रमोदासी ओल्हावन। मन्मथाचें ॥' -शिशु ६२८. ओलवण पहा.

**ओल्हावणें**—सक्रि. भिजविणें; ओलावणें; ओलें करणें. 'असो माथा वन्दूनि उदक। ओल्हाविलें द्वय अंबक।' -मुआदि २२.३९. [ सं. आर्द्रयण; म. ओलावण ]

**ओंवड**—न. (कों. हेट.) बकुळीचें झाड; वोवल; ओऊळ, ओंवळ पहा. [ सं. बकुल ? ]

**ओवंडकरू, ओवंडेकरी, ओवांडकरी**—वि. ओवंडा धारण करणारा; परक्या ठिकाणची शेती करणारा.

**ओवंडा**—पु. १ ज्या गावांत मालक राहतो त्या गांवच्या शिवारांत नसणाऱ्या जमिनीचा मालकी हक्क किंवा लागवड. २ अशा प्रकारची लागवडींत आणलेली किंवा ताब्यांत आलेली जमीन. ३ (यावरून) स्वत:च्या घरापासून दूर असलेलें काम, धंदा; एखाद्या कामाचा कांहीं भाग एकीकडे करणें व दुसरा

दुसरीकडे करण्याची तऱ्हा, प्रकार; दूर राहून करावयाचा व्यवसाय. -गांगा ९९. [?]

**ओंवण**—स्त्री. १ ओंवणें; छिद्रांतून किंवा छिद्रें पाडून आंत दोरा घालणें; गुंफणें. 'देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी। शोभतील गुणीं आपुलीया ॥' -तुगा १९५१. २ शिवण; टाका घालणें [सं. उप+वे=विणणें]

**ओवणी**—स्त्री. ओंवलेली जिन्नस; एकत्र केलेली स्थिति माळ. 'रविमंडळा भंवती। जरि तारागणांची ओवनी दीसे- ती ॥' -शिशु ३९९.

**ओवणें, ओंवणें**—उक्रि. १ सुईत वगैरे दोरा घालणें, गुंतविणें; गुंफणें; धागा घालणें, अडकविणें. २ (कुण.) शिवणें टांके घालणें. ३ (ल.) श्लोक, वाक्य इत्यादींत नवीन अक्षर किंवा शब्द, पदें घालणें, संबद्ध करणें. ४ माळेंत फुलें घालणें [स. उप+वे=विणणें; प्रा. ओविअ]

**ओवर**—न. दंपती; वधूवर; जोडपें; नवरा-बायको (विशेषतः लग्नाहून परत आलेलीं अथवा कुलदेवतेच्या दर्शनास जाणारीं) (अव. ओवरें) [सं. वधुवर; प्रा. वहुवर] ०**जत्रा-यात्रा**-स्त्री वधूवरांनीं कुलदेवतेच्या दर्शनास जाणें. (क्रि० भरणें). खेरीज याच अर्थी **ओवरभरणी**-स्त्री. **ओवरभरणें**-न. (क्रि० करणें). ०**जेवण**-न. नवरीच्या बापानें नूतन वधुवरांस केलेली मेजवानी.

**ओंवरा**—पु. स्वयंपाक घर. ओयरा पहा. 'ओवरा ओजरी भूमि माळिवरी उपरिया.' -वसा १४. [ओवरी]

**ओवरी**—स्त्री. १ मुख्य देवळाच्या बाहेरील आवाराच्या भिंतींत गोसावी, यात्रेकरी, देवाची पुजारी मंडळी यांना तात्पुरतें राहण्यास बांधलेली खोली, पडवी, सोपा; कांहींच्या मतें हा शब्द 'वांव' पासून झाला असावा, कारण ओवरीची रुंदी एक वांव असते. २ (सामा.) खोली; ओसरी. 'रत्नांचिआं चित्रशाळेया। चिंतामणीचिआं ओवरियां।' -शिशु ५९६. [प्रा ओवर=निकर, समूह; दे. ओवारी=धान्याचें कोठार; सं. अपवारिक-ओवारिआ-ओवारी; किंवा सं. अपवरक, उपरक; प्रा उवरओ-भांडारकर]

**ओवरें**—न. फुलाचें मखर ? माळा. 'कनक-कमळें कल्हारें। पार्यातकें सेंदुआरें। गुंफीवु कीजेती ओवरें। अशोका तळवटीं॥' -शिशु ६३१. शिवाय ६३८, ७७३. [ओवरी]

**ओंवसणें**—अक्रि. (बायकी) व्रत (वसा) घेणें; करणें. 'मंगळागौर पांच वर्षे ओवसावी लागते.' [सं. उपास्=पूजा करणें; प्रा. उवास; म. वसा]

**ओंवळ, ओंवळदोडा**—(गो.) बकुल; ओंऊळ, ओंऊळदोडा पहा.

**ओंवळणें**—अक्रि. (वस्त्र) थोडेंसें धुणें; खळवळणें. [सं. उद्+वल्]

**ओंवळणें**—अक्रि. (कों) (आंबे इ०) अर्धवट पिकून खालीं गळणें; उमटणें; उमळणें; उंबटणें. [ओघळणें; सं. उत्+पच्]

**ओंवळा, ओंवळा**—वि. अगदीं पवित्र (सोंवळा) व अगदीं अपवित्र यांच्या मधल्या स्थितींतला; सोवळें न नेसलेला; अशुद्ध; अपवित्र; विन धुतलेल्या धोतरास किंवा स्नान न केलेल्या मनुष्यास शिवलेला (मनुष्य). ब्राह्मणांत संध्या, भोजन, यज्ञ, इतर धार्मिक कृत्यें करण्यासाठीं स्नान करावें लागतें. तें केलें नसेल तो ओंवळा; सोंवळ्यांतील माणसानें इतर माणसें, वस्त्रें इ० स शिवलें तर ओंवळेपणा येतो. सोंवळा असतां कासोटा सुटल्यासहि माणूस ओंवळा होतो. तऱ्हां अनेक गोष्टींनीं माणूस किंवा वस्तु ओंवळी होते. 'सदा पवित्र ज्वालामाळी। त्यास ओवळे कोण म्हणेल ॥' -ह ३२.५३. [सं. अमंगल; प्रा. ओमलिआ]

**ओंवळी**—स्त्री. (कों.) ओंऊळ पहा.

**ओंवळ्याभोंवळ्या**—स्त्री. अव. लहान मुलांचा खेळ. स्वतःभोवतीं गिरगिर फिरणें. [भोंवळ द्वि.]

**ओवा-हा-व्हा**—पु. (ना.) १ (गाई, म्हशी यांची) कास; ओटी. २ पान्हा 'वो(ओ)हा दाटल्या चहूंस्तनीं। दुग्धधारां वर्षती।'-मुवन १२.६७. [सं. ऊधस्]

**ओवा**—पु एक प्रकारचें औषधी झाड आणि त्याचें बीं. झाडाची उंची १ ते १॥ हात असून, बींचा रंग पिवळसर असतो; पोटदुखीवर उपयोगी. ओंव्यांत किरमाणी ओवा, पानओवा इ० भेद आहेत. पानओंव्यास बीं येत नाहीं. याचें झाड, पसरट दीड हात उंच असून पानें जाड असून त्यास ओंव्यासारखा वास येतो. पानांचीं भजीं करतात फांद्या लावल्यानें हें झाड होतें. ओंव्याच्या अर्काला ओंव्याचें फूल असे म्हणतात [सं. यवानी, अजमोदा, हि. अजवान; बं. यमानी; ते. ओममी ता. अमन] **म्ह०** १ ज्याचें पोट दुखेल तो ओंवा मागेल. २ ओवा म्हणतो मी आहे गुणी पण माझ्यावर पितात पाणी

**ओवांडा, ओवांडाकरी, ओवांडदार**—पु. ओवंडा. ओवंडेकरी पहा.

**ओवासणें**—अक्रि. (कु.) ओवरजत्रा करणें; नवीन जोडपें देवास जाणें. [ओवसणें पहा]

**ओंवाळणी**—स्त्री. १ तोंडाभोंवतीं फिरविणें (हात, आरती वगैरे); आरती करणें. २ कथा झाल्यानंतर श्रोतेमंडळी हरिदासावरून जो पैसा वगैरे ओंवाळून आरतीच्या ताम्हनांत टाकतात तो. ३ कोणाहि ओंवाळणेकऱ्याच्या ताम्हनांत बक्षीस टाकावयाचा पैसा; ओंवाळून टाकलेलें द्रव्य; देणगी; भेट; बक्षीस. ४ (ल. उप.) फजिती; खरडपट्टी. 'पुढील सालीं साहेबाची असल्या

प्रकारची ओवाळणी करण्याची पाळी न येवो म्हणजे झालें' –टि २.२१४. [ओवाळणें] ०काढणें–(बायकी) ओवाळून टाकणें; उतरून टाकणें (पैसा, कापड इ०). 'असल्या पैशांची ओवाळणी काढावी माझ्या बाळावरनं.' –झांमू.

**ओवाळणें**—उक्रि. १ लामणदिवा घेऊन किंवा तबकांत निरांजन, पैसा, सुपारी, अक्षता घालून तें माणसाच्या अगर देवाच्या तोंडाभोंवतीं उजवीकडून डावीकडे फिरविणें (अमंगल, इडापिडा जाण्यासाठीं, पूजेच्या वेळीं, अगर मंगलप्रसंगीं). २ स्त्रियांचें न्हाणें किंवा पुरुषांची आंघोळ झाल्यावर त्यांचीं वडील माणसें शेवटचा तांब्या घालून मग पुरुष असल्यास उदंड आयुष्याचा हो, मुलगी असल्यास चांगला पति मिळो व सुवासिनी असल्यास जन्मसावित्री–पुत्रवंती हो असे आशीर्वाद देऊन हातांत पाणी घेऊन स्नान करणाऱ्याच्या अंगाभोंवतीं फिरवितात तें. ३ भोंवतीं ओंवाळून टाकणें; कःपदार्थ मानणें; बलि देणें. 'तन मन धन यथार्थ। रामावरुनि ओंवाळिती॥' 'इअे तें ओवाळोनि आखतां। दावावियां वसंतां।' –शिशु ८१७. [सं. उद्वलन किंवा अवज्वलन]

**ओवाळलेला**—वि (कु.) वाईट, तिरस्कारलेला. [ओंवाळणें]

**ओवाळून टाकणें**—कुचकिमतीचें म्हणून फेंकून देणें. 'काय देउं उपमा तुळणेस दिसेना कांहीं। ओंवाळुन काय टाकावी वाटे लवलाहीं।' –प्रला ९२. 'हीं मोतीं उत्कृष्ट आहेत, कालचीं मोतीं ह्यांच्यावरून ओवाळून टाका.'

**ओवी, ओंवी**—स्त्री. १ मराठींतील चार चरणांचा एक छंद. महाराष्ट्र संतकवींचा हा छंद अत्यंत आवडता आहे. यांत वर्ण व मात्रा यांची संख्या अनियमित असते. तथापि अष्टाक्षरी–औटचरणी व अष्टाक्षरी–त्रिचरणी असे दोन प्रकार साधारणपणें पाडतात. 'पहिली माझी ओंवी। पहिला माझा नेम। तुळशीखालीं राम। पोथी वाचे॥' हा पहिला प्रकार. 'आकाशींच्या अंतराळीं। तारकांना तेज चढे। तुझी माझी प्रीति जडे॥' हा दुसरा प्रकार. 'नागार्जुनाचा दातारू। राणेराओ श्रीचक्रधरू। ओंवी प्रबंधीं कवी भास्करू। वर्णितुसे।' –शिशु ७. २ सदर छंदांत रचलेलें गीत बायका दळतांना, मुलांना थोपटतांना किंवा झोपाळ्यावर बसून म्हणतात. 'तथा महाराष्ट्रेषु योषिद्भिर् ओंवी गेया तु कंडने।' –मानसोल्लास ५.२०५२. 'ओविअें गातांति यादवांचां राणा।' –दाव ३३. 'जात्यावर बसलें म्हणजे ओवी आठवते' किंवा 'हातीं खुंटा आल्यावांचून ओवी सुचत नाहीं.' ३ विणकामांतील प्रत्येक ताणा जींतून ओवला जातो व जिच्यामुळें विणतांना तो खालींवर केला जातो ती; वही; नेहमीं ओव्या असा अनेकवचनीं प्रयोग करतात. **ओव्या गाणें**–(ल.) भलतीच स्तुति करणें. [सं. वे=विणणें; दे. ओविअम; म. ओवणें]

**ओव्हरकोट**—पु. कोटावरून किंवा कपड्यांवरून घालावयाचा पायघोळ डगला; थंडीचा कोट. [इं.]

**ओव्हरसिअर**—पु. १ देखरेख करणारा; ओरशार. २ बांधकाम खात्यांतील देखरेख किंवा पाहणी करणारा लहान अधिकारी (इंजिनियरचा दुय्यम). [इं.]

**ओशंग**—स्त्री. मांडी. ओसंग पहा.

**ओशट, ओशेट**—न. १ तेलकटपणा; बुळबुळीतपणा; स्निग्धता. २ कोणताहि बुळबुळीत अथवा तेलकट पदार्थ; स्निग्ध द्रव्य. 'ताप आला असतां ओशट खाऊं नये.' ३ (कुण.) मांस. 'बामणीचीं लांकडें ओशटाखालीं जाळीत नाहींत.' –खेया ४३. ४ (ल.) लांच. [सं. अवशिष्ट–ओशिष्ट–ओशेट–ओशट– भाअ १८३२; किंवा सं. उच्छिष्ट] –वि. १ तेलकट; बुळबुळीत; स्निग्ध (हात, वस्त्र, पात्र इ०). २ ओशट पदार्थाचा वास असलेला.

**ओशात–द**—स्त्री. १ (कों.) (झाड, दिवा, पलंग, माणूस अथवा इतर वस्तु यांची) सावली; छाया; ओशेटा; तिच्यामध्यें बसूं नये अगर उभें राहूं नये कारण ती वाईट आहे अशी भावना असतांना प्रयोग. २ (सामा.) सावली; छाया. [ओस= झाडाची छाया]

**ओशाळ**—वि. १ निलाजरी; निसवलेली; स्वैर (स्त्रीसंबंधीं योजितात). **म्ह०** ओढाळ गुरूं आणि ओशाळ बायको. २ ओशाळा पहा.

**ओशाळ, ओशाळगत, ओशाळी, ओशाळीक**—स्त्रीपु. ओशाळेपणा; लज्जा; खजिलपणा; शरमिंधेपणा; मोकळेपणा न वाटणें अशी अवस्था. 'नसतां ओशाळ महीपाठीं। कलिकाळातें मारूं काठी।' –नव २१.३३. 'सुंदर परंतु निर्दोष वस्तूकडे पतित मनाला ओशाळेपणामुळें उघड्या डोळ्यांनीं पाहण्याचा धीर होत नाहीं.' –एकचप्याला पृ. ७५. [ओस=छाया]

**ओशाळणें**—अक्रि. १ लाज वाटणें; शरमणें; ओशाळा होणें. २ दबेल, दराऱ्याखालीं असल्याप्रमाणें राहणें.

**ओशाळा**—वि. खजिल; शरमिंधा; दबेल (उपकारामुळें वगैरे); लाजलेला (आपलें दुष्कर्म उघडकीस आल्यामुळें). 'कित्येकांना हजारों रुपयांचीं बक्षिसें, घरेंदारें देऊन ओशाळें करून ठेवलें आहे.' –विक्षिप्त ३.१४०. **म्ह०** ओशाळा आदितवाराला भितो. [ओस=छाया (छायेनें घेरलेला)?; सं. अपसार–ओसार–ओशाल–ला]

**ओशिंड**—न. वशिंड पहा.

**ओशेटा**—पु. १ सावट; मोठ्या झाडाची सावली; (हिच्याखालीं वनस्पतींची वाढ होत नाहीं). ओशात–द पहा. २ झपाट्यानें

जात असतां होणारें अस्पष्ट ज्ञान; अंधुक दिसणें ( मनुष्य झाड इ० चें ). [ ओस=छाया ]

**ओषण**—पु. ( रसा. ) प्राणवायूंत विद्युत्कुलिंग सोडला म्हणजे हा वायु तयार होतो. यास चमत्कारिक वास येतो. याचा कर्बयुक्त पदार्थाशीं संयोग होऊन निरनिराळीं रासायनिक द्रव्यें होतात. –ज्ञाको ओ ३२. [इं. ओझोन पहा] **०ऊदिन** (ओझो-बेझिन )–पु. एक पांढरें स्फोटक द्रव्य: हें ऊदिनचें प्राणीदीकरण होऊन तयार होतें. –ज्ञाको ऊ ६.

**ओषध**—न. औषध पहा.

**ओषधी**—स्त्री. १ औषधी वनस्पति. 'राजाग्नि विशल्य करी देउनि इलुसीच ओषधी राजा ! ॥' –मोभीष्म ८ ८. २ ( सामा. ) झाड; झुडप; वनस्पति; एकवर्षायु झाड; एक वेळ फळ येऊन जें झाड मरतें तें; –अमरकोश. २.३.६. ३ उद्भिज्ज पदार्थ. –वि. औषधी गुणयुक्त; औषधाला उपयोगी.

**ओष्ठ**—पु. ओठ; होट पहा. [ सं. ] **०आखादणें**–मुका घेणें. 'कोण्हीं ओष्ठीं नाचतां । मुख मुखी घालूनि आखादिलें ॥ –मोल. **०पादी**–पु. (प्राणि.) या वर्गांतील प्राण्यांत अगदीं पुढच्या दोन पायांचा उपयोग ओठांप्रमाणें चर्वण करण्यास होतो. उ० घोणी इ० प्राणी–प्राणिमो १२१. **०पुट**–न. ओठ (खालचा किंवा वरचा ); ओठाचा पुडा. 'तिजें वग्वी ओष्ठपुटे। बिंबफला पासोनी । ' –शिशु ४११. [सं. ओष्ठ+पुट] **०भाषा**–स्त्री. (ओठांची भाषा) बहिऱ्याशीं बोलतांना स्पष्ट उद्गार न काढतां उद्गाराला अनुसरून ओठ हलविण्याची क्रिया. **०रोग**–पु. ओठांचे रोग. 'वातादि पृथक् तीन दोषांनीं तीन, त्रिदोषापासून एक, आणि रक्तजन्य, मांसजन्य, मेदजन्य व अभिघातजन्य या चार दोषांनीं चार असे एकंदर आठ ओष्ठरोग आहेत. ' –योर २.४४९.

**ओष्ठ्य**—वि. ओठापासुन उच्चारले जाणारे ( वर्ण. जसे–उ, ऊ, व प वर्ग ).

**ओष्ठामृत**—न. ( काव्य. ) ओंठांतील अमृत. ( चुंबनाच्या वेळीं हें लाभतें ). चुंबनाच्या वेळीं मिळणारें सुख. [ सं. ओष्ठ+अमृत ]

**ओष्णावणें, ओष्णेणें**—अक्रि. झोपेंत बोलणें, बरळणें, बडबडणें, ओसणणें, जावडणें. [ सं. उत्स्वप्न ]

**ओस**—वि. १ निर्जन; लोकांनीं सोडून दिलेलें; ओसाड ( गांव, शहर ); पडित ( जमीन ). २ रिकामा; शून्य. 'ओस जाल्या दिशा मज भिगुळवाणें। ' – तुगा १५५६. [सं. अ+उषित–ओसिअ–ओस किंवा अवस–ओस. –राजवाडे भाग १८३४ ]

**ओस**—स्त्री. १ ( कों. ) भात झोडल्यावर त्या तृणाच्या पेंढ्या बांधतेसमयीं कवळी अग्रभागीं धरून झाडली म्हणजे तींतून आखूड, कुजका तृणांश खालीं पडतो तो. २ नारळ, केळ इत्यादिकांचें काढून टाकलेलें सोपट किंवा काथ्या.

**ओस**—पु. ( कों. कु. ) नाकाच्या आंतील हाड.

**ओस**—न. ( हिं. ) दंव; धुकें. [ दे. ओसा=निशाजल ]

**ओस, ओसंग**—नपु. (प्रां.) १ झाडाची सावली. २ दाट झाडी; झुडपाचा अंधार; सावट.

**ओसंग-गा**—पु. (काव्य) मांडी. 'बाळ ओसंगा घेतला। केला नमस्कार धर्मासी. ' –जै ८१.७०. [ सं. उत्संग; प्रा. ओच्छङ्ग; हिं. उछग ] **ओसंगीं घालणें, देणें**–एखाद्याच्या आश्रयाखालीं जाणें, देणें, हवालीं करणें. **ओसंगीं असणें–पडणें–राहणें–निघणें**–आश्रय करणें; स्वाधीन होणें; लीन होणें. 'तुका म्हणे पांडुरंगा । तुझ्या निघालों ओसंगा ॥ ' –तुगा ( मोल ).

**ओसग-गी**—स्त्री. अशोकाचें झाड. [ सं. अशोक ]

**ओसंगळ**—स्त्री. ( ल. ) आश्रय; संरक्षण; छत्र; कृपा; आच्छादन. बहुधा विभक्तिप्रत्यय लावूनच उपयोगांत आणतात. उ० ओसंगळीनें–चा, ओसंगळीं. [ ओसंग ]

**ओसंगा**—पु. मदतगार; मेढा; प्रोत्साहक. [ उत्संग ]

**ओसट**—ओशट पहा.

**ओसट**—न. सावट; झाडाची छाया. ओस पहा.

**ओसंड-डं**—न. वशिंड पहा.

**ओसडणें**—उक्रि. ( मावळी ) लुटणें; नागविणें. [ सं. अवशातन: प्रा. ओसाडण ? ]

**ओसं ( सां ) डणें**—अक्रि. १ ( काव्य ) पडणें; सांडणें; गळणें. 'जया स्वानंद ओसंडे । सर्व ही इंद्रियद्वारें । ' –विपू १. ४३. २ वरून वाहणें; भरपूर भरून वाहून जाणें. वोसंडणें पहा. 'कैसा मुक्ताचा निजबोध । घेवों जातां रसस्वाद । रसत्व लोपूनि स्वानंदकंद । परमानंद ओसंडे । ' –एभा ११.३१५. [ सं. उत्सन्न; सं. उत्+म. सांडणें ]

**ओसंडणें**—उक्रि. ( काव्य ) बाहेर फेकणें, देणें, त्यागणें. 'जे हें माझें मत अव्हेरुनी । ओसंडिती ॥ ' –ज्ञा ३.१९४. 'कष्टवीप राज्य आलें हातां । तरी काय ओसंडावें तत्त्वता । ' –रावि १.२००. [ सं. उत्सन्न; उत्+सांडणें ]

**ओसंडणें**—ओसणणें पहा.

**ओसण**—न. बैल, रेडा यांच्या नाकांतील वेसण. [ वेसण ]

**ओसणणें-वणें, ओसणावणें**—अक्रि. १ झोपेंत बोलणें. ओष्णावणें पहा. 'ओसणतां गा आपण । स्वप्नीं ही जाण नेदावें । ' –एभा २९.५०३. 'उखेसी न वाटे ऐसे । कीं हें स्वप्न देखतसें । गोष्टी करी रतिरसें । बोलतसें ओसणतां ॥ ' –ह २८.४४. २ बडबडणें; बरळणें. [ सं. उत्स्वप्न ]

**ओसणें**—उक्रि. ( कों. ) ओस ( काथ्या, सोपट ) काढणें, खरपुडी किंवा साल काढणें; सोलणें ( नारळ, पोकळ, शेंग, अंबाडीची काडी इ० ). [ ओस ]

**ओसत-द**—स्त्री. ( राजा. ) सावट. ओशत पहा.

**ओसपटणें, ओसपाटणें**—उक्रि. १ ( कों. ) पाणउतारा करणें, होणें. 'आतां आणखी कशाला सांगतोस ? पुरा ओसपटलास.' २ शक्तीपेक्षां जास्त काम केल्यानें अतिशय थकणें. [ कों. ओस+पडणें ]

**ओसंबणें**—अक्रि. ( राजा. ) स्फुंदत स्फुंदत रडणें. उसंबणें पहा.

**ओसर**—पुस्त्री. १ एकीकडे होऊन किंवा बाजूस सरून दुसऱ्यास जाण्यासाठीं दिलेली वाट; जागा. ( क्रि. घेणें; देणें ). २ नदीच्या पुराच्या पाण्याची ओहोट. [ सं. अव+सृ; अवसर; प्रा. ओसर ]

**ओसरणें**—अक्रि. १ (नदीचा पूर, पाणी) कमी होणें; खालीं जाणें, उतरणें; ( पाऊस, ताप, सूज ) कमी होणें; ( श्रीमंती, कीर्ति, तारुण्य, जोम इ० स ) उतरती कळा लागणें; ( पाऊस, अभ्रें ) जाणें; नाहींसें होणें. 'क्षणें शोकिले जलार्णव । सूर्य उगवतां तम सर्व । जाय जैसें ओसरोनी ।' –मोल. (बाजार, जमाव, गर्दी ), पातळ होणें; मागें जाणें; हटणें; बाजूला होणें, करणें. 'हा शूर दूर ओसर म्हणणार महाप्रभाव हा रविला ।' –मोभीष्म १०.९२. २ रिकामा होणें. 'जैसा वृष्टि करुनियां आणाया तोय मेघ ओसरला ।' –मोकर्ण ३५.४०. [सं. अवसरण; प्रा. ओसरण]

**ओसरा, ओसरी**—स्त्री. माजघराच्या पुढील अगर मागील, तीन बाजूंनीं भिंत असलेली मोकळी जागा; ओटी; पडवी; सोपा. 'पृथ्वी रुसोनि ओसरां राहे ।' –एभा २२.४१०. 'ओवरा ओसरी भूमि ... ' –वसा १४. [ सं. अवसर; दे. ओसरिआ; हि. उसारा=देवडी, ओवरी ] **म्ह०** भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी.

**ओसवा**—पु. झाडाची सावली. ओस पहा.

**ओसळणें**—अक्रि. (तंजावरी) झोंपेंत बरळणें. ओसणणें पहा.

**ओसा**—पु. ओस पडलेला; (पीक असलेल्या शेतांतील) पडित जमिनीचा तुकडा; शेतांतील रिकामी, पीक न उगवलेली जागा. [ ओस ]

**ओसाड**—वि. उजाड; निर्जन; माणसांनीं सोडलेलें; मनुष्य वस्ती नसलेलें; वाईट. **म्ह०** ओसाडगांवीं गाढवी सवाष्णी. 'एखाद्या ओसाड अरण्यांत जाऊन पडल्यास आपली काय दशा होईल ... ' –टि ४१४८. [ सं. उत्सद्; प्रा. ओस्साड ]

**ओसाड**—स्त्री. (गो.) सुकतीच्या वेळीं नदीचें पाणी जोरानें उसळतें ती पाण्याची स्थिति.

**ओसाडा**—पु. वाऱ्यानें वाहून आणलेला पाऊस, तुषार ( नेहमीं अव. ओसाडे असा प्रयोग ). ( क्रि० येणें ).

**ओसाडा**—पु. पडदा. 'तंव भीत भंगा चहुंकडे । वानलगा वस्त्राचे ओ(वो)साडे.' –ऋ ६८३. [ सं. अव+शाट=वस्त्र ]

**ओसाडी**—स्त्री. ओसाडपणा; उजाडी; निर्जनता. **ओसाडीचा लांडगा** ( भयाण व एकांत स्थलींचा लांडगा )–जेथें रक्षण करण्यास कोणी नाहीं अशा ठिकाणीं नाश करण्यास टपून बसलेला माणूस.

**ओसार**—पु. वाट, ओहटी या अर्थी ओसर पहा.

**ओसार-रा**—पु. १ पार वाहून जाणें; कमी होणें; उपरम; उतार. २ तहकुबी; मंदी ( व्यापार इ० ची); खंड; खाडा; ( क्रि० घेणें; खाणें ). [ ओसरणें ]

**ओसार**—स्त्री. (गु.) ( बांधकाम ) भिंतीची जाडी. असार पहा.

**ओसावणें**—अक्रि. १ कमी होणें. २ शक्तिहीन, अशक्त होणें. 'कैसीं दिहें दिहूं ओसावली । वैदर्भी हें॥' –शिशु ८३७. [ सं. अवसद्–अवसाद्; दे. ओसव्विअ ]

**ओसीक**—वि. पडित; बिनलागवडीची ( जमीन ). [ओस]

**ओस्ते**—न. ( कों. ) सावट. ओस, ओसट पहा. [ ओस ]

**ओहकर**—न. (व.) १ म्हशीचें पारडूं. २ (ल.) शेवटचें मूल (हें आईच्या मागें मागें असतें तेव्हां त्यास म्हणतात). [ओव्हा]

**ओहट-टी-टें**—पुस्त्री. १ ओहोटी; समुद्राच्या पाण्याची सुकती; भरती उतरणें; चंद्रसूर्याच्या–विशेषतः चंद्राच्या आकर्षणानें समुद्राचें पाणी वाढल्यानंतर पुन्हां उतरतें त्यास ओहोटी म्हणतात. २ विराम; उपरम; तहकुबी. 'मग पांडवीं ओहटु केला । दळभारू मागौता परतैला ।' –शिशु ८८८. [ सं. अव+घट्ट्; प्रा. ओहट्ट=कमी होणें, ऱ्हास पावणें; तुल० ते. ओट्टु=नाश ]

**ओहटणें**—अक्रि. १ मागें हटणें; कमी होणें. २ ओसरणें; आटणें; ओहोटी लागणें. ३ (ल.) उतरती कळा लागणें. 'यशास ओहटी लागली.' [ ओहट ]

**ओहड-णें**—ओढणें पहा.

**ओहण**—न. ( कों. ) पर्वतांतील लहानसा ओढा, प्रवाह; वहाळ; पऱ्हा, त्याचा पाट, चर ( शेतांत पाणी घेण्यासाठीं काढलेला ). [ वाहणें ]

**ओहदा**—पु. १ हुद्दा; ( मुलकी किंवा लष्करी ) अधिकाराचें स्थान; ( सरकारी ) नेमणूक. २ कर्तव्य; ठराव; हक्क. 'पातशाहाकडून वस्त्रें घेऊन जावीं हा ओहोदा आमचा आहे' –दिमरा १.१३१. [ अर. उह्दा ] **०दार–ओहदेदार**–पु. अधिकारी; सरकारी नोकर; हुद्दा धारण करणारा; ऑफिसर.

**ओहम-ओम**--न. विद्युत्प्रतिरोधाचा एक; विद्युत्प्रतिबंध मोजण्याचें मूलमान. (हें ओहम नांवाच्या जर्मन शास्त्रज्ञानें शोधून काढलें, सन १७८७-१८५४). [इं.] **०मापक**-न. विद्युद्रोधनामुळें उत्पन्न होणारा प्रतिरोध मोजावयाचें विद्युद्यंत्र. -ज्ञाको, ओ ३५-३६.

**ओहमा**--पु. (प्र.) वहमा; वहीम; संशय. [अर. वह्म्; फा. वहीम]

**ओहमाय**--स्त्री. वधूची आई; बायकोची आई; सासू. [वधू+माय; प्रा. वहू+माय]

**ओहर**--न. वधूवर; नवरानवरी (नवीन जोडपें). ओवर पहा. 'मिरवावया दोघें वधूवरें। वरात काढिली कंसासुरें। रथावरी वैसविलीं ओहरें। आपण धुरे सारथी जाहला।' -ह २.१२८. 'हे तुळजापुरचे आई, तुझ्या यात्रेला ओहोरानें येईन.' -थोरले माधवराव पेशवे (नाटक). [सं. वधू+वर; प्रा. वहूवर]

**ओहर**--पु. (कों.) १ समुद्राच्या भरतीचें पाणी जमिनींत शिरून तयार झालेला चर; फांसू; पोहडी; पोंई; पोईड; आखात २ समुद्राचा दूरवर गेलेला फांटा.

**ओहरजत्रा-यात्रा, ओहर-भरणी-णें**--ओवरजत्रा-यात्रा, भरणी पहा.

**ओहरणें**--उक्रि. (प्र.) होरणें; भर घालणें. १ भरणें (खड्डा, चर, खांच इ०) बुजविणें. २ (ल.) आच्छादून, मढवून काढणें (दागदागिने, वस्त्रालंकार वगैरेनीं); होरणें पहा. [सं. आ+उद्+भृ]

**ओहरता**--वि. सरळ; नीट. -ऋ ९२. (५७७ ओंवीवरील टीप). [सं. अव+हृ-सर?]

**ओहरा**--पु. (कों.) नांगरटीचा तास; तुकडा. ओरा पहा.

**ओहवां**--स्त्री. (भि.) हसूं. 'इं उनाजनें वागाल ओहवां आली' =हें ऐकून वाघाला हसूं आलें. -भि १७. [दे. आहंक= हंसें? प्रा. ओहास? सं. उप+हास्]

**ओहळ**--पु. १ नाला; ओढा; पऱ्हा; झिरपणी; वाहणी. 'इतर ओहळ आणि भागीरथी। वरकड गज आणि ऐरावती।' -रावि २५.६८. 'वाघ आणि गाय यांनीं एकाच ओहोळावर पाणी प्यावें.' -नि ५२६. २ पर्वतावरील ओढा व त्याच्यापासून झालेला चर, घळण. [सं. वह्; प्रा. ओहळी=ओघ; दे. वाहली= लहान प्रवाह; का. व्हळी; म. वाहळी] **ओहळ उडून राऊत होणें**-१ संकट पार पडल्यावर मग धाडसी बनणें. २ (ल.) आपल्या हितकर्त्याकडून आपलें काम झालें म्हणजे मग त्याच्यावर उलटणें. **०खोवळ**-ओढे-नाले; दरी-खोरी; खाच-खळगे. [ओहळ द्वि.] **ओहळींखोवळीं शिरणें**-मुख्य मुद्दा सोडून भलतेंच बोलणें; आडमार्गाला जाणें.

**ओहळणें**--अक्रि. १ झिरपणें; वाहणें; ठिबकणें; स्रवणें. २ मोठें भोंक होत जाणें (मोती, इ० चें); वेज सैल होणें. ३ ओघळणें पहा. [ओहळ]

**ओहळणें**--उक्रि. (कों.) उलटणें; लवंडणें; उलथणें.

**ओहळी**--स्त्री. (कों.) लहानसा ओढा; पाट; पाझर. ओहळ पहा.

**ओहा**--पु. गाईम्हशीची ओटी; कांस. ओव्हा पहा.

**ओहार-जत्रा**--ओवर-जत्रा पहा.

**ओहिरी**--स्त्री. ओवरी पहा.

**ओहो, ओहोहो**--उद्गा. आश्चर्य, कौतुक, आनंद, आठवण यांचा दर्शक उद्गार! वाहवा! ओलो! [ध्व.]

**ओहों**--क्रिवि. (भि.) दूर. 'तों ओहों चोरांआ गियो.' =तें दूर चरायला गेलें. -भि ९.

• **ओहोबाप**--पु. (लग्नप्रसंगीं) वधूपिता. **ओहोमाय**-स्त्री. वधू माता ओहोबाप व ओहोमाय हे शब्द नवऱ्यामुलाच्या मातापितरांनाहि लावतात.

**ओहोट, ओहोटणें, ओहोटी, ओहोड, ओहोडणें, ओहोण, ओहोर-णें, ओहोरा, ओहोळ-णें-ळी**--ओहनें आरंभ होणाऱ्या शब्दांखालीं पहा. जसें ओहट, ओहटणें इ०.

**ओहोळकट**--पु लहान ओढा. [ओहळ+कट=अल्पार्थी प्रत्यय]

**ओहोळणी**--स्त्री. (तंजावरी) ओढणी; परकरावर लुगड्यासारखें नेसावयाचें लहान वस्त्र. [सं. अवगुंठनी; दे. अवघाटणी; प्रा. ओहाडणी; म. ओढणी]

**ओळ**--स्त्री. १ रांग; पंगत; मालिका; पंक्ति. २ लेखणीनें ओढलेली रेघ, अथवा लिहिलेली अक्षरांची पंक्ति. (क्रि० पाडणें; ओढणें). ३ दर्जा. ज्या बलुतदारांचा जितका उपयोग त्या मानानें त्यांची प्रतवंदी लागून जे तीन वर्ग झाले त्या वर्गाला ओळ म्हणतात. -गांगा १४. ४ (ल.) मार्ग; पद्धत; रीत; ओघ; शिस्त; सभ्यपणाची वागणूक. 'त्या रुक्मिणी-कृष्णापासून जरी इतिहास पाहिला तरी तुम्हां वहिनी-दादांना एकच ओळ कां ग!' -गडकरीकृत वेड्यांचा बाजार. [सं. आवलि, आलि; प्रा. ओआली, ओली; तुका. ओलि=रांग] **ओळीस येणें**-बोलण्याच्या ओघास येणें; प्रवाहांत पडणें, सांपडणें; पाळी येणें.

**ओळ**--स्त्री. (प्रां.) ओढा; पऱ्हा; नाला. [ओहळ]

**ओळक**--पु. (राजा.) १ दांडी लावलेली किंवा न लावलेली नारळाची करवंटी; बेली; डवली (बाहेर पाणी उपसण्यासाठीं किंवा ताक, कढी इ० वाढण्यासाठीं); नारळाची पळी. २ त्यासारखेंच धातूचें किंवा लांकडी पात्र; पळी; ओगराळें. -पया.

**ओळकंवणें, ओळकुंवणें**—अक्रि. १ लोंबणें; झोंके घेणें; लटकणें; लोंबकळणें. २ फार वेळ लटकल्यामुळें रक्त साकळणें (पायाचें, मानेचें इ०). ३ भारावणें; स्वतःच्या वजनानें खालीं वांकणें. -सक्रि. झोंके देणें; पुढेंमागें करणें; हेलकावे देणें. [सं. अवलंबन; प्रा. ओलंबण; सं. अव+लंब्. का. ओलु=लटकणें]

**ओळकंवली पाटी**—स्त्री. आढ्याला टांगलेली टोपली; सुरक्षित ठेवण्याकरितां शिंक्यासारखी केलेली एक पाटी.

**ओळकं(कुं)बा**—पु १ झोका; लोंबण्याची, उलटण्याची क्रिया; (क्रि० घेणें; मारणें); हेलकावा. २ लोंबण्यासाठीं आधार (घेणें).

**ओळकी**—स्त्री. लहान ओळक; डवली; बेली. [ओळक]

**ओळख**—स्त्री. १ परिचय; ज्ञान; माहिती (वस्तु, मनुष्य यांविषयीं). 'ओळखी जालेयां बुधीं कांहिसीं.' -शिशु ७८. २ आठवण; स्मरण; याद; अभिज्ञान. ३ खूण (वस्तु अथवा पदार्थ ओळखण्यासाठीं केलेली); ओळखीचें साधन. ४ जामीन (कर्ज दारासाठीं घेतलेला). 'कोणाची ओळख आण, म्हणजे उधार देतों.' [सं. अवलक्ष्, उपलक्ष्] ०पटविणें-देणें-उधार घ्याव याचें किंवा पैसे यावयाचे असतां घेणाराच्या व देणाराच्या ओळखीचा तिसरा माणूस जामीनकीदाखल पुढें उभा करणें.

**ओळखण**—स्त्री. १ खूण; चिन्ह. ओळख अर्थ ३ पहा. (क्रि० करणें). २ ओळखीसाठीं दिलेली वस्तु. (क्रि० देणें). ३ (व.) (भली खोड मोडली या अर्थी) कायमची आठवण. (गु.) ओळखण. [सं. उपलक्षण]

**ओळखणें**—उक्रि. जाणणें. म्ह० आपणावरून जग ओळखावें. २ माहीत आहे असें दाखविणें; स्मरणें; याद असणें. [सं. अवलक्षण, उल्लक्षण, उपलक्षण; सिं. ओखाणणू]

**ओळखदेख, ओळखपाळख, ओळखभेट**—स्त्री ज्ञान; परिचय; माहिती; सख्य; ओळख (दाट परिचयाचा अथवा तोंडओळखीचा या दोहोंसहि लावतात). 'ओळखीपाळखीचीं वीस माणसें आहेत.' 'तो माझे ओळखीचा नाहीं कीं पाळखीचा नाहीं.' '... पंतांची आणि विठोबादादांची ओळखभेट झाली नव्हती म्हणून नाहीं?' -भक्तमयूरकेकावली-प्रस्तावना ९. [ओळखणें+देखणें; ओळख द्वि.]

**ओळखंबणें-खंबा**—ओळकंबणें, ओळकंबा पहा.

**ओळखी-चा**—वि. माहितीचा; परिचयाचा; ठाऊक असलेला (मित्र). २ सगासोयरा; मित्र; परिचित. **ओळखीदेखीचा-पाळखीचा, ओळख्यादेख्या-पाळख्या**—म्ह० ओळखीचा चोर जिवें न सोडी=आपल्या माहितीचा चोर चोरी करतांना सांपडला तर तो स्वतःला होणाऱ्या शिक्षेच्या भीतीनें जिवंत सोडीत नाहीं. 'अंतरंगींचा हा ओळखीचा चोर जीवें न सोडी अशापैकीं करून सोडतो.' -भा १७.

**ओळग**—पु. ओळक पहा.

**ओळग**—पु. आश्रय. [सं. अवलग; प्रा. ओलग्ग]

**ओळगणा**—वि. आश्रय घेणारा; चिकटणारा; सेवक. [ओळगणें]

**ओळगणें, ओळंगणें**—अक्रि. वोळंग-घणें पहा. १ पासून लोंबणें; झोंके घेणें; वेंघणें; २ (ल.) आश्रय घेणें; चढणें; आरोहण करणें. 'फळें तांबूल सुगंध सुमनें। भोगोपचारें ओळगे।' -मुआदि ३७.७७. 'अश्वावरी वीर ओळंगले।' ३ शरण जाणें; सेवा करणें; राबणें. 'ते ओळगे श्रीचरण।' -शिशु ८८. 'शतांच्या शतदारी। ओळंगिती जियेपासीं।' ४ प्रसन्न होणें; वश होणें; प्राप्त होणें. 'ओळगो देआं श्रीचक्रधरा।' -दाव ८६६. आपण होऊन प्राप्त होणें. 'आणि मुक्तिसायुज्यता। बोधेंचि ओळंघे।' -विपू १.२८. [सं. अव+ लग्; प्रा. ओलग्ग=सेवा करणें; का. ओळगिसु=सेवा करणें]

**ओळगणें-घणें, ओळंगणें-घणें**—उक्रि. मिठी मारणें; बिलगणें (हिसकून घेण्यासाठीं); चिकटणें; (क्वचित) वळगणें; प्रसन्न होणें; आलिंगणें. 'तेह वेळीं कुचपर्वताचां घाटीं। ओळघतां डोळे जाले आयेतुटीं।' -शिशु ५६०. [सं. अवलग्, आलिंगन]

**ओळंगर**—पु. (राजा.) लहानसा ओघळ; लहान झिरपा. [ओळ]

**ओळगवट**—स्त्री. सेवकवर्ग. 'कीं धर्माची उत्तर वेंट। कीं सिद्धीची ओळगवट॥' -ऋ ११. [सं. अवलग्; प्रा. ओलग्ग=सेवा करणें+वट (सं. वृत)]

**ओळंगा**—पु. आश्रय. ओळग पहा.

**ओळगावणें**—उक्रि. शरण जाणें; आश्रय करणें. 'ओळगावेआ परेशु। नाहीं ब्रह्मादिकां सौरसु॥' -ऋ २६.

**ओळण**—स्त्री. (राजा.) दिवा अडकवावयाची कडी, दोरी इ०; सांखळी; ओलाणी-ओलाणें पहा.

**ओळण**—वळण पहा.

**ओळणें**—अक्रि. १ (काव्य) एखाद्याकडे ओढला जाणें, वळणें. 'ओळखगावरि घनसा।' -मोआदि ३६.४८. २ अनुकूल होणें; प्रसन्न होणें; प्राप्त होणें. 'कौरव म्हणती कोण देवो। आजी आम्हां ओळला॥' -मुसभा १४.९३. ३ अनुग्रह करणें; उपदेशणें; कृपा करणें. 'एणें श्रीकृष्णघनें शमवाया सर्व ताप ओळावें।' -मोमौसल २.९१. 'मच्छिंद्रानें बोध गोरक्षासि केला। गोरक्ष ओळला गयनीप्रती।' -ज्ञानदेवगाथा प्रस्तावना ४. [वळण]

**ओळणें**—उक्रि. स्रवणें; पाझरणें; झरणें. 'तेणें धातु आदि करौनी। अमृत ओळतांती।' -दाव ३२६. [ओळ=रांग, प्रवाह]

**ओळत**—स्त्री. ( गो. ) भिंत ( घराची ).

**ओळदांडी**—स्त्री. गाडीची आखरी व सांटा आवळणाऱ्या आळ्यास पीळ घालून तो पीळ न सुटण्यासाठीं त्यांत अडकविलेली दांडी; आवळदांडी. [ आळा+दांडी ]

**ओळंबणें**—अक्रि. १ ओळकंबणें पहा. २ वांकपर्यंत लोंबणें ( फांदी इ० ). ३ ओळंबा नांवाचा विकार होणें. [ सं. अवलंबन; प्रा. ओलंबण ]

**ओळंबळणें**—अक्रि. उचंबळणें; उतू जाणें (नदी, भांडें इ०).

**ओळंबा**—पु. ( गवंडी ) १ गवंड्याचें एक हत्यार; एका दोरीला लावलेलें गोल वजन ( शिसें, दगड वगैरेंचें ); हें वजन लोंबकळत ठेवून दोरी स्थिर झाल्यावर सिद्ध होणारा उभा लंब ( भिंत सरळ रेषेंत आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं ). २ ( व. ) त्रास. 'त्याला कशाला माझ्या घरीं ठेवतां, उगीच माझ्या भोवतीं ओळंबा. ३ गाडीचा सोल ज्यांतून जातो तो भाग. ४ ०किंवा **ओळंबी**—स्त्री. कों. गाय, बैल इ० जनावर अशक्त झालें असतां मानेखालीं रक्त उतरून जमलेला गोळा किंवा त्यामुळें पडलेला दाब; रक्त सांखळून झालेला विकार. ५ ( ल. ) ठपका; मर्मभेदक खरडपट्टी. –होकै ११. [ सं. अवलंबन–लंबक; प्रा. ओलंब ] **ओळंब्यांत असणें**–क्षितिजाच्या पातळीशीं काटकोनांत असणें; लंबरेषेंत असणें.

**ओळंबॉ–बो**—पु. ( गो. ) वाळवी; अळंबो. वाळिंबा पहा. 'कोप आलिया ओळंबयासी। केवीं स्पर्शे अग्नीसी। श्रीगुरुकृपा असे जयासी। काय करील यवन दुष्ट ॥' –गुच १४.२४.

**ओळसा**—पु. वळसा; फेरा; वेढा. 'कोल्हाळ चुकविला। त्रिगुणांचा ओळसा।' –भज २२. [ वळसा ]

**ओळा**—पु. रीत; तऱ्हा; शिस्त; पद्धत; मोळा. 'हिला कांहीं ओळा नाहीं, नुसता गोळा आहे.' [ ओळ ]

**ओळा**—ओवळा पहा.

**ओळांगर**—पु. ( राजा. ) ओळंगर पहा.

**ओळाणें**—न. ओलाणी पहा.

**ओळी**—स्त्री. १ ( राजा. ) ओहळ–ळी पहा. २ पाण्याचा लहानसा पाट; लहानशा ओळ्याचें सुकलेलें पात्र.

**ओळीचा**—वि. विद्वत्ता, कुलीनता, संपत्ति वगैरेनीं बरोबरी करणारा; समान योग्यतेचा. २ सभ्य चालीरीतींचा. [ओळ]

**ओळींबा**—पु. ( माण. ) तिवड्यास बैल जुंपण्याकरितां घातलेलें लोखंडी कडें. ओळंबा पहा.

---

# औ

**औ**—चवदावा स्वर. 'ओ'ला एक मात्रा देऊन हें अक्षर काढतात. इ. स. ६ व्या शतकापासून ( मंदसोर लेख ) 'औ' आढळतो.

**औकात–द, औकाळ–ळीं**—पुस्त्री. १ गुजारा; चरितार्थ. अवकाळ पहा. 'एणेंकरून आपला औकात चालत नाहीं.' –रा १८.४८. २ निर्वाहसाधन. 'त्यांचा योगक्षेम चालावयासी कांहीं औकात नाहीं.' –रा १७.३९. [ अर. औकात्. वक्त्चें अव. ]

**औख–वण**—( कु. ) औक्ष–वण पहा.

**औखळ**—वि. ( व. ) खोडकर. अवखळ पहा.

**औचट**—अवचट पहा.

**औचित**—अवचित पहा.

**औचित**—वि. उचित; योग्य. 'औचिता करौनि धरा। मग लेखा येईल ॥' –शिशु ६९६. [ उचित अप. ]

**औचित्य**—न. युक्तता; योग्यपणा; उचितपणा; शोभण्यासारखें असणें. [ सं. ]

**औजड–जाड**—वि. मोठें; अगडबंब; अवाढव्य; विशाल; अवजड पहा.

**औजस द्रव्य**—न. अल्ब्युमिन; एक पौष्टिक द्रव्य. हें अंड्यांत असतें. [ सं. ]

**औजार**—न शीड इ०; अवजार पहा. [ अर. औझार् ]

**औजार**—पु. ( गो. ) उपद्व्याप. [ अपचार ?; अवजार ]

**औज्ज्वल्य**—न. उज्ज्वलता; चकचकीतपणा; तेज; चमक; झळाळी. [ सं. ]

**औट**—वि. १ साडेतीन. 'हें औट हात मोटकें।' –ज्ञा १३.१२. 'औट हात तुझा जागा। येर सिणसी वाऊगा ॥' –तुगा २६९२. २ ( योग ) साडेतीन मात्रा. 'तैशी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी।' –ज्ञा ६.२२३. 'रत्नखचित सिंहासन शोभे औटपीठावर।' –महिपती ( राजवाडे ९८ ). [अर्धचतुर्थ–अद्धुट्ठ–अउट्ठ–औट; दे. आउट्ठ=३॥ ] ०**पद्–पीठ**–न. (योग) द्विदल अग्निचक्रावरील एक स्थान; त्रिकूट, श्रीहट, गोल्हाट, औटपीठ हीं जीं महाकारणस्थानें आहेत त्यांपैकीं एक. 'शोषुनि सहस्र दळाचे पाट। औटपीठ आणि गोल्हाट। क्रमोनिया श्रीहट। आली उद्धट ब्रह्मस्थाना।' –एभा ६.१२९. २ कोल्हापूर; तुळजापूर; मातापूर हीं तीन व सप्तशृंग अर्धे, मिळून देवीचीं साडेतीन स्थानें. 'नाना औटपीठें ओकारें दर्शना आलीं।' –सप्र ५.१८. ०**मात्रा**–स्त्री. ओंकार; प्रणव. ०**घटकांचा आनंद**–पु. (साडेतीन घटकांचा म्हणजे) अल्पकाळ टिकणारें सुख,

आनंद; क्षणभंगुर सुख. ०घटकांचें, घटी( डी )चें राज्य-( किरीटी रामराजानें आपल्या अबदागिऱ्याला साडेतीन घटका राज्य दिल्याच्या गोष्टीवरून अथवा शिराळशेटाच्या गोष्टीवरून ) थोडा वेळ मिळणारा अधिकार, सुख; पाण्यावरचा बुडबुडा; शिराळशेटी राज्य पहा. **औटकीं-कें**—न. उजळणीचा प्रकार; अवटकी; साडेतीनचे पाढे व त्यांचें कोष्टक; एकपासून शंभरपर्यंत संख्यांची साडेतीन पट देणारें कोष्टक.

**औट**—पु. जळाऊ लांकडांचा किंवा इमारती लांकडांची ढीग, रास. अवट पहा.

**औट**—क्रिवि. बाहेर; बाद. [इं.] ०**डोअर**-वि. घराबाहेरचें; फिरतें; बैठेच्या उलट (काम). ०**हाउस**-न. पडघर; पडशाळा; चाकर लोकांसाठीं बांधलेला स्वतंत्र सोपा. [ इं. ]

**औटकी**—स्त्री. अवटी याचें काम, अधिकार, धंदा. अवटकी पहा.

**औट-औटभर**—न. १ बैलांना त्रास न देतां झालेलें दिवसानें नांगरटीचें काम; एक नांगरभर; खुटणभर ( क्रि० नांगरणें ). २ ( ल. ) ( व. ) एक शेत, वावर किंवा त्याची लांबी. 'तें गांव येथून औटभर आहे. [ औत ]

**औटडें**—न. ( साडेतीन हातांचें ) शरीर. 'बंदी बंदाची कौपीन । बहिरवास औटडें ॥ ' –तुगा ४०२०. [ औट ]

**औटावी**—वि. १ औट( मात्रा )मधील अर्धी; ओंकाराच्या साडेतीन मात्रांपैकीं शेवटची अर्धमात्रा. 'देवा तूं अक्षर । औटावि ये मात्रेसि पर । ' –ज्ञा ११.३०७. २ ( ल. ) माया; ब्रह्मस्वरूप. आउटाविए, आउठावें अशीं रूपेंहि आढळतात. ' आउटाविए पदीं आरोहण । ' –तुगा ४०३५. [ औट ]

**औटी**—स्त्री. १ लांकडी ठोकळ्याला आंत चीप बसविण्यासाठीं पाडलेली आडवी खांच. ( क्रि० घेणें; पाडणें; करणें. )[सं. अवटी=खांच ] २ ( टंक. ) टंकक्रुतींत काशाची किंवा पोलादाची केलीली मादी. –चिज १९१८. ( इं. ) डाय. अवटी पहा. [ सं. अवटी=खांच; म. अवटी=( सोनार धंदा ) ठसा ]

**औठणें**—अक्रि. ओंहटी लागणें. ओहटणें पहा.

**औठी**—स्त्री. ओहोटी पहा.

**औठें, औठडें**— औट पीठ पहा. ' तैसी ते निजांगें कुंडलिनी । निजेली होती औठें वळणीं ॥ ' –स्वादि ९.५.२.

**औड**— ( व. खान. )शेतकामाकरितां किंवा वखरण्याकरितां निश्चित केलेला एक तुकडा; आवड.

**औड, औडकें**—औट, औटकें पहा.

**औड-भर**—औट-भर पहा.

**औडकचौडक**—पु. लहान मुलांचा एक खेळ. त्यांतील गाणें असें- 'औडकचौडक दामाड । दामाडूचे पंचाडू । पंचाडखोड खासा । हिरवा दाणा कुडकुडी । राजघोडी व्याली । सोनपाणी प्याली । अन्यामन्या शेजीवेचा । डावा उजवा हातच कन्या ॥ ' अर्थः– अरे भाऊ! आपल्या शेताच्या ह्या बांधापासुन त्या बांधावर जा. तेथें आपलीं जनावरें घेऊन राळे, गहूं, तीळ आणि हरभरे वगैरे पिवळीं धान्यें आपल्या शेतांत पेर व त्याजवळच्या मळयांत बाजरी व ओंवा पेर. –चिज १२.१९१६. अवडकचवडक पहा.

**औडबारा**—अउडबारा पहा.

**औडुव**—पु. ( संगीत ) ( प्र. ) औडव. पांच स्वर; औडुव राग पहा. ०**तान**-पांच स्वरांची तान. **औडुवत्व**-जे दोन स्वर रागालापांत वर्ज्य असतील ते न घेण्याची दक्षता ठेवणें. ०**राग**-पु. १ ज्या रागास पांचच स्वर लागत असून दोन स्वर वर्ज्य असतात असा राग. २ ज्या रागाच्या आरोहांत पांच स्वर व अवरोहांत पांच स्वर असतात तो. ०**षाडव**-पु. ज्या रागाच्या आरोहांत पांच व अवरोहांत सहा स्वर असतात तो राग. ०**संपूर्ण राग**-पु. ज्या रागाच्या आरोहास पांच स्वर व अवरोहास सात स्वर लागतात असा राग. [ सं. औडव=एक राग ]

**औत**—न. १ आऊत; शेतकी वगैरे धंद्याचें साधन. जसें– मळयाच्या कामाचीं औतें–नांगर, कुळव, पाभर, दंताळें, मैंद, पेटारी, फावडें, पिकाव, पहार, करवडी, कोळपें, खुरपें व विळा, कोयता वगैरे कापणीचीं साधनें; शेतीसाठीं औत वापरण्याची चाल वेदकालापासूनची आहे. सामान्यतः नांगर, कुळव, पाभर इ० जीं बैलांनीं फिरवावयाचीं साधनें त्यांस औत म्हणतात. ' जे कर्ता जीव विदाणीं । काढूनि पांचही खाणी । घडित आहे करणीं आउती दाहे । ' –ज्ञा १८.४५४. ' नागरीं कवळी मग आउतें वोढीं । ' –उषा १५९७. २ एका नांगरानें नांगरली जाईल इतकी जमीन. सुमारें ८० बिघे. –विल्सन कोश. ३ ( व. ) शेतकामाच्या बैलांची एक जोडी. ' आमच्या घरीं चार औतें आहेत.' ४ –पुन. ( कों. ) भंडाऱ्याचा माडाची पोय कापण्याचा कोयता. ५ साधन; हत्यार (सोनार, कांसार, कुंभार इ० धंद्याला लागणारें); आयुध; शस्त्र. ६ (राजा.) सुप, टोपली, रोवळी, पंखा, इ०; वंशपात्र. प्रभु जातींत वरातीच्या वेळीं बांबूच्या हातरीवर वरीलपैकीं जें साहित्य ठेवतात त्यास औत म्हणतात. ७ मासे पकडण्याचें जाळें; आवत. (वाक्प्र.) औताचा नांगर, औताचा बैल. [ सं. आयुध, आ+युत=जोडला जाणारा; गो. आवत] ०**चालणें**-नांगर चालू असणें. ०**धरणें**-शेतकाम चालू करणें. ०**भरणें**-शेतकीचीं हत्यारें साफसूफ, तयार करून ठेवणें. ०**सुटणें**(**पडणें**)-काम बंद करणें. ०**करी-पु.** नांगर धरणारा; शेतकरी; औत्या. ०**काठी**-स्त्री. (सामा.) औत; शेतकीचीं हत्यारें. ०**पट्टी**-स्त्री. १ प्रत्येक नांगरावरील सरकारी कर. ( नांगऱ्यावरहि असा जादा कर बसवीत. ) २ ताब्याच्या

तोडणीच्या प्रत्येक कोयत्यावरील कर. ०बंदी–स्त्री. प्रत्येक नांगरावर कर बसविण्याची पद्धति; नांगरबंदी. खानदेशांत यास ओटबंदी म्हणतात. ०भरणा–पु. (समुच्चयानें) १ शेतकरी वर्ग. २ शेतकीचीं हत्यारें. ३ नांगरावरील सरकारी कर. औतपट्टी पहा. ( आऊत असाहि प्रयोग आढळतो ).

**औत**—पु. (व.) आहुति–आहुत (अप.) १ बलि; २ (ल.) अतिशय कष्टमय स्थिति; आसन्न मृत्यूची अवस्था. **औत घेणें**–अति श्रम होणें; त्रास होणें; मरणोन्मुख होणें–स्थितीस येणें. 'बाळंतपणानें औत घेतली.'

**औतकी**—स्त्री. प्रत्येक नांगरामागें ठराविक धान्य मिळण्याचा पाटलाचा हक्क. [ औत ]

**औतण-णं, औतण-णें, औतन-नें**—नउक्रि. आमंत्रण; आमंत्रण करणें; आवतण, अवतण–णें पहा. **औतून कटकट-कज्जा आणणें-करणें**–भांडण उकरून काढणें, भांडणास आमंत्रण देणें.

**औतें**—न. ( खान. ) अंबाडी, ताग, केतकी, यांचा एक इंच घेराचा दोर.

**औत्पातिक**—वि. अशुभ; अमंगलसूचक; पीडादायक. [ सं. उत्+पत्–उत्पात ]

**औत्पादिक**—वि. आकस्मिक; उपटसुंभ. 'ग्रॅट डफचाच इतिहास वाचणाऱ्या गृहस्थांस मराठ्यांचा अभ्युदय हा केवळ औत्पादिक वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुतः तो तसा नाहीं.' –टि २.२२९. [ सं. उत्+पद् ]

**औत्या**—पु. १ शेतकरी; नांगर धरणारा; नांगऱ्या, आवत्या. २ (ल.) औत धरण्याच्या वयाचा बाप्या. 'अशी मनसुभी वाटून घाट्न आडला आवत्या गडी। लटकीच कुरबुर बायको झोडली घालून बसला आढी।' –पला ८६. २ ( खान. ) चाकर; सालदार; आवत्या. 'बिहीरांहीं आवत्यो रिंहेने तो आखे तों काम केवों.' =दुसऱ्याच्या येथें चाकर राहून तो सांगेल तें काम करावें. –भि ३५.

**औत्सुक्य**—न. उत्सुकता; उत्कंठा; धाधावणें; उतावीळपणा. 'विविधा औत्सुक्यांची दाटी।' –ज्ञा १८.१५५६. [सं.]

**औदंड**—वि. उदंड; विपुल. 'औदंड भजनि अखंड, चित्त लागे.' –वेप ६६. [ उदंड अप ]

**औदंबर-री**—( काव्य ) ओडंबर-री पहा.

**औंदा**—क्रिवि. ( कुण. ) यंदा; ह्या वर्षी; चालू सालीं. 'औंदा पीक बरें आहे.' [ फा. आयंदा=भावी–पुढील साल ]

**औदार्य**—न. उदारपणा; दातृत्व; दानशीलता; वदान्यता. [ सं. ]

**औदासीन्य, औदास्य**—न. १ उदासीनपणा; निरानंदावस्था; सुखाभाव. २ बेफिकिरी; अलिप्तपणा; निष्काळजीपणा; तटस्थपणा. [ सं. उदासीन ]

**औदुंबर**—पु. ( प्र. ) उदुंबर; औदुंबराचें झाड; उंबर. [ सं- उदुंबर ] –वि. उंबराविषयीं; उंबराचें ( काष्ठ, पर्ण, पुष्प, इ० ).

**औदुंबरी माळ**–स्त्री. उंबराची माळ ( अठांगुळाच्या वेळेस स्त्रीच्या गळयांत घालतात, ही एक लोकरूढी आहे ). 'औदुंबरी माळ गळां न घाली.' –साखह २.३५.

**औदुंबर**—न. तांबें. 'औदुंबर सुवर्ण रजत। काष्ठाचेही असे पवित्र। ऐसें असे निर्मळपात्र। वामहस्तीं उदक बरवें॥' –गुच ३६.२७७. [ सं. ]

**औद्धत्य**—न. उद्धटपणा; दांडगेपणा; वरचढपणा. 'तैसे मौख्य घणावे। औद्धत्य उंचावे।' –ज्ञा १६.३९१. [ सं. ]

**औद्योगिक**—वि. उद्योगासंबंधीं. ०उन्नति–स्त्री. धंदे वगैरेची भरभराट. 'धंदेशिक्षण मिळाल्याखेरीज औद्योगिक उन्नति कशी होईल.' –टिसु ४१. ०शिक्षण–न. उद्योगधंदे शिकविणारें शिक्षण. 'औद्योगिक शिक्षण घेणें हा राष्ट्रभक्तीचा पहिला पाठ आहे.' –के १६.४.३०.

**औंध**—स्त्री. काळोखी, अंधारी. ओंध पहा. [ सं. अंध ]

**औधिया**—स्त्री. चोऱ्या करणारी एक बैराग्यांची जात; त्यांतील माणूस. –गांगा १३२. [ औध, ओढ्या किंवा अयोध्यापासून ]

**औपचारिक**—वि. १ उपचाराविषयींचा–बद्दल. २ ओढून ताणून; कसातरी; वरवरचा; शिष्टाचार म्हणून पाळलेला. 'सर्व व्यवहार औपचारिक चालला होता, त्यांत प्रेम राहिलें नव्हतें.' –इंप ४२. ३ अलंकारिक; रूपकात्मक. ४ खुशामतीचें; प्रशंसात्मक; गौरवपर ( भाषण ). [ सं. ]

**औपम्य**—न. सादृश्य; तुल्यता; सारखेपणा. [सं. उपमा ]

**औपरोधिक**—वि. उपरोधयुक्त; गुप्त; गूढ; ज्यांतील खरा अर्थ गर्भित असून शब्दार्थ किंवा वाच्यार्थ निराळा असतो असें; वर्मी; छद्मी ( भाषण इ० ); शालजोडींतील ( मारणें ). [ सं. उपरोध ]

**औपाधिक**—वि. उपाधीसंबंधीं; उपाधि जडलेला; मायिक. 'दाविजे तेवीं औपाधिका। बोली इया॥' –ज्ञा १५.४७०. [ उपाधि ]

**औपासक**—वि. ( काव्य ) उपासकबद्दल चुकीचा प्रयोग; भक्त; सेवक. 'त्याच्या औपासकासी विघ्न। करूं कवण शकेल।'

**औपासन**—पु. स्मार्ताग्नि किंवा गृह्याग्नि; विवाहामध्यें गृहप्रवेशाचे वेळीं ज्या अग्नीवर 'गृहप्रवेशनीय' होम होतो तो अग्नि. हा अग्नि गृहस्थाश्रमीनें आमरणांत संरक्षण करावयाचा असतो

व यावर सकाळ-संध्याकाळ होम यावयाचा असतो. 'सांडोनि वैश्वदेव औपासन । सदा भक्षिती परान्न ॥' -कथा ४.१६.३६. [ सं. ]

**और**—पुन. १ ऊर; ओर; नदीचा पूर. २ खाडींत किंवा नदीच्या पात्रांत आलेली समुद्राची भरती. [ सं. आ+पूर; प्रा. आऊर ]

**और**—वि. १ अन्य; दुसरा; तद्भिन्न. २ ( ल. ) विलक्षण; विचित्र; मजेदार. 'और आहे बुवा !' 'तुका मान्या पेटका और न जाने कोय।' -तुगा ४२९. ३ छान; सुंदर. -क्रिवि. आणखी; शिवाय. [सं. अपर-अवर; हिं. और; दे. ओर=सुंदर] म्ह० और तो लगाव पीछे बतायेंगे, मेरे गल्लीमे तो आव=न्याड माणसाच्या वागण्याबद्दल म्हणतात.

**औरंग**—न. १ सिंहासन; तख्त. २ ( हिं. ) व्यापारी जिन्नस तयार होण्याचें किंवा एकत्र मोठया प्रमाणांत असण्याचें ठिकाण. ३ ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारांत वखारींना हा शब्द लावीत असत. [ फा. ]

**औरत**—स्त्री. स्त्री; पत्नी. सरकारी दप्तरांत व कुणबाऊ बोलींत याचा विशेष उपयोग होतो. [ अर. औरत् ]

**औरस**—पु. १ धर्मविधीनें लग्न लावलेल्या स्वस्त्रीस स्वतः-पासून झालेला पुत्र; स्वस्त्रीचे ठायीं स्ववीर्यानें उत्पन्न झालेलें अपत्य; अस्सल; दत्तकाच्या उलट. 'गांधारि ! उगीच रहा, होऊं दे द्यूत औरसा मान्य।' -मोसभा ६.८७. -मोभीष्म ३.२२. [ सं. उरस्=वक्षस्थल ] -वि. १ छातीसंबंधीं. २ स्वीय; अस्सल. [ सं. उरस् ]

**औरस**—स्त्री. ( चुकीनें ) लग्नाची बायको; पाटाची नव्हे.

**औरसचौरस**—क्रिवि. १ अवरसचवरस; सभोंवार; चोहों-कडे; चारी बाजूस; आसपास. २ लांबी-रुंदीनें; उभें-आडवें ( क्षेत्रादिकांचें प्रमाण ); लांबीनें रुंदीस गुणून; आडवातिडवा. [ चौरस द्वि. ] 'चोळीस खण औरस चौरस सात विती लागतो.' 'चवरंग औरस चौरस एक हात कर.' [ सं. चतुरस्त्र द्वि. ]

**औरसपुत्र**—पु. विवाहित स्त्रीपुरुषाची संतति; धर्मपत्नी-पासून स्वतःला झालेला पुत्र. औरस अर्थ १ पहा. [सं. उरस्]

**और्ध्वदेहिक**—न. (प्रेताविषयींचें) उत्तरकार्य-क्रिया; प्रेत-संस्कार. -वि. उत्तरक्रियेसंबंधीं. [ सं. ऊर्ध्व+देह ]

**औलाद**—स्त्री. प्रजा. अवलाद पहा. [ अर. औलाद् ]

**औलिया**—अवलिया पहा.

**औषध**—न. ( अप. ) औशध. १ रोग निवारण करणारा पदार्थ; ओखद; दवा; उपाय; ज्याचे सेवनानें रोगनिवृत्ति होते असा झाडपाला, मुळी, काष्ठ, धातु, रस, रसायन, मात्रा इ०. २ ( ल. ) कार्यसिद्धीचें साधन, अर्थ; उपाय; इलाज. ३ ( वाई ) दारू ( शोभेची-बाराची ). 'हवाया नळे भरभराटे । औशधकळा गाजली ॥' -वेसीस्व ७.८८. 'मोहित्यांच्या लग्नांत औषध फार जळलें.' ४ (संकेतानें) सोमल; अफू इत्यादि अंमली पदार्थ. ०करणें-औषध लावणें, घेणें; उपाययोजना करणें. **औषधाला नसणें**-औषधापुरतेंहि नसणें; संपुष्टांत येणें; मुळींच नसणें; अत्यंत अभाव असणें. 'त्याच्या घरांत पान औषधालाहि नाहीं.' औषधावांचून खोकला जाणें. =(ल.) अना-यासें ब्याद टळणें. ०पाणी-न. औषध; औषधउपचार; उपाय-योजना ( व्यापकपणें ). ( क्रि० देणें; घेणें; करणें ). [ सं. ]

**औषधी**—स्त्री. १ फळें पिकेपर्यंत जीं झाडें जगतात तीं, एक हंगाम जगणारीं झाडें प्रत्येकीं. २ (सामा.) झाड; वनस्पति; जडीबुटी. [सं. ओषधी] -वि. औषधासंबंधीं गुणदायक; औषधाला उपयोगी. ०द्रव्य-न. औषध किंवा औषधाची वस्तु, पदार्थ ०शास्त्र-न. वनस्पतींत औषधी गुणधर्म कोणते आहेत ह्याचा विचार करणारें शास्त्र. ( इं. ) 'मटीरिया मेडिका.'

**औषधोपचार**—पु. रोगावर उपचार; उपाय; औषध-योजना; दवा. (अनेकवचनी प्रयोग). मत्रोपचार पहा. [औषध+उपचार ]

**औषधोपाय**—औषधोपचार पहा. 'हा दुखणाईत औषधो-पाय करून भुईचा सावडला.' [ औषध+उपाय ]

**औष्णिक**—वि. ( शाप. ) उष्णता देणारें ( किरण, इ० ).

**औस**—स्त्री. ( कुण. ) अमावास्या. अवस पहा.

**औंस**—१ ( ट्रॉय वजन ) $\frac{1}{12}$ पौंड. २ ( अवार्डुपाईय ); $\frac{1}{16}$ पौंड; अडीच तोळे. १ औंस=२ जेवणाचे चमचे ( टेबलस्पून ). २ औंस=१ दारूचा पेला ( वाइन ग्लास ). [ इं. ]

**औसर**—अवसर पहा.

**औसा**—पु. पुजारी. [ दे. अउस=पुजारी, सं. उप+आस् ]

**औसाफ**--पु. १ लौकिक; कीर्ति. 'परशुरामपंत यांस छत्र-पतींनीं मारविले सबब विश्वासराव यास मारिले ही गोष्ट बेहिशे-बाची, आमचे घराण्याचे औसाफास योग्य न जालें.' -ख ११. ६१३५. २ (हिं.) गुण; लायकी. [अर. औसाफ; वस्फ चें अव.]

**औसिकम**--पु. हरणाच्या रंगाचा घोडा. -अश्वप १.१०४.

**औक्ष**—न. (कुण. बायकी) आयुष्य; जीवित; जीवनमर्यादा. 'औक्ष कसें कमि झालें सवाई माधवरायाला।' -ऐपो ३०३. [ सं. आयुष्य ]

**औक्षण, औक्षवण**—न. आरती ओवाळणें; आरती; निरांजन; आरती वगैरे ठेवलेलें तबक किंवा लामणदिवा. लग्न कार्याच्या अथवा इतर शुभप्रसंगीं देवाची मूर्ति किंवा ज्याचें मंगलकार्य असेल त्यास त्याच्या तोंडाभोंवतीं सुवासिनीनें ओवाळण्यासाठीं घेतलेलें दीपादियुक्त ताम्हन; सदर ताम्हन

ओवाळण्याची क्रिया; (सामा.) ओवाळणें. अक्षवाण पहा. 'त्या (वधू) बसल्यावर त्यांचें सुवासिनी स्त्रियांकडून औक्षण होतें.' –ऐरापुविवि २६. (क्रि० करणें). आयुष्यवर्धक विधि. [सं. आयुष्य+वान् किंवा वर्धन?]

**औक्षवंत-वान**—वि. (कुण. बायकी) चिरायु; चिरंजीव-आयुष्यमान; उदंड आयुष्याचा. (आशीर्वाद). [सं. आयुष्यवंत-वान्]

---

# अं

**अं**—मराठी वर्णमालेंतील पंधरावें अक्षर. अच्या डोक्यावर टिंब देऊन अं अक्षर बनविण्याची पद्धत फारशी प्राचीन दिसत नाहीं. गिरनार शिलालेखांत टिंब अच्या पुढें आहे. इ. स. ४ थ्या शतकांत अच्या डोक्यावर नुसती लहान रेघ दिलेली आढळते

**अंः**—उद्गा. तिरस्कार, बेपर्वा, अविश्वास दाखविणारें उद्गार-वाचक अव्यय; उंः; तुच्छतादर्शक उद्गार.

**अंऽऽ**—उद्गा. काय? पुन्हा सांग या अर्थी.

**अँ**—उद्गा. ऊं; आँः; पुन्हां सांग याअर्थी उद्गार; पुन्हां बोल तर पाहूं असा धाक यानें दर्शविला जातो.

**अंक**—पु. १ संख्या; आंकडा (१, २, ३ इ०); आंख (अंक गणितांतील). 'अंकें जैसीं शून्यें सयःकार्यक्षमें, न तीं अन्यें।' –मोवन ६.३५. २ खूण; चिन्ह; छाप; शिक्का. 'अंक तो पडिला हरिचा मी दास।' –तुगा १३३८. ३ नाटकाचा एक भाग; कथाभागाला किंवा संविधानकाला विरोध दाखविणार नाहींत असे जे नाटकाच्या कथानकाचे विभाग त्यांना अंक म्हणतात. असे अंक चारपासून बारापर्यंत असतात अलीकडील सुमारें २५ वर्षांतील गद्य-पद्य नाटकें तीन अंकाचीं असतात. 'शाकुंतल नाटकाचा चौथा अंक फार बहारीचा आहे.' –नाकु ३.१. ४ मांडी. 'आधार शक्तीचिया अंकीं। वाढविसी कौतुकीं।' –ज्ञा १२.५. ५ (डोळयाजवळचा) आंख. भुंवई व कान यामधील जागा. ६ डाग; कलंक. 'सुत हो! शुद्रांस कसें आतळलें व्यसन अंक हा रविला।' –मोसभा ७.४२. ७ नियतकालिकाचा (वर्त-मानपत्र, मासिक इ०) एक भाग, अनुक्रम, संख्या, नंबर. 'साग्र हकीगत लांबलचक असलेमुळें पुढील अंकावर ठेवणें भाग आहे.' –विक्षिप्त १.१४. [सं. अंक (अंक्=खूण करणें, मोजणें); लॅ. अंकस्; ग्री. ओग्कोस] **०गणित**–न. अंक किंवा व्यक्त संख्या यांचा विचार ज्यांत केलेला असतो तें शास्त्र. भास्कराचार्यांनीं याला 'पाटीगणित' असें म्हटलें आहे. याची उभारणी संख्येच्या कल्पनेवर असल्यामुळें या शास्त्राची उत्पत्ति व्यापाराचें मूळस्वरूप जें विनिमय त्यापासून फार प्राचीन काळीं झाली असावी. बीजगणिताच्या (अक्षरगणिताच्या) उलट याचे पूर्णांकगणित व अपूर्णांकगणित असे दोन भाग आहेत. यांत बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन, घन-मूळ असे आठ प्रकार येतात. 'अंकगणिती कोटया काढून नेटि-वांस फसविण्याचे दिवस आतां राहिले नाहींत.' –टि २.५२३. **०गति**–स्त्री. (हिशेबाचे) आंकडे मांडण्याची किंवा मोजण्याची पद्धत. **०चक्र**–न. (ज्योतिष) कालगणना चक्र. हें चक्र ५९ वर्षांचें असतें. या कालगणनेंत वर्षारंभ भाद्रपद शु. १२ ला समज-तात. ६ किंवा ० ज्याच्या शेवटीं आहे तें वर्ष गणनेंत धरीत नाहींत. मद्रास इलाख्यांतील गंजम जिल्ह्यांतील लोक ओंको किंवा अंक नांवाच्या चांद्रसंवत्सरचक्रानुसार वर्षे मानितात. –ज्ञाको (अं) २७ **०चालन**–न. (ज्योतिष) अंकांचीं किंवा गणिती कोष्टकें, सारण्या; निरनिराळया काळांना जुळतील असा अंकांचा फरक **०जाल**–न. आंकडयांचें कोष्टक, सारणी, (पंचांगाचें गणित सोपें करण्यासाठीं तयार केलें). [अंक+जाल] **०पट्टी**–स्त्री. (कापडाच्या गांठीमधील) कापडाच्या अनुक्रमाची, किंमतीची किंवा इतर माहितीची चिट्ठी; बीजक. आंकपट्टी पहा. **०पाश**–पु. संख्यारचनेसंबंधीं प्रकार. (इं.) परम्युटेशन. [सं.] **०मोडणी**–स्त्री. १ आंकडेमोड; हिशेब. २ अंक मांडण्याची पद्धत (डावीकडून उजवीकडे किंवा उजवीकडून डावीकडे). ३ बोटें मोडून अंक मोजणें. [अंक+मोडणी] **०राशि**–स्त्री. संख्येची मालिका; ओळ; रकमा (बेरजेसाठीं). [सं.] **०लिपी**–स्त्री. १ संख्या-लेखनपद्धति (आंकडयांची–अक्षरांची नव्हे), आंकडे लिहिण्याची पद्धति, अठरा लिपींपैकीं एक. २ ज्यांत पाढे वगैरे लिहिले आहेत असें पुस्तक; उजळणीचें पुस्तक. [सं.] **०स्थल-स्थान**–न. (अंकगणित) आंकडयांची जागा. 'गणितांत अंकस्थानें नऊ आहेत.' [सं.]

**अंकडा-डी**—सर्व अर्थी आंकडा–डी पहा.

**अंकण**—न. मळणीचीं कणसें, धान्य. आकण पहा. 'अंकणा तुझीं सात कणसें।' –भोंडला.

**अंकण-णा-णें**—न. पायांत बांधावयाचें पराक्रमसूचक ब्रीद (तोडा); एखाद्यास जिंकलें असतां जिंकणारा त्याची प्रतिमा किंवा नांव आपल्या तोडरावर कोरीत असे. 'पण स्वामी निमालेया कुगावरि। तेही अपोस्तोली केली कीर्ति थोरी। संसारु बांधला तोडरी। अंकण करुनि।' –खिपु २.४१. ११८. २ ब्रीद; बिरुद. आंकण–णा–णें पहा. [सं. अंकन]

**अंकणकडवें**—न. गाण्याचें पालुपद; ध्रुवपद. आंकणकडवें पहा.

**अंकणा**—आंकणा पहा.

**अंकणी**—आंखणी, रेघ, पट्टी, खण इ० अर्थी आंकणी पहा.

**अंकणें**—उक्रि. १ ( सामान्यतः ) खूण करणें; मोजणें; छाप मारणें; आंखणें; चितरणें. 'मी अनंगव्रतें असे अंकिली। ती तंव तुम्ही येथें नसे जिंकिली। जी संगविरहें बहुत व्यापिली। ती काय जाणाल स्वामिया ॥' –जै १७.११५. २ रेघा ओढणें; रेखाटणें; नकाशा काढणें; बेतणें; आराखडा काढणें; वर्णन करणें. आंकणें पहा. ३ योजणें; संकल्प करणें. ४ अंकित होणें; वश होणें. 'कामाचे विकिले क्रोधाचे जिंकिले लोभाचे अंकिले सर्वभावें ॥' –ब १९१. ५ अंकित, स्वाधीन करणें. [ सं. अंकन ]

**अंकणें**—न. घरावरील धाब्याचा – पाणी जाण्यासाठीं केलेला–उतरता भाग. [ का. अंकण=घराचा खण ]

**अंकदार**—वि. गांवांतील जमीनींपैकीं कांहींचा मालक; खातेदार; सारा भरणारा. [ सं. अंक+फा. दार ]

**अंकन**—न. १ खूण करणें; मोजणें, आंकडे घालणें. २ अंगावर देवताचिन्ह किंवा नांव डागणें; गोंदणें. [ सं. ]

**अंकनीय**—वि. चिन्ह करण्याचें किंवा करण्याजोगें; गणना करण्याचें किंवा करण्याजोगें. [ सं. ]

**अंकरी**—स्त्री. कुळीथ; हुलगा.

**अंकसळ, अंकशाळ**—पु. १ सोनार, अकसाळी पहा. २ सोनें कसोटीस लावण्याचा दगड. 'कां भंवरेंचि केला मळा। वरकलुचि जाला अंकसळा।' –ज्ञा १८.४९२. [ सं. अर्क–अक्क= सोनें+शाला=साल; अंकन+शलाका; तु० का. अक्कसालिग=शकांची एक पोटजात, हे पूर्वजांचे टांक ठेवीत ]

**अंकित**—वि. १ चिन्हित; खुणा केलेलें. 'कां मातापितर मरणें। अंकित जे दिवस ॥' –ज्ञा १८.११०. २ मर्यादित; सांगितलेलें; ज्याचा मार्ग किंवा वागण्याची रीत ठरवून दिली आहे असा. ३ सेवक. ( अंकित=खुणा केलेला, राजाच्या सेवकाच्या अंगावर कांहीं तरी सेवकपणाचें चिन्ह असतें त्यावरून ); ताबेदार; गुलाम. 'जो श्रीहरिभजनीं होईल रत। कळिकाळ अंकित होय त्याचा।' 'तैसा मी संतांचा अंकित।' –दा १.६. २०. ४ वश; आज्ञा उल्लंघन न करणारा. 'केलीं नारायणें आपुलीं अंकित। तोचि त्यांचें हित सर्व जाणे।' –तुगा ११. सामाशब्द आज्ञांकित=आज्ञेनुसार वागणारा; श्रमांकित=थकलेला; नियमांकित; पापांकित. [ सं. ]

**अंकिला**—स्वाधीन असलेला; ताबेदार; अंकित पहा. 'हे स्वामिचे अंकिले। भणौनि दंडवतें घातलें।' –ऋ १३. 'चारी मुक्ति ज्याच्या दासी होती। त्याचा अंकिला मी श्रीपती।' –एभा २२.६९१. [ अंकणें ]

**अंकी**—वि. १ अंकासंबंधीं. २ अंकानें लिहिलेला, मंडित केलेला; याच्या उलट अक्षरी. ३ तिथिवाचक अक्षरांनीं न लिहितां त्याऐवजीं केवळ अंकांनींच लिहिलेलें ( पंचांग, इ० ).

**अंकु–कू**—पु. १ अंक पहा. २ शिष्य; सेवक. 'या बोला आन होये। तरी व्यासाचा अंकु न वाहें। ऐसें गाजोनि बाहें। उभिली तेणें।' –ज्ञा १८.१६५८. [ अंक ]

**अंकुडें**—वि. आंकडा असलेलें; आंकडयासहित.

**अंकुर**—वि. १ कोंभ; मोड. ( क्रि० फुटणें; येणें ). 'सपूर गगनांकुर सबळ। तैसे मस्तकीं केश कुरळ।' –एरुस्व १.६३. २ ( ल. ) मूल; वंशवृक्षाचा कोंभ, मोड; वंशज. 'गंगाबाईच्या या एका अंकुराशिवाय कुणीच वंश नव्हता.' –इंप २८. ३ अणकुची; टोंक. 'कधी डवचिती ... हरिणपोत शृंगांकुरें।' ४ भावी कर्तृत्वाचें चिन्ह. ( लहान मुलाच्या अंगचे–चेष्टा, भाषण इ० ). ( क्रि. दिसणें ). [ सं. ]

**अंकुरणें**—अक्रि. १ कोंभ फुटणें; मोड येणें; उगवणें; प्रगट होणें. 'कीं क्षीरसागरू आंकुरला। गगनभूमीं।' –शिशु ४२. 'भाजलें तें बीज अंकुरेना कदा। न मिळेचि दुधामाजी लोणी।' –ब ३४५. २ ( ल. ) अंगावर रोमांच उभे राहणें. 'त्या महोत्सवेंविशेषें अंकुरलें अंग।' –रास २.२१२.

**अंकुरित**—वि. १ अंकुर फुटलेला; उगवलेला. २ ( ल. ) स्पष्ट झालेला, दिसूं लागलेला, प्रादुर्भूत. शरीराच्या ठिकाणीं दिसूं लागलेली ( तारुण्यावस्था, इ० ). उदा० अंकुरित यौवन=वयांत आलेला–ली. [ सं. ]

**अंकुश**—पु. १ हत्तीला ताब्यांत आणण्याचें, एका बाजूला आंकडीसारखें वांकविलेलें हत्यार; हें त्याच्या गंडस्थळास टोंचतात. टोंचणी. 'ध्वजवज्रांकुशरेखा। चरणींची सामुद्रिकें देखा।' –एरुस्व १.२२. म्ह० 'हत्तीला अंकुश केवढा असतो?' ( क्षुद्र वस्तु मोठ्याला आपल्या अंकित ठेविते तेव्हां योजितात ). =थोडयाशा दुष्ट लोकांनीं पुष्कळ सुष्ट लोकांवर अंमल चालविणें. २ आंकडी; अंकुशी. ३ जैन यतीच्या हातांतील एक उपकरण ज्यानें तो देवपूजेकरितां वृक्षाचीं पानें फुलें काढतो. ४ दाब; आकलन; मर्यादा. 'निरंकुशाः कवयः।' =कवींना कांहीं धरबंध, प्रतिबंध नसतो. ५ तुरा; शिरपेंच. 'स्त्रीमात्र इये सृष्टीं। गंगेसमान माझिये दृष्टीं। जितेंद्रियत्व गुणाचे मुगुटीं। वरी अंकुश खोंविला ॥' –मुआदि २३.७१. [ सं. ] ०**मारणें**–( गों. ) टोंचणी लावणें. 'ताजेकडच्यान कसलेंय् काम करून घेतलॅ जाल्यार ताका पोतुं-पोतुंन अंकुश मारूं जाय.'

**अंकुशी**—स्त्री. आंकडी; अंकुश. ०**रुपया, अंकुसी–अंकोसी**–पुस्त्री. ज्याच्यावर अंकुशाचा छाप आहे असा रुपया ( हा पेशवाईत चालू होता ). 'पगार मक्ते प्रमाण। घ्यावे सुरस अंकोसी नाणें।' –पैमार्षेदु ६.

**अंकोल-ळ**—पुस्त्री. डोंगरांत वाढणारें एक झाड. याचें पान एक अंगुळ रुंद व पांच सहा अंगुळें लांब असून फूल पांढरें असतें, कच्चें फळ निळें व पिकलेलें लाल रंगाचें असतें; झाडाला कांटे पुष्कळ असतात. कृमी, शूल, विषार ( साप, उंदीर इ० ) यावर औषधि आहे. [ सं. अंकोट, प्रा. अंकोल्ल ] –न. त्याचें फळ. याचा रस वांती, विष, पिशाचपीडा, अतिसार इ० चा नाश करतो. याचें तेल मंत्र-विद्येंतहि उपयोगी पडतें.

**अंख**—पु. १ अंक; आंकडा; संख्या; अंकगणितांतील चिन्ह. २ डोळयाचा आंख; कपाळाचें गंडस्थळ. आंख पहा. [ अंक ]

**अंखणपंखण**—वि. धान्य, कणीस याप्रमाणें चिखुरलेली ? अंखणपंखण नक्षत्रें.' –भोंडला, मसाप ४.२५२. [ अंकण द्वि. ]

**अंखणी-णें**—अंकणी-णें पहा.

**अंखी**—अंकी पहा.

**अंखोअंख**—क्रिवि. चिठ्ठीवरील आंकडयाप्रमाणें, म्हणजे किंमत कमजास्त न करतां, मूळ किंमतीस ( विकणें किंवा विकत घेणें ). [ अंक-आंख द्वि. ]

**अंग**—न. ( अप. ) आंग. १ शरीर; देह. 'पै जयाचेनि अंगसंगें ।' –ज्ञा ९.२६९. 'अंगाला वारा लागेल, आंत जा !' २ अवयव; इंद्रिय; गात्र. 'अति क्षीणता पावलीं सर्व आंगें.' –दावि २४२. ३ ( ल. ) कोणत्याहि गोष्टीचा घटक, विभाग. 'हत्ती, रथ, घोडेस्वार आणि पायदळ हीं प्राचीन काळीं सैन्याचीं चार अंगें समजलीं जात असत.' ४ बाजू; दिशा. दारा अंग= ( व. ) दरवाज्यामागें किंवा जवळ. 'आठें आंगें पोळती । वसुधरेचीं ।' –शिशु ७४८. 'किल्ल्याचें आंग भिउनि फिरंग भार हा पळतो कानडयाचा.' –ऐपो १८३. 'तुमचें पागोटें मागल्या अंगानें बैडौल दिसतें.' ४ वेदांग; वैदिक वाङ्मयापैकीं विशिष्ट ग्रंथ-समूहास संज्ञा. उदा० शिक्षा, ज्योतिष, निरुक्त, इ. ५ एखाद्या कामांत असलेला हात, घेतलेला भाग किंवा संबंध. 'त्या मसलतींत रामाजीपंतांचें अंग आहे.' ६ चोरून मदत किंवा मिलाफ; आश्रय; फूस. 'ह्या चोराला कोतवालाचें अंग आहे.' 'ही सासुबरोबर भांडते, हिला नवऱ्याचें अंग आहे.' ७ अधि-ष्ठान; ठिकाण; शरीर; देह ( एखाद्या गुणदोषाचा कर्ता, पात्र ). 'ही चोरी ज्याचे अंगीं लागेल त्यास मी शासन करीन.' 'त्याच्या अंगीं चित्रकलेचा गुण आहे.' ८ ( एखाद्या वस्तूचा किंवा कार्याचा ) गौण, अप्रधान; भाग. उ० विवाहामध्यें होम हा प्रधान आहे, अवशिष्ट कर्में अंगें होत. ९ खूण. 'अनुभवाचीं आंगें जाणें ।' –दा ५.९.२२. १० आंतडयाचा गुदद्वाराबाहेर येणारा भाग, किंवा प्रसुतीनंतर योनीच्या बाहेर येणारा भाग. ( सामा. ) गुदद्वार. 'आंगीं सारी बर्फ कुणाच्या छत्री गाजर मुळा । मेणबत्तीचा खेळ चालला' –विक्षिप्त १.१३५. ११ विशिष्ट काम करण्याची पात्रता, ताकद, क्षमता, बुद्धि. १२ आपल्या बाजूचा माणूस(मोठ्या अधिकावरील);पुरस्कर्ता,तरफदारी करणारा; वशिला 'दरबारांत अंग असल्यावांचून कार्य सिद्धीस जात नाहीं.' १३ ( ज्यो. ) पूर्वक्षितिजावरील क्रांतिवृत्तावरचा बिंदु, अंश. ( अस्तलग्नाच्या उलट ). १४ (संगीत) प्रबंधाचा पोटविभाग; रागवाचक स्वरसमुदाय; हे विभाग सहा आहेतः– स्वर, विरुद्ध, पद, तेनक, पाट, ताल. १५ ( ताल ) तालाचें मात्रानियमानें झालेलें कालप्रमाण हीं अंगें सात आहेतः–अणु-द्रुत, द्रुतविराम, लघु, लघुविराम, गुरु व प्लुत. १६ कौशल्य; चातुर्य; कल. 'त्याला गाण्याचें अंग आहे.' १७ मगधाच्या पूर्वेचा जुना बंगाल देश; सध्यांचे मोंघीर, भागलपूर, पूर्णिया इ०. जिल्हे यांत येतात. याचा उल्लेख अथर्ववेदांत आलेला आहे. पुढील काळीं शोण, गंगा या नद्यांच्या आसपासचा प्रदेश; कर्णाचें राज्य. १८ आचारांग सूत्रांपैकीं एक जैन आगम ग्रंथ. १९ स्वतः, खुद्द. आंगें असाहि प्रयोग आढळतो. 'दीप वांचूनि दिवा लाहे । तें आंग भुललाचि कीं ।' –अमृ ३.२०. 'राहोनि गुप्त धृष्ट-द्युम्नें तच्छोध लाविला आंगें ।' –मोआदि ३४.१८. २० प्रकार. 'घालाघालीचें आंग सांधीं कैसें । चालितां बिंबु न दिसे ।' –शिशु १००६. 'कारभाराचें सांगावें अंग कैसें ।' –दा ११.५.२३. –शअ. ( व. ) कडे. उ० 'भिंतीअंग' ( वाप्र. ) ०**ओढविणें**– आपल्या आंगावर घेणें; स्वतः पुढें होणें; ( एखाद्या कार्यांत– कडे ). 'आपुलेंचि अंग तुम्हीं वोडविलें । त्याचें निवारिलें महा दुःख ।' ०**काढणें-काढून घेणें**–१ स्वतः एखाद्या कामांतून माघार घेणें; संबंध तोडणें ( एखाद्या कामांतून ). 'मी त्या कामांतून आपलें अंग काढून घेतलें आहे.' २ ( कु. गो. ) दच-कणें. 'आंग काडप.' ०**घालणें**–१ हात घालणें; मदत करणें; मन घालणें. 'या कामांत तूं जर अंग घातलेंस तर फार सोय होईल.' २ दुःखामुळें ( जमिनीवर पडणें. ) 'ऐकोनियां आंग घाली पृथ्वीवरी ।' –दा ३.५.३०. ०**घासणें**–झीज सोसणें. 'परांजप्यांनीं प्रामाणिकपणानें अंग घासून ... स्वतःची स्कीम करून कार्यास लागावें' –केले १.२६३. ०**घेणें-भरणें**–१ लठ्ठ होणें. २ ( गो. 'आंग घेवप.' ) ( कामांत ) भाग घेणें. ०**न घेणें**–पुढें न सरसावणें; भाग न घेणें. ०**चढणें**–सदरांत पडणें; वर्गांत येणें. 'जें विधीसी नातुडे । तें निषेधाचें अंग चढे ।' –एभा ७.६९. ०**चढून येणें**–( व. ) ताप भरणें, चढणें. ०**चोरणें-जोगावणें**–१ अंग राखून काम करणें; टंगळमंगळ करणें; चुकारपणा करणें. 'संत सेवेसी अंग चोरी । वृष्टी न पडो तयावरी ।' २ शरीराचा भाग आकुंचित करणें ( मार चुकविण्या-साठीं ). 'असा अंग चोरतोस म्हणून नीट लागत नाहीं.' ०**जड करणें**–( गो. 'अंग जड करप' ) एखाद्या कामांत

भाग घेण्याचें टाळूं पहाणें. ०जड जाणें–( गो. ' आंग जड जावप. ' ) अंगावर कांटा उभा राहणें. ०झांकणें–लपविणें–स्वतःची बाजू किंवा भाग ( कामांतील ) दाबून, गुप्त ठेवणें. ०झाडणें–साफ नाहीं म्हणून सांगणें; नाकबूल करणें. ' आंग झाडिती न मर्मे। येणें बोलें। '–ज्ञा १७.३७२. ०टाकणें–१ अशक्त होणें; वाळणें. ' आई गेल्यापासुन बाळानें अंग टाकलें आहे. ' २ जोरानें देह जमिनीवर टाकणें. ३ विश्रांतीसाठीं आडवें होणें; कसें तरी अस्ताव्यस्त पसरणें. ' घरीं जाऊन केव्हां अंग टाकीन असें मला होतें. ' ०टेकणें–आश्रय करणें ' योगें आंग टेकिलें योगीं। '–अमृ ९.२६. ०दर्शविणें–एखाद्या गोष्टींत किंवा व्यवहारांत हात किंवा संबंध आहे असें भासविणें. ०दाखविणें–एखाद्या कामांत कौशल्य दाखविणें. फड जिंकणें. ०न दाखविणें–अंग असल्याचें लपविणें; मागें रहाणें, जबाबदारी टाळणें. ( गो. आंग दाखैना जावप. ' ) ०देणें–१ मदत करणें; हातभार लावणें. २ प्रवृत्त होणें; वळणें. ' मुखा अंग देऊं नये। ' ०दोडपणें, दुडपणें, दुमडणें–( गो. ' आंग दोडप. ' ) अंग चोरणें. ०धरणें–१ ताठरणें; संधिवातानें शरीर आंखडणें. २ लठ्ठ होणें; ताकद येणें. ०मरणें–अर्धांगवायूनें शरीर अथवा एखादा अवयव बधिर होणें. ०मारणें–१ अंग चोरणें पहा. २ जोरानें अंग आंत घुसविणें. ' मीं दाटींतुन अंग मारलें. ' ०मुरडणें–मुरडणें; मागें पहात दिमाखानें जाणें; ठमक्यानें जाणें; ' नवी साडी नेसून पोर पहा कशी अंग मुरडीत चालली आहे. ' ०मोडून काम करणें–खपणें; श्रम करणें; अतिशय मेहनत करणें; जिवाकडे न पाहतां काम करणें; जीव पाखडून काम करणें. ०मोडून येणें–तापानें अंगावर कांटा येणें; कणकणणें; कसकसणें. ' तदुपरि अविलंबें आंग मोडून आलें। '–साछह ३.५७. ०येणें–( गो. ' आंग येवप. ') १ लठ्ठ होणें. २ प्रसूति समयीं गुह्यांग बाहेर येणें. ०रक्षण करणें, राखणें–वांचविणें–अंग चोरणें; आपला बचाव करणें. ' यश रक्षावें न आंग लेकांहीं। ' –मोउद्योग १०.६१. ' वत्सें भीमें एकें काय करावें ? न अंग राखावें। '–मोभीष्म ३.४. ०सांवरणें–१ तोल सांवरणें. २ गेलेली ताकद पुन्हां मिळविणें; पूर्व स्थितीवर येणें. ०सोडणें–( गो. ' आंग सोडप ' ) खंगत जाणें. ०हलकें होणें–( गो. आंग ल्हवु जावप. ' ) हायसें वाटणें; ( जबाबदारींतून ) मोकळें झाल्याबद्दल समाधान वाटणें. ' अंगा–नें आरंभ होणा रे वाप्र. –खांद्यावरचें–( बायकी ) ( ल. ) दागदागिने. –खालची, खालची बायको–स्त्री. राख; उपस्त्री. –खालीं घालणें–स्वतःच्या चैनीसाठीं अथवा उपभोगासाठीं राखणें ( वेश्या, परस्त्री, इ० ). –खालीं पडणें–१ सवयीचें होणें. २ भोग देणें; रतिसुख देणें–घेणें. –चा आंकडा होणें–आंकडीनें पेटके येणें, अंग वांकडें होणें. –चा आळापिळा करणें–१ अंग पिळवटणें; आळेपिळे देणें. २ अतिशय श्रम करणें. –चा खकाणा करणें–( व. ) संताप करून घेणें. –चा खुर्दा होणें–( श्रमानें ) अतिशय श्रमानें अंग ठणकणें; गलितगात्रें होणें; मणके ढिले होणें. –चा हुरपळा–भडका होणें–अंग अतिशय तापणें ( तापानें, संतापानें ); लाही होणें; आग होणें. –ची आग–लाहकी–होळी होणें–रागानें, संतापानें अंगाची आग होणें. –ची चौघडी करणें–१ शरीराच्या चार घड्या करणें ( डोंबाऱ्याच्या कसरतींत ). २ सर्व अंग पोटाशीं घेऊन निजणें ( थंडी, ताप इ० मुळें ). –ची लाही होणें–अंगाचा हुरपळा होणें पहा. १ उन्हानें अतिशय अंग तापणें; काहिली होणें; भडका होणें. २ अतिशय संताप येणें ( जोंधळा इ० धान्याची भाजून लाही होते त्याप्रमाणें ), ' तें तिजला खपलें नाहीं। अंगाची झाली लाही। '–विक १७. –ची लाही करणें–संतापविणें, खिजविणें, भाजणें; जाचणें. –चें आंथरूण करणें–स्वतःवद्दलची काळजी सोडून सर्व प्रकारच्या संकटांना तोंड देणें; एखाद्याचें काम करण्यासाठीं स्वतःच्या जीविताची पर्वा न करणें. ' त्याचें लग्न व्हावें म्हणून म्या अंगाचें अंथरूण केलें तरी त्यानें त्याचा कांहीं उपकार मानला नाहीं. ' –चें आंथरूण होणें–( तापामुळें ) अशक्तता येणें; उठवणीस येणें; मरगळीस येणें. –चें कातडें काढून जोडा शिवणें–( एखाद्याविषयीं ) अतिशय कृतज्ञता, आदरबुद्धि दाखविणें. –चे चकदे काढणें–( मांसाचे तुकडे करून काढणें ) जोरानें वेदम मारणें; अंगाची सालडी काढणें. –चे–चा तिळपापड होणें–रागानें शरीराची लाही होणें. ' मी दहांच्या तोंडून ऐकलें आणि माझ्या अंगाचा असा तिळपापड झाला कीं सांगतां पुरवत नाहीं. '–मोर १५. –चे धुडके उडविणें–( शरीराच्या ) लकतऱ्या काढणें; चेंदामेंदा करणें; फार झोडपणें. ' त्या बदमाषानें त्याच्या अंगाचे नुसते धुडके उडविले. ' –चें पाणी करणें–होणें–अतिशय श्रम करणें ( त्यामुळें अंगास पाणी, घाम येणें ). ' अंगाचें पाणी करूनच या हतभाग्या आयुष्याचे दिवस मला लोटले पाहिजेत. ' –पाव्ह ९९. –च्या चिंध्या करणें–१ (व.) अंग ओरखडणें. २ त्रास देणें. अंगांत मांग शिरणें–शरिरांत अतिशय क्रोधाचा संचार होणें. ( मांग हा फार क्रूर समजला जातो यावरून ). –त येणें–वारें शिरणें–१ भूतसंचार होणें. २ अति उत्कंठेनें काम करणें –त शीळकळा येणें–( माण. ) अंगांत देव येणें, वारें येणें. –निराळा–बाहेर–टाकणें–झोंकणें–सोडणें–झिडकाविणें–( कामधंदा, जबाबदारी ) सोडून देणें; माथ्यावर, अंगावर न घेणें. ' पेशव्यांनीं आम्हाला अंगाबाहेर

टाकलें आहे.' –अस्तंभा २४. **–निराळें करणें**–अंगाबाहेर टाकणें पहा. **–बरोबर होणें, –त बसणें**–एखादा कपडा अंगास बरोबर बसणें, ठीक होणें, बेताचा होणें; **–ला लावणें**–१ अंगाला तेल वगैरे चोपडणें. 'नवी नवरी म्हणून अंगाला लावीन म्हटलें; नाहीं!' –झांमू. २ बाळंतिणीचें अंग रगडणें, चोळणें. **(एका) –वर असणें–होणें**–एका कुशीवर निजणें; पडून राहणें. **–वर कांटा उभा राहणें**–भीतीनें किंवा आनंदानें अंग रोमांचित होणें. 'श्रुतश्रवणें आला सर्वांगीं आमुच्या पहा कांटा।' –मोकर्ण १८.१. **–वर काढणें**–आजार वगैरे सोसणें. **–वर कोसळणें–कोसळून पडणें–ओघळणें**–१ रागानें एखाद्याच्या अंगावर चालून जाणें, पडणें. २ संकट आपत्ति वगैरे गुदरणें; जबाबदारी येणें; आपत्तींत सांपडणें. **–वर गाण किंवा गोणी येणें**–(व.) अंगावर जोखीम किंवा जबाबदारी येणें **–वर घेऊन**–स्वतःवर जबाबदारी घेऊन; आपलें म्हणून; कैवार घेऊन (क्रि॰ करणें, बोलणें; सांगणें; पुसणें, विचारणें). **–वर घेणें**–१ मुलास प्यावयास घेणें, देणें; थान देणें. २ स्वतःवर जबाबदारी घेणें. ३ आपला म्हणणें, अतिशय प्रीति दाखविणें. **–वर तुटणें–तुटून पडणें**–हल्ला करणें; धांवून जाणें; एकदम चालून जाणें. **–वर देणें**–जामिनकी किंवा गहाण न घेतां वैयक्तिक जबाबदारीवर कर्ज वगैरे देणें. **–वर देणें–बांधणें–भरणें–पोसणें–करणें** इ॰–स्वतःच्या जबाबदारी–साधन–संचयावर देणें, बांधणें वगैरे. **–वर पडणें–येणें**–१ शिरावर पडणें; विक्रींत नफा होईल म्हणून जो माल खरेदी केला तो अडीअडचणीमुळें, भाव उतरल्यामुळें आपल्याजवळ पडून राहणें; तोटा भरून देण्याची जोखीमदारी अंगावर येणें. २ गळ्यांत येणें; एखादा धंदा अगर काम करण्यास भाग पडणें. ३ रागानें चालून जाणें; वसकन अंगावर येणें. ४ हल्ला करणें; चालून येणें. **–वर पिणें, खाणें**–(मुलानें) स्तनप्राशन करणें; स्तनप्राशन करण्याइतकें लहान असणें. **–वर शेकणें**–तोटा होणें (व्यापारांत); बूड येणें (रुपये, व्यवहार, इ॰ ची); कुमांड येणें. **–वरचें**–वि. दूध पिणारें (मूल). **–वरचें जाणें**–(बायकी) महिन्याच्या महिन्यास तरुण स्त्रीच्या शरीरांतून जसें दूषित रक्त बाहेर जातें तसें अवेळीं जाऊं लागणें; धुपणी रोग होणें. **–वरचें तोडणें**–तान्ह्या मुलाचें अंगावर पिणें बंद करणें. **–वरून वारा जाणें**–अर्धांगवायु होणें. 'भूतपिशाच्य लागलें। अंगावरून वारें गेलें।' –दा ३.७.५५. **–स कुयला लागणें**–मत्सरानें किंवा संतापानें हिरवा–निळा होणें; मिरच्या लागणें; अतिशय राग येणें. **–स झोंबणें**–(व.) अंगास स्पर्श करणें; धरणें. **–स मुंग्या येणें**–वातादि विकारामुळें अंगाला एक प्रकारची बधिरता येणें. **–स बसतें येणें**–अंगाला बरोबर बसेल असें होणें (कपडा इ॰). 'नोकरलोकांच्या अंगास बसते येतील असे पोषाख करण्यांत यावेत.' –खानगींतील नोकरांचे पोषाख (बडोदें) ७. **–स–अंगीं–येणें**–१ व्यापारांत बूड येणें; नुकसान होणें; ठोकर बसणें. 'मिरच्यांचा व्यापार अंगास आला.' २ अंगांत बाणणें. 'मराठीच्या अंगीं आलेली क्षीणता क्षणमात्रहि झांकली जाणार नाहीं.' –नि. **–स येणें–होणें**–अंगाबरोबर होणें. **–स–आंगीं–लागणें**–१ पुष्टिकारक होणें; लठ्ठ होणें. २ एखादा दोष किंवा गुन्हा अंगावर शाबीत होणें, लागू होणें. 'तेथें न करितां चोरी। आंगीं लागे।' –दा ६.१.७२. ३ तोटा सोसावा लागणें; ठोकर बसणें; अंगावर शेकणें. **–स लावणें**–१ (बायकी) स्नानाच्या अगोदर तेल व हळद अंगाला लावणें, चोळणें. २ बाळंतिणीच्या अंगाला तेल लावणें. **–स लावणें–लादणें**–चिकटविणें; शाबीत करणें (गुन्हा, अपराध). **अंगीं**–यानें आरंभ होणारे वाप्र. **–असणें**–जवळ, पदरीं असणें; ठायीं असणें. 'हा दोष माझ्या अंगीं नाहीं.' **–आणणें**–१ आपल्यावर घेणें; ताबा घेणें. २ आपल्या ठिकाणीं असें देणें; स्वाधीन राखणें. 'हा गुण अंगीं आणण्याचा प्रयत्न कर.' **॰आदळणें**–अंगास चिकटणें, कोसळणें. 'अंगीं आदळतो शोक.' –दावि ४२३. **अंगीं(एका अंगीं)–अंगें–उणा**–वि. १ आईबाप मेलेला; पोरका; विधवा; विधुर. २ व्यंगी; लुळा; कमीपणा असलेला; एका पायानें लंगडा; ३ (ल.) सरळ, ताठ नसलेला; उणेपणा असलेला; कमजोर बाजू असलेला; लुच्चा; जाणूनबुजून अपराधी. **म्ह॰** अंगीं उणा तर जाणे खाणाखुणा=ज्याला आपला कमीपणा ठाऊक आहे तो लोकांची टीका आपल्याला चिकटवून घेतो. **॰खिळणें**–शरीरांत भिनणें. **॰घुमारणें**–भूत लागणें; अवसर येणें. 'आजि आंगीं घुमारिलें.' –दावि १५६. **–चा उतारा**–वि. अंगावरून ओवाळून दिलेला, काढून टाकलेला जिन्नस (वस्त्र, अलंकार इ॰). 'तुझें अंगीचा उतारा। तो मज देई गा दातारा।' –भज ४२. **–ची सावली करणें**–(स्वतःचा) आश्रय देणें. 'आपुलिये आंगींची सावली। अहोरात्र करुनि तया रक्षी।' **–जिरणें**–सरावाचें होणें; मुरणें. **–ताठा भरणें**–गर्विष्ठ होणें. 'अंगीं भरलासे ताठा। वळणीं न ये जैसा खुंटा।' **–तुटणें**–अशक्त होणें; वाळणें; रोड होणें (मूल). **–नसणें**–१ जातीनें अनुभव, माहिती नसणें. २ स्वतःचा नसणें; मूळचा नसणें. 'इतका उद्धटपणा त्याच्या अंगीं नाहीं.' **–पडणें**–१ सहाय, पक्षपात करणें. 'हा अविवेचा अंगीं पडे.' –अमृ ६.६. २ सवय होणें. अंगीं मुरणें पहा. **–फुटणें**–१ लठ्ठ होणें; गुबगुबीत होणें. २ एखादा रोग अंगावर स्पष्ट दिसणें, वाहणें (रक्तपिती इ॰). **–बसणें**–सुगम असणें; सवय होणें. **–बिऱ्हाड देणें–करणें**–शरीरांत थारा देणें; हृदयांत, अंतःकरणात

बाळगणें; आसरा देणें ( दुर्गुण, पापवासना इ० ना ). **–माशा मारणें**–आळशी बनणें. **–( माशीं ) भरणें**–लठ्ठ होणें. **–मिरच्या, कुयले, लागणें–झोंबणें**–( एखाद्यानें मर्म काढलें असतां ) रागानें जळफळणें. **–मुरणें**–१ संवयीचा होणें. २ हाडीं शिरणें; शरीरांत (ताप) भिनणें. ३ जिरणें; बाहेर न येणें ( देवी, गोवर ). **–येणें**–अंगांत भुताचा संचार होणें; अवसर येणें; भूतबाधा होणें. 'शूद्र येक त्याचे आंगीं आला बोले।' –रामदासी २.११. **–लागणें**–अन्न पचणें; लठ्ठ होणें. 'त्याच्या अंगीं अन्न लागलें.' **–वाजणें**–( बाजणें ) अंगांत शिरणें; शोभणें. 'थोरपण अंगीं वाजे नाना' –दावि ६५. **अंगीं–गें**–१ स्वतः, जातीनें. **म्ह०** 'अंगें केलें तें काम। पदरीं असे तो दाम।' 'अंगें करितातो आपण। दोघे जण मिळोनी।' –एभा ७.५७८. 'अंगें धावे कार्यासमान।' –नव १६.१७५. २ च्या वतीनें, मार्फत ( प्रतिनिधि ). दादा अंगे वयनी सोयरी. **अंगें, आंगें**–शअ. जवळ; बाजूस. 'पाण्याचा तांब्या बापूचे आंगें होता.' –बाळ २.६८. **म्ह०** १ अंगीं (माझ्या इ०) का माशा मेल्या आहेत = काय ( मी ) आळशी आहें, का माझा धंदा काय माशा मारीत बसण्याचा आहे? २ आली अंगावर तर घेतली शिंगावर = सहजासहजीं, आगाऊ न ठरवितां एखादी गोष्ट अंगावर येऊन पडली असतां, आडवी आली असतां ती करणें (बैलाच्या शिंगांच्या टप्प्यांत कोणी आला तर तो त्याला शिंगावर घेण्याला कमी करीत नाहीं यावरून, आयता मिळालेला फायदा करून घेणें हा अर्थ ). ३ अंगापेक्षा बोंगा मोठा; अंगापेक्षां बोंगा, कोठें जासी सोंगा=( शरीरापेक्षां धोतराचा अथवा लुगडयाचा पुढचा भाग मोठा ) खऱ्यापेक्षां जास्त योग्यतेची ऐट मारणें. सामाशब्द: **०अंग, आंगप्रत**–क्रिवि. पृथक् पृथक्; अलग अलग; इसमवार; प्रत्येकीं. **०उद्धार**–पु. (प्र.) अंगोद्धार. १ (काव्य) शरीराची, देहाची मुक्तता. २ तीर्थांत स्नान करणें; तीर्थस्नान; देहशुद्धि. ३ ( योग ) पोटांतील आंतडीं तोंडांतून बाहेर काढून स्वच्छ करणें; धौती; धुतीपुती. [ अंग+उद्धार ] **०उधार**–वि. अंगावर दिलेलें, केलेलें (कर्ज, उधारी); स्वतःच्या पतीवर केलेली उधारी. **०ओलाचें**–न. ( कों. ) जिच्यांत पाणी सांठविण्याची शक्ति आहे असें शेत, जमीन; उन्हाळ्यांत पाणी न देतां हिच्यांतून पीक काढतात. **०कंप**–पु. शरीरास कंप सुटणें; थरकांप होणें. [ सं. ] **०कल**–पु. शरीराचा तोल, वांक. [ सं. ] **०कवळी**–स्त्री. ( काव्य ) आलिंगन; मिठी; पक्कड. 'परस्परें अंगकवळी होतां। आनंदिलीं उभयतां।' –मोल. [ अंग+कवळणें ] **०कष्ट**–पु. शारीरिक श्रम. [ सं. ] **०कळा**–स्त्री. शरीराचें तेज, कांति; मुसमुशीतपणा ( निरोगावस्थेंत ). **०काठी**–स्त्री. अंगबांधा; अंगयष्टि; शरीराचा बांधा, ठेवण. ( अंगलट–लोट–ठेवण–वटा–वठा–वळण हे शब्द शरीराचें स्वरूप, कांति, भरदारपणा इ० दाखवितात तर अंगकाठी–बांधा–यष्टी हे रचना, बांधणी दाखवितात ). **०काढू–ढू–ढ्या**–वि. अंग काढणारा; पळपुटया; जबाबदारी टाळून निसटूं पाहणारा (संकट, अडचणी असतांना); काम चुकारू; माघार घेणारा. [ अंग+काढणें ] **०कार्श्य**–न. शरीराचा लुकडेपणा; सडपातळपणा; कृशता. [सं.] **०गडी**–पु. पोटांतील भिडू; पित्त्या; ( सोंगटया, पत्ते इ० खेळांत ) भिडूंचा तोटा असतां आपणच त्यांच्या वाटचें खेळणें, म्हणजे आपणच एक कल्पित भिडू आहों असें मानणें. **०ग्रह**–पु. आचके, पेटका, गोळा येणें. [ सं. ] **०चपळाई–चापल्य**–स्त्रीन. अंगांतील चपळपणा; स्वतःसिद्ध चापल्य. **०चुकाऊ–र–रू, –चोर**–वि. कामांत कुचराई करणारा; मनापासून, नेटानें काम न करणारा. 'अंगचोर वाग्वीर–पटूंचें पेव कसें फुटलें।' –सन्मित्र समाज मेळा पृ. १३. १९२९. **०च्छाया**–स्त्री. १ अंगाची सावली. २ ( ल. ) आश्रय. 'तंव वैकुंठपिठींचें लिंग। जो निगमपणाचा पराग। जियें जयाचेनि हें जग। अंगच्छाया।' –ज्ञा १७.४६. **०छेद–विच्छेद**–स्त्री. शरीराचा एखादा अवयव कापणें. [ सं. ] **०ज**–वि. अंगापासून झालेला. –पु. स्वतःचा पुत्र; मुलगा; औरस. **०जा**–स्त्री. स्वपुत्री. **०जड**–वि. जड शरीराचा; लठ्ठ; फोपसा; भगडबंब; मंद; आळशी. **०जूठ**–स्त्री. मल्लयुध्द; कुस्ती; झटापट. [स. अंग+युध्द –जुध्द–जुट्ठ ] **०जोर**–पु. अंगबळ; शरीराची ताकद, शक्ति. ( असे घेडगुजरी समास मराठी भाषेंत पुष्कळ झाले आहेत ). [सं. अंग+फा. जोर] **०झाप**–स्त्री. पेंढाऱ्यांपैकीं कोणी एखादा पेंढारी झटापटींत मारला गेल्यास त्याला तात्पुरती मूठमाती देण्याची जी चाल होती तीस म्हणत. ठग लोकांत, त्यांनीं मारलेल्याला तात्पुरती मूठमाती देण्याची पध्दत; पुढें त्या मृताला सवडीनें नीट लपवून ठेवीत. [अंग+झापणें–झांकणें] **०झोंक**–पु. शरीराचा तोल, कल. [ अंग+झोंक ] **०झोल**–पु. ( काव्य ) छातीवरील बंदांचा लांब अंगरखा. **०ठसा–ठाण–ठेवण**–पुनस्त्री. अंगाची ठेवण; अंगकाठी. 'भीमा ऐसा अंगठसा। माझिये दृष्टी दिसतसे।' –मुसभा ६. १५३. २ (ल. ) बळ; सैन्य. –होकै १. **०ठोळा–ळी**–पु.स्त्री. हातांच्या किंवा पायाच्या बोटांत घालावयाचें एक वेढें, वेढणें. ( मराठ्यांत स्त्रिया व मुलें बहुधा वापरतात ). [ अंगुष्ठ ] **०तुक**–न. अंगाचें वजन. 'तरी लोहाचें आंगतुक। न तोडितांचि कनक। केलें जैसें देख। परिसें तेणें।' –ज्ञा १७.२१६. [अंग+तुक] **०तोल**–पु. अंगझोंक पहा. **०त्राण**–न. शरीरसंरक्षक साधन; चिलखत; बख्तर: कवच. 'गोधांगुळें घालिती हस्तीं। अंगत्राणें बांधिलीं।' –पांप्र ३२.६५. **०त्वानें–त्वें**–क्रिवि. ( अंगत्व याची तृतीया ) प्रतिनिधि म्हणून; एखाद्या करितां; एखाद्याच्या नांवानें–तर्फे–आश्रयानें, मार्गदर्शकत्वाखालीं; वतीनें. 'मला न फावल्यास मी

आपल्या अंगत्वानें दुसरा कोणी पाठवीन.' ०दट–वि. १ अंगास घट्ट बसणारें, दाटणारें. २ दृढ; बळकट. 'आत्मविषयीं आंतुवट। साधन जें आंगदट॥'–ज्ञा १६.४५. –पु. (कर्ना.) अंगरख्याच्या आंत घालावयाची कोपरी. [सं. अंग+दृढ] ०देण्या–वि. प्रत्यक्ष शेत कसणारा शेतकरी; शारीरिक श्रम करणारा पक्ष. ०देवता–स्त्री. उपदेवता (कर्मांतील जी मुख्य देवता तिच्या अंगभूत असणारी). २ (ल.) सेवक; चाकर; भोंवतालची मंडळी. [सं.] ०धट–वि. उद्धट; असभ्य; शिरजोर. [अंग+धृष्ट] ०ध(धि)टाई–स्त्री. १ केवळ शारीरिक बळ; पाशवी बळ, शक्ति (चातुर्य, युक्ति यांच्या विरुद्ध). २ रानटी जुलूम; आंगमर्दी. ०धार–आंगधार पहा. ०धुणें–न. १ (बायकी) स्नान; अंघोळ. २ (व.) न्हाणीघर. ०न्यास–पु. देवतास्थापनेच्या वेळीं, धर्मविधि करतांना निरनिराळे मंत्र म्हणून देवतेच्या प्रतिमेला ६ किंवा १६ स्थानीं स्पर्श करावयाचा विधि; संध्या वगैरे करतांना स्वतःच्या शरीराच्या निरनिराळ्या स्थानीं स्पर्श करावयाचें कर्म. [सं.] ०परिवर्तन–न. उलटें करणें (शरीर इ०); एका बाजूवरून दुसऱ्या बाजूला वळणें. 'आषाढमासीं शयन। भाद्रपदमासीं अंगपरिवर्तन। कार्तिकीं उद्‌बोधन।' [सं.] ०पात–पु. १ शरीराचा ऱ्हास; लुकडेपणा; क्षीणता. २ (कड्यावरून) स्वतःस खालीं लोटून घेणें. ३ शरीरास किंवा एखाद्या अवयवास पक्षघात होणें. ४ अंग बाहेर येणें (गुह्येंद्रियाचा भाग). [सं.] ०पांथी–स्त्री. खासगत वांटा; सरकतीच्या व्यवहारांत सावकारानें आपली सरकत ठेवली असतां सावकारीचे पांथीहून निराळी सरकतीसंबंधें जी त्याची नफ्याची पांथी असते ती. २ अंगवांटा. [अंग+पंक्ती] ०पिळा–मोड–पु. अंगादिक पिळणें; आळस आला असतां किंवा भूतसंचारामुळें अंगास दिले जाणारे आळेपिळे; आळोखेपिळोखे; तापानें अंग कसकसणें. ०पीडा–बाधा–स्त्री. नैसर्गिक विकार; शरीरास जडलेली व्याधि किंवा रोग (भूतपीडेच्या उलट). [सं.] ०प्रत्यंग–न. अवयवांसकट शरीर; पूर्ण शरीर. [सं.] ०प्रस्थान–न. प्रत्यक्ष प्रवासास निघण्यापूर्वी एखादा शुभ मुहूर्त साधण्यासाठीं आपलें घर सोडून जवळपास दुसऱ्याच्या घरीं स्वतः रहावयास जाणें. [सं.] ०बल–न. शारीरिक शक्ति; ताकद; अंगधटाई. 'अवनीतीनें वर्तों नये। आंगबळें।'–दा २.२.२२. [सं.] ०बांधा–पु. शरीराची ठेवण. ०भंग–पु. १ अंगाचे सांधे धरणें; अशक्तपणा वाटणें. २ अंगविक्षेप; शरीराचे निरनिराळे चाळे, हावभाव, चेष्टा. 'अंगभंग बहु दाविती रंगीं। रामरंग सुखसिंधु तरंगीं।' ०भंगवात–पु. अंगभंग रोग; ज्यामुळें हा रोग होतो तो वातदोष. ०भर–भार–क्रिवि. शरीराच्छादनापुरतें (वस्त्र). 'अंगभर वस्त्र, पोटभर अन्न.' –पु. (ल.) शक्ति; जोर. 'एऱ्हवीं प्राप्तें मतांतरें। थातंबूनि आंगभरें।'–ज्ञा १३.३१८. ०भर होणें–(ना.) १ फजिती उडणें. २ भार होणें. ०भा–स्त्री. अंगकांति. 'अंगभा विलोकितां तटस्थ जाहली सभा।'–(अनंत) सीतास्वयंवर ८९. ०भूत–वि. एखाद्या वस्तूचा भाग, अंश; अवलंबी; समाविष्ट; तदंतर्गत; संबंधीं; आश्रयी. 'सीमंतपूजन हें विवाहाचें अंगभूत होय.' 'ज्वराच्या अंगभूत अरुचि असतेच.' [सं.] ०मर्दन–न. अंग रगडणें; चेपी; मालिश. [सं.] ०मर्दाई–मर्दी–स्त्री. पौरुष; शक्ति; केवळ शारीरिक बळ; अंगधटाई. [सं. अंग+फा. मर्दी=पौरुष] ०मस्ती–पाशवी शक्ति; दांडगाई; उद्धटपणा. [सं. अंग+फा. मस्ती=दांडगाई] ०मार्दव–न. शरीराचा नाजुकपणा. [सं.] ०मास–न. (व्यापकपणें) शरीर या अर्थीं 'माझें अंगमास दुखतें.' 'तिचें अंगमास शेकलें पाहिजे.' ०मेहनत–स्त्री. शारीरिक श्रम; प्रत्यक्ष कष्ट. [सं. अंग+अर. मिहनत्=श्रम, कष्ट] ०मेहनती–त्या–वि. शारीरिक कष्ट करून पोट भरणारा; कष्टाळू; पोषाखीच्या उलट. २ स्वतः शेत कसणारा; शेतकरी. ०मेळ–पु. अंगसंग; संबंध. 'तियेचेनि अंगमेळें।' –विपू १.१०३. [अंग+मिळणें] ०मोड–स्त्री. अतिशय मेहनत करणें; कष्ट करणें; सक्त मेहनत. ०मोडा–पु. १ आळेपिळे (आळस घालविण्यासाठीं). (क्रि० देणें.) 'निद्रेनें व्यापिली काया। आळस आंगमोडे जांभया।'–दा १८.९.२. २ ताप भरण्यापूर्वी अंग कसकसणें; अंग मोडून येणें. (अव.) अंगमोडे. 'अंगमोडे येऊं लागले.' [अंग+मोडणें; बं. अंगमोडा] ०यष्टी–रचना–स्त्री. शरीराचा बांधा, ठेवण. [सं.] ०रस–पु. वनस्पतीच्या पानांचा, पाणी न घालतां काढलेला रस; आपरस पहा. [सं.] ०राख्या–वि. अंग राखून काम करणारा (आळसामुळें, अप्रामाणिकपणानें); अंगचोर; चुकार. ०राग–पु. १ सुगंधी उटणें; उटी, लेप; चोपडण. 'श्रमघर्मानें रणिं वीरांचा अंगराग पसरला।'–सुसु नाटक २१. २ उटीचें द्रव्य (अरगजा, केशर, इ०). [सं.] ०रेटा–पु. अंगानें दिलेला, शरीरानें दिलेला धक्का, ठोसा. 'गाड्यास अंगरेटा दे म्हणजे चालता होईल.' [अंग+रेटणें] ०रेटाई–स्त्री. अंगाची धक्काबुक्की; मस्ती; ठोमेठोशी; अंगधटाई. ०रोग–पु. शरीरास होणारा स्वाभाविक रोग (पिशाच्चबाधेनें किंवा देवतापराधानें न होणारा). ०लग–वि. १ (जात, मैत्री, नोकरी इ० संबंधानें) जडलेला; संबंधीं; संबंध असलेला. २ जिव्हाळ्याचा; जवळचा; –पु. १ नातेवाईक; स्नेही. 'तुम्हा पिता तरी विरोचन। तो आमुचा अंगलग जाण।'–कथा २.६.८८. 'अवघे अंगलग तुझे वधियेले वीर।'–तुगा ३९२. २ समागम. 'संताचेनि अंगलगें। पापातें जिणणें गंगे।'–ज्ञा १२.१७७. ३ आश्रय; साहाय्य. 'परब्रह्मींचेनि अंगलगें। सृष्ट्यादि कार्य माया करूं लागे।'

—विउ ११.१६. ' देवा मंदराचेनि अंगलगें । ' –ज्ञा ११.२५७. **०लट – लोट – वटा – वठा**–स्त्री पु. शरीराची ठेवण, कांति, तेज. अंगकाठी पहा. ' तेची अंगलट गोरी आसा ' ' माझी आंगलट त्यावेळीं कांहींशी पातळ होती ' –विवि ११.८.२०४. [ सं. अंगयष्टिः; प्रा. अंगलठ्ठी–अंग लट; किंवा अंग+लोष्ठ] **०लट घेणें**–स्वतः होऊन जबाबदारी पत्करणें. **०लट येणें**–१ अंगास चिकटणें; तोटयांत येणें. २ अंगाला चिकटणें; धक्काबुक्की करणें: खोडी काढणें. ( अंगलट जाणें असाहि प्रयोग आढळतो ). **०लीन**–वि. अंगांत मुरलेलें; शरीरांत गुप्त असलेलें. ' सद्दैवें जैसें दोपा । अंगलीना । ' –ज्ञा १६.४२. **०लेणें**–न. अंगावरचा दागिना; अलंकार. ' नाना अलंकार अंगलेणीं । ' –सप्र २.५. **०लोट**–१ अंगलट पहा. २ अंगभार; अंगानें वजन, पतन. ' मस्तकीं वाहती करूनि मोट । भूमीं टाकिती जैसा घट । तळीं पाषाण होती पिष्ट । आंगलोटें दोघांच्या ॥ ' –मुसभा ७.३२. **०वख**–पु. अंगप्रदेश. ' जळतेया गिरिचेया आंगवखां । ' –राज्ञा ११.४२०. [ अंग+वक्ष ? ] **०वटा**–क्रिवि. स्वाधीन. [ अंग+वत् ] **०व( वा )टा**–शेतांत उत्पन्न झालेल्या मालाच्या तीन ( शेतमालक, बैल–नांगर मालक व शेत कसणारा ) वांटयांपैकीं शेत कसणाऱ्याचा वांटा. [ अंग+वाटा ] **०वण**–स्त्री. १ सरावाच्या योगानें आलेली योग्यता; संपादन केलेली कार्यक्षमता; वाकबगारी. ' ऐसी अंगवण नाहीं मज देवा । ' –तुगा ४४९५. ' वातात्मजासि म्हणे यदुनंदन । जरी तुज असेल आंगवण । यांतून एक स्त्रीरत्न । तुवां घ्यावें स्वेच्छेनें ॥ ' –जै ११.६. २ पराक्रम; शौर्य; जोर; उत्साह. ( व. ) खटपट; प्रयत्न. आंगवन असाहि प्रयोग. ' जळो तुमचें दादुलेपण । नपुंसकाहूनि हीन । वृथा गेली आंगवण । काय वदन दावितां ॥ ' –एरुस्व ८.६. ' नीलजां कैची आंगवणा ॥ ' –उषा १४२३. ३ शरीरावस्था. ' तंव भीमसेनाची आंगवण । कृष्णधर्म पाहाती । ' –जै ६.७०. ४ देवीचा वण; तीळ; चट्टा. ( क्रि० पडणें, उठणें, येणें, जाणें ). ५ उपासना; भक्ति; ( गो. ) ( देवाला केलेला ) नवस. ' कीं वीरश्रीची धरितां अंगवण । प्रताप विशेष वाढे पैं । ' –रावि ११.६. ६ सराव; नित्यक्रम; वहिवाट. ' ऐसें करितां पापाचरण । तयासी आलें वृद्धपण । पुत्र जाहाले अति दारुण । तरी आंगवण न सांडी ॥ ' –रावि १.१११. ७ ( ल. ) साहाय्य; मदत. ' या परी चतुरंगसेना । मिसळली रणकंदना । आपुलालिया अंगवणा । गज रथ रणा आणिती ' –एभा ३०.११७. ८ द्वंद्व युद्ध; झुंज. ' तेआं भीड भीमसेना । जुंझतां बहुती आंगवणा । परतिजे ऐसी हांव कव्हणा । उपजेचिना ॥ ' –शिशु ८७८. [ अंगवलन किंवा अंगापण–अंगावण ] **०वणा**–वि. शूर. ' तो अक्रूर आंगवणा पुढां चाले । ' –शिशु ५४५. **०वत**–सामर्थ्य; अभिमान. ' आतां हा जळता वारा कें वेंटाळे । कोणाही विषा भरलें गगन गिळे । महाकाळेंसि खेळे । आंगवत असे ' –ज्ञा ११. ४०५. **०वला**–वि. जवळचा; अनुकूल; स्वाधीन. **०वसा**–( झाडाचें ) साल, पाला, शेंडा. ' अशोकाचे अंगवसे । चघळिले कव्हेनि जैसे । ' –ज्ञा ११.४१४. **०वसें**–न. रूप. ? –मनको. **०वस्त्र**–न. १ उपरणें; उत्तरीय; उपवस्त्र. ' नुसत्या अंगवस्त्रानिशीं तो घराबाहेर पडला. ' २ लंगोटी ( गौरवार्थी ) [ सं. ] ३ ( ल. ) प्रेमपात्र; ठेवलेली स्त्री; रखेली; उपस्त्री. [ अंगना + उपस्त्री=आंगावस्त्रि–आंगोवस्त्र असा हा शब्द बनला आहे. वस्त्र( कपडा )याशीं याचा कांहीं संबंध नाहीं असें राजवाडे म्हणतात–भाइ १८३२ ] ' मला तर असें आठवतें आहे कीं, त्या वेळच्या खाजगी शाळेच्या एका मास्तरास सकाळची शाळा असतां शाळेंतील विद्यार्थी त्याच्या आंगवस्त्राच्या घरांतून कित्येकदां बोलावून आणत असत ! ' –टि ४. २९१. वाप्र. एका अंगवस्त्रानें निघणें–भाऊबंदांशीं बेबनाव होऊन एका उपरण्यानिशीं कांहीं एक तनसडी न घेतां घराबाहेर निघणें. **०वळ**–पु. आगवळ, आगूळ. अगवळ पहा. –नागा १२८. ( –शर ) **०वळण**–पु. अंगलट; अंगाची, शरीराची ठेवण. **०वळणीं पडणें**–सरावाचें होणें ( हा शब्द प्रथमा विभक्तींत क्वचित योजितात ). ' जी भाषा आम्ही ... बोलतो त्यांतील शब्दांचे उच्चार आमच्या आंगवळणीं पडले असल्यामुळें ... ' –टि ४.४०१. **०वळा**–पु. १ अंगाचे आळेपिळे; आळसामुळें येणारी जांभई. अंगपिळा पहा. २ मुलांची चळवळ. ३ सांगाती, सोबती; संबंधी; सहवासी. ' नित्य त्या सेवकाजवळा । अंगें अंगवळा तूं होशी । ' –एभा ६३९४. ४ अंगकाठी. **०वळेकार**–वि. भारी; शक्तिमान्. ' सेजवळ सहवासी । आंगवळे–कारू विश्वासी । ' –शिशु ५०५. **०वाटा**–पु. १ अंगवटा पहा. २ ( व्यापारधंदा ) भांडवल उभारल्याखेरीज प्रत्यक्ष काम करणाराचा वांटा. ३ अंगपांगी पहा. **०वाटेकरी**–पु अंगवाटा घेणारा. **०वाण**–पु. ( कु. ) नवस ' देवाक आंगवाण केली हा. ' [ अंग+वाणी. ] **०वात**–पु. चालतांना वेगानें उत्पन्न होणारा वारा; अंगवारा; गतिमान् वस्तूपासून उत्पन्न होणारा वायु. **०वाला**–वि. ( गो. ) अंगांत घालण्याचा; आंगाचें. **०विकार–विकृति**–पु.स्त्री. शारीरिक रोग. **०विक्षेप**–पु. हावभाव; अभिनय; चाळा; अंगचेष्टा; हातवारे. [ सं. ] **०वृद्धि**–स्त्री. शरीराची वाढ ( रोगामुळें झालेली–अंतर्गळ, अंडवृद्धि; इ० ). [ सं. ] **०वेग**–पु. १ शरीराचा वेग; चालण्याचा जोर अंगवात. २ शरीर वाढत असतांना त्याला आंतून मिळणारा जोर. **०वैकल्य**–न. १ शरीराचा अधूपणा; लुळेपणा; व्यंग. २ ( ल. )( धार्मिक विधींतील महत्त्वाचा भाग गाळल्यामुळें ) येणारी न्यूनता; अपूर्णता; दोष; वैगुण्य. **०शः**–क्रिवि. एकेक भाग घेऊन; भागशः; खंडशः.

**०शैथिल्य**–न. शरीराचा ढिलपणा; थलथलीतपणा; मांद्य ( अंगदार्ढ्य याच्या उलट ). **०संकोच**–पु. १ शरीराचें आकुंचन. अंग चोरणें. 'किं अंगसंकोचें पारधी । टपोनि तत्काळ मृग साधी।' २ आकुंचनाची स्थिति; आकुंचन; संकुचितपणा. [सं.] **०संग**–पु. १ शरीराचा संयोग, मीलन; अंगस्पर्श. 'दीपाचिया अंगसंगा । कोण सुख आहे पतंगा ।'–एभा ८.७४. 'दुरून बोल, अंगसंग कामाचा नाहीं.' २ संभोग; मैथुन; रतिसुख. 'घडे भक्ति जैसी मनाच्या प्रसंगें । न साधे तसी माझ्या अंगसंगें ।' ३ हातघाई; अंगलट; लठ्ठालठ्ठी; कुस्ती. [सं.] **०सफाई**–स्त्री. शरीराची अथवा कामाची चपळाई; अंगचापल्य. [सं. अंग+फा. सफाई] **०सरकर्ता**–पु. अंगवाटेकरी पहा. **०संस्कार**–पु. १ अभ्यंगस्नान वगैरे; शरीरावर संस्कार. २ अंगस्पर्श; शरीरसंयोग. [सं.] **०सामर्थ्य**–न. शारीरिक बळ; अंगजोर. [सं.] **०साळया**–वि. नाणें पाडण्याचें काम न करतां इतर कामें करणारा सोनार ( टंकसाळयाच्या विरुद्ध ). अकसाळया पहा. **०सिक**–न. अंगावरील वस्त्र. 'आंगसिकें वेढुं म्हणोनि । सर्वज्ञांचीं ॥'–ऋ ७०. 'आंगसीकें दीधलीं उदारें । भणे कवी भास्करु ॥'–शिशु २३२. **०सुख**–न. रतिसुख; संभोगसुख. 'यावा निजांगसुख लाभ वधूजनांतें ।' [सं.] **०सुटका**–स्त्री. १ एखाद्या संकटांतून किंवा अडचणींतून कांहीं नुकसान किंवा इजा न होतां सुटणें. २ मुक्तता. 'हें काम मी पतकरलें आहे यांतून माझी अंगसुटका झाल्याशिवाय तुम्हांकडे कसा येऊं ?' **०सुस्ती**–स्त्री. शरीरमांद्य; जाड्य. **०सूट**–वि. चपळ; हलक्या अंगाचा; सुटसुटीत; मोकळा. **०सौष्ठव**–न. शरीराचा बांधेसूदपणा; सौंदर्य. [सं.] **०स्तनें**–न. लेंकरूं. –शर ? **०स्वभाव**–पु. जन्मजात अथवा उपजत स्वभाव; नैसर्गिक वृत्ति. [सं.] **०हार**–पु. ( नृत्य ) सहा किंवा सहापेक्षां जास्त करणांचा समुदाय. हे अंगहार ३२ आहेतः–स्थिरहस्त; पर्यस्तक; सूचीविद्ध; अपविद्ध; आक्षिप्त; उद्धट्टित; विष्कंभ; अपराजित; विष्कंभापसृत; मत्ताक्रीड; स्वस्तिकरेचित; पार्श्वस्वस्तिक; वृश्चिकापसृत; भ्रमर; मत्तस्खलित; मदाद्विलसित; गतिमंडल;परिच्छिन्न; परिवृत्त; वैशाख रेचित; परावृत्त; अलातक; पार्श्वच्छेद; विद्युद्भ्रांत; उद्वृत्तक; आलीढ; रेचित; आच्छुरित; आक्षिप्तरेचित; संभ्रांत; अपसर्प व अर्धनिकुट्टक. **०हीन**–वि. व्यंग; न्यून; अपूर्ण; अवयवरहित ( शरीर ). 'कां अंगहीन भांडावें । रथाची गति ॥'–ज्ञा १७.३८९. –पु. मदन. –स्त्री. वेश्या; पण्यांगना. 'अंगहीन पडप । जियापरी ।'–ज्ञा १७.२५६.

**अंगचा**—वि. १ शरीराचा; बाहेरचा नव्हे; स्वाभाविक. २ स्वतःचें; जन्मजात; जातीचें; उसनें न घेतलेलें; अंगभूत. ३ स्वतःच्या डोक्यांतील, कर्तबगारीचा, करणीचा, शोधाचा, दुसऱ्यानें शिकविलेला नव्हे असा. ४ स्वतःच्या योजनेचा; कल्पनेचा. ( ल. ) थोतांडाचा; कवटाळपणाचा; बनावट; खोडसाळ. ५ व्यक्तिविशेषाचा; खासगत; पदयाचा; एकांतीचा. वरील अर्थात कमीजास्त फरक होऊन पुढील कांहीं शब्द झालेले आहेत. **०कल्पक**–वि. स्वभावतः नवीन गोष्टी शोधून काढणारा; जात्याच शोधक, तीव्र बुद्धीचा. **०कसबी**–वि. स्वतःच निरनिराळ्या वस्तु मेहनतीनें व स्वतःच्या चतुराईनें नीट करणारा; नेहमीं लागण्याऱ्या वस्तु तयार करणारा. **०कारागीर–कारिगर–गाणारा–चितारी, इ०**–वि जन्मतःच कुशल–कलावान्–गवई–चितारी इ०. **०खांब**–पु इमला ज्या सामानाचा ( लांकूड, दगड इ० चा केला असेल ) त्याच सामानाचा तयार केलेला खांब. **०जोड**–पु. मुख्य इमारतीपासून अथवा वस्तूपासून झालेली वाढ; जास्ती वाढविण्यासाठीं घातलेली भर. **०झरा**–पु. पावसाळ्यांतच केवळ उत्पन्न होणारा नव्हे तर सतत पाणी वाहणारा जमिनींतील जिवंत झरा. 'या विहिरीला अंगचे झरेच पुष्कळ आहेत, पावसाळीं एकदोन असतील.' **०धणी**–स्वतःचा मालक; कोणाचा चाकर नव्हे तो. **०मळ**–पु. स्वतःच्या शरीराची घाण; एखाद्यास अगदीं निरुपयोगी असलेली वस्तु. जसें:– तो अंगचा मळ द्यावयाचा नाहीं. ( कंजूष माणसाबद्दल योजतात ). **०लिहिणार**–वि. लेखक वगैरे न ठेवतां स्वतःचें लेखन स्वतः करणारा. 'मोरोपंत अंगचा लिहिणार होता.' **०वक्ता**–वि. उपजत वक्ता. **०शहाणा**–वि. स्वभावसिद्ध शहाणा; चतुर. **०ची कळा**–स्त्री. स्वतःच्या अंगचें नैसर्गिक तेज, चातुर्य, हुशारी. **०ची गोष्ट**–स्त्री. वैयक्तिक किंवा स्वतःचें काम, धंदा; स्वतः काढलेली कल्पना. ( क्रि० सांगणें ) **०ची बुद्धि**–स्त्री. उपजत शहाणपण. **०चें देऊळ**–न. खडकांत, डोंगरांत कोरून काढलेलें देऊळ.

**अंगचें**—आंगचे पहा.

**अंगछा**—पु. १ ( अंगवस्त्र ) उपरणें. २ ( कों. मुंबई ) हातरुमाल ३ ( माण. ) कोपरी; हाफजाकीट. [सं अंग+वस्त्र; हिं. अंगोचा; गु. अंगुछो; सिं. अंगोचो; काश्मी. अंगोस]

**अंगठा, अंगोठा**—पु. १ हाताचें किंवा पायाचें पहिलें जाड बोट. 'त्या आरशा घालुनि आंगठ्याला । त्याली असे सुंदर आगठ्यांला ।'–सारुह ६.२७. २ कळाशीचा एक प्रकार; चाळा; दांता. ३ हाड; काठी; धज इ० शब्दांप्रमाणें या शब्दाचाहि बांधा, ठेवण या अर्थी उपयोग करतात. **०दाखविणें**–वाप्र. नाकबूल जाणें; नाकारणें; फसविणें, ठकविणें ( तर्पण करतांना पितरांना प्रत्यक्ष वस्तु देण्याऐवजीं आंगठ्यावरून पाणी सोडतात त्यावरून किंवा नाहीं याअर्थी अंगठा हलवितात त्यावरून ). 'तेवीं पुत्रापासोन सुखप्राप्ती । माता पिता होईल

म्हणती । शेखीं पुत्र अंगोठा दाविती । केवळ भ्रांती पुत्रमोहो।' –एभा ११.८२. [ सं. अंगु=हात+स्थ, अंगुष्ठ; प्रा. अंगुट्ठ; जि. अंगुष्ठ; झेंद. अंगुस्त; फा. अंगुस्त्; हिं. अंगूठा; गु. अंगूठो ] ०धरणें–अव. अंगठे धरणें. पायाचे आंगठे ओणवे होऊन हातानें धरणें (शाळेंतील एक शिक्षेचा प्रकार). 'अंगठे धरून ह्या म्हाताऱ्याला उभा करा.' –वाय २.१. पायाचे अंगठे मुखांत धरणें= वरील अर्थ. 'हरि हरि दाहापूर्वी कळतें तरि आंगठे मुखीं धरितों । अपराध कोटि पोटीं घालाया मुकुट पाय ते करितों ॥' –मोस्त्री ६.६३. ०ठ्यास आग लागणें–संकटांचा प्रारंभ होणें; (आगामी संकटाला प्रथमपासूनच घाबरण्याच्या वेळीं म्हणतात.) 'अजून तर तुझ्या आंगठ्यास देखील आग लागली नाहीं.' –धर्माजी ९१. ०ठ्याची आग मस्तकास जाणें–रागानें नखशिखांत लाल होणें. ०ठ्यावर दिवस मोजणें–आतुरतेनें वाट पाहणें; एखादी इष्ट गोष्ट साधण्यापूर्वीच दिवस मोजणें. ०ठ्याचा मान– अंगठेदाम पहा. ०ठ्याची खूण–छाप–करणें–बिन लिहिणाऱ्यापासून पावती घ्यावयाची असतां सहीच्या ऐवजीं डावे हातच्या अंगठ्याचा ठसा शाईनें उठविणें. 'गोप्रदान घेणारा लिहिणारा नसल्यास अंगठ्याची खूण करून घ्यावी.' –गोप्रनि ४. ०ठ्यावरील जोर–(व्यायाम) दोन्हीं हातापायांचे आंगठे टेंकून दंड, जोर काढणें. –व्यायाम, आगष्ट १९२३.

**अंगठी**—स्त्री. १ हाताच्या बोटांत घालावयाचा एक अलंकार; मुदी; वेढें; मुद्रिका; मोहरेची–देव दर्शनी–मिन्याची–सील (नांवाचीं आद्याक्षरें) इ० अंगठ्या असतात. २ हाताची करंगळी. ३ पायाचें बोट. ४ अंगुस्तान. म्ह० १ आंगठी कापली तरी हा मुतायचा नाहीं=अतिशय कृपण माणसाबद्दल योजतात. २ आंगठी सुजली म्हणून डोंगराएवढी होईल कां? =क्षुल्लक गोष्ट कितीहि फुगवून सांगितली तरी तिला महत्त्व येत नाहीं. ३ ज्याची आंगठी त्याच्याच डोळ्यांत घालणें=एकाद्याला डावांत फसविणें; ज्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यांत घालणें. [ अंगुलिस्थ (रत्न)–आंगुइट्ठ–आंगुट्ठी–आंगठी; सं. अंगुष्ठ; सिं. आङ्वठी ]

**अंगठेदाबणी-दाम**—स्त्रीपु. (लग्नाच्या) सप्तपदीच्या वेळीं नवरीची बहीण नवरीच्या पायाचा आंगठा दाबून धरून बसते, तेव्हां तो सोडविण्यासाठीं नवऱ्यामुलानें तिला द्यावयाचा मानपान, पैका. [ आंगठा+दाम ]

**अंगठेधरी**—स्त्री. अंगठे धरण्याची शिक्षा. –संगीत घोटाळा १३.

**अंगडी-डें**—स्त्रीन. १ (सामा.) अंगरखा. 'आंगडें झाडुनि घोंगडें करी।' –तुगा ६२०. 'अंगडी पगडी शाल दुशाला.' –अमृत ११२. २ लहान मुलाचा अंगरखा; अंगा. आंगडे-बंदुकी (चें)–कापडी रूदार चिलखत. 'आंगडे बदुकी व तिरंदाज यांची संचणी करून हराम मेळविले.' –मदाआ ६. (कु. राजा.) आंगडा=बंडी; झबलें ] ०टोपडें-टोपी–अंगरखा आणि टोपी; पोशाख. 'तुझा नामदेव शिंपी। घेऊनि आला आंगडी टोपी.' –रंगानु. संतस्तवन.

**अंगडी**—स्त्री. (कर्ना.) बाजार; दुकान. [द्रा; का. अंगडी]

**अंगण**—न. १ घरापुढील अथवा मागील मोकळी जागा; आवार; घरापुढील झाडून सारवून तयार केलेली जागा; पडूस. 'नर्तकी अंगणीं तुझ्याहि दिसती सर्या।' –कमं ४. 'सभा बैसली आंगणीं।' –भूपाळी. २ (ल.) रंगण; पटांगण; मैदान; जसेः–युद्धांगण, रणांगण. ३ (ल.) टप्पा. 'उभा नयनाचें आंगणां.' –देप १९०. वाप्र. अंगणीं जाणें–(व.) (बायकी) मोरीवर जाणें, लघ्वीला जाणें. म्ह० १ घर सोडलें अंगण पारखें (परदेशी). अंगणावरून घराची परीक्षा. अप. रूपें–आंगण–णें. [ सं. ]

**अंगत**—वि. आंगच्या. 'महाराजांनीं समक्ष बोलावून अंगत स्वभावानुसार शिव्यागाळी करून.' –विक्षिप्त ३.११३. [ सं. अंग+गत ]

**अंगतपंगत**—आंगतपंगत पहा.

**अंगद**—न. १ बाहुभूषण (दंडांत किंवा मनगटांतहि घालतात). कडीं, वाकी, बाजूबंद इ०. 'करकंकणें बाहुअंगदें.' –एभा १४.४८५. 'अंगदमंडित चंदनचर्चित सायुध नृपाळभुज तोडी.' –मोकर्ण ११.३. –पु. २ वालीपुत्र (रामदूत). [सं.] ०नीति– स्त्री. (रामदूत अंगदानें रावणास सांगितलेलें नीतिशास्त्र; त्यावरून) सुनीति; सन्मार्गाचे नियम. ०शिष्टाई–स्त्री. सीता परत करण्यासाठीं अंगदानें रावणाशीं केलेली वाटाघाट, सामाचें बोलणें, त्यावरून (ल. उप.) दोन्हीं पक्षांचा समेट करण्यासाठीं आपण होऊन लुडबुडेपणानें केलेली मध्यस्थी; लुडबूड; चोंबडेपणा.

**अंगदेणें**—न. प्राचीनकाळीं मुंबईस पोर्तुगीजांनीं कोळ्यांवर बसविलेला एक कर; शिरपट्टी.

**अंगना**—स्त्री. १ स्त्री. 'ऐके नरवीरपंचानना । प्राप्तकाळीं पाणिग्रहणा। तुज कोण वरीना अंगना। मनमोहना श्रीकृष्णा॥' –एरुस्व ४.११. २ पत्नी; स्वतःची बायको. [ सं. ]

**अंगरखा**—आंगरखा पहा.

**अंगरेज, अंग्रेज**—इंग्रज माणूस. इंग्रज पहा.

**अंगरेजी, अंग्रेजी**—इंग्रजी पहा.

**अंगलणें**—अक्रि. स्वाधीन होणें. अंगवणें पहा. –शर.

**अंगलाई, आंग्लाई**—स्त्री. इंग्रजशाही; इंग्रजांचें राज्य; इंग्रजी अमदानी. [ इं. आंग्लो ]

**अंगलाई**—स्त्री. एक देवता. 'अंगलापुरीची अंगलाई' –सप्र ५.३६.

**अंगवणें**—अक्रि. ( गो. ) नवस करणें. आंगवणें पहा.

**अंगवणें-विणें**—उक्रि. प्राप्त होणें; मिळणें; होणें. 'तेणेंचि परब्रह्म आंगविलें । जेणें जिंकिलें मनातें ।' -एभा २३.७०५ 'देहो दिव्यस्त्रीचा आंगवला ॥' -मुसभा ६.३९. २ अनुकूल असणें. 'गुरूचा उगाळू घ्यावया देख । मी होईन आंगवला सेवक ॥' -एभा १२.५५४. ३ स्वाधीन होणें, करून घेणें. 'देहत्वें कां आंगवता । मी म्हणोनि ॥' -परमा १०.२३. 'तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ॥' -ज्ञा ३.२६७. 'तें आपुलेनीचि बळें । आंगविलें जिहीं ॥' -ज्ञा १२.४५.

**अंगवला**—वि. स्वांगानें, स्वतः, शरीरानें. 'कांतेचिया भिडा । आवरला होय जगायेवढा । आंगवला उघडा । जियेवीण ।' -अमृ १.३४.

**अंगवे**—अंगापासून. 'ऐशी हीं पचवीस तत्त्वें । रचिलीं लिंगदेहा अंगवे ।' -कथा ६.११.७९.

**अंगळी**—अंगुळी पहा.

**अंगा**—आंगरखा पहा.

**अंगा**—संबो. अगा ! अरे. ( कुण. ) हंग. 'हे अंगा अगाये कृष्णा।' -रासपं १.८४६. 'यदंगदाशुपेत्वं' -ऋग्वेद १,१,६. [ वै. सं. अंग=संबोधन, अहो, बरें ! ]

**अंगाई**—उद्गा. मुलाला निजवितांना म्हणावयाचें गाणें व त्याचें पालुपद. या गाण्याच्या आरंभीं व अखेरीस. 'अंगाई' असें म्हणतात. 'तनयातें करिते अंगाई.' -विक ८७. [ अंग+आई ] -स्त्री. झोंप ( मुलांच्या भाषेंत ) ( क्रि० करणें ). 'अंगाई बाळाची टंगाई' ०करणें-( उप थट्टा ) झोंप घेणें; निजणें; गाई करणें. 'तर आमचें आख्यान फार लांबून वाचकमंडळीपैकीं जर कोणास डुकल्या यायला लागल्या तर त्यांनीं खुशाल मधून उठून जाऊन अंगाई करावी.' -नि.

**अंगाकढा**—पु. पानगा; निखाऱ्यावर भाजलेली आरोळी. अगाकडा पहा. [ अंगार+कडवू ? ]

**अंगांगीभाव**—पु. अवयव आणि अवयवांनीं युक्त जो देह यांचा परस्पर संबंध; गौण भागाचा प्रधान भागाशीं संबंध; गौण-मुख्य भाव; उपकार्योपकारक भाव. [ सं. अंग+अंगी+भाव ]

**अंगार**—पु. १ जिवंत विस्तव; निखारा; इंगळ. 'अंगारकणीं बहुवर्सी ।' -ज्ञा १३.१०६२. २ ( ल. ) रागीट माणूस. ३ आग, ( ल. ) दारूगोळ्याचा वर्षाव. 'अंगार भडकली होती.' -संग्राम ६९. [ सं. ] ०होणें-( व. घाटी ) १ आग होणें. २ राग येणें. ०डब्बी, पेटी-स्त्री. ( ना. ) आगपेटी.

**अंगारक**—पु. १ मंगळ ग्रह. २ ( संकेत ) आंग्रे, ( मराठी राज्याचे आरमाराधिपति ) यांचें आंगारक असेंहि एक रूप आढळतें-भाअ १८३५. २०९; ३०९. ३ म्लेंच्छ; ताम्रलोक. ४ कोळसा ( शाप. ) कार्बन -सूपनि ८. ५ मंगळवार. [ सं. ]

**अंगारकी, अंगारी**—स्त्री. मंगळवारीं येणारी वद्यपक्षांतील ( संकष्टी ) चतुर्थी. 'श्वेतमांदारीं गजानन । अंगारकचतुर्थीसी साधिल्या जाण ।' -एभा १५ २०४. [ अंगारक ]

**अंगारा**—पु. देवापुढें जाळलेल्या धूपाची राख; ही भक्तलोक आपल्या कपाळास अरिष्टनाशक म्हणून लावितात. रक्षा; धुपारतींतील अवशेष. 'तुझा दास शेषशायी । म्हणुनि लावी अंगारा ॥ २ ( वैष्णव वगैरे पंथांत ) वर सांगितलेल्या राखेची कपाळास लावलेली भुकण; विभूति; भस्म. ३ एखाद्या साधूनें किंवा मांत्रिकानें अरिष्ट किंवा पिशाच वगैरेंचा उपद्रव होऊं नये म्हणून मंत्रून दिलेली राख; रामरक्षा, शिवकवच इ० स्तोत्रें म्हणून राख मंतरतात ती; भस्म. ४ जोंधळ्यावर पडणारा काजळीचा रोग. ५ विस्तव; निखारा. ( ल. ) रागीट माणूस. ६ ( सामा. ) राख. 'तुका म्हणे पाहता घडी । जगा ओडी अंगारा ॥' -तुगा ३९७६. [ सं. अंगार; फ्रें. जि. अंगर; गु अंगारो ] म्ह० अगाऱ्याला गेला पागारा घेऊन आला=मोठा पराक्रम करण्यासाठीं जाऊन सामान्य गोष्ट करणें. ०करणें-१ भुतांखेतांची पीडा नाहींशी करण्यासाठीं, विषार उतरण्यासाठीं, किंवा एखादें लोकोत्तर कार्य हातून घडण्यासाठीं मंतरलेलें भस्म अंगास चोळणें. २ ( ल. ) अंकित करणें; कबजांत आणणें. ०लावणें-( ल. ) एकाद्यास आशा दाखवून शेवटीं निराश करणें. **डाव्या पायाचा अंगारा**-दृष्ट लागूं नये म्हणून आई आपल्या डाव्या पायाच्या तळव्याची माती मुलाच्या कपाळास लावते ती. ०धुपारा-१ अंगारा; विभूति; रक्षा; मंत्रतंत्र. ( क्रि० करणें ). अंगारा करणें पहा. २ ( ल. ) अपुरी सामुग्री, बेगमी; चिक्कूपणाचा खर्च. तुटवडा येणें. 'शेरभर तांदुळांचा सहा माणसांस अंगाराधुपारा होईल.'

**अंगाराम्ल**—न. ( शाप. ) कार्बनिक ॲसिड. -सूपनि ८.

**अंगारी चतुर्थी-चौथ**—स्त्री. अंगारकी-अंगारी पहा.

**अंगावर्त**—न. घोड्याच्या पुढील पायाच्या फऱ्यावर उजवेकडे किंवा डावेकडे भोंवरा असतो तो. [ सं. अंग+आवर्त ]

**अंगाविणें**—उक्रि. १ ( काव्य ). कवटाळणें; मिठी मारणें. २ आपला करणें; स्वतःवर जबाबदारी घेणें; अंगावर घेणें. [ अंग ]

**अंगिक**—वि. १ अंगासंबंधीं; शारीरिक. २ अंगचें; स्वाभाविक. अंगभूत 'जयाचेनि आंगिकें तेजें ।' -ज्ञा ६.११०. -न. शरीरावयव; अंगुलि. 'कीं अंगिका अंगुष्ठद्वया जवळें । गर्भिचेया लावण्या आठांगुळें ।' -ऋ ८७. २ सामर्थ्य; बल. 'जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें ।' -ज्ञा १८.५२४. ३ अंगचा स्वभाव. 'हिंवलीं जैसी आंगिकें । हिंवों नेदी निजांग ।' -ज्ञा १७.२२९. ०पण-१ स्वभावधर्म. 'कोण्ही म्हणती साय जैसी

दुधावरी । तैसी ब्रह्मीं मायेची असे उजरी । क्षणें लपे क्षणें प्रगटे साईचे परी । आगींच्या अंगिकपणें ॥ ' –स्वानुदिन १३.१.५६. ०भाव–पु. १ शरीराची आकृति, ठब; आकार; ठेवण. ' स्मृति तेचि अवयव । देखा अंगीकभाव । ' –ज्ञा १.४२. २ सामर्थ्य.

**अंगी**—स्त्री. अंगडें; कुरकी; झग्याप्रमाणें वर खणाची चोळी व खालीं जोडून परकर असा कशिदा काढलेलें लहान मुलाचें आंगडें. (हल्लींचा फ्रॉक हा अंगीचा सुधारलेला नमुना आहे) –शिशि ३.४१. ' सावरीत फिरणें अंगी कुंची । ' –दावि १८. २ अंगरखा; कोट; पोषाख. ' चंद्रतारां आंगि टोपरें । केलेसें शार्ङ्गधरें । ' –शिशु ५१०. ' लोहमुयी हातीं न घेतां । अंगी सिवितां न ये कीं ॥ ' –भवि ३.८९. –पु. अनेक अवयव मिळून झालेला विशिष्ट पदार्थ. –वि. अनेक अंगांचा, अवयवांचा, भागांचा. [सं. अंगिका=कुडतें, चोळी; अंगिन्. हिं. अंगिया= चोळी]

**अंगीकरण-कार**—नपु. १ हक्क सांगणें; स्वीकारणें; स्वतःचें म्हणून मान्य करणें; मानणें. २ रुकार भरणें; संमति देणें. ३ हातीं घेणें; अंगावर घेणें. ४ स्वीकार, मान्यता. ' आंगीकार जाधव-रायांनीं केला । ' –ऐपो ८६. ५ (कायदा) (इं.) अॅडमिशन. कोर्टांत चाललेल्या कामांतील पक्षकारानें स्वतः, किंवा स्पष्ट किंवा गर्भित अधिकार दिलेल्या इसमानें कळविलेल्या तोंडीं किंवा दस्त ऐवजी हकिकतीवरून निघणारें मुद्याच्या किंवा लागू गोष्टीविषयीं अनुमान. ६ (हिंदुधर्मशास्त्र) देणें मान्य असल्याबद्दल लेखी कबुली. (इं.) अॅक्नॉलेजमेंट. [सं. अंगीकृ]

**अंगीकारणें**—उक्रि. अंगिकार करणें. १ आपला म्हणणें; हक्क सांगणें; स्वीकारणें इ. २ कबूल करणें; रुकार भरणें; मान्यता देणें. ३ हातीं घेणें; अंगावर घेणें. ४ स्वीकारणें; घेणें. ' जरी मी अंगीकारीं राज्यासन । ' –रावि ११.१६४. [सं. अंगीकार]

**अंगीकृत**—वि. १ कैवार घेतलेलें; आदरलेलें; अंगिकारिलेलें; आपलेंसें केलेलें. २ कबुली, परवानगी दिलेलें; मान्य केलेलें. ३ हातीं घेतलेलें. ४ घेतलेलें; स्वीकारलेलें. [सं.]

**अंगीज**—स्त्री. उरक; उठावणी; पार पाडणें. ' त्यांच्यानें कोणा एका कार्याची स्वतां अंगीज करवत नाहीं. ' –मराआ १३. [फा. अंगेझ्, अंगेख्तन् (=उठावणी करणें) चें आज्ञार्थी रूप; सं. अंग]

**अंगीसणें**—अक्रि. एकरूप होणें. ' एकाकी असे आंगु । आंगींसूनी । ' –ज्ञा १२.२०६. **अंगिसुनी**–निश्चळ–मनको.

**अंगुठा**—पु. (काव्य) अंगठा पहा.

**अंगुठी**—स्त्री. अंगठी पहा.

**अंगुर-गूर**—न. द्राक्ष. ' अंगुरखिरण्या द्राक्षिस घड लोंब-तात मुंडावळी । ' –प्रला १५४. ०**शिरका**–द्राक्षासव.

**अंगुरशेफ**—स्त्री. (हिं.) काश्मिरांत उगवणारें एक झुडुप. (इं.) (अॅट्रोपा बेलाडोना)

**अंगुल ळ**—न. आंगुळ पहा. १ आठ यव एकास एक जोडून (रुंदीकडून) झालेल्या लांबीचें माप. २ हाताच्या बोटांच्या रुंदीचें माप. १२ अंगुळें=१ वीत. चोवीस आंगुळें=एक हात. ' तो जगदात्मा दशांगुळें उरला । ' ३ बोट; अंगठा. [सं. अंगुल] ०**वेढे**–१ आंगठ्याचा एक रोग; कांडरूं. बोटाच्या सांध्याचा एक विकार. ' अंगुळवेढे(ढे) गालफुगी । ' –दा ३.६. १८. २ आंगठी.

**अंगुली-ळी**—स्त्री. १ हाताचें किंवा पायाचें बोट. ' दुर्ती दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । ' –ज्ञा १८.५७. ' रुचिरतर विरोद्या शोभती अंगुळीला । ' –सारुह ६. ३१. २ (नृत्य) अंगुलीच्या चार क्रिया. –आवेष्टित, उद्वेष्टित, व्यावर्तित व परावर्तित. ०**त्राण**–१ बाण वगैरे मारतांना हाताच्या बोटास इजा होऊं नये म्हणून हाताच्या पंजांत घालावयाचा एक कातड्याचा हातमोजा. २ अंगुस्तान पहा. [सं. अंगुली+त्राण] ०**तोरण**–कपाळावर गंधाचें किंवा भस्माचें त्रिपुंड्र. [सं. अंगुली= बोट+तोरण=दरवाजाची कमान] ०**नर्तन**–न. विचारांत गर्क असतां हाताच्या बोटांची हालचाल;चाळा. ०**निर्देश**–पु. हाताच्या बोटानें दाखविणें; उल्लेख, दिग्दर्शन करणें (हा तो माणूस इ० वाक्प्रचारांत) ०**भंग**–पु. १ बोटाचे सांधे मोडणें; बोटें मोडणें. शाप देतांना किंवा अलायबलाय करतांना कानशिलावर बोटें मोडणें. २ (ल.) कार्यनाश. ०**संदेश**–पु. हाताच्या बोटांच्या खुणांनीं भाषण करणें; खुणा करणें. [सं.]

**अंगुलीयक**—न. अंगठी. [सं.]

**अंगुलें-ळें**—न. हातांतील अंगठी. ' जायाचें अंगुळें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ॥ ' –तुगा ३२१८. ' अंगुळें, लोळुलें, वाघनख, सरी । ' –वटसा ३५.

**अंगुळें**—न. अंगडें पहा. ' नवां ठाइं तडुकलें । हें पांच पुडें आंगुळें । ' –ऋ ५४.

**अंगुष्ठ**—पु. अंगठा. ' रत्नें भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठींही तपिजे । ' –ज्ञा १७.४१५. [सं. अंगुष्ठ; अर. फा. अंगुश्त्; झेंद. अंगुस्त] –**ष्ठाची आग मस्तकांत जाणें**–१ अंगाची लाही होणें; फार संतापणें, रागावणें. **अंगुष्ठावरून दशशिर (रावण) करणें**–आंगठ्याचा रावण करणें. (ल.) अंशमात्र पाहून सर्व गोष्टी किंवा प्रकार अतिशय युक्तीनें सांगणें; फुगवून सांगणें. –**दशशीर करणारा**–गप्पिष्ट; अतिशयोक्ति करणारा. ०**पर्व**–न. अंगठ्याचें पेरें. ०**पर्वभर**–न. अंगठ्याच्या पेराएवढा; टीचभर; बोटभर. ०**मात्र पुरुष-शरीर**–मनुष्याचें सूक्ष्म शरीर; प्राण गेल्यानंतर यमदूत हें शरीर स्थूल शरीरांतून ओढून नेतात व हेंच

शरीर पापपुण्य भोगतें, असा समज आहे; लिंग देह. 'अंगुष्ठ-मात्र पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी।' –मोवन १३.५८.

**अंगुष्ठाण-स्तन-स्तान-स्थान**—न. १ बोटाला सुई टोचूं नये म्हणून व सुईस मागून नेट मिळावा म्हणून तर्जनींत घालावयाचें एक धातूचें (लोखंडी, पितळी) टोपण. २ अंगठी. [सं. अंगुली+स्थान किंवा त्राण; फा. अंगुश्तदान; अंगुश्तरी=अंगठी]

**अंगुसा**—पु. (माण.) फडकें; चिंधी; अंगवस्त्र; अंगोछा. अंगछा पहा. 'त्या अंगुशांत भाकरी बांध.' [सं. अंग+वस्त्र]

**अंगुस्ती**—स्त्री. (गो.) दुःख; चिंता; काळजी. 'तूं देवाची अंगुस्ती साचारु।' –ख्रि १.१.१४. [पोर्तु. अंगुस्तिआ; इं. अँग्विश]

**अंगुस्ती**—स्त्री. १ चिळस, भीति वगैरेमुळें किंवा ताप येण्यापूर्वी अंग कसकसणें, शहारे येणें; अंगावरील काटा; शिरशिरी (क्रि० येणें, वाटणें) २ खांदे उडविणें; शरीरावयवाची एकदम हालचाल. (क्रि० देणें). [सं. अंग+ऋस्ता–स्ती=विचलन]

**अंगुस्ती**—स्त्री. रखेली; राख. [अंग+स्त्री]

**अंगुळु-ळू**—वि. (नंदभाषा) दहा संख्या (बोटें दहा असतात यावरून संकेत) 'मुळु उदानु अंगुळु ऐसी। नंदभाषा सांगितली त्यासी।' –भवि ४२.४५. [सं. अंगुलि]

**अंगून**—शअ. १ ज्या बाजूनें; ज्यावर अथवा खालीं, वरून अथवा खालून (रस्ता, भिंत इ०). 'वर जी टेकडी ती वरचे अंगून चिरेबंदी दगडांनीं बांधून काढिली आहे.' –विवि ८.१.१०. २ एखाद्यापासून, करितां, कडून, तर्फे (निरोप, विनंति) [अंग+ऊन, हून]

**अंगेज-जणी, अंगेजी**—पुस्त्री. शौर्य, धाडस; उठावणी; पराक्रम. 'जनरलांनीं अंगेज केला आहे.' –राज १२.९७. 'स्वामी हिंदुराज्यकार्यधुरंधर राज्याभिवृद्धिकर्ते, तुम्हां लोकाचे आंगेजणीनें सिद्धीस पावले.' –मराआ ७. [फा. अंगेझ्–अंगेख्तन्=उठावणी करणें; सं. अंग]

**अंगेजणें**—उक्रि. (काव्य) अंगीकारणें पहा. [अंग. रागेजणेंप्रमाणें घटना]

**अंगेष्टी**—स्त्री. शरीरयष्टि; अंगकाठी. 'लिंग का प्रतिमा दिठीं। देखतखेंवो अंगेष्टी।' –ज्ञा १७.२०४. [सं. अंग+यष्टि]

**अंगोगडी-ड्या**—आंगोगडी-डया पहा.

**अंगोछा-च्छा**—पु. अंग पुसण्याचा पंचा; अंगवस्त्र; उपवस्त्र. अंगछा पहा.

**अंगोठा**—पु. १ अंगठा पहा. २ (ना.) अंगठ्याचा छाप, शिक्का. [अंगठा]

**अंगोठा**—पु. (ना.) अंगकाठी; शरीरयष्टि; अंगलोट–बटा पहा.

**अंगोवांगीं**—क्रिवि. १ स्वतःस, जातीनें. 'येयोनि निघावें वेगीं। एकलाचि आंगोवांगीं।' –एभा ७.२९. २ (ल.) सहज, अनायासें. 'ऐसे योगबळें योगी। माया जिणती अंगोवांगी।' –एभा ६. ३८५. [अंग+वा+अंग, किंवा अंग द्वि. सांगोवांगीं प्रमाणें]

**अंगोशा-शी**—पुस्त्री. (व.) पंचा; धोतर; अंगवस्त्र; अंगोछा; अंगछा पहा.

**अंगोस्तर, अंगोस्ती, अंगोस्त्र अंगोस्त्री,**—नस्त्री. अंगवस्त्र; उपरणें. 'गांडीस धोतर। येक अंगोस्तर' –रामदासी ९६. 'मग स्नान करूनि अंगोस्त्र बरवें।' –दावि १६४; 'सुचवोनि अंगोस्त्री बांधविलें।' –दावि २५३. [सं. अंग+वस्त्र]

**अंगोस्ती**—स्त्री. अंगावरील शाहारे; काटा. अंगुस्ती पहा. (क्रि० येणें, वाटणें).

**अंगोळिका, अंगोळी-गोळी**—स्त्री. बोट (हाताचें। पायाचें), करंगळी; अंगुलि पहा. (अव.) अंगोळिया, अंगोळिका. 'अंगोळीस जडीत घालुनि मुदी। कानास कांडाळिते।' –विरस ३१. 'सुरेख सरळ अंगोळिका। नखें जैशी चंद्ररेखा।' –ऋग्वे ५५. 'सुनीळ नभाचिया कळिका। तैशा आंगोळिया देखा' वरी नखें त्या चंद्ररेखा।' –एहस्व १ २४.

**अंगौन-आंगौन**—वि. अंगासंबंधीं, अंगावरला. –न. धोतर. 'आंगौनि ऐकुणा झोळु। फेडितांचि तो बाहिरलु।' –अमृ २.४८. [अंग]

**अंग्या**—पु. अंगी, अंगरखा पहा.

**अंग्रेज-जी**—अंगरेज-जी पहा.

**अंघूळ-घोळ-घोळी**—स्त्री. आंघोळ; स्नान. (क्रि० घालणें, करणें). 'आंघोळी देवें पूजा सारिली।' –शिशु ५७६. 'त्या मिळोन एके वेळीं। जाती उदकीं आंघोळी।' –कथा १.५.६. [सं. अंग+का. होळणें=धुणें; प्रा. अंगोहलि=खांद्यावरून स्नान]

**अंघ्र-घ्री**—पु. पाय. 'अर्पिलीं अंघ्रियुगुलीं। विश्वरूपाच्या॥' –ज्ञा ११.७०८. 'विलोकीं अग्रजाचें अंघ्र।' –मुवन १.१०५. [सं.]

**अंचल-ळ**—पु.स्त्री. अचळ पहा. १ वस्त्राचा शेवट, टोंक; पदर. 'मुखकमल तियेचें अंचलें माय झांकी।' –सारुह २.९१. २ पडदा. 'ते अहंकाराचा अंचलु लोटी।' –माज्ञा २.१३२. ३ दशी; मागावरील कापड विणून झाल्यानंतर शेवटास उरलेले उभे दोर. अंचळी पहा. पुल्लिंगी. अव. शब्द वापरतात. ४ योगी जें एक प्रकारचें वस्त्र वापरतात तें. ५ जनावराचें थान; स्तन; अंचूळ [सं. अंचल] ०फेडणें–(व.) लुगड्याच्या पदरानें दृष्ट काढणें. 'अंचल फेडल्यानें डोळ्याला बरें वाटेल.'

**अंचवण**—न. १ जेवणानंतरचें तोंड हात धुणें. ( क्रि० करणें ). २ ( गो. ) आचमन. ३ ( ल. ) त्याग. [ सं. आचमन ]

**अंचवणें**—अक्रि १ जेवणानंतरचें तोंड हात धुणें. 'जेवावयास पंचामृत अंचवावयास खारें पाणी.' २ अंतरणें; मुकणें; सोडणें. अंचवणें हें भोजनोत्तर करावयाचें असतें त्यापुढें भोजन करणें शक्य नसतें यावरून प्राणास, धनास अंचवणें=जिवास, धनास मुकणें. 'संसारसुखास अहल्या आंचवली पोरवयांत।' –विक १६. ३ ( गो. ) आचमन करणें. –उक्रि. दुसऱ्याचें तोंड हात धुणें. [ सं. आचमन; हिं. अंचवना, अचाना; बं. ऑचान ]

**अंचळी**—स्त्री. दशी; वस्त्राच्या शेवटास असणारीं दोऱ्यांचीं टोकें. अंचल–ळ ३ पहा. **आंचळया काढणें**–पदर लावणें. [ सं. अंचल ]

**अंचित**—वि. १ पूजलेला, मान दिलेला; आदरलेला; [सं.] ०**करण**–न. ( नृत्य ) बोटें व्यावृत्त परिवृत्त करून मग डावा हात छातीसमोर वांकडा करून नाकाच्या शेंड्यासमोर ठेवणें. ०**पाद**–न. टांच जमिनीला टेंकवून पाऊल सर्व उचलून बोटें वांकविणें. ०**बाहु**–पु. ( नृत्य) छातीवरील हात थोडा छातीच्या पुढें धरणें. ०**मान**–स्त्री. ( नृत्य ) शरीराचा तोल पुढें जाऊं लागला असतां तो सांभाळण्यासाठीं मान मागें घेणें. ०**शीर्ष**–न. (नृत्य) डोकें किंचित एका बाजूला खांद्यावर वांकविणें ( रोग, मूर्च्छा इ० गोष्टी दर्शविण्याचा अभिनय ). [ सं. ]

**अंची**—स्त्री. १ डाक, टपाल; पेणें ( टपालाचा घोडा बदलण्याची जागा व मुक्काम ). 'सरकारांतून पत्रें आंचीवर जीं जीं आलीं तीं तीं नवाब बहादूर यांस श्रवण करून पत्राचे भाव समजाऊन, उत्तरें निरोत्तरें आलीं. त्या अन्वयें आंचीवर लिहित गेलों.' –राज १०.१९७. –ख३६४०. २ हरकारा. [ सं. अंचि (अञ्चगतौ). ते. अंचे, अंचिय=टपाल; घोडा बदलण्याची जागा; जासूद. का. अंचे=टपालरस्ता. ] ०**वाला**–पु. टपाल खात्याचा अधिकारी. ( का. ) अंचेदार.

**अंचेलिया**—पु गुरांचा एक रोग. –शे ६.९६ नामजोशी.

**अंज, अंजन**—पु. ( शाप. ) एक धातु. ( इं. ) अँटिमनी; याचा उपयोग छापावयाचे खिळे तयार करावयाच्या धातूमध्यें मिसळण्यासाठीं करतात. तसेंच सुरम्याकडेहि करतात. म्हणून याला सुरम्याची धातु असेंहि नांव आहे. –ज्ञाको अं ४३. याच्यापासुन अंजत्रिगंधकिद, अंजत्रिहरिद, अंजद्राक्षित इ० संयुक्त द्रव्यें होतात. –ज्ञाको अं ४६. [ सं. अंज् ]

**अंजन**—न. १ डोळ्यांत घालावयाचें काजळ, सुरमा. 'न लेति जे लोचन अंजनाला।' –सारुह २.९६. 'माझी वेणी आपुल्या हातें। गुंफिली रात्रीं कृष्णनाथें। अंजन सोगयाचें स्वहस्तें। कंसांतकें रेखिलें॥' –ह २७.२२. २ एक औषधी द्रव्य. यानें नेत्रविकार, शैल्य इ० रोग बरे होतात. ३ विशिष्ट प्रकारचें काजळ; हें डोळ्यांत घातलें असतां भूमिगत द्रव्य दिसतें. यानें इच्छित वस्तु दिसणें इ० अतींद्रियज्ञान होतें. 'जैसें डोळयां अंजन भेटे।' –ज्ञा १.२३. 'जैसें नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान।' –दा ५.१.३८. ४ (ल.) गुरुकृपा, प्रसाद; ज्ञानदृष्टि प्राप्त होण्याचें साधन; ईश्वरीप्रसाद. 'गुरुअंजनेवीण तें ( ब्रह्म ) आकळेना।' –राम १४१. ५ ( ल. ) शुद्धीवर आणणारी गोष्ट; शहाणपणाचें औषध. 'डोळयांना चुरचुरूं न देतां पुरुषांच्या डोळयांत झणझणीत अंजन घालण्याची युक्ति बायकांनाच साधते.' –मानाप ६९. ०**शलाका**–स्त्री. एक औषधी सळई. त्रिफळाचा रस ( काढा ), माक्याचा रस, सुंठीचा काढा, तूप, गोमूत्र, मध व शेळीचें दूध यांपैकीं प्रत्येकांत शिसें तापवून पातळ करून सतत सात वेळ बुडवावें. नंतर त्याची सळई करावी ती नेत्ररोगांचा नाश करते. –योर ५५१. ०**हारी**–पु. ( नकळत दुसऱ्याच्या डोळयांतील अंजन काढून घेणारा ) अट्टल चोर, सोदा, भामटा.

**अंजन-नी**—स्त्री. एक इमारती लांकूड. हें दहा बारा हात उंचीचें असुन त्यास उन्हाळ्याच्या अंगास लागून जांभळीं फुलें व फळें येतात; पानांपासुन पिवळा रंग होतो. –शे ११.७०. –वगु १.८. [ सं. ]

**अंजनी**—वि. एकरंगी आंगावर काळे, निळे, तांबडे किंवा पिवळे ठिपके असणारा ( घोडा. ) उदा० काळांजनी, रक्तांजनी. –अश्वप ९४. [ सं. अंजन ]

**अंज-जु-मान**—स्त्री. १ सभा, संस्था, समिति. २ पारशांमध्यें धर्माचारांसंबंधीं वादांचा निर्णय सांगणारी संस्था. [ फा. अंजुमन् ]

**अंजलि**—स्त्री. १ ओंजळ; अंजळी; दोन्ही तळहात एकत्र जोडून केलेली पोकळी ( नमस्कारासाठीं, किंवा कांहीं पदार्थ घेण्यासाठीं ). २ नमस्काराची एक पद्धत; अभिवादन. ३ ओंजळभर कांहीं पदार्थ ( फुलें, धान्य, इ० ). ४ एक माप ( ओंजळींत राहाणाऱ्या धान्याचें ); कुडव. [ सं. ] ०**जोडणें–बांधणें**–दोन्ही तळहात एकमेकांस जोडणें ( नमस्कार–प्रार्थनेसाठीं ); हात जोडणें; प्रार्थना करणें. 'अंजलि बांधोनि म्हणे जरि अभय असेल तरि निवेदीन।' –मोवन ११.११३. ०**पुट**–अंजली १ पहा. ०**संयुक्तहस्त**–पु. ( नृत्य ) हातांचीं बोटें सरळ पसरून एकमेकांस लावणें व आंगठा थोडा आंखडणें नंतर दोन्ही हातांच्या करंगळीकडील बाजू एकमेकांस जुळविणें.

**अंजान**—वि. ( हिं. ) अज्ञानी; गैरमाहीत; नेणता; अडाणी. [ सं. अज्ञान ]

**अंजाम**—पु. परिणाम; शेवट. 'मर्जी हजरतीची खुष राहिली म्हणजे कृतकृत्य! अंज्याम कसा आहे. इकडे कोणी

पहात नाहीं.' -रा ५.१०४. [फा. आंजाम्=शेवट. बं. अंजाम=बंदोबस्त]

**अंजारणें-गोंजारणें**—उक्रि. १ कुरवाळून सांत्वन करणें; समजूत पाडणें; लाडीगोडीनें बोलणें. २ माया लावणें; ममता करणें. [गोंजारणें द्वि.] **अंजारून गोंजारून**-१ पोटाशीं धरून; कुरवाळून. २ आर्जवून; समजूत घालून.

**अंजिर, अंजीर**—पु उंबरासारखें एक झाड व त्याचें फळ. हें उष्ण प्रदेशांत होतें. उंची दहा हातांपेक्षां अधिक नसते. पानें मोठीं. फळाच्या पांढरीं व जांभळीं अशा दोन जाती आहेत. फळ रसकाळीं व पाककाळीं मधुर जड व थंड असून कफ, आम वात करणारें अग्निमांद्यकारक व रक्तदोष, दाह, वायु व पित्त यांचा नाशकारक आहे. पिकल्या अंजिराचा मुरंबा होतो. सुके अंजीर अरबस्थानांतून येतात. अंजिराच्या लाखेचा अळिता उत्तम होतो. -योर १.५२. वगु १.१४. [सं. फा. अजीर.] ०**दोडी**-स्त्री. भाजीचा कच्चा अंजीर.

**अंजिरी-जीरी**—वि. अंजिराच्या रंगाचें (कापड, वस्त्र, इ०). -स्त्री. अंजिरी रंगाचें वस्त्र, पैठणी. दोन घरें हिरवें दोन घरें काळें उभार, व आडवण सर्व तांबडें असें लुगडें. 'मग दोन्ही नागकुमरीं। मदालसा देखिली सामोरी। तंव येरीनें सरसाविली अंजिरी। लाजलेपणें।' -कथा ५.६.१३८.

**अंजीर**—स्त्री. गुरांच्या घशांत औषध वगैरे ओततांना हातास इजा वगैरे होऊं नये म्हणून त्यांच्या तोंडांत जी लांकडी नळी देतात ती.

**अंजुली-पुट**—अंजली-पुट पहा.

**अंजुळ-ळी**—अंजुली; ओंजळ पहा. 'ऐक्यभावाची अंजुळी।' -ज्ञा १५.२.

**अंजूत**—पु. (व.) गजकर्णासारखा एक त्वचारोग; चट्टा. 'हें अंजुतावर गुणकारी मलम आहे.' [?]

**अंटसंट**—वि. (मालवी) ताळतंत्ररहित; बेअंदाज.

**अंटा-ठा-रणें**—अटारणें; अवटरणें पहा.

**अँटिमनी**—स्त्री. एक धातु; अंज पहा. 'अन्टीमनी ही धातु हुबेहुब शिशासारखी दिसते.' -अग्नि ३. [इं] ०**टार्ट**-(होमिओ.) गोंवर, डांग्या खोकला, दमा वगैरेवर औषध. [इं].

**अंटया, अंठा**—पुस्त्री. (व.) कारभार; हालचाल. 'त्यानें त्याचा अंटया बंद केला.' 'तुम्हीं तर आमची अंठाच बंद केली.'

**अंठी**—अठी पहा.

**अंठी**—(खा.) अक्कल. -भात्रै ७.१.४

**अं(आं)ठी**—स्त्री. ऐक्य; मिठी; आलिंगन. अठी अर्थ ४ पहा. 'मग सुखेंसि घे आंठी। गाढेपणें।' -ज्ञा ५.१३२. [का. अंटु=मिठी मारणें, एकत्र येणें]

**अंड**—न. १ अंडकुली; वृषण. २ कस्तुरीमृगाची कस्तुरी असलेली नाभी; नाफा. ३ कंवठ; अंडें पहा. ४ (व.) रुईचें, सरकी काढलेल्या कापसाचें आंख. [सं.] ०**काढणें-बडविणें**-खच्ची करणें (पशूस). **अंडाखालीं खाजवणें**-हां जी हां जी करणें; खुशामत करणें; लोणी लावणें. ०**गाळणें**-१ खचणें; लटपटणें; गळाठणें. २ भीतीनें मागें घेणें, राहाणें. ०**ब्रह्मांडास-कपाळीं-जाणें**-तिरपीट उडणें; पांचावर धारण बसणें; धीर खचणें. ०**म्हणजे उंबरफळ म्हणणें**-अतिशय मद्द किंवा मूर्ख असणें; अडाणी, दगड असणें. **अंडाचें निवणें करून बसणें-अंडावर अंड घालून बसणें- अंडावर बुक्क्या मारणें**-(व.) आळशीपणानें काम न करतां बसून राहाणें; स्वस्थ बसणें. अगदीं आळशी माणसाबद्दल वापरतात. **अंडावरमूत गळणें-पडणें**-(व.) १ अतिशय अशक्त व असहाय्य होणें; निर्बल, कमकुवत असणें. २ (ल.) मेंग्या, भागुबाई, षंढ होणें, असणें. **-स येणें**-वार्धक्यामुळें कमजोर व मलूल, कमताकद होणें; लुळाखुळा होणें. **-स लोणी लावणें**-हां जी हां जी करणें; मिनतवारी करणें; कांहीं कार्य साधून घेण्यासाठीं फार आर्जव करणें; खुशामत करणें. (**दुसऱ्याच्या**) **अंडानें विंचू मारणें**-दुसऱ्याच्या नफानुकसानीची पर्वा न करतां त्याजकडून परभारें आपलें काम करून घेणें; पाहुण्याच्या हातानें साप मारविणें. ०**उबारा**-पु. (ल.) माया; गर्भ श्रीमंती. -वि. (नवीन घातलेल्या अंड्याच्या उबेप्रमाणें) उबट; किंचित गरम; कोंबट. ०**कटाह**-पु. १ विश्व, ब्रह्मांड; खगोलाचा दृश्य गोलार्ध. २ ब्रह्मांडाभोंवतीं असलेलें अष्टधा प्रकृतीचें आवरण किंवा कवच. 'दुज्या पदें अंडकटाह फोडी।' -(वामन) नवनीत १११. [अंड+कटाह=कढई] ०**कुली-कुलें-कूल**-स्त्रीन. वृषण, अंड; (लहान मुलाचें). २ दोन्हीं वृषणें; सबंध आंड. ०**कोश-ष**-पु. अंडावरचें आवरण आंतील वृषणासह; वृषण; अंडाशय. २ ब्रह्मांडकोशाचा संक्षेप. 'भागीरथी अंडकोश फोडून आली.' ०**गडी**-१ (सोंगट्या इ० खेळ) हाताखालचा खेळगडी, पिंटू. २ पोटांतला गडी, एकादा गडी कमी असतां त्याच्याबद्दल आपणच खेळणें; मुका गडी. ३ मदतनीस; सोबती; अडगडी. ४ हस्तक; बगल्या; सर्व अर्थीं अंगगडी पहा. ०**गोल-गोलक**-पु. वृषण; अंड. [सं.] ०**ज**-वि. अंडापासून जन्मलेलें. २ अंड्यापासून उत्पन्न होणारा प्राणिवर्ग (पक्षी, सर्प; इ०). -न. पक्ष्याचें पिल्लूं. 'तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज।' -नामना ६२. [सं. अंड+ज] ०**त्रास**-पु. (शब्दशः-अंडकुल्या वर उचलाया-जोगी अवस्था) अतिशय भीति; तिरपीट; त्रेधा; पांचावर धारण. 'करी अंडत्रासें वरिकर दुजा, जो भय हरी।' -मृत्तिकाभक्षण (वामन) ८. ०**दोरी**-स्त्री. खोगीर आवळतांना जनाव

राच्या अंडावरून आवळला जाणारा व पाठीमागें बांडगें यास बांधण्यांत येणारा पट्टा, मुठीची दोरी. **०धरणी**–स्त्री हां जी हां जी; मिन्नतवारी; खुशामत; शेंपूट घोळणी; अंडमळणी पहा. **०पंचा**--पु. अतिशय अरुंद पंचा. **०बंध**-पु मंदिराच्या शिखरावरील अंडाकार गोळा; घुमटी. **०बुर्ली**--स्त्री. लहान मुलाच्या करदोडयाच्या किंवा घागऱ्यांच्या मधोमध घालण्यासाठीं ( बुलीसारखा ) केलेला सोन्याचा किंवा चांदीचा एक दागिना **०मळणी, ०मळणी-चोटमळणी**-स्त्री. ( कुण. ) हां जी हां जी; हलक्रीं कामें करून किंवा फाजील स्तुति करून मर्जी संपादणें; खुशामत. [ अंड+मळणें ] **०विकार--विकृति**-पुस्त्री. अंडाला होणारा रोग. **०वृद्धि**-स्त्री. अंतर्गळ; अंड वाढणें (वाताच्या उपद्रवानें). **०स्थिति**--स्त्री. प्राणी अंडयांत असण्याची अवस्था. –प्राणिमो १००.

**अंडाकार-कृति**—वि. अंडाच्या आकाराचा; अंडासारखा लांबट गोलाकार. [ सं. ]

**अंडावर्त**—वि. वृषण ज्या जागीं पोटास लागतें त्याजागीं किंवा वृषणावर भोंवरा असणारा ( घोडा ). –अश्वप ९४.

**अंडाशय**—पु. ज्या ठिकाणीं मादीच्या पोटांत अंडीं उत्पन्न होतात तें स्थान. गर्भाशय ( इं. ) ओव्हरी.

**अंडाळबंडाळ**—स्त्री. (व.) अव्यवस्था; गैरसोय. [ बंडाळी द्वि. ]

**अंडी**—स्त्री. एरंडाचें बीं, एरंडी. ( अव. ) अंडया.

**अंडींपिल्लीं**—नअव. १ अंडीं आणि पिल्लीं. २ ( पक्षी आपलीं अंडींपिल्लीं खोल दडवून ठेवतात यावरून ) अतिशय गुप्त व सूक्ष्म गोष्टी; एकूण एक खुब्या; साद्यंत हकिकत. 'तूं कशास त्याची इतकी प्रतिष्ठा सांगतोस, मला त्याचीं अवघीं अंडींपिल्लीं ठाऊक आहेत.' ३ काळें बेरें; दुष्कृत्य. ( क्रि० बाहेर काढणें. 'तो त्यांचीं अंडींपिल्लीं बाहेर काढील.' –टि ४.१३०.

**अंडील-डेल**—वि. १ अंड शाबूत असलेला; न वडवलेला (बैल इ०). सांड. 'त्यांचा थोरला बैल अजून अंडील आहे.' (ल.) रगदार; तगडा. २ वद्ध (घोडा, बैल इ०). खच्ची न केलेला. 'अंडील घोडा.' ३ (ल.) बगल्या; अत्यंत प्रीतींतील माणूस. ४ तारुण्यानें मुसमुसलेला जवान. ५ बाहेरख्याली; कामासक्त. ६ अट्टल; पक्का. 'अंडिल गडी.' [ सं. अंडीर=वीर्यवान्, पौरुषयुक्त ]

**अंडुकली-ले**—अंडकुली पहा.

**अंडें**—न. कंवठ; पक्षी किंवा इतर कित्येक प्रकारच्या प्राण्याच्या स्त्री जातीपासून उत्पन्न होणारा प्रजोत्पादक गोलक. यांत असलेल्या गर्भाची वाढ होऊन पिल्लें तयार होतात. इतर अर्थी अंड पहा. [ सं. अंड ] **०गाळणें**–१ पक्ष्यानें अंडें घालणें; विणें. २ (खोखोमधील एक संज्ञा); कोणत्याहि चुकीबद्दल ( उ० खो देण्याच्या जागीं आर्धी गडी उठल्यास ) म्हणतात. शिवाय. **०घालणें, पडणें, करणें, होणें**–असे वाक्प्रचार आहेत. ३ (ल.) भीतीमुळें माघार घेणें; लेंडया गाळणें; भेदरणें. **०अंड्यावर येणें**–१ अंडें टाकण्याच्या स्थितीस येणें. २ ( ल. ) जिकीरीस येणें.

**अंडेर**—स्त्री. अंडरी; ( खा. ) मुलगी.

**अंडोर**—पु. ( खा. ) मुलगा. 'तेथचि आंडोरां करवि सात खडे वोलांडवणें।' –ऋ १०८. [सं. अंडज=अंडाउय=अंडाउर=अंडोर ]

**अंड्या**—वि. १ अंड सुजलेला; अंड मोठें असलेला. २ ( ल. ) अंतर्गळ झालेला. ३ कोनफळाची एक जात. [ सं. अंड ]

**अंत**—पु १ शेवट; निकाल; परिणाम. २ मृत्यु; मरण. 'आतां असे अंत समीप आला।' –सारुह १.१८. ३ ( वैद्यक–निदान ) रोगाची पांचवी अवस्था; प्रकार; निकाल. ( रोगांतून उठणें किंवा मरणें ). ४ ( गणित ) श्रेणीची शेवटची रकम; पद. ५ ( ल. ) शेवट; ठाव, खोली; तळ. 'ह्या विहिरीच्या पाण्याचा अंत लागत नाहीं.' ६ अवसान; अंतिम स्वरूप; कठिण परीक्षा; कसोटी 'कोणाचा अंत पाहिल्यावांचून देव कोणावर कृपा करीत नाहीं.' 'इतका वेळ माझा कां अंत बघायचें झालें?' –बाय २.४. ७ कर्तृत्वाची पराकाष्ठा; सीमा; दम; तथ्य. 'ह्या धोतरांत आतां कांहीं अंत राहिला नाहीं.' 'त्या घोडयाचा अंत पाहून दाहा कोस न्या.' ८ समाप्ति; पूर्णपणा. 'माझा ग्रंथ अद्यापि अंतास गेला नाहीं.' ९ कड; तीर; टोंक उ० वनान्त; वस्त्रान्त. **०पाहाणें**–कसाला लावणें, छळणें, गांजणें; निघेल तितकें काम काढणें. 'धाव रे रामराया किती अंत पहासी।' –रामदास. **०पुरणें**–कालसमीप येणें. मरण ओढविणें. 'माझा तों पुरलासे अंत।' –ह ३१.२२०. **०लागणें**–सर्व समजणें; अखेर सांपडणें; शेवट दिसणें; ठाव लागणें. **अंताला लागणें**–शअ. व्यवस्थित पार पडणें. शेवटास जाणें. 'हें कार्य एकदांचें अंताला लागलें.'

**अंत, अंत:**— शअ. आंत; मध्यें; अंतर्गत; आंतर. 'उबरजे-अंत स्थापिला मारुती.' –रामदासी २.१०. समासांत किंवा स्वतंत्रपणें उपयोग होतो. [ अंत:, अंतर् ]

**अंतक**—पु. १ काळ; यम. 'जेणें नादे अंतकु। गजबजला ठाके।' –ज्ञा १.१५०. [ सं. ] २ ( ल. ) प्राण घेणारा; फांशी देणारा ( मांग ); संहारक पदार्थ; भयंकर शत्रु; जन्मजात वैरी. –वि. संहार करणारा; प्राणनाशक ( रोग, जखम, वैरी ).

**अंत:करण**—न. १ अंतर्याम; हृदय; विकार–विचाराचें स्थान; मन; आत्मा; जीव; अंत:करण चतुष्टयांपैकीं प्रत्येक. निर्विकल्प जें स्फुरण। उगेंच असतां आठवण। तें जाणावें अंत:करण। जाणती कळा।' –दा १७.८.४. २ ( ल. ) दया; माया. 'त्याला अंत:करण नाहीं.' [ सं. ] **०चतुष्टय**–न मन, बुद्धि, चित्त व अहंकार मिळून होणारें आंतर मन. चार प्रकारांनीं चेष्टणारा आत्मा. **०पंचक**–न. अंत:करण, मन, चित्त, बुद्धि आणि

अहंकार यांचा समूह. ०शुद्धि-स्त्री. मनाची शुद्धि; पवित्रता; निष्कपटता; मनांतून कामक्रोधादि विकार काढून टाकणें. [ सं. ] ०जळणें-१ अतिशय तळमळ लागणें; आस्था असणें. 'अंत:करणेंच जेथें जळत आहेत तेथें असंतोषाग्नीच्या ज्वाला बाहेर पडणारच.' -टिसु १३. २ मत्सर वाटणें; द्वेषबुद्धि जागृत होणें. 'बाजीराव स्वयंसिद्ध होऊं पाहतात, हें पाहून बाळोबाचें अंत:करण जळूं लागलें.' -अस्तंभा १८. -णांत घर करून बसणें-अत्यंत विश्वासू होणें; विश्वासास पात्र होणें, बनणें. 'हा नानांचा कांटा त्याच्या अंत:करणांत घर करून बसला आहे.' -अस्तंभा ५५. -णांत-णास चटका लागणें, बसणें-ध्यास लागणें, तळमळ होणें. 'तुमच्या अंत:करणांत देशाबद्दल चटका लागून राहिला असल तर स्वदेशी कापड वापरा.' -टि १.५११.

**अंतकाल-ळ**—पु. मरणकाल; शेवटची घटका. म्ह० 'अंतकाळापेक्षां मध्यान्ह काळ कठीण.' 'जिवाशीं जडविलेल्या जिवासाठीं अंतकाळाला लाभकाळ समजावें लागतें.' -र जंग ५. २ (ल.) कार्यमात्राच्या उपसंहाराची वेळ; समाप्तीची वेळ. अखेरीची वेळ. [ सं. ]

**अंतडी-डें**—स्त्रीन. आंतडी-डें पहा. आंत्र प्राण्याच्या पोटांतील दोरीसारखा एक अवयव. [सं. अंत्र] ०उगडणें-फाडणें-गळ्यांत घालणें-बाहेर काढणें-उपसणें-१ अतिशय रागावणें; खरडपट्टी काढणें. २ स्फोट करणें; उघडकीस आणणें. ०कातडें एक असणें-होणें-मिळणें-जमणें-रक्त- मांस एक असणें; एकोदर असणें. अंतडीं गळ्यास येणें-अतिशय श्रम होणें; अतिशय त्रास-त्रस्त होणें. ०तुटणें-कळवळा येणें; दया येणें; हृदयास पीळ पडणें. ०निपसणें-१ आंतडी बाहेर काढणें. २ (ल.) धिंडें, अंडीं पिल्लीं बाहेर काढणें. ३ हात धुवून पाठीस लागणें; पिच्छा पुरविणें. ०पिळणें, आंतड्याला पीळ पडणें-बसणें-१ कळकळ वाटणें; तळमळणें. २ अतिशय श्रमामुळें आंतड्याला दुखापत होणें. ०रंगविणें-चोपडणें-रंगणें-चांगलें खाऊं पिऊं घालून शरीर पुष्ट करणें; तजेला आणणें; धष्टपुष्ट होणें. ०ड्या वाळविणें-वाळवीत बसणें-दातांस दांत लावून बसणें; भुकेनें व्याकूळ होणें.

**अंतडें कातडें**—न. आतडें आणि कातडें (लहान मुलांसंबंधानें आईनें कळवळयानें व प्रेमानें म्हणावयाची संज्ञा). 'हें माझें अंतडें कातडें आहे.' अंतड्याकातड्याची माया-स्त्री. आईची कळकळ, माया.

**अंत:पट-पाट**—पु. अंतर्पाट; लग्नांत नवरा व नवरी यांच्या मध्यें किंवा मुंजींत गुरु (बाप) व मुंज होणारा मुलगा ह्यांच्या मध्यें जें वस्त्र, पद्धतीप्रमाणें ठराविक मुहूर्तघटकेपर्यंत धरतात तें. 'काळ सावधान म्हणत। सूर्य लग्नघटिका पाहत। वियोग अंत:पट सोडित। भावार्थें म्हणत ओंपुण्या।' -एरुस्व ७.६५. [सं. अंतर्+पट]

**अंत:पाती**—वि. आंत असलेलें; अंतर्गत; आश्रित; मधलें; आंत गुंडाळलेलें, सांपडलेलें; समाविष्ट; आंत येणारें; पोटांत गणना होणारें. 'ज्ञानाज्ञानाचे विकार। अविद्यांत:पाती साचार।' -एभा २८.५०९ सामाशब्द-जगदंत:पाती; जलांत:पाती. 'मी शास्त्री बावांचाच शिष्यवर्गांत:पाती आहें.' [ सं. अंतर्+पत् ]

**अंतपार**—पु. अखेर व पलिकडील जागा; शेवट; सीमा; इयत्ता (नेहमीं नकारार्थी प्रयोग). 'गोकुळींच्या सुखा। अंतपार नाहीं लेखा।' -तुगा १९४. २ (गो.) ठावठिकाणचा पत्ता. [ अंत+पार ]

**अंत:पुर**—न. १ राणीवसा; जनानखाना. 'सोळां सहस्र अंत:पुर। केलिया नाना उपचार।' -शिशु ७५३. 'गरिबांना अंत:पुर नाहीं, सुखसोहाळे नाहींत.' -मानाप १२. २ (ल.) स्त्री. बायको. 'जया सोळा सहस्र अंत:पुरां।' -उषा ७२५. भणौनि सोळां सहस्रें अंत:पुरें प्रगिली।' -शिशु ७०२. ३ आंतलें घर, बायका बसण्याची जागा. [ सं. अंतर्+पुर ]

**अंत:प्रकृति**—वि. आंतल्या गांठीचा; कुढा; भिडस्त; संकोची; अबोल्या; खोल. [ सं. ]

**अंतमाळ**—स्त्री आंतडीं. [ सं. अंत्र+माला ]

**अंतर्**—आंतील; मधील; मध्यंतरींचा. यापासून बनलेले सामासिक शब्द कांहीं स्वतंत्र व कांहीं अंतर शब्दांमध्यें दिले आहेत. [ सं. अंतर्; झें. अंतरे; लॅ. इंटर; गॉ. उंदर् ]

**अंतर**—न. १ विवक्षित गोष्टींमधील स्थलावकाश, कालावकाश; अवधि (सामा.) काळ; वेळ. 'मग तोही निगे अंतरें। गगना मिळे।' -ज्ञा ६.३००. 'पुणें व मुंबई यांमध्यें १२० मैलाचें अंतर आहे.' २ खंड. ३ फरक; भेद; असमानता. 'तेवीं आम्हां तयां परस्परें। बाहेरी नामाचींचि अंतरें। वांचूनि आतुवट वस्तुविचारें। मी तेचि ते।' -ज्ञा ९.४११. ४ विपरीतपणा; विप्रतिपत्ति; असंमति; विपरीत मत. ५ द्विमत; भेदभाव; भांडण; वांकडेपणा. 'परि न वदावें बंधु-प्रेमीं जेणें पडेल अंतर तें॥' -मोसभा ४.६१. ६ कसूर; तफावत; कमतरता (काम चाकरी, धंदा यांत). 'चाकरीत अंतर पडलें असलें तर ...' ७ चूक, अशुद्ध; तफावत. (क्रि०पडणें). 'ह्या हिशेबांत अंतर नाहीं.' ८ मन; हृदय; मनांतील गोष्ट; अभिप्राय. 'तुमचें अंतर कळलें तर बरें?' 'अंतरींचा ज्ञानदिवा मालवूं नको रे.' 'तुका म्हणे देवा माझें अंतर वमवा।' -तुगा ११६८. ९ (ल.) रहस्य; मर्म. 'भक्तीचें अंतर अतिगूढ। न कळे उघड श्रुतिशास्त्र।' -एभा १४.२४१. १० (समासांत पदाच्या अंतीं) दुसरा; अन्य, जसें.-भाषांतर, म्हणजे दुसरी भाषा; देशांतर, देहांतर; स्थलांतर. 'गुढी उभविली अनंगीं। शास्त्रांतरीं।' -ज्ञा ६.५२. ११ (अंकगणित) विवक्षित न्यूनीकरण, वजा करणें; जसें-विसांत पांचांचें अंतर करून पधरा.

१२ (काव्य) अंतरिक्ष; आकाश; अंतराळ. 'कीं अंतरींहून खालीं पडली। गेली चूर होऊनिया।'-मोल. १३ (काव्य) आंतली बाजू, स्थल, भाग. जसें-'अंतरी शर भिनला.' 'वायुतत्वाचें अंतर।'-ज्ञा १३.११५, 'पात्रांतरीं वाजति क्षीरधारा।' १४ वियोग; ताटातूट. 'मायलेकरांस अंतर पडलें.' [सं. अंतर; गॉ. अंथर्; लिथु. अंत्र; लॅ. अल्टर] **०करणें**-(अंकगणित) वजाकरणें. **०देणें**-सोडणें; त्यागणें; टाकून जाणें. 'तुका म्हणे आतां नको देऊं अंतर। न कळे पुढें काय बोलूं विचार॥' -तुगा १८३७. -ख१२३३. **०पडणें**-न्यूनता, कमतरता येणें (मित्रप्रेमांत, भक्तिभावांत, इ०) अंतर अर्थ ५ पहा. **०होणें**-फरक पडणें. 'बापू, यांत अंतर होणार नाहीं.' -इंप ६६. **म्ह०** अंतरंमहदंहतरं=कोणताहि भेद, फरक असो तो मोठाच भेद होय. **०कळा**-स्त्री. अंतःकरण, मन. 'प्रीतीपात्र अंतर्कळा। घेऊन गेली।'-दा ३.२.८२. **०खूण, -ची खूण**-स्त्री. गुप्त खूण; चिन्ह; बिंग, इंगित. 'म्हणे कांहीं सांगे अंतरखूण। तो ताटिकांतक मखपाळण। जेणें करूनि संतोषे।' **०गळ**-अंतर्गळ पहा. **०गडू**-वि. १ विशेष परिचयाचा (कुटुंबांतल्या गुह्य गोष्टी, धंद्यांतल्या खुब्या, एखाद्या गोष्टीची कच्ची हकीकत इ० इत्थंभूत माहिती असलेला); अंतर्भेद्या. २ लुडबुड्या; लांडा कारभार करणारा; मध्यस्थ. ३ त्रासदायक; निरुपयोगी (अंग, अवयव, भाग). ४ (ल.) खटपटी; निष्णात. [सं. अंतर्गडु=निरुपयोगी] -पु. १ गुप्त हेतु; गुह्य गोष्ट; मनांत ठरविलेला बेत (क्रि०राखणें; ठेवणें-बाळगणें; पोटांत). २ अडथळा; आडकाठी; प्रतिबंध; [सं. अंतर्+गडणें] **-चा निरोप**-पु आंतला (खाजगी, गुप्त) संदेश, आज्ञा. **-रींची मात**-स्त्री. गुह्य गोष्ट; गुप्त गोष्ट. 'सांगें अंतरींची मात। तो येक मूर्ख॥'-दा २.१.९. [अंतर्+मात] **०गृह**-न. १ माजघर; स्वयंपाकघर. २ अंत:पुर; जनानखाना. 'वस्त्रें भूषणें अंगावरूती। तीं सकळ ब्राह्मणांसि वांटी भूपती। मग जावोनि अंतरगृहाप्रती। पुत्रमुख प्रीती पहातसे।'-संवि १७.१६२. **०दृष्टि**-स्त्री. अंतस्थ नजर; मनश्चक्षु; ज्ञानचक्षु. 'बैस सावधान माझे ध्यानीं। अंतरदृष्टीं लक्षुनि।' **०पगडी-पकडी**-स्त्री. (व्यायाम) १ टांगलेला मलखांब. २ छताला दोरीनं लटकलेल्या दीड फूट लांबीच्या मलखांबावरील आढ्या, उड्या. यांत खालीं उडी मारण्यांत शिताफी असते; वज्रमुष्टी पहिलवान या व्यायामाचा विशेष अभ्यास करतो. हा मलखांब सागवानी लांकडाचा करतात. -संव्या ६३. **०पट-पाट**-अंतःपट पहा. 'मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक। राहिला लौकिक अंतरपाट॥' -तुगा ३६५३. **०पट्टी**-स्त्री. (शिवण काम) पुढयाला बळकटी आणणारा कापडाचा भाग. 'कापडाच्या रुंदींत पाठ, पुढा व अंतरपट्टी इतके अवयव बसतात.' -काप्र. **०पर**-वि. (बंगाल) एक वर्ष पडीत असलेली (जमीन). [ईस्ट इंडिया कंपनी रेकॉर्ड्स ३.१७३] **०मळिण**-वि. (काव्य) वाईट अंतःकरणाचा; मनाचा खोटा; दुराचारी; भ्रष्ट, दुष्ट. **०मार्ग**-पु. १ आंतील रस्ता. २ (संगीत) प्रत्येक रागाच्या विशिष्ट नियमानुसार वादी-संवादीच्या धोरणानें वैचित्र्य उत्पन्न करणारा स्वरसमुदाय रागविस्ताराच्या मध्यें मध्यें योजणें; रागाचें वैशिष्ट राखण्यासाठीं व रंजकतेसाठीं केलेली स्वररचना. **०मिठी**-स्त्री. अतिशय प्रेम. 'राम जावईविशेष। अंतरमिठी जनकाची।'-वेसीस्व ७.१०. **०याम**- अंतर्याम पहा. 'नवल वाटतें अंतरयामीं।'-देप २९. **०वन**-न. नागवेलीचे अंकुर; जुन्या नागवेलीचें कडें करून तें जमिनींत पुरलें असतां त्यापासून जे नवीन अंकुर किंवा धुमारे फुटतात ते व गुंडाळी व नवीन फुटलेलीं पानें (नवती). **०वही-ई**-स्त्री. आंतील कुंपण, बांध, वई; अनुक्रमानें लागत गेलेले जे अनेकस्वामिक भूभाग त्यांच्या भेदार्थ मध्यें मध्यें ज्या आडव्या वह्या असतात त्या प्रत्येक **०विटाळ**-पु. साक्षात् स्पर्श न होतां गवत, काठी इ० मध्यस्थ वस्तूनें झालेला विटाळ. [सं. अंतर+द. विट्टाल; म. विटाळ] **०वेधी**-पु अंतरज्ञानी पुरुष; मनकवडा. 'अंतरवेधी अंतर जाणें। बाहेरमुद्रा कांहींच नेणें।' -दा १८.८.१५. **०वेल**-पु.स्त्री. आकाशवेल; अमरवेल; सोनवेल. **०साल**-स्त्री. झाडाच्या वरील सालीच्या आंतली पातळ साल, त्वचा; जनावराच्या वरील कातड्याच्या आंतील पातळ चामडी. **०साळ**-स्त्री. भाताचा एक प्रकार. **०साक्ष-क्षी**-वि. १ अंतर्ज्ञानी (ईश्वर, योगी) २ अंतर्याम जाणणारा. **०सुख**-न. आत्मसुख; आत्मतृप्ति; अंतर्यामीचा आनंद. 'जयाला लाधलें अंतरसुख। मग तो न मानी प्रपंचदुःख।' **०सुती**-वि. १ ज्याची अर्धी विणकर सुती आहे असें कापड, सणंग. २ (ल.) आंतून काम करणारा; गुप्तपणें खटपट करणारा. ३ प्रच्छन्न भावाचा; गूढ अर्थाचा. [अंतर्+सूत्री] **०स्थ**-वि. १ अंतस्थ; आंतील. २ अंगची; मूळची ३ स्वाभाविक; नैसर्गिक. **०हेत-तु**-पु. गुप्त हेतु. 'अंतरहेतचुकत गेला। समुदायाचा।' -दा १९.९.७. **०ज्ञ**-वि. १ अंतर्ज्ञानी; जगांतील सर्व गोष्टी मनानें जाणणारा. २ अंतरसाक्षी. [सं.]

**अंतरंग**-न. १ (काव्य) मन; अंतःकरण. 'भक्ति निकट अंत(आंत)रंगें। तो सत्वगुण।' -दा २.७.३४. २ आंतील भाग; अभ्यंतर; अंतर्भाग; गुह्य. बहिरंगाच्या उलट. 'ऐसा हा अंतरंगु। सच्छब्दाचा विनियोगु।' -ज्ञा १७.३८५. **-गीचा**-वि. अंतरीचा; जवळचा; शरीरसंबंधी; जिवलग; निकटवर्ती असलेला; कुटुंबांतला (चाकर, नोकर, आप्त, मित्र इ०); 'मी जरी सलगीचा चांगु। तरी काय आइसीहूनि अंतरंगु॥' -ज्ञा ११.३२. 'बहु अंतरंग होउनि करिती स्वार्थाजिनीं न अनमान।'-मोआदि ३५.३०. २ आत्मीय; स्वतःचा; स्वकीय; वैयक्तिक; सर्वसामान्य

नव्हे असा. 'सरकारी कामापेक्षां घरचें काम अंतरंग असतें.' ०**परीक्षण**–न. १ समग्र ग्रंथ अवलोकन करून त्यांतील मर्म, रहस्य, मथितार्थ किंवा प्रमेय काढणें. –टिसु ७७. २ ग्रंथाचें प्रस्तावनावजा सिंहावलोकन; ग्रंथसार.

**अंतरणें**—उक्रि. १ गाळणें; सोडणें; वगळणें; टाकणें; दुर्लक्ष करणें. २ पुढें, वर जाणें; मागें टाकणें; कांहीं अंतरावर सोडणें. समय अतिक्रांत करणें. 'आतां धर्मातें पाचारीं। विलंबे दुरीं अंतरती।' –मुसभा १६.११. ३ चुकणें; आंचवणें; मुकणें. 'भावनेच्यामुळें अंतरला देव। शिरला संदेह भय पोटीं।' –तुगा ४८. 'पुत्र विटाळले ते पितृधनासीं अंतरले।' ४ नाहींसें होणें; हातचें जाणें; वियोग पावणें; दूरावणें (मृत्यु, देशांतर इ० कांमुळें). 'आणि परलोक ही अंतरेल। ऐहिकेंसी॥' –ज्ञा २.२७. 'मला चाकरी अंतरली तर अंतरो!' ५ मरणें. 'पूर्वे दिनीं गोत्रज अंतरे। तैं स्वगोत्रीं सूतक भरे।' –एभा २१.१२५. [अंतर]

**अंतरमाळ-ळा**—स्त्री. आंतडें. (भीति, तहान, काळजी यांपासून होणारें दुःख सांगण्यासाठीं योजतात). (क्रि० सोकणें; शोषणें; वाळणें; सुकणें). 'चतुर्थ नरसिंह विशाळ। ...निवटुनि असुरांसि समूळ। काढी अंतरमाळ।' –पाळणे २२. 'तें वर्तमान ऐकून माझ्या अंतरमाळा सोकल्या.' ०**गळ्यांत घालणें**–१ ठार करणें; नाश करणें. २ त्रास देणें. ०**गळ्यांत येणें**–त्रास होणें; नाश होणें.

**अंतरा**—पु. १ मधील अंतर, काळ; अंत्रा पहा. २ एक-दिवसा आड येणारा ताप. ३ (संगीत) अंत्रा; चिजेचा दुसरा भाग–ह्यांत तारसप्तकांतील स्वर असलेच पाहिजेत; (सामा.) गाणें; गाण्यांतील पहिल्याखेरीज कोणतेंहि कडवें. ४ अंतर पहा. [अंतर]

**अंतरा**—पु. तरवारीच्या मुठीवरील बोटांचा आसरा. –शर. [फा.?]

**अंतरा**—पु. (जंबिया) बॉकमधील एक डाव; आपल्या हातांतील जंबियानें जोडीदारास त्याच्या उजव्या बाजूला शेवटच्या बरगडीजवळ छातीवर मारणें. [सं. आंत्र; किंवा अंतर् म. अंतर]

**अंतरागमन**—न. मधून जाणें (मूळ अर्थ यज्ञांत ऋत्विज अनुष्ठानास बसले असतां त्यांचे मधून अथवा कर्मकर्ता, ऋत्विज व देवता यांच्यामधून इतरांनीं जाणें). १ वादीप्रतिवादी, गुरुशिष्य, नवराबायको इ० कांच्या मधून इतरांचें गमन. २ मध्यस्थी; मध्यस्थपणा. [सं. अंतर्+आ+गम्]

**अंतरात्मा**—पु. १ जीवात्मा; मन. २ अंतर्विकार; भावना; हृदय; अंत.करण. [सं.]

**अंतराय-व**—पु. १ अडथळा; विघ्न; अडचण; हरकत. 'जैसा सिद्धांसि सिद्धलाभ होतां। उठी अवचिता अंतराय।' –एरुस्व २.४१. 'विचार कळला सांगता नये। उदंड येती अंतराये।' –दा १५.२.१३. २ वियोग; ताटातूट. 'तुजसी अंतराय होईल।' –ज्ञा १.२३४ 'श्रीकृष्णदेवेंसी अंतरावो।' –निगा ३. ३ उणीव. 'अंतराय कांहीं अनुष्ठानी राहिल्या। गायी या जन्मल्या पुण्यवेगें।' –ब १८. [सं. अंतर्+इ–अय्=जाणें, अंतराय]

**अंतरायामघात**—पु. शरीराच्या पुढील भागाचे स्नायू आखडून शरीर धनुष्याप्रमाणें वांकविणारा धनुर्वाताचा एक प्रकार (बहिरायामवाताच्या उलट). [सं.]

**अंतराल-ळ**—पुन. १ पृथ्वी आणि आकाश यांच्यामधील जागा; अंतरिक्ष; वातावरण; आकाश. 'हें असो स्वर्ग पाताळ। कीं भूमी दिशा अंतराळ।' –ज्ञा ११.२७१. 'बाण जळत अंतराळीं.' –एरुस्व ९.३५. 'पुढें भीम तो अंतराळें उडाला।' –राक १.१३. 'अंतराळांत काय काय चमत्कार आहेत ...' –नि ३९. २ मधली जागा; अवकाश; अभ्यंतर. [सं. अंतराल्] –क्रिवि. आकाशामध्यें; हवेंत; वर. ०**दीप**–पु. आकाशदिवा.

**अंतराळयो**—उद्गा. (क.) (विटीदांडू) खेळांतील एक संज्ञा; विटी हवेंतून फेक या अर्थी शब्द. 'मी अगोदर अंतराळयो म्हटलें आहे.' [अंतराळ]

**अंतरास्पर्श**—पु. (अप.) अंतरस्पर्श. अंतरविटाळ पहा.

**अंतरित**—वि. १ अंतरलेलें; ओलांडिलेलें; गाळलेलें; वगळलेलें; अपुरें टाकलेलें. २ विभागलेलें; वेगळें केलेलें; अंतरावर सोडलेलें. [सं.]

**अंतरि(री)क्ष**—न. आकाश; अंतराळ पहा. 'अंतरिक्षीं तारागणें। धरी कवण॥' –ज्ञा १३.५८. –क्रिवि. अंतराळीं; आकाशांत; पोकळींत. 'मार्ग होये परी अंतरिक्ष।' –दा ४.४.१३. [सं.]

**अंतरीक**—वि. अंतरित पहा.

**अंतरीय-वस्त्र**—न. १ आंतील वस्त्र; आंतला कपडा (याच्या उलट उत्तरीय–पांघरावयाचें–वस्त्र). २ नेसावयाचें धोतर (पूर्वी अंतरीय व उत्तरीय अशीं दोनच वस्त्रें असत). [सं.]

**अंतरोळ**—न. (गो.) १ अंतःकरण. २ आकाश. अंतराळ पहा.

**अंतर्कळा**—स्त्री. १ (काव्य) चाणाक्षपणा; हुषारी; चातुर्य; कल्पकपणा. २ अंतरकळा पहा.

**अंतर्गत**—वि. १ आतील; अंतःस्थित; मधील. २ समाविष्ट; पोटांत आलेलें. ३ मनांतला; गुप्त. –न. मनांतला हेतु; गुप्त मसलत. [सं.]

**अंतर्गर्भ**—पु. १ आंतला भाग; गाभा; गर; मगज; दळ; सार. [सं.] २ (ल.) गर्भितार्थ; आंतील हेतु; गूढार्थ.

**अंतर्गळ**—पु आंतड्याचा कांहीं भाग वातप्रकोपानें अंडाशयांत किंवा कांहींच्या मतें जांघेंत उतरून अंड मोठें होणें; यानें अंडसंधीमध्यें गांठीप्रमाणें सूज उत्पन्न होते. [ सं. आंत्र; म. अंतर+गळणें ]

**अंतर्गृह**—अंतरगृह पहा.

**अंतर्गोल**—वि. ज्याचा आंतील भाग गोल आहे असा, (इं.) कॉन्केव्ह. (बहिर्गोलाच्या विरुद्ध). ०भिंग-न. अंतर्गोलाची जाड कांच. (इं) कॉन्केव्ह लेन्स.

**अंतर्ग्रह**—पृथ्वी व सूर्य यांमधील बुध व शुक्र ग्रह; हे पृथ्वीपेक्षां लहान असून यांची घनता व आसाभोंवतीं फिरण्याचा कल पृथ्वीसारखा असतो. हे सूर्याजवळ असल्यानें तेजस्वी असतात हे सायंकाळीं पश्चिमेस किंवा सकाळीं पूर्वेस कांहीं उंचीवर दिसतात. –सृष्टि १०५.

**अंतर्चक्षु**—वि. अंतर्ज्ञानी; दुसऱ्याचें अंतःकरण जाणणारा, दिव्यदृष्टि असलेला; मंत्रद्रष्टा. –पु. दुसऱ्याचें अंतःकरण जाणण्याची दृष्टि; ज्ञानदृष्टि; अंतर्दृष्टि [सं.]

**अंतर्जठर**—न. (आतलें पोट) पोट; उदर. [सं.]

**अंतर्ज्योति**—स्त्री. (वेदांत) अंतरात्मा; आत्मा. 'कीं अंतर्ज्योतीचें लिंग। निर्वाळिलें।' –ज्ञा ६.२५४. –वि. आत्मज्ञान झालेला. [सं.]

**अंतर्झूल-ली**—स्त्री. हत्तीच्या अंगावरील चित्रविचित्र झूल, पाखरा. [सं. अंतर्+म. झूल]

**अंतर्त्याग**—पु. (काव्य) खरोखरचा, मनापासूनचा, अंतःकरणपूर्वक केलेला त्याग. 'बाह्य कुटुंबा करी सांड। पण जेथें स्थूळ देह न साडे। तेथें अंतर्त्याग केविं घडे।' मोल. [सं.]

**अंतर्दशा**—स्त्री. (फलज्यो.) जन्मकुंडली करतांना उपग्रहाचा पगडा; ग्रहाचा फल देण्याचा काल; जन्मकाळीं जें नक्षत्र असेल त्याच्या आरंभापासून जितकी घटका-पळें गेलीं असतील तितकी दशा जन्मापूर्वी गेलेली असते व शिल्लक राहिलेली जन्मानंतर भोगावयाची असते. याच्या उलट महादशा, म्हणजे मुख्य ग्रहांची बाधा, स्वामित्व. २ स्वतःची अंतस्थ खरी स्थिति; वस्तुस्थिति. 'माझी अंतर्दशा तुम्हास काय माहीत?' [सं.]

**अंतर्दर्शी**—वि. आत्मचिंतनांत मग्न असणारा; आत्मज्ञानी. [सं.]

**अंतर्दाह**—पु १ बाहेरून हातास अंग ऊन लागत नसून शरीरांत होणारी जळजळ; आग. (ताप पित्त इ० मुळें). २ (ल.) आंतील दाह, दुःख, संताप (काम, क्रोध इ० मुळें होणारी). [सं.]

**अंतर्दृष्टि**—स्त्री. १ दृष्टि अंतर्मुख करून चित्त, मन पाहणें; अंतरावलोकन; अंतःचक्षु; आत्मप्रवणता. २ अंतर्ज्ञान; अंतर्ज्ञानानें जाणणें. –वि. १ मनाची वृत्ति आत्म्याकडे वळवून पाहणारा; अंतर्मुखी. २ अंतर्ज्ञानी; दूरदर्शी; सिद्ध पुरुष. [सं.]

**अंतर्द्वार**—न. १ आंतलें दार. २ जनानखान्याचें, राणीवशाचें दार. ३ (ल.) गुप्तपणें मध्यस्थी करणारा, वशिला लावणारा माणूस; मध्यस्थ. [सं]

**अंतर्धान**—न. १ एकदम नाहींसें होणें; दिसेनासें होणें; गुप्तता; अदृश्यावस्था. 'आज्ञा मागोनि समर्थाप्रती। अंतर्धान पावे मारुती।' –संवि ३.५८. (क्रि० पावणें). २ आच्छादन; एखादी वस्तु किंवा शरीर झांकावयाचें साधन, जसें-पडदा; माया; डोळ्यावरील पटल. [सं. अंतर्+धा=ठेवणें]

**अंतर्धायक**—वि. अंतर्धान करणारें; गुप्त, आड ठेवणारें. [सं]

**अंतर्ध्यान**—न. ध्यानरूप समाधि; ध्यानस्थ असणें, भक्ताची परमेश्वराच्या ठिकाणीं लागणारी तंद्री. [सं.]

**अंतर्निष्ठ**—वि. १ ध्यानस्थ; समाधिस्थ. २ निवृत्तिमार्गावर निष्ठा असलेला; अंतर्मुख पहा. [सं.]

**अंतर्निष्ठा**—स्त्री. अंतर्ध्यानानें झालेली मनाची एकाग्रता: समाधि; ध्यान. [सं.]

**अंतर्पाट**—पु. अंतःपट पहा.

**अंतर्बाह्य**—न १ अंतरात्मा आणि बाह्यक्रिया, अथवा चलनवलन; अंतःकरण आणि आचरण. या गृहस्थाचें अंतर्बाह्य शुद्ध आहे.' २ आंतील आणि बाहेरील बाजू. –क्रिवि. आंत आणि बाहेर सर्व बाजूंनीं; चोहोंकडून; हरएक प्रकारें. 'कोणताहि व्यवहार अंतर्बाह्य पाहिल्यावांचून समजत नाहीं.' [सं.]

**अंतर्भाव**—पु. १ समावेश; समाविष्ट स्थिति. 'स्वातंत्र्यांत स्वराज्याचा अंतर्भाव आहे.' –टि ३.२४८. 'राजास आमंत्रण केलें म्हणजे प्रधानादिकांच्या आमंत्रणाचा त्यांत अंतर्भाव होतो.' २ मनः मनोभाव; अंतःस्थ हेतु; अभिप्राय. [सं.]

**अंतर्भूत**—वि. समाविष्ट; अंतर्गत; अंतःस्थित. 'नाम धरियेलें कीर्ती। असे अंतर्भूत पोटीं॥' [सं.]

**अंतर्भेद**—पु. १ आतील किंवा खाजगी गुह्य गोष्टी; गुपित; आंतली बातमी. २ अशा गुह्य गोष्टींची फोड, परिस्फुटता. (शत्रु, बाहेरचे लोक इ० मध्यें). ३ गुप्त गोष्टींची माहिती, ज्ञान. [सं.]

**अंतर्भेदी-द्या**—वि. १ गुप्त गोष्टी माहीत असलेला; अंतस्थितीचें ज्ञान असलेला. २ गुह्य बाहेर फोडणारा; घरभेद्या; गुप्त गोष्टींची परिस्फुटता करणारा. [अंतर्भेद]

**अंतर्माळ**—अंतरमाळ पहा. ०उडप-क्रि. (गो.) पांचावर धारण बसणें; तोंडचें पाणी पळणें; धीर सुटणें. 'तें आयकनाफुडें म्हजी अंतर्माळ उडली.'

**अंतर्मुख**—वि. १ अंतर्निष्ठ; आत्मनिष्ठ; ध्यानस्थ. २ निवृत्ति-मार्गी; विरक्त. ३ आंत वळलेली; विचारी; आत्मचिंतनपर (दृष्टि इ०). [सं.]

**अंतर्याम**—न. १ आत्मा; जीव. २ (ल.) मन; अंतःकरण· चित्त. ३ अंतरंग; आंतील गोष्ट. [सं] (वाप्र.) ०**कळवळणें**-आंतड्याला पीळ पडणें; तळमळ होणें. -**मीं ताप बसणें**-हाडीं ज्वर चिकटणें. -**मीं रडणें**-मनांतल्या मनांत दुःख करणें; झुरणें. -**मीं वास करणें**-हृदयांत खोल जाऊन बसणें; अंतःकरणावर ठसून राहणें. -**मास डाग बसणें-लागणें**-हृदयास धक्का बसणें (दुःखामुळें). -**मीचें दुःख अंतर्यामास ठाऊक**-मनाची पीडा मनासच माहीत (ती इतरांना कळणें अशक्य या अर्थी). -**मीची खूण अंतर्यामास ठाऊक**-मनांतले बेत किंवा खलबतें, अनुभव ज्याचीं त्याला माहीत; अपकार किंवा उपकार केलेले मनाचे मनास माहीत. -**मीची खूण आईला ठाऊक**-१ आपल्या मनांतल्या गोष्टी आईलाच माहीत असतात -मोल. २ मुलाचा जनक कोण हें आईसच माहीत असतें. (अंतर्याम याऐवजीं अंत्राम असेंहि अशुद्ध रूप योजितात).

**अंतर्यामी**—वि. १ जवळचा; जिवश्चकंठश्च; जिवलग. २ अंतर्यामाचा साक्षी (जीवात्मा; ईश्वर).

**अंतर्यामींचा**—वि. १ जिवलग; अतिशय परिचयाचा; अंतर्यामी पहा. २ अकृत्रिम; खराखुरा; कळकळीचा; मनोभावापासूनचा; निष्कपट (अंतर्याम शब्दाच्या सप्तमीपासून साधित झालेला शब्द).

**अंतर्युति**—स्त्री. (ज्यो.) ग्रहांची गौणयुति. [सं.]

**अंतर्लापिका**—स्त्री.श्लोकाचा अर्थ लावण्याचें मर्म गुप्त रूपानें त्याच श्लोकांत ठेवलेलें असतें अशा प्रकारचा श्लोक; गूढ श्लोक; गर्भितार्थश्लोक. 'कं बलवंतं न बाधते शीतं। कंबलवंतं न बाधते शीतम्।' 'औषध न लगे मजला.' -नल ५१. [सं.]

**अंतर्वत्नी**—स्त्री. (काव्य) गरोदर स्त्री. 'अंतर्वत्नी पत्नी झाल्या, ज्याला सपुत्र फळ शकलें।'-मोसभा १.७७. 'संवत्सरें झालीं षोडशी। अंतर्वत्नी झाली ऐका।' -गुच ११.१०. [सं.]

**अंतर्वर्ती**—वि. १ आंत असलेला; मध्यस्थित; समाविष्ट; आकळित. 'परि महेशें सूर्याहातीं। दिधली तेजाची सुती। तया भासा अंतर्वर्ती। जगचि केलें।' -अमृ १०.२. २ गौण (ग्रह.) याच्या उलट बहिर्वर्त्ती. बुध आणि शुक्र ह्यांस अंतर्वर्ती ग्रह म्हणतात, कारण ह्यांच्या कक्षा पृथ्वी आणि सूर्य ह्यांच्यामध्यें आहेत. [सं. अंतर्+वृत्]

**अंतर्वसन**—आंतलें वस्त्र. अंतरीय पहा. 'अंतर्वसन बाह्य वसन। कंचुकीवरून प्रावरण।' -ह ३४.१६३. [सं. अंतर्+वसन]

**अंतर्वास**—पु. (योग). १ आंतील वस्ती. २ आत्म्यांत वास करणें; परमेश्वराशीं तादात्म्य पावणें; आत्मनिष्ठ असणें 'आवडीच्या करा ऐसे। अंतर्वासें जाणतसा।' -तुगा १७६१. [सं. अंतर्+वस्]

**अंतर्वासी**—वि. आत्मनिष्ठ (योगी); आत्म्यांत विलीन झालेला (योग्याचा एक प्रकार).

**अंतर्वृद्धि**—स्त्री. अंतर्गळ पहा.

**अंतर्वेदी**—स्त्री. १ कोणत्याहि दोन नद्यांमधील प्रदेश; दुआब. २ (विशेषतः) गंगा व यमुना यांमधील प्रांत; (प्राचीनकाळीं येथें ब्रह्मदेवानें जो यज्ञ केला त्याची ही वेदी होती म्हणून हा देश पवित्र मानतात). तैत्तिरीय आरण्यकांत (५.१) आर्यावर्त अथवा कुरुक्षेत्रावर यज्ञभूमीचें रूपक केलें आहे त्यांतील वेदीची जागा गंगा आणि यमुना नद्यांच्या भागांत येते. प्राचीन काळीं इटावा ते अलाहाबाद या दुआबच्या दक्षिणेकडील प्रदेशाला अंतर्वेदी म्हणत. कधीं कधीं सबंध दुआबालाच हें नांव दिलेलें आढळतें. 'अब्दाली कोळेहून यमुना उतरून अलीकडे येऊं लागले तरी, अंतर्वेदींत सर्वांनीं उतरून पायबंद द्यावा.' -रा १.२००. [सं.]

**अंतर्वैर**—पुन. गुप्त शत्रुत्व; आंतून द्वेष. [सं.]

**अंतर्वैरी**—पु. १ गुप्तशत्रु. २ एखाद्याच्या मरणाच्या वेळेस ज्याचा ध्यास घेतला असतां जो (मुलगा, मुलगी) कांहीं अडचणीमुळें त्यास भेटत नाहीं परंतु मरणानंतर येऊन पोंचतो तो. 'पोटचा पोर देखील एखादवेळीं अंतर्वैरी होतो.' [सं.]

**अंतर्हित**—वि. १ अदृश्य; अंतर्धान पावलेला. -शिल्पवि ४७७. २ लपविलेलें; आवरण घातलेलें; दडविलेलें. [सं.]

**अंतर्ज्ञान**—१ परमात्म्याविषयींचें ज्ञान; दिव्यज्ञान. २ योगसाधन, ईश्वरकृपा इ०मुळें दुसऱ्याच्या मनांतील गुह्य गोष्टींची होणारी माहिती; गुप्त ज्ञान. ३ जगांतील चाललेल्या व्यवहारांचें-ते व्यवहार प्रत्यक्ष न पाहतां-मनास झालेलें ज्ञान; अप्रत्यक्षविषयदर्शन. ४ सहजोपलब्ध ज्ञान; तात्कालिक ज्ञान. (इं.) इन्टुइशन. [सं.]

**अंतर्ज्ञानी**—वि. अंतर्ज्ञान असलेला; अप्रत्यक्ष विषयद्रष्टा; सहजज्ञानी. [सं.]

**अंतवंत**—वि. नाशवंत; मर्त्य; जिला शेवट आहे अशी (वस्तु, देह). 'अथवा ऐसा नेणसी। तूं अंतवंतचि हें मानिसी।' -ज्ञा २.१५२. [सं.]

**अंतःशौच**—न. मनाची शुद्धता; अंतःकरणाचें पावित्र्य; (काम-क्रोधादिकांचा त्याग व शमदम, वैराग्य, भगवद्भक्ति इ. चा स्वीकार केल्यामुळें होणारी अंतःकरणाची निर्मळता); अंतःशुद्धि. [सं.]

**अंतःसंज्ञा**—स्त्री. आंतून जागृति; आत्मज्ञान; आत्मबोध. [सं. अंत+सम्+ज्ञा]

**अंतःसाक्षी**—वि. अंतःकरण जाणणारा. अंतर्ज्ञानी. [ सं. ]

**अंतःस्थ**—न. अप. अंतस्थ; अंतस्त. १ (व्यापक) गुप्त रीतीचा लांच; दरबारखर्चाचा एक भाग; सरकारांतून आपल्यासारखें काम करून घेण्यासाठीं कारकून, मुत्सद्दी, मोठमोठे सरकारी अधिकारी यांना त्यांचा हक्क म्हणून ( लांच नव्हे ) ठोकळ रोख रक्कम देण्याची पद्धत. ही मुसलमानी, मराठी व इंग्रज कंपनीच्याहि रियासतींत त्यावेळीं सरसहा प्रचलित होती, दरबारखर्च पहा. –गांगा ५६; –पया २०४. गुप्त मसलत किंवा तह ठरविणाऱ्या अधिकाऱ्यास शत्रूकडून ही रक्कम मिळे. 'चिकोडी व मनोळी हे दोन प्रांत पेशव्यांनीं कोल्हापुरकरास नजर केले व त्याबद्दल किंमत म्हणून ११ लाख रुपये सरकारात घेतले व खेरीज १० लाख रु. अंतस्थ स्वतःसाठीं घेतले.' –थोमारो २०९. 'गडवाल संस्थानापासून सरकार २०००० खंडणी सालीना घेई. त्यांत सखारामबापूला ५००० अंतस्थ मिळत.' –थोमारो २५४. २ ( सामा. ) लांच. –वि. १ गुप्त; खासगत; एकांत स्थळीं किंवा खासगत जागीं केलेलें. २ अंतस्थित; मधला; आंत असलेला; आंतील. [ सं. ] ०**पट्टी**–स्त्री. सरकारास आवश्यक लागणारा खर्च निभावण्यासाठीं प्रसंगीं जमीनदारावर व क्वचित रयतेवर बसविण्यांत येणारा कर. ०**पत्र**–न. हुंडीबरोबर पाठविलेलें खुणेचें पत्र.

**अंतःस्थिति**—स्त्री. १ आंतली अवस्था ( मन, आत्मा, प्रसंग, घर इ० ची ). 'अंतःस्थिति यजमानाची ठाउकी आम्हातीं।' २ आंतील अधिष्ठान, वास्तव्य. ३ अंतरात्मा. [ सं. ]

**अंतस्थी**—अंतस्थ अर्थ १ पहा.

**अंतावन**—न. शेवट. 'आतां स्तबकाचें अंतावनीं । ब्रह्मप्रळय वर्णील मुनी।' –कथा १.१४.१२८. [ सं. अंत+अवन ? ; वण–न]

**अंतिक**—वि. जवळचा; निकटचा; समीपवर्ती. –पु. (ल.) सेवक; नोकर. [ सं. ]

**अंतिम**—वि. शेवटचा; अखेरचा; शेवटील; अंत्य. [ सं. ] ०**साध्य**–न. शेवटचें उद्दिष्ट, ध्येय. 'स्वातंत्र्य हें अंतिमसाध्य ठरवावें.' –टिव्या. [ सं. ]

**अंतीं**—शअ. १ शेवटीं; नंतर; पश्चात्, परिणामीं; अखेरीस; मग. अनुभवाअंतीं=अनुभवानंतर; केल्याअंतीं; घेतल्याअंतीं. 'व्यवहाराचे अंतीं चार पैसे बुडतात किंवा मिळतात हें चाललेंच आहे.' २ ज्यामुळें; साठीं; करितां; स्तव. 'सरकारकामाअंतीं मी आलों नाहीं.' [ अंतची सप्तमी विभक्ति ]

**अंतीगुंती**—स्त्री. अडचण; अडथळा. 'अवश्य म्हणून नृपनाथ । बोळवीतसे समस्त । ऐसें रायास गांवोगांवीं होत । अंतीगुंती चालावया।' –नव १८.१४. [ गुंता–ती द्वि. ]

**अंतील**—वि. अंतीचा; शेवटचा. 'हाचि श्लोकींचा अंतील चरण।' –एभा २९.८८. [ अंत ]

**अंतुता**—क्रिवि. आंत 'आकाशा ठाव अंतुता । भूतभास बिंबला।' –वेसीस्व ११.२९.

**अंतुती**—अ. शेवट; समाप्ति. 'नमस्कारासी वारी नाहीं अंतुती।' –सप्र १.६६. [ अंत ]

**अंतुरी–तोर–तोरी**—स्त्री. १ ( काव्य ) स्त्री; बायको; पत्नी; भार्या. ( सामा. ) बाई. ( अव ). अंतोरिया. 'अंतोरिया कुमरें । साडोनिया भाडारें।' –ज्ञा १.२२०. 'जन्मला जयांचे उदरीं । तयासीं जो विरोध करी । सखी मानिली अंतुरी । तो येक मूर्ख।' –दा २.१.८. ( सामान्यपणें ) कोणतीहि स्त्री. 'न कळे हो माव मुनि मार्गे एकी अंतुरी । साठीं संवत्सरा जन्म तया उदरीं ॥', –तुगा २७७. [ सं. आन्त.पुरिकी, आन्त.पुरी; प्रा. अंतेउरी–अंतुरी ]

**अंतुवट**—आंतुवट पहा.

**अंतेज**—पु. अंत्यज; महार. 'तीन दिवसांचा उपासी अंतेज।' –रामदासी २.१५८. [ अंत्यज ]

**अंतेवासी**—पु. ( कायदा ), ( शब्दशः जवळ राहणारा ). गुरूजवळ राहणारा; उमेदवार; शिष्य; विद्यार्थी ( करार केलेला ). [ सं. अन्ते+वस् ]

**अंतेष्ट–ष्टी**—स्त्री. और्ध्वदेहिक संस्कार; क्रिया; उत्तरक्रिया. [ सं. अंत्य+इष्टि ]

**अंतोरिक–अंतोर**—न. अंतःपुर; राणीवसा. 'तैसीं दीसतीं अंतोरें । यादवांचीं।' –शिशु ५५. –पंच ३.७. अंतुरी पहा. [ सं. अन्तःपुर; प्रा. अंतेउर ]

**अंतोर–री**—न.स्त्री. अंतुरी पहा. 'आपुलें लपविलें अंतोर । मेरू पर्वतीं ॥' –शिशु २४०; 'हिरोनियां देवांचीं अंतोर।' –एभा ४.२२७.

**अंतौतें**—शअ. आंत, मध्यें. अतौत पहा. [ सं. अंतर् द्वि. ]

**अंत्य**—वि. शेवटचा; अंतिम; चरम, अखेरचा. –न. संख्यास्थानसंज्ञांतील 'जलधी' च्या पुढील व 'मध्य' च्या मागील एक संज्ञा; एक हजार महापद्म. –पु महार. 'अंत्यु राणिवे बैसविला।' –ज्ञा १३.७२४. [सं ] ०**कर्म–क्रिया**–न स्त्री. उत्तरक्रिया; अंतेष्ट पहा. ०**गोदान**–न. १ पापक्षालनार्थ अनुष्ठान करतांना त्यांतील प्रधान कर्म आटोपल्यानंतर लागलीच करावयाचें गाईचें दान. २ मरणापूर्वी ब्राह्मणास केलेलें गाईचें दान. ०**धन–पद**–न. गणित किंवा भूमितिश्रेढींतील शेवटची संख्या. ०**नाडी**–स्त्री. ( ज्यो. ) अश्विनी, भरणी, कृत्तिका इत्यादि २७ नक्षत्रांना आद्यनाडी, मध्यनाडी व अंत्यनाडी अशा अनुक्रमें संज्ञा आहेत, त्यांपैकीं कृत्तिका वगैरे नक्षत्रास लागणारी संज्ञा. नाडी पहा.

**अंत्यज**—पु. शूद्र जातीच्या खालील महार, मांग, चांभार इ० अतिशूद्र; धोबी, चांभार, बुरूड, नट, कोळी, मेद ( पारधी )

शरीर पापपुण्य भोगतें, असा समज आहे; लिंग देह. 'अंगुष्ठमात्र पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी।' –मोवन १३.५८.

**अंगुष्ठाण-स्तन-स्तान-स्थान**—न. १ बोटाला सुई टोचूं नये म्हणून व सुईस मागून नेट मिळावा म्हणून तर्जनीत घालावयाचें एक धातूचें (लोखंडी, पितळी) टोपण. २ अंगठी. [सं. अंगुली+स्थान किंवा त्राण; फा. अंगुश्तदान; अंगुश्तरी=अंगठी]

**अंगुसा**—पु. (माण.) फडकें; चिंधी; अंगवस्त्र; अंगोछा. अंगछा पहा. 'त्या अंगुशांत भाकरी बांध.' [सं. अंग+वस्त्र]

**अंगुस्ती**—स्त्री. (गो.) दुःख; चिंता; काळजी. 'तू देवाची अंगुस्ती साचारू।' –ख्रि १.१.१४. [पोर्तु. अंगुस्तिआ; इं. अँग्विश]

**अंगुस्ती**—स्त्री. १ चिळस, भीति वगैरेमुळें किंवा ताप येण्यापूर्वी अंग कसकसणें, शहारे येणें; अंगावरील कांटा; शिरशिरी (क्रि० येणें, वाटणें). २ खांदे उडविणें; शरीरावयवाची एकदम हालचाल. (क्रि० देणें). [सं. अंग+ऋस्ता–स्ती=विचलन]

**अंगुस्ती**—स्त्री. रखेली; राख. [अंग+स्त्री]

**अंगुळु-ळू**—वि. (नंदभाषा) दहा संख्या (बोटें दहा असतात यावरून संकेत) 'मुलु उदानु अंगुळु ऐसी। नंदभाषा सांगितली त्यासी।' –भवि ४२.४५. [सं. अंगुलि]

**अंगून**—शअ. १ ज्या बाजूनें; ज्यावर अथवा खालीं, वरून अथवा खालून (रस्ता, भिंत इ०). 'वर जी टेकडी ती वरचे अंगून चिरेबंदी दगडांनीं बांधून काढिली आहे.' –विवि ८.१.१०. २ एखाद्यापासून, करितां, कडून, तर्फे (निरोप, विनंति). [अंग+ऊन, हून]

**अंगेज-जणी, अंगेजी**—पुस्त्री. शौर्य; धाडस; उठावणी; पराक्रम. 'जनरलांनीं अंगेज केला आहे.' –राज १२ ९७. 'स्वामी हिंदुराज्यकार्यधुरंधर राज्याभिवृद्धिकर्ते, तुम्हां लोकांचे आंगेजणीनें सिद्धीस पावले.' –मराआ ७. [फा. अंगेझ–अंगेख्तन्=उठावणी करणें; सं. अंग]

**अंगेजणें**—उक्रि. (काव्य) अंगीकारणें पहा. [अंग° रागेजणेंप्रमाणें घटना]

**अंगेष्टी**—स्त्री. शरीरयष्टि; अंगकाठी. 'लिंग का प्रतिमा दिठीं। देखतखेंवों अंगेष्टी।' –ज्ञा १७.२०४. [सं. अंग+यष्टि]

**अंगोगडी-ड्या**—आंगोगडी-ड्या पहा.

**अंगोछा-च्छा**—पु. अंग पुसण्याचा पंचा; अंगवस्त्र; उपवस्त्र. अंगछा पहा.

**अंगोठा**—पु. १ अंगठा पहा. २ (ना.) अंगठ्याचा छाप, शिक्का. [अंगठा]

**अंगोठा**—पु. (ना.) अंगकाठी; शरीरयष्टि; अंगलोट-वटा पहा.

**अंगोवांगीं**—क्रिवि. १ स्वतःस, जातीनें. 'येथोनि निघावें वेगीं। एकलाचि आंगोवांगीं।' –एभा ७.२९. २ (ल.) सहज, अनायासें. 'ऐसे योगबळें योगी। माथा जिणती अंगोवांगी।' –एभा ६. ३८५. [अंग+वा+अंग, किंवा अंग द्वि. सांगोवांगीं प्रमाणें]

**अंगोशा-शी**—पुस्त्री. (व.) पंचा; धोतर; अंगवस्त्र; अंगोछा; अंगछा पहा.

**अंगोस्तर, अंगोस्ती, अंगोस्त्र अंगोस्त्री,**—नस्त्री. अंगवस्त्र; उपरणें. 'गांडीस धोतर। येक अंगोस्तर' –रामदासी ९६. 'मग स्नान करूनि अंगोस्त्र बरवें।' –दावि १६४; 'सुचवोनि अंगोस्त्री बांधविलें।' –दावि २५३. [सं. अंग+वस्त्र]

**अंगोस्ती**—स्त्री. अंगावरील शहारे; कांटा. अंगुस्ती पहा. (क्रि० येणें, वाटणें).

**अंगोळिका, अंगोळी-गौळी**—स्त्री. बोट (हाताचें। पायाचें), करंगळी; अंगुलि पहा. (अव.) अंगोळिया, अंगोळिका. 'अंगोळीस जडीत घालुनि मुद्री। कानास कांडाळिते।' –विरस ३१. 'सुरेख सरळ अंगोलिका। नखें जैशी चंद्ररेखा।' –कथं ५५. 'सुनीळ नभाचिया कळिका। तैशा आंगोळिया देखा' वरी नखें त्या चंद्ररेखा।' –एरुस्व १.२४.

**अंगौन-आंगौन**–वि. अंगासंबंधीं, अंगावरला. –न. धोतर. 'आंगौनि ऐकुणा झोलु। फेडितांचि तो बाहिरलु।' –अमृ २.४८. [अंग]

**अंग्या**—पु. अंगी, अंगरखा पहा.

**अंग्रेज-जी**—अंगरेज-जी पहा.

**अंघूळ-घोळ-घोळी**—स्त्री. आंघोळ; स्नान. (क्रि० घालणें, करणें). 'आंघोळी देवें पुजा सारिली।' –शिशु ५७६. 'त्या मिळोन एके वेळीं। जाती उदकीं आंघोळी।' –कथा १.५.६. [सं. अंग+का. होळणें=धुणें; प्रा. अंगोहलि=खांद्यावरून स्नान]

**अंघ्र-घ्री**—पु. पाय. 'अर्पिलीं अंघ्रियुगुलीं। विश्वरूपाच्या॥' –ज्ञा ११.७०८. 'विलोकीं अग्रजाचे अंघ्र।' –मुवन १.१०५. [सं.]

**अंचल-ळ**—पुस्त्री. अचळ पहा. १ वस्त्राचा शेवट, टोंक; पदर. 'मुखकमल तियेचें अंचलें माय झांकी।' –सारुह २.९१. २ पडदा. 'ते अहंकाराचा अंचलु लोटी।' –माज्ञा २.१३२. ३ दशी; मागावरील कापड विणून झाल्यानंतर शेवटास उरलेले उभे दोरे. अंचळी पहा. पुल्लिंगी. अव. शब्द वापरतात. ४ योगी जें एक प्रकारचें वस्त्र वापरतात तें. ५ जनावराचें थान; स्तन; अंचूळ [सं. अंचल] °फेडणें-(व.) लुगड्याच्या पदरानें दृष्ट काढणें. 'अंचल फेडल्यानें डोळ्याला बरें वाटेल.'

**अंचवण**—न. १ जेवणानंतरचें तोंड हात धुणें. ( क्रि० करणें ). २ ( गो. ) आचमन. ३ ( ल. ) त्याग. [ सं. आचमन ]

**अंचवणें**—अक्रि १ जेवणानंतरचें तोंड हात धुणें. 'जेवावयास पंचामृत अंचवावयास खारें पाणी.' २ अंतरणें; मुकणें; सोडणें. अंचवणें हें भोजनोत्तर करावयाचें असतें त्यापुढें भोजन करणें शक्य नसतें यावरून प्राणास, धनास अंचवणें=जिवास, धनास मुकणें. 'संसारसुखास अहल्या आंचवली पोरवयांत।' –विक १६. ३ ( गो. ) आचमन करणें. –उक्रि. दुसऱ्याचें तोंड हात धुणें. [ सं. आचमन; हिं. अंचवना, अचाना; बं. आँचान ]

**अंचळी**—स्त्री. दशी; वस्त्राच्या शेवटास असणारीं दोऱ्यांचीं टोकें. अंचल-ळ ३ पहा. **आंचळया काढणें**–पदर लावणें. [ सं. अंचल ]

**अंचित**—वि. १ पूजलेला, मान दिलेला; आदरलेला; [सं.] ०**करण**–न. ( नृत्य ) बोटें व्यावृत्त परिवृत्त करून मग डावा हात छातीसमोर वांकडा करून नाकाच्या शेंडयासमोर ठेवणें. ०**पाद्**–न. टांच जमिनीला टेंकवून पाऊल सर्व उचलून बोटें वांकविणें. ०**बाहु**–पु. ( नृत्य) छातीवरील हात थोडा छातीच्या पुढें धरणें. ०**मान**–स्त्री. ( नृत्य ) शरीराचा तोल पुढें जाऊं लागला असतां तो सांभाळण्यासाठीं मान मागें घेणें. ०**शीर्ष**–न. (नृत्य) डोकें किंचित एका बाजूला खांद्यावर वांकविणें ( रोग, मूर्च्छा इ० गोष्टी दर्शविण्याचा अभिनय ). [ सं. ]

**अंची**—स्त्री. १ डाक, टपाल; पेणें ( टपालाचा घोडा बदलण्याची जागा व मुक्काम ). 'सरकारांतून पत्रें आंचीवर जीं जीं आलीं तीं तीं नबाब बहादूर यांस श्रवण करून पत्राचे भाव समजाऊन, उत्तरें निरोत्तरें आलीं. त्या अन्वयें आंचीवर लिहित गेलों.'–राज १०.१९७. –ख३६४०. २ हरकारा. [ सं. अंचि (अंच्‌गतौ). ते. अंचे, अचिय=टपाल; घोडा बदलण्याची जागा; जासूद. का. अंचे=टपालरस्ता. ] ०**वाला**–पु. टपाल खात्याचा अधिकारी. ( का. ) अंचेदार.

**अंचेलिया**—पु. गुरांचा एक रोग. -शे ६.९६ नामजोशी.

**अंज, अंजन**—पु. ( शाप. ) एक धातु. ( इं. ) ॲंटिमनी; याचा उपयोग छापावयाचे खिळे तयार करावयाच्या धातूमध्यें मिसळण्यासाठीं करतात. तसेंच सुरम्याकडेहि करतात. म्हणून याला सुरम्याची धातु असेंहि नांव आहे. –ज्ञाको अं ४५ याच्यापासुन अंजत्रिगंधकिद, अंजत्रिहरिद, अंजद्राक्षित इ० संयुक्त द्रव्यें होतात. –ज्ञाको अं ४६. [ सं. अंज् ]

**अंजन**—न. १ डोळ्यांत घालावयाचें काजळ, सुरमा. 'न लेति जे लोचन अंजनाला।'–सारुह २.९६. 'माझी वेणी आपुल्या हातें। गुंफिली रात्रीं कृष्णनाथें। अंजन सोगयाचें स्वहस्तें। कंसांतकें रेखिलें॥'–ह २७.२२. २ एक औषधी द्रव्य. यानें नेत्रविकार, शैत्य इ० रोग बरे होतात. ३ विशिष्ट प्रकारचें काजळ; हें डोळयांत घातलें असतां भूमिगत द्रव्य दिसतें. यानें इच्छित वस्तु दिसणें इ० अतींद्रियज्ञान होतें. 'जैसें डोळयां अंजन भेटे।,' –ज्ञा १.२३. 'जैसें नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान।'–दा ५.१.३८. ४ (ल.) गुरुकृपा, प्रसाद; ज्ञानदृष्टि प्राप्त होण्याचें साधन; ईश्वरीप्रसाद. 'गुरुअंजनेवीण तें ( ब्रह्म ) आकळेना।'–राम १४१. ५ ( ल. ) शुद्धीवर आणणारी गोष्ट; शहाणपणाचें औषध. 'डोळयांना चुरचुरूं न देतां पुरुषांच्या डोळयांत झणझणीत अंजन घालण्याची युक्ति बायकांनाच साधते.'–मानाप ६९. ०**शलाका**–स्त्री. एक औषधी सळई. त्रिफळाचा रस ( काढा ), माक्याचा रस, सुंठीचा काढा, तूप, गोमूत्र, मध व शेळीचें दूध यांपैकीं प्रत्येकांत शिसें तापवून पातळ करून सतत सात वेळ बुडवावें. नंतर त्याची सळई करावी ती नेत्ररोगांचा नाश करते. –योर ५५१. ०**हारी**–पु. ( नकळत दुसऱ्याच्या डोळयांतील अंजन काढून घेणारा ) अट्टल चोर, सोदा, भामटा.

**अंजन-नी**—स्त्री. एक इमारती लांकूड. हें दहा बारा हात उंचीचें असून त्यास डहाळ्याच्या अंगास लागून जांभळीं फुलें व फळें येतात; पानांपासुन पिवळा रंग होतो. –शे ११.७०. –वगु १.८. [ सं. ]

**अंजनी**—वि. एकरंगी आंगावर काळे, निळे, तांबडे किंवा पिवळे ठिपके असणारा ( घोडा. ) उदा० काळांजनी, रक्तांजनी. –अश्वप ९४. [ सं. अंजन ]

**अंज-जु-मान**—स्त्री. १ सभा, संस्था, समिती. २ पारशांमध्यें धर्माचारांसंबंधीं वादांचा निर्णय सांगणारी संस्था. [ फा. अंजुमन् ]

**अंजलि**—स्त्री. १ ओंजळ; अंजळी; दोन्ही तळहात एकत्र जोडून केलेली पोकळी ( नमस्कारासाठीं, किंवा कांहीं पदार्थ घेण्यासाठीं ). २ नमस्काराची एक पद्धत; अभिवादन. ३ ओंजळभर कांहीं पदार्थ ( फुलें, धान्य, इ० ). ४ एक माप ( ओंजळींत राहाणाऱ्या धान्याचें ); कुडव. [ सं. ] ०**जोडणें-बांधणें**–दोन्ही तळहात एकमेकांस जोडणें ( नमस्कार–प्रार्थनेसाठीं ); हात जोडणें; प्रार्थना करणें. 'अंजलि बांधोनि म्हणे जरि अभय असेल तरि निवेदीन।'–मोवन ११.११३. ०**पुट**–अंजली १ पहा. ०**संयुक्तहस्त**–पु. ( नृत्य ) हातांचीं बोटें सरळ पसरून एकमेकांस लावणें व आंगठा थोडा आंखडणें नंतर दोन्ही हातांच्या करंगळीकडील बाजू एकमेकांस जुळविणें.

**अंजान**—वि. ( हिं. ) अज्ञानी; गैरमाहीत; नेणता; अडाणी. [ सं. अज्ञान ]

**अंजाम**—पु. परिणाम; शेवट. 'मर्जी हजरतीची खुष राहिली म्हणजे कृतकृत्य। अंज्याम कसा आहे. इकडे कोणी

ज्याला ज्या गोष्टीचा उपयोग नाहीं ती त्याला देणें. (वाप्र.) अंधा देतां आमंत्रण सर्वेचि येती दोघेजण (=आंधळयाला बोलविलें असतां हातीं धरणारा माणूस व आंधळा असे दोघे येतात).

**अंधक**—वि. १ अंधुक; कमी प्रकाशाचा (उजेड, प्रकाश अथवा चकचकीत वस्तु). २ फिक्का, विन तकतकीचा; निस्तेज, (रंग, रंगीत वस्तु) मंद. [सं.]

**अंधक, अंधकअंधक**—क्रिवि. १ तुरळकतुरळक; अस्पष्ट; अव्यक्त; मिणमिणीत (दिवा, वस्तु) (क्रि० दिसणें). २ धुकट, धुंद (हवा, वातावरण).

**अंधकणें**—अक्रि. अंधक होणें; झाकुळणें; आवरण पडणें. निस्तेज होणें; मावळणें. 'ततारा झमकत होता। अंधकळा।' —ऐपो ९२. [अंधक]

**अंधकार**—पु (अप.) अंधःकार. १ अंधार; काळोखी; काळोख; प्रकाशाभाव. 'सूर्य देऊनि घेतला अंधकार।' —ह ३. २०३. २ (ल.) बुद्धिमांद्य; अज्ञान. [सं.]

**अंधकूप**—पु. १ गवत किंवा झाडझुडप यांमुळें जिचें तोंड दिसत नाहीं अशी विहीर; अंधारी विहीर. 'मग अंधकूप आश्रावा।' —ज्ञा १.२३९. —एभा ७.४५२. २ एक नरक. [सं.]

**अंधतम**—पु. १ जास्त अंधार; आंधळें करण्याइतका काळोख २ (ल.) आध्यात्मिक अज्ञानांधकार; अध्यात्मज्ञानाचा अभाव. ३ एक नरक. 'तेणें अकर्म कर्मवशें अंधतमीं तो प्रवेशे।' —एभा १०.५९०. —वि. अत्यंत अंधळा. [सं.]

**अंधतामिस्र**—न. एक नरक. [सं.]

**अंधत्व**—न. आंधळेपणा; दृष्टिहीनता; चक्षुरिंद्रियाचा अभाव. 'प्रळयाग्नीच्या ज्वाळा। अंधत्व केवि पावल्या॥' [सं.]

**अंधपरंपरा**—स्त्री. १ आंधळयांची ओळ, माळ; एका अंधळयापासून दुसऱ्या अंधळयास प्राप्त होऊन चालत आलेली रीत वगैरे. २ एकाचें पाहून दुसऱ्यानें, त्याचें पाहून तिसऱ्यानें, याप्रमाणें कोणतीहि गोष्ट करण्याचा परिपाठ; गतानुगतिकत्व; खरें खोटें, फायदा तोटा न पाहतां वाडवडील किंवा समाज जसें करीत आला तसें करणें (यावरून अंधपरंपरान्याय निघाला आहे). 'लोकांची सामान्यतः प्रवृत्ति अशी आढळते कीं जो समज एकदां होऊन बसला तो पीछेसी आयी या न्यायानें केवळ अंधपरंपरेनें पुढें चालवावयाचा.' —नि [सं.]

**अंधबंध**—न. अंधपटल. —हंको.

**अंधविलोकन**—न. आंधळयाचें पाहणें (यावरून अशक्य गोष्टीविषयीं योजतात—जसें खपुष्प); असंभाव्य गोष्ट. [सं.]

**अंधळा**—वि. १ ज्याला दिसत नाहीं असा (मनुष्य, डोळा); अंध पहा. २ (ल.) अज्ञानी; अजाणता; चुकणारा; विवेकशून्य; अविचारी; गोंधळया; अव्यवस्थित (व्यवहार), बेकायदेशीर (राज्य). [सं. अंध] **म्ह०** अंधळा सांगे गोष्टी, बहिरा गाढव पिटी; अंधळया मनीं आयतवार (सोमवार), बहिरा (किंवा पांगळा) म्हणतो माझी बायको गर्भार. या (परस्पर गैरसमज दाखविणाऱ्या) व अशा पुष्कळ म्हणी आहेत. अंधळयाच्या गाई देव राखतो=ईश्वर गरिबा-दुबळयाची काळजी घेतो. अंधळयानें दळावें कुत्र्यानें पीठ खावें किंवा अंधळें दळतें कुत्रें पीठ खातें=एकानें कष्ट करावे व भलत्यानेंच त्याचा फायदा घ्यावा अशी बेबंदशाही, अंदाधुंदी. 'यास्तव आमचें सरकारास रयतांच्या वतीनें असें निक्षून सांगणें आहे कीं आंधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें असला प्रकार यापुढें चालावयाचा नाहीं.' —सासं २.३१६. अंधळयापुढें नाच बहिऱ्यापुढें गायन=ज्याला ज्याची किंमत नाहीं त्याला ती वस्तु देणगी देणें. (गो.) 'आंधळयासरी नाजून आनी भैऱ्यासरी गावन उपयोग किते?' अंधळया बहिऱ्याची गांठ=प्रत्येक जण दुसऱ्याबद्दल गैरसमज करून घेतो अशा दोन माणसांची भेट. २ परस्परांना मदत करण्यास असमर्थ अशांची गांठ. अंधळा मागतो एक डोळा देव देतो दोन (देव अनुकूल झालें असतां कधीं कधीं आपल्या इच्छेपेक्षां अधिकहि देतें यावरून)=अपेक्षेपेक्षां अधिक मिळणें. अंधळयास अंधळा वाट दाखवितो=एक अज्ञानी दुसऱ्या अज्ञानी माणसास उपदेश करतो, मार्गदर्शक होतो (म्हणजे दोघेहि फसतात). अंधळा रोजगार आणि मिंधा संसार=अव्यवस्थितपणामुळें दुसऱ्याचा पगडा स्वतःवर बसणें. **—ळयाचा रस्ता-वाट-मार्ग**—पु. सरळ; रुंद व मोकळा रस्ता; आंधळयाला अडचणीशिवाय जातां येईल असा हमरस्ता. **०कारभार**—पु. अंदाधुंदीनें चालविलेलें राज्य; बेबंदशाही; अव्यवस्थित काम. **०डोळा**—पु. अंधळा माणूस (विशेषतः एका डोळयानें) **०तिंधळा-तिरळा**—वि. (कों.) १ अंडगडी; पोटगडी; पित्त्या २ (इटीदांडूच्या खेळांतील) दुश्या; दोन्ही बाजूंनीं खेळणारा रहाट्या. ३ (ल.) दोहीं दगडींवर हात टेकणारा; दुरोखी **०नारळ**—पु. कोंवळा नारळ; शहाळें; ज्यांत नुसतें पाणीच असल्यामुळें वाजत नाहीं असा. आडसर पहा. **—ळयाची काठी**—१ अंधळा, अशक्त, निराश्रित यांचा पुढारी अथवा आश्रयदाता अंधळयाला आधारभूत गोष्ट (अंधळयाला मुख्य आधार त्याच्या काठीचा असतो यावरून). 'या अंधावृद्धाची राहों देतास ए[illegible] जरि यष्टी। भीमा, मी मानस तरि होऊं देत्यें कशास ब[illegible] कष्टी।' —मोस्त्री ३.४६. २ म्हाताऱ्या आईबापांचा एकुलता एक मुलगा. **—ळयाची माळ-माळका**—स्त्री. १ अंधळया लोकांची माळ, रांग. २ (ल.) अज्ञानी व मूर्ख लोकांची परंपरा **—ळयाची मिठी**—स्त्री. घट्ट मिठी; चिकटणें. **—ळयांत काणा राजा**—जेथें सर्वच अडाणी असतात तेथें थोडयाशा शहाण्या[illegible]

तेज पडतें. -ळ्यासी जन सारेंचि आंधळें-जसें आपण असतों तसेंच जग आपल्याला दिसतें.

**अंधळी कोशिंबीर**—स्त्री. एकानें डोळे मिटून इतरांना धरण्याचा मुलांचा एक खेळ. वि. का. राजवाडे यांच्या मतें अंधा कोशिंबी नांवाचा खेळ, कौशांबी नगरांत खेळत. -भाअ १८३२. (र हा बंगालींत षष्ठीचा प्रत्यय आहे, जसें:-आमार देश=आमचा देश, तसें-कौशांबीर=कौशांबीचा). ०खेळणें-न्यायनीति सोडून वागणें. व्यवहाराकडे दुर्लक्ष करणें 'इकडे अशी अंधळीकोशिंबीर खेळतांना राहिलें कीं अंगाची अशी आग होते.'-प्रेमसंन्यास ३१.

**अंधळी गाय**—स्त्री. गरीब, अशक्त, निरुपद्रवी माणूस. म्ह० अधळया गाईंत लंगडी गाय प्रधान=गांवढळ माणसांमध्यें शेंदाड शिपाई किंवा तिस्मारखान; ओसाड रानांत एरंड बळी (अडाणी लोकांना कोणीहि शहाणपण शिकवावें या अर्थी)

**अंधळी वेळ**—स्त्री. (फलज्यो.) ज्या वेळीं हरवलेली वस्तु सांपडत नाहीं ती वाईट वेळ. अंधळें नक्षत्र पहा.

**अंधळें**—वि. दृष्टिहीन. ०गारुड-न. १ लबाडी; लुच्चेगिरी; अंतरमंतर. २ गुप्त मसलत; छक्के पंजे; कट. 'दुसरे कांहीं अंधळेंगारूड असलें तरी त्याचा थांग लागूं देणारा नाहीं.'-कफा ६. ०तिरळें-न. अंधळा, तिरळा घेऊन खेळ खेळणें. अंधळा-तिरळा पहा. ०नक्षत्र-न. ज्या नक्षत्रावर हरवलेली वस्तु पुष्कळ खटपट करूनहि सांपडत नाहीं तें नक्षत्र. अंध ४ पहा. (क्रि० लागणें). ०वरण-न. ज्या वरणांत मुळींच डोळ शिल्लक राहिले नाहींत असें वरण. ह्याच्या उलट डोळस वरण.

**अंधळ्या**—स्त्रीअव. सूर्य चित्रा नक्षत्राजवळ असणें; त्या-वेळीं पडणारा पाऊस.

**अंधाई**—स्त्री. १ अंधार; काळोख. २ (ल.) अंदाधुंदी; बखेडा. [हिं.]

**अंधाटी**—स्त्री. १ एखाद्याच्या सरळ बोलण्यावर दुसऱ्यानें घेतलेला आक्षेप; अडफाटा. २ असल्या आक्षेपानीं स्वतःचें मत सिद्ध करण्याचा धरलेला हट्ट. (क्रि० घेणें; फोडणें; काढणें) ३ बधाटी पहा. हा शब्द कधीं कधीं वेंधाटीशीं जोडून येतो. [बंधाटी द्वि.]

**अंधाधुंद-ध, अंदाधुंदी-धी**—स्त्री. गोंधळ; घोंटाळा अराजकता; बंडाळी; अव्यवस्था (राज्य, घर, कामकाज इ० मध्यें). -वि. अव्यवस्थित; अनियमित; बेबंदी (कारभार, राज्यतंत्र). [हिं. अंधा+धुंद]

**अंधार-रा**—पु. १ काळोख; अंधकार. 'खोलींत अंधार पडिला फार। खालीं न दिसे अणुमात्र।'-संवि १.१३४. 'अंधार हा चोरास पथ्य.' २ (ल.) अडाणीपणा; अज्ञान. 'जाणपणें घे अंधार। तो एक पढतमूर्ख।'-दा २.१०.२७. ४ (ल.) अन्याय; उपद्रव; अंदाधुंदी; घोंटाळा; बेबंदशाही. [सं. अंधकार; प्रा. अंधार] ०अंधारीं उजाडीं (सांगणें, शिकविणें)-क्रिवि. गुप्तरीतीनें व उघड; सरळ; स्पष्ट शब्दांत व सुचवून; खाजगी रीतीनें व चारचौघांत; अनेक मार्गांनीं व रीतींनीं. ०कोठडी-स्त्री. एकांतवासाची शिक्षा देण्याकरितां चोहोंकडून बंद असलेलें व फक्त हवा येण्याकरितां झरोका असलेलें तळघर, खोली. २ (ल.) एकांतवासाची शिक्षा. (क्रि० टरणें; ठरवणें; देणें). ०कोंडी-खण-खणी, अंधारी कोठडी-स्त्री. अंधारकोठडी; काळोखी खोली; तळघर; तुरुंग. ०खोली-स्त्री. १ (फोटो) (इं.) डार्क रूम; फोटोग्राफीसाठीं लागणारी विन उजेडाची खोली. २ अंधार-कोठडी पहा. ०गडत-न. अतिशय काळोख (क्रि० पडणें; येणें; चढणें; होणें). अंधार गडप-ब असेंहि शब्द वापरतात. -क्रिवि. दाट काळोखांत. [सं. अंधकार+गर्त]

**अंधारणें**—अक्रि. १ जमून येणें व काळोख करणें (अभ्रें, पाऊस). 'पाऊस अंधारला' 'अभाळ अंधारलें' 'मेघ अंधारले.' [सं. अंधकार] २ (अकर्तृक) काळोखी येणें (अभ्रामुळें), अंधार पडणें; संध्याकाळ होणें. अंधारून यणें-असाहि प्रयोग वरील अर्थी करतात. (गो.) पावस् सामको आंधारून आयला.' 'सरीवरी येति महासरीही। अंधारुनी येइ दिसे न कांहीं।' -पाअक ९९.

**अंधारी**—स्त्री. १ काळ्याकुट्ट ढगांमुळें पडलेला अंधार. २ घोडा किंवा रहाटाचा, घाण्याचा बैल यांच्या डोळ्यांस लावण्याची झांपड. 'अंधारी भरगच्चीची निमजरी.'-ऐरापुप्र ९.५१३. ३ पित्तक्षोभानें डोळ्यांपुढें एकाएकीं भासणारा अंधार किंवा चक्कर; मूर्च्छा; तसेंच उतारवयामुळें व (ल.) आळ्यनेमुळें डोळ्यांवर येणारी धुंदी. (क्रि० येणें). (गो.) 'ताज्या डोळ्याकडेन अंधारी आयली.'

**अंधारी**—स्त्री. १ रहाटगाडग्याच्या चाकाच्या दोन दात्यां-मधील जागा; दंतांतर; खांचा. २ कडीपाटाच्या दोन कड्यां-मधील जागा झांकण्याकरितां बसविलेली आडवी फळी; खांडे व दाडे यांच्यामधील फळी. ३ लांकडी जिन्याच्या दोन पायऱ्यां-मध्यें मागच्या बाजूस असलेली पोकळ जागा बंद करण्याकरितां बसवावयाची फळी. 'अंधारी उंच ठेवूं नका.' ४ तुरुंग; अंधार-कोठडी; तळघर. ५ अंधार; काळोख; (क्रि० येणें; पडणें). ६ (ल.) अज्ञान. 'तेथें अंधारी गेली। मग बुद्धी मावळली।' -परमा १०.११. ७ बळद; भिंतींत काढलेलें कपाट; तळघर. ०कुंधारीं-कोंधारीं-क्रिवि. १ काळोखांत; अंधारांत; सांधी-कोंदींत; कोन्याकोपऱ्यांत. २ (ल.) गुप्तपणें; चोरून; आडून; (अंधारी द्वि.). ०रात्र-स्त्री. वद्य पक्षांतील रात्र; अंधारानें युक्त असलेली रात्र; काळोखी रात्र.

**कचेल**—न. कपाट. कचऱ्याल पहा.

**कचोरा**—पु. ( नाविक ) नावेचा कणा-नाको.

**कचोरा-री-ला**;—पुस्त्री. हळदीच्या झाडासारखें एक झाड. याचे कंद जमिनींत सांपडतात. कंदाच्या काचऱ्या उकडून लोणच्यांत घालतात. कचोरा सुगंधी असल्यामुळें अंगास लावण्याच्या मसाल्यांत घालतात. कापूरकाचरी म्हणून याची एक दुसरी जात आहे. कचरा-री पहा' [ सं. कर्चूर; प्रा. कच्चूर; गु. कचूरो ]

**कचोरी-डी**—स्त्री. १ तिखट मसाल्याचें पुरण भरलेली पुरी, यांत बटाटे व डाळीचें पुरणहि घालतात. ( गु. ) कचोरी. ' पोळी भात सीरा कचोर । ' –नव ९.११६. २ कणीक व उडदाची डाळ यांची तळलेली पुरी. ३ विरईपुरी; शिंगाडेपुरी( मांसयुक्त )चा एक प्रकार. –गृशि २.१९. [ प्रा. दे. कच्चरा; हिं. कचौरी; का. कच्चरी ]

**कचोळ-ळा-ळें, कंचोळ**—नपु. १ एकास एक लागून तीन घरें व वर पेला असलेलें एक लहान पूजेचें उपकरण ( पंचामृत ठेवण्याकरितां ); गंधाक्षतपात्र; एक पूजापात्र. ' उगेंच हातीं मिरवी कचोळें ' –सारुह ७.९०. –ह १९.४७. २ वर्तुळाकृति बसलेले लोक; कोचाळें. ३ फुलांचें आच्छादन, ' कनक कमळांचा कचोळा । कीजे परागाचा उधळा । ' –शिशु ७८१. –शिल्पवि ६६५. [ फा; कचकोल=पेला. तुल० सं. कच्छ+आलय ]

**कचोळी**—स्त्री. ( गो. ) सोनें इ० धातूंची देवाची मूर्ति.

**कच्च**—( कर्ना. ) खांच; लहान खळगा (लाकूड वगैरेवर चाकू, रंधा वगैरेनें पडणारा ). [ का. कच्चु=खाच, वण ]

**कँच्चकरप**—अक्रि. ( गो. ) खेकसणें.

**कच्च जावप**—अक्रि. ( गो. ) दचकणें; धस्स होणें.

**कच्चा**—वि. १ न पिकलेला; हिरवा; कोंवळा ( फळ, गळूं, पान इ० ). २ साफसूफ न केलेला; ओबडधोबड ( दगड, चित्र, इ० ). ३ अशिजा ( भात, भाकरी, रसायन इ० ). ४ अपुरा व पक्का न केलेला; सरासरीचा; ठोकळ ( जमाखर्च, काम, इ० ). ५ अपूर्ण; अपक्व; अप्रौढ ( कट, मसलत इ० ). ६ अपुरें समजलेलें किंवा मिळविलेलें ( शास्त्र, कला ). ७ अपुऱ्या ज्ञानाचा; अर्धवट शिक्षणाचा ( माणूस ). ' तो अभ्यासांत कच्चा आहे.' ८ बिन वाकबगार; अडाणी; संस्कारहीन; यथातथा ज्ञान असलेला. ९ कोता; अप्रौढ; संकुचित (विचार, बुद्धि). १० गौण; लहान; कमी ( वजन, माप; इ० ). ११ न टिकणारा; लवकर नाहींसा होणारा ( रंग इ० ). १२ सविस्तर; सर्व पोटभेद ज्यामध्यें घेतले आहेत असा (हिशेब). १३ बळकट नाहीं असा ( बांधकाम इ० ). ' मातींत घर बांधूं नये, मातीचें काम अगदीं कच्चें असतें. ' १४ इयत्तेहून, वाजवीपेक्षां कमी. ' आम्हीं एका तासांत एक कच्चा कोस चालतों. ' १५ कढवून फार घट्ट न केलेला ( साखरेचा पाक इ० ). १६ ( गणित ) त्रैराशिकांतील दुसरें व तिसरें या दोन पदांचा गुणाकार करून येणाऱ्या रकमेस कच्चे म्हणतात. नंतर त्यांस प्रथमपदानें भागून आलेल्या भागाकारास पक्के किंवा पक्का म्हणतात ( ज्याच्यामध्यें भारी परिमाणाच्या किंमतीवरून हलक्या परिमाणाची किंमत काढावयाची असते अशा हिशेबांत उपयोग ), उ० १० शेरांस पांच रुपये, तर १॥ पावशेरास किती. येथें ५ व १॥ ह्यांचा गुणाकार जो ७॥ ते कच्चे. १७ कामामध्यें तोटानफा होईल तो मूळ धन्याचा अशा बोलीनें केलेली ( नोकरी. मामलत, इ० ); पगारी (मक्ता न देतां नोकराकडून प्रत्यक्षपणें सारा वगैरे वसूल करण्याच्या पद्धतीला हा शब्द लावितात ). कच्चा हा शब्द अपुरा, ओबडधोबड, अप्रौढ, उणा ह्या अर्थानें शब्दशः व लाक्षणिकरीत्या अनेक प्रकारें योजतात. उ० **कच्चा मजकूर-लिहिणें-वर्तमान-बातमी-हकिगत-कैफियत**-वरवरचें, पक्कें नव्हे तें, कसें तरी तयार केलेलें; अंदाजी. **कच्चा ताळा-ताळेबंद-कीर्द-जमाबंदी-बाब-हिशेब-बेरीज**' इ०, =अपुरा;बंद न केलेला, अपूर्ण. [ध्व. कच; हिं. कच्चा; तु० सं. कथ्य=खोटें] ०**अमदानी**-स्त्री. एकंदर जमा ( खर्च वजा न करितां ). ०**अंमल**-पु. १ पगार घेऊन केलेली सरकारी (जिल्ह्याची, तालुक्याची) नोकरी, काम; याच्या उलट मक्त्याचा अंमल. कच्चा मोकद्दमा पहा. २ कच्चा अर्थ १७ पहा. ०**असामी**-पु. हंगामी, उपरी शेतकरी-मालक; ज्याचा कबजा कायमचा नाहीं असा इसम. ०**आकार**-पु. ठोकळ हिशेब, अंदाज; साधारण आढावा. ०**कागद**-पु. खळ न लावलेला कागद. ०**करखड**-पु. माशाचा एक प्रकार, याचा रस्सा करतात. –गृशि २.४७. ०**खर्च**-पु. १ कच्चा हिशेब, टांचण. २ तात्पुरता, कायम नव्हे असा खर्च. 'कच्चे खर्चाचे तमाशे असतील त्यांच्या नाइकानें वेळीं आपले लोकास १० दिवस रजा द्यावी.' –(बडोदें,) कलावंत खातें २०. ३ जुजबी; ठोकळ खर्चाखेरीज खर्च; जो प्रसंगीं होईल तो सामान्य खर्च. ०**खर्डा**-पु. १ अंदाजपत्रक; बजेट ( हिशेबाचें ); पक्का करण्यापूर्वीचा पहिला खर्डा. २ कुळकर्ण्यानें शेतकऱ्यांकडून आलेल्या रकमांचा ठेवलेला हिशेब. ०**खाना**-पु. पोळ्या, डाळभात, खिचडी इ० जिन्नस. –मसाप १.१०. ०**डांक, डाग**-पु. शिसें, जस्त किंवा कथील यानीं दिलेला डांक (चांदीचा नव्हे); तात्पुरता जोड; कस्तर करणें. ०**ताप, ज्वर**-पु. साधा ताप; विकोपाला न गेलेला ताप. ०**तोळा**-पु. (क.) ९२ गुंजांचा तोळा ( पक्का तोळा ९६ गुंजांचा असतो). ०**दोरा-धागा**-पु. पटकन् तुटणारा दोरा; पीळ न घातलेला दोरा. ०**पक्का**-वि. अंदाजी, ठोकळ आणि त्यावरून केलेला पक्का हे दोन्ही ज्यांत आहेत असा (जमाखर्च, वही, खतावणी इ०). ०**पाडा-दा**-पु. ठोकळ, तोंडीं, त्रोटक, ठाकठीक न केलेली, कच्ची हकिगत,

वर्तमान, साधन ( क्रि० वाचणें ). ०**बटवडा**–पु. इसमवार पगारवाटणी ( सरकारी नोकर किंवा मजूर यांना ); डोईपगार. ०**भरणा**–पु. रयतेनें भरलेला सारा, वसूल ( ऐन किंवा नक्त ). ०**मामला, मामलत**–पु. कच्चा अंमल पहा. ०**माल**–पु. ओबडधोबड; न कमावलेला; मूळच्या स्वरूपांतील; ज्याचा जिन्नस बनविला नाहीं अशी वस्तु ( कापूस, कातडें, बी, वनस्पती इ० ). 'विलायती कारखान्यांत हिंदुस्थानांतून जो कच्चा माल जातो तो बंद झाला.' –के ३१.५.३०. ०**मोकद्दमा**–पु. कामामध्यें नफातोटा होईल तो धन्याच्या वाटयाला अशा बोलीनें केलेलें काम, गुमास्तेगिरी; कच्चा अंमल. मक्त्याच्या उलट. ०**रंग**–पु. १ धुतला असतां जाणारा, न टिकाऊ रंग; रंग पक्का करण्यासाठीं उकळावा लागतो, तो उकळला नसला म्हणजे त्यास कच्चा रंग म्हणतात. २ तिफाशी सोंगटयांत काळा अथवा हिरवा रंग. ०**वसूल**–पु. रयतेकडून आलेला सारा, खंड ( ज्याची वर्गवारी काढली नाहीं असा ). ०**शेर**–पु. प्रमाणभूत ( पक्क्या ) शेरापेक्षां कमी असणारा शेर. (क.) १५ रुपये भारांचा शेर. ( उलट पक्का ८० भारांचा). **कच्ची**–स्त्री. ( तिफाशी सोंगटयांत ) १ मेलेली पण पुन्हां नुकतीच जिवंत केलेली, नुकतीच बसविलेली सोंगटी; पट फिरून न आलेली सोंगटी. २ हिरवी किंवा काळी सोंगटी. तिफाशी सोंगटयांत तांबडा व पिंवळा यांस पक्का व हिरवा व काळा यांस कच्चा रंग अशा संज्ञा आहेत. ३ ( ल. ) फजिती; मानहानि; अपकीर्ति. ०**असामी**–स्त्री. दिवाळें वाजलेला किंवा अपुरीं साधनें असलेला, नालायक सावकार, कंत्राटदार, कूळ, अर्जदार, खंडकरी इ०. ०**कमाविशी–कमावीस**–स्त्री. तैनात घेऊन केलेलें सारावसुलीचें काम; नफातोटा धन्याचा अशा बोलीनें मामलत वगैरे करावयाचा प्रकार; कच्चा अंमल ( ह्याच्या उलट मक्त्याची कमाविशी). ०**कुंदी**–स्त्री. कपडा भट्टींत न घालतां नुसता धुवून केलेली थंडी इस्त्री. २ धुतलेल्या कपडयास खळ न लावतां केलेली इस्त्री. [ कच्ची+कुंदी=खळ लावणें, इस्त्री करणें ] ०**कैद**–स्त्री. चौकशीपूर्वीची किंवा अपराध शाबीत होण्यापूर्वीची कैद. २ नजरकैद; साधी कैद. ०**कोंबी करणें**–( क. ) एखाद्याचें भजन करणें. ०**खोर**–पु. सदोदित ज्याची फजिती किंवा पच्ची होते असा माणूस; फजीतखोर. ०**जमाबंदी**–स्त्री. एकूण आलेली गांवची जमा (खर्च वेगळा काढून तो वजा न घालतां). ०**जप्ती**–स्त्री. (कायदा) दाव्याचा निकाल लागण्यापूर्वी केलेली जप्ती; अवलजप्ती पहा. ०**बाजू**–स्त्री. (सोंगटयांचा खेळ) तिफाशी डावांत काळया व हिरव्या सोंगटया. ०**बुटी–टूटी**–स्त्री. सोनेरी किंवा रुपेरी रंगानें कापडावर काढितात ती बूट, फुलें, खडी. –वि. अशा कापडाचें (पागोटें; अंगारखा इ०); खडीदार. ०**माती**–स्त्री. कोरडी, चिक्कणपणा नसणारी माती. ०**मामलत**–कच्चा अंमल पहा. ०**मिती**–स्त्री. मारवाडी, सावकार हे कर्जाऊ दिलेल्या रकमेची तारीख आदल्या दिवशींची घालतात ती. याच्या उलट पक्की मिती (कुळाकडून आलेल्या रकमेची तारीख मात्र दुसऱ्या दिवशींची घालतात). ०**मुदत**–स्त्री. (सावकारी) हुंडी हातांत पडल्यानंतर अमुक दिवसांतच ती वटविली पाहिजे अशा प्रकारची दिलेली मुदत; ह्याच्या उलट बंदीमुदत (=हुंडींत दिलेल्या तारखेनंतरची जास्त मुदत). २ हुंडीची ठराविक मुदत भरण्यापूर्वीचा काल; अद्याप संपावयाचा मुदतीचा काल. ०**लढाई**–स्त्री. पुरा निकाल न होतां झालेलें युद्ध; दोन्ही पक्षांनीं मध्येंच सोडून दिलेली लढाई; अनिर्णीत लढाई. ०**वहिवाट**–स्त्री. कच्ची वहिवाट पहा. ०**शाई**–स्त्री. लाख न मिसळलेली, पाण्यानें निघून जाण्यासारखी शाई. ०**सुपारी**–स्त्री. न शिजविलेली सुपारी; पोफळ, रोठा. ०**हुंडी**–स्त्री. अद्याप न पटलेली किंवा न स्वीकारलेली हुंडी. **कच्चें**–वि. न पिकलेलें, व इतर अर्थी कच्चा पहा. ०**अंडें**–न. नवीन घातलेलें अंडें; ताजें अंडें. ०**अक्षर**–न. खराब व बिन कित्याचें अक्षर; वळण नसलेलें अक्षर. ०**इरसाल**–न. जिल्ह्यांतून सरकारी खजिन्यांत पाठविलेला शेतसाऱ्याचा भरणा. ०**कातडें**–न. न कमावलेलें किंवा रंगविलेलें कातडें. –**खोर**–कच्चीखोर पहा. ०**खातें**–न. (हिशेब) ज्या खात्याचें येणें–देणें पुढील सालास उतरावें लागत नाहीं असें खातें; तात्पुरतें खातें. ०**गिरी**–स्त्री. कच्चेपणा; अपूर्णता; अपक्वता. 'तुम्ही आधीं कच्चेगिरी केली म्हणून फसला.' ०**चीट–छीट**–न. जें धुतलें असतां त्यावरील रंग नाहींसा होतो असें चीट. ०**दूध**–१ न तापविलेलें, निरसें दूध. २ नवीन व्यालेल्या जनावराचें पहिल्या बारा दिवसांतील दूध; कोवळें दूध. ०**नाणें**–न. चलनी नाण्यांत आलेला सरकारी वसूल ( यांत निरनिराळीं नाणीं सरमेसळ आलीं असतात). ०**पान**–न. पानवेलीचें, विडयाचें हिरवें पान (याच्या उलट पक्कें, पिकलेलें पान). ०**पोतें**–न. सरकारी चावडींत भरलेला शेतसारा; सरकारी खजिन्यांत ज्या स्थितींत येतो त्या स्थितींतील वसुली पैसा. ०**बच्चें**–न. ( अव. कच्चींबच्चीं ) मूलबाळ; पोरबाळ; लहान मूल. 'येक म्हणे गा पळोन जावें। तरि कच्चे बच्चे काय करावे।' –दावि २३२. 'तो चार कच्च्याबच्च्यांचा धनी आहे.' [ हिं. कचबच ] ०**बारा**–पु. ( तिफाशी सोंगटयांत ) फांशांवरील एक दान; ( एकावर पांच, एकावर सहा व एकावर एक अशा ) बारा ठिपक्यांचें दान. ०**मडकें**–१ न भाजलेलें मडकें. २ ( ल. ) अज्ञानी माणूस ( मडकें=डोकें, बुद्धि ). 'हें अजून कच्चें मडकें आहे.' –नाम ४. ०**रंग**–पु. ( तिफाशी सोंगटयांत ) हिरवा व काळा रंग. कच्ची बाजू पहा. ०**रेशीम**–न. पाण्यांत न उकळलेलें रेशीम. ०**लोणी**–न. कोऱ्या दुधापासून घुसळून काढलेलें लोणी ( दह्याचें नव्हे ). ०**वजन**–न. ( क. ) ( सोन्याचें ) ९२ गुंजांचा तोळा. कच्चा तोळा पहा.

**कच्चेरा**—पु. पावसाळ्यांत, बाजारांत भात येत राहील अशी व्यवस्था करणारा मुंबईतील ठेकेदार. अशी नेमणूक जुन्या काळीं सरकारांतून होत असे.

**कच्छ**—पु. १ कासोटा; नेसलेल्या वस्त्राचें टोंक जें मागें खोंवितात तें. ( क्रि० घालणें; सोडणें ). २ नदीच्या किंवा समुद्राच्या कांठचा प्रदेश. कच्छप्रांताला यावरून नांव पडलें आहे ३ दलदल; पाणथळ जमीन. 'भीतो बहु दूरुनिहि पद टेवाया जसा करी कच्छीं।' –मोमंभा २.४८. ४ कांसव; व त्याची पाठ. ५ विष्णूच्या दशावतारांपैकीं दुसरा; कच्छावतार. ६ नांदुरकीचें झाड ७ नावेची नाळ. [ सं. ]

**कच्छप**—पु. १ कांसव. 'पृथ्वीलागुनी कच्छप।' –दावि १६८. २ नांदुरकी. ३ कासोटा. कच्छ पहा. **कच्छपीं लागणें**–आश्रय करणें; एखाद्याच्या मागें मागें करणें, तंत्रानें चालणें, नादी लागणें ( माणसाबद्दल–आपलें काम करून घेण्यासाठीं ); त्याचेसें होणें; त्यावर अवलंबून असणें ( कार्य, पदार्थ ) ( सोमयज्ञामध्यें बहिष्पवमानाच्या वेळीं एक ऋत्विज दुसऱ्याच्या कासोट्याला धरून आहवनीयाकडे जातो त्यावरून ). 'तो सारखा बायकोच्या कच्छपीं लागला आहे हें बरें नाहीं.' २ पाठ न सोडणें; पाठ पुरविणें; त्रास देणें. 'अरे, माझ्या कां असा कच्छपीं लागला आहेस? जरा खेळायला जा!' [ सं. कच्छ ]

**कच्छपी**—स्त्री. सरस्वतीचा वीणा. [ सं. कच्छ ]

**कच्छमच्छ**—न. ( बायकी ) चातुर्मासांत पहिले दोन महिने दूध व शेवटचे दोन महिने दहीं न खाणें हें व्रत. ( विष्णूच्या पहिल्या दोन अवतारांच्या जोडीप्रमाणें दूध, दहीं हे शब्द जोडीनें येतात यावरून ).

**कच्छी**—वि. १ कच्छ प्रांतांतील ( घोडा, माणूस इ० ). [ कच्छ ] –**स्त्री.** ( गो. ) मेणा.

**कछवा**—स्त्री. ( संगीत ) एक सतार; यांतील भोपळा कासवाच्या पाठीसारखा असून क्वचित लांकडी असतो. तारांची संख्या, तारा मिळविण्याची पद्धति, पडदे वगैरे सर्व बाबी सतारी सारख्याच असतात. यांतहि रागदारीच्या व लयकारीच्या गती वाजवितात. [ सं. कच्छ ]

**कंज**—पु. ब्रह्मदेव. –न. कमळ. 'सर्वस्व परित्यागुनि ज्याचें स्मरतात पाद–कंज यमी।' –मोवन १.२८. [ सं. कम्+ज ] ०**कन्या**–स्त्री. सरस्वती.

**कज**—( कों. ) एक मासा.

**कंजर**—स्त्री. शिंके करणारी, जोतीं–जुंपण्या, पिछाडया, म्होरक्या, दोऱ्या वळणारी एक जात; जिप्सिप्रमाणें एक भटकी जात. –गांगा ११९. ही जात अस्पृश्यांपैकीं समजली जाते. कंचर पहा.

**कंजरीट**—पु. खंजरीट; ताजवापक्षी. ह्याच्या डोळ्यांची उपमा बायकांच्या डोळ्यांस देतात. 'बोलली भुपास काय कंजरीट लोचनी.' –( रामसुतात्मज ) द्रौपदी वस्त्रहरण ११४. [ सं. खंजरीट ]

**कजलणें–जेलणें**—अक्रि. ( दुफाशी सोंगट्यांत ) दुफाशी सोंगट्यांत सोंगट्या जुगल्यानंतर बारा, वेती, दुद्दी इत्यादि जुगदान खेळणें. कदलणें पहा.

**कजलवाश**—पु. बंदुकवाला, लाल टोपीचा इराणी शिपाई. [ तु. किझीलवाश् ]

**कजली**—कदली पहा.

**कजा**—कज्जा पहा. 'कजा शंभू ब्रह्मा करिति हृदयाब्जीं पदक ज्या।' –वामन विराट ५ १.

**कजाख–ग**—वि. १ क्रूर; दुष्ट; राक्षसी; रानटी. ( रशियन सैन्यांतील कोसॅक नांवाचे शूर व धाडसी घोडेस्वार, यावरून ). २ भांडखोर; तंटेखोर; खाष्ट; हट्टी. [ तु. कझाक्=लुटारू, चोर, पुंड; रशि. कोसॅक ]

**कजाखी–गी**—स्त्री. १ रानटीपणा; क्रूरपणा; राक्षसीपणा; कजागपणा. २ गनिमिकाव्याची जोराची लढाई. 'ते फौज कजाखीस व आमची फौज समुन्ख झुंजास कामास येईल.' –दिमरा १.२२. ३ कष्ट–अष्टप्रधानांचा इतिहास २४५. ४ ताकद; सैन्यबळ. ५ युक्ति; हुन्नर. 'चौकशी पडली असतां कजाखी करून नांवें न सांगतां सुटून येऊन....' –मराचिथोशा ३९. ६ पुंडाई; चोरी; लुटफाट. 'इस्माईलबेग कोठील कोण ऐसें असतां ५००० फौज बाळगून कजागी करितो.' –रा १०.२०१ [ तुर्की ]

**कजान**—पु. नारळाच्या सावळ्या.

**कंजार, कंजारी**—पु. एक जातीचे लोक. कंजर पहा. –गांगा ११९.

**कंजारी, कंजारीण**—स्त्री. १ कंजार जातीची **स्त्री.** या टाळ्या पिटून व अश्लील गाणीं गाऊन भिक्षा मागतात. –गांगा ११९,१२६. २ ( ल. ) केस पिंजारलेली स्त्री. 'कशी कंजारीण आयत्यावेळीं पुढें झाली.' –कीच.–भाव ११८. [ हिं. ]

**कजावा**—पु. १ उंटाचें खोगीर. २ उंटाचें वाहन. यांत बायका बसून जातात. [ फा. ]

**कजिया**—कज्जा पहा.

**कंजूत**—वि. ( व. ) शिवळा बेरडया.

**कंजूश–ष–स**—वि. कद्रू; कवडीचुंबक; कृपण; चिक्कू. [सं. कर्ण+जुष्; प्रा. कण्णझूस ?; हिं. कंजूस=कानांतील मळ खाणारा, कृपण ]

**कजेल–ली**—नस्त्री. कदली पहा.

**कजेलीवर येणें**—सक्रि. भांडण करणें; मारणें; ओरडणें. [ कज्जा ]

**कज्जल**—पुन. काजळ ( दिव्यावर धरलेलें ); शोभेसाठीं किंवा औषधासाठीं याचा उपयोग करतात; सुरमा. कज्जली पहा. [ सं. ]

**कज्जला**—वि. ( व. ) भांडखोर; कजाग. [ कज्जा+ला ]

**कज्जली**—स्त्री. १ (वैद्यक) पारा व गंधक एकत्र खलून केलेलें रसायन; काजळी. २ काजळासारखें औषध.

**कज्जा**—१ भांडण; तंटा; वैर; वितुष्ट; शिवीगाळ. २ (कायदा) वाद; प्रकरण; खटला. (विशेषतः फौजदारी वाद). ३ लढाई. 'कज्जा मोठा घोरंधर जाला. ' –राज ३.१८४. [ अर. कझिया=प्रतिज्ञा, गोष्ट; फा. कझिया=भांडण; तुल० सं. कार्य–काज्ज] **०खांदून काढणें**–भांडण उकरून काढणें. **०कटकट–खोकला–भांडण–कफावत**–पुनस्त्री. लहानमोठे भांडणतंटे· वादविवाद; वितुष्ट-विरोध. –रा ८.१८३. ' कज्जेकफावती होवोत रस्त्यांत । ' (क्रि० करणें; काढणें; आणणें ).

**कज्जाक–ख, कज्जाकी–खी–गी**—कजाख–खी पहा.

**कज्जेखोर, कज्जेदलाल**—वि. भांडखोर; तंटेखोर; कळीचा नारद; भांडणें लावणारा, उपस्थित करणारा. ' आम्हां भांडखोर व कज्जेदलाल शास्त्र्यांचीं अशीं लग्नें लावण्यांत आल्यामुळें नानासाहेबांच्या वारसांप्रमाणें आम्हालाहि भाऊबंदकी साधण्याचा हक्क सांप्रत प्राप्त झाला आहे.'–भाऊ अं. २.प्र. १. **कज्जेदलाली**–स्त्री. उपस्थित केलेलीं भांडणें; भांडणें लावण्याची वृत्ति; त्याबद्दल मिळणारा पैसा. –के ३१.५.३०. 'शांततेच्या प्रसंगीं कज्जेदलालीच्या तंटेबखेड्यामध्यें रूपमाया सेनापतिसाहेबानीं वादीप्रतिवादींचें काम आपल्याकडे घेणें म्हणजे परमेश्वरी संकेताविरुद्ध वागण्यासारखें आहे. ' –वाय २.२. [फा. कझियादल्लाल ]

**कज्या**—कज्जा पहा. –सभासद ४८. 'बाकीचा पैसा यावा म्हणून कज्या केला । ' –ऐपो २८६.

**कंज्याळ**—न. ( माण. ) पाण्यांत उगवणारी एक वनस्पति.

**कट**—पु. १ जूट; टोळी; संघ; ऐकमत्य. ' अलीकडे अशा प्रकारच्या हजारों जुटी किंवा कट युरोपांत होऊं लागले आहेत.' –आगर ३.६७. २ बंदुकीच्या दस्त्यास नळी घट्ट बसविण्यासाठीं असलेलें वेढें, कडी; हत्तीच्या दातांना घातलेलें कडें; ( सामा. ) वेढें; शेंबी. ' बंदुकीला कट पटयास नक्षी. ' –प्रला ४७. ३ अंगावर किंवा कपड्यावर बसलेलें मळाचें पूट, लेप. ४ सोंगटयांच्या पटांत × अशी खूण केलेलें घर, (ह्या घरामध्यें सोंगटी बसली असतां ती मरत नाहीं, तिला कटावर बसली असें म्हणतात). 'हिरवी मागें पिवळी लागे लाल बैसली कटीं। घरांत राहे पडून काळी तिची खुंटली गति । ' –विक ८६. ओकीबोकीच्या वगैरे खेळांत एक रंगाच्या चार सोंगटया. ५ तंबूच्या किंवा कनातीच्या काठ्यांचीं टोकें बसविण्यासाठीं आणि तंबूचे दोर ज्या जागीं बांधतात ती जागा सुरक्षित राहण्यासाठीं तंबूच्या कनातीला लाविलेली कातडी टोपी, खोबण; ( सामा. ) चामडयाचा कांठ; कड; पदार्थाची कड खराब होऊं नये म्हणून तिला घातलेला कातडी गोट. ६ गंडस्थल. 'प्रेरियलें भेदाया पतिधैर्यद्विरदकट कटाक्ष तिनें. ' –मोसभा ५.१६. ७ अमुक एक परिमाणाचा कडबा बांधण्याची दोरी ( साडेतीन हात लांबीची). –खरे ८५०. ८ आग्रह. –खरे ४४८६. ९ ( अ. ) सतारीचा पडदा. ( आ ) ज्यांतून सतारीच्या तारा ओवून खुंटीस बांधतात त्या भोकें असलेल्या हस्तीदंती पट्टया. १० हिरडे व लोखंडाचा कीस यांचें मिश्रण. (?) ११ बिझिक खेळांतील ४ एक्के, ४ राजे, इ० जे मार्कांचे संच ते. [ सं. कट्=आवरण घालणें, आच्छादणें; कट. तुल० का. कट्टु=बांधणें, रचणें, बंधन घालणें] **कटास हात लावणें**–देवळाची पायरी अथवा उंबरठा याला हात लावून विश्वासु राहण्याबद्दल शपथ घेणें; ( एखाद्या कार्याबद्दल अथवा गुप्त मंडळीबद्दल ), वेलभंडार उचलणें.

**कट**—पु. कष्ट; त्रास; दुःख; यातना; वेदना (अव.) (क्रि० खाणें; भोगणें ). [ कष्ट ]

**कट**—पु. १ सैन्याचा एक गट, व्यूह, विशिष्ट रचना. २ गुप्त मसलत; व्यूह; विभू. 'तुम्हाला त्या सर्वांनीं वेगळें टाकण्याविषयीं कट केला आहे. ' ' आमच्याविरुद्ध पुण्यांत कट झालेला आहे कीं नाहीं बोल ? ' –इंप ३७. [का. कट्टे=रचना, बांधणी]

**कट**—पु. १ पुरण शिजवून आमटीसाठीं त्यांतील जें पाणी काढतात ते. २ काढा; कषाय; घाणेरडें पाणी ( कपडे धुतल्यानें झालेलें ). [ का. कट्टु=डाळीचा, कडधान्याचा रस ]

**कट**—स्त्री. कटि; कंबर. ' सुंदर ते ध्यान उभे विटेवरी। कर कटावरी ठेवूनिया । '–तुगा १. ' विटेवरी पाय, कटेवरी हात। ' [ कटि, कट ]

**कट**—पु. कूट गाणें. 'कटावरि कट बंदावरि प्रबंद । ' –दावि १६३. [ का. कट्टु=रचणें ( कविता, नाटक इ० ), कटाव ]

**कट**—पु. मनाई; थांबविण्याचा हुकूम. 'ते जाणोनियां एम्पेर दोरु । लोकासि कटु केला थोरु । म्हणे न करा युदेअनचा संसारू । ऐसा डांगोरा पिटिला । ' –ख्रिपु २.४२.१३७. [ का. कट्टु=प्रतिबंध करणें ]

**कट**—पु. १ घाव; वार; फटका. २ (क्रिकेट) बोलरनें टाकलेला चेंडू अडविणें ( डाव्या बाजूस न मारतां ); दिशा बदलणें (चेंडूची). याचे फॉरवर्ड कट, स्क्वेअर कट व लेट कट असे प्रकार

आहेत. –व्यायाम १०.१९२२. [इं.; तुल० सं. कृत; प्रा. कट्ट= कापलेलें, छिन्न ]

**कट**—पु. काळा रंग; कीट. [ सं. किट्ट ]

**कट**—पु. १ ( कुण. ) कड; शेवट; बाजूचा गोट. २ ( बा. ) शेताचा बांध. [ कड; का. कट=शेवट ]

**कटई**—पु. चांभारांतील एक पोटजात; यांतील लोक पडद्यास कट लावितात. कट अर्थ ५ पहा.

**कटक**—न. १ सैन्य. 'एकीं पाषाण वाऊनि उतरलीं । समुद्र-कटकें ॥ '–ज्ञा १०.३६. 'हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनी गोधना खळ तो । ' –मोविराट. ( नवनीत ) ७१. 'तरी बहुत कटक घेऊन । ज्येष्ठासि धरी तूं वेष्टून । '–राvि ३८.१३९. २ कंकण; कडें ( हातांतील ). 'परंतु मुगुट नव्हे कटक । कडें मुगुट होइचना ॥ ' –यथादी १५५७. 'यश हारविलें तेंथें किंति शस्त्रें हार कुंडलें कटकें ॥ ' –मोआदि ३२.३२. ३ छावणी. ४ राजधानी. [ सं. ] ०उलगणें–( क. ) कार्य पार पडणें. म्ह० कटकास गुळवणी=सैन्याला गूळपाणी· जसें पुरणार नाहीं तसें ( पुष्कळ पाहुण्याना अपुरें अन्न ). अपुरेपणा. ०बंद–वि. सैन्या-सहित; सैन्यानें सिद्ध. 'खान कटकबंद केला ' –ऐपो ११. 'कट्कबंद फावे पुढें कीर्ति धावे । ' –दावि ३३३. ०बंध–सैन्य-रचना; व्यूह. 'वातें घनसा द्रोणें धर्माचा भेदिला कटकबंध । ' –मोद्रोण १०.४.

**कटक**---पु. ( गो. ) नारळाचा एक प्रकार.

**कटक**—न. कटकी पहा

**कंटक**—पु. १ कांटा; वृक्षावरील टोंचायाजोगा अवयव. 'कंटकशल्यें बोथटलीं । मखमालीची लव वठली । ' –केक ( क्षपूर्ती ) १. २ माशाच्या शरीरांतील हाडांचा सांपळा. ३ ( ल. ) व्याधि; पीडा; दुर्जन; दुष्ट माणूस. 'भाविकां कंटक करिताती पीडा । ' –तुगा १२८९. 'पवित्राला म्हणती नको हा कंटक । '–तुगा ४०८. ४ ( ल. ) क्रूर; रानटी माणूस. ५ चिक्कू; कृपण. ६ शत्रु; वैरी., आजि अकंटक केलें नृपनय-निपुणें सुयोधनें राज्य । ' –मोसभा ७.३. ७ ( शाप. ) अग्र; टोंक. ( इं. ) पाइंट. ८ अडथळा; अडचण. 'माझ्या मार्गांतला तो कंटक आहे. ' [ सं. ]

**कंटक**—वि. सोशीक; काटक पहा.

**कटकई**—स्त्री. सैन्याचा तळ. 'उपरी श्रीरामचंद्रकि कट-कई । ' –वैद्यकबाड ८०. [ सं. कटक, कटकिका ]

**कटकट**—स्त्री. १ भांडण; कज्जा; तंटा. म्ह० 'मिया आणि बिबी व कटकट उभी. ' २ किरकीर; बडबड; गडबड; गलबला; गोंगाट. ३ युद्ध. 'दळीं केला कटकट । '–दावि ४९६. –पया १०७. ४ त्रास; पीडा; भुणभुण. 'नेणती वैकुंठनायका । वृथा कटकट करिताती । ' –ह १६.६४. 'काशी केली वाराणशी केली तरी कपाळाची कटकट नाहीं गेली.' ५ घासाधीस; तक्रार. ( क्रि० करणें ). ६ आवाज ( घड्याळाचा ); किटकीट; कांहीं त्रासाचा, रागाचा शब्द. [ ध्व. कट्.; सिं. किट्किटी ]

**कटकट**—उद्गा. दुःखोद्गारः अरेरे ! हायहाय ! कटकटा पहा. 'अहा कटकट ! ते काळीं. ' –एभा १०.४२५. आहाकटा पहा.

**कटकटणें**—अक्रि. १ ( कों. कु. ) चुटचुटणें; हळहळणें. २ स्वतःविषयीं त्रासणें; स्वतःवर रागावणें; वैतागणें. ३ कलकल करणें. ४ कटकट करणें; त्रासाचा, रागाचा आवाज करणें. [कटकट]

**कटकटा**—उद्गा. ( काव्य ) दुःख, त्रास, असंतोष याचा उद्गार; दैवाला दोष लावतांना काढलेला उद्गार; हायहाय ! हा नशीबा ! प्रारब्धा ! 'एथ अर्जुन म्हणे कटकटा । '–ज्ञा ११. ४५२. 'मग म्हणे गा कटकटा । किती करूं गे आहाकटा । मर मर विधातया दुष्टा । काय अदृष्टा । लीहिलें ॥ ' –एरुस्व ५.६९. 'यमसम यम समरीं हे पाहुनि म्हणतील तूं कटकटा कीं ' –मोउद्योग ४.६. [ सं. ]

**कटकट्या**—वि. कटकट करणारा; किरकिऱ्या; तुसडा; चिडका; भांडखोर. [ कटकट ]

**कंटकत्वक्**—पु. ( प्राणि. ) ताराकृति प्राणी; या वर्गातील प्राण्यांच्या कातडीवर कांट्यासारखे ·केंस असतात. –प्राणिमो १३६. [ सं. ]

**कटट्–कन–कर–दिशीं**—क्रिवि. पट्दिशीं मोडण्याचा आवाज ( घट्ट दोरी, काठी इ० चा ) होऊन; कट् असा आवाज करून. [ ध्व. ]

**कटकरणें**—अक्रि. १ ( वे. ) तुटणें ( दोर, काठी इ० ). 'दोर नवा करकरीत बाजारांतून आणला पण पाणी ओढतांना कटकरला. ' २ ( व. ) हूं कीं चूं करणें. [ कट् करणें ]

**कटका**—पु. (हिं.) तुकडा; कुटका (भाकरीचा). [ध्व, कट्]

**कंटकारी**—स्त्री. १ रिंगणी. २ सांवरी. ३ वेहकळीचें झाड. [ सं. ]

**कटकी**—स्त्री. दालचिनीच्या पानासारखें पान असलेलें, १२।१५ फूट उंचीचें चिवट झाड. याचें फळ लहान असून मुलें त्याचा नळींत घालून बंदुकीप्रमाणें आवाज करतात.

**कटकी( खण )**—पु. अपुरा, ( तीन सळी किंवा घडी ) कर्नाटकी खण; हा दक्षिणी बायकांना चोळीला पुरत नाहीं, थोडा जास्त ( एक घडी ) घ्यावा लागतो.

**कटगर-घर**—न. ( व. ) १ लांकडी कठडा; कटारा; कुंपण; कुडण. २ घराभोंवतालचें कंपाउंड, कुंपण. [ सं. काष्ठ+गृह; हिं. कटघरा–गरा ]

**कटंजन, कटिंजन**—न. १ कठडा ( नक्षीदार ); गरादा; गराद ( दार, खिडकी, गाडी, पलंग इ० कांचा ); कंपाउंड ( झाडा-भोंवतालचें ); कामटयांची उभी–आडवी जाळी; जाळीदार काम. २ अर्धी जाळी किंवा भिंत घातलेला ओटा. ३ ( माण. ) पिंपळ, औदुंबर वगैरेंच्या भोंवतालचा पार. ४ देवळाभोंवतालची प्रदक्षिणेची वाट; कटांजन. [ सं. काष्ठ+जनित ]

**कटणें**—अक्रि. १ अतिशय मळणें ( शरीर, वस्त्र इ० ); मळ बसणें; किटणें. २ एखाद्या गोष्टींत निपुण, तरबेज, तयार होणें. ३ विटणें; नकोसें होणें; किटणें. 'तेंच तेंच रडगाणें ऐकून कान कटले.' [ कट ]

**कटणें**—अक्रि. अतिशय मेहनत करणें, जिवापाड श्रम करणें. [ कष्ट ]

**कटणें**—अक्रि. १ ( हिं. )लढाईत ठार होणें; जायबंदी होणें; एखादा अवयव तुटणें, कापला जाणें. 'त्या युद्धांत हजारों माणसें कटलीं.' २ कापलें जाणें; कापणी होणें ( शेताची ). ३ कमी होणें ( खर्च, पगार, मजुरी इ० ); काट मारली जाणें. ४ कष्टानें जाणें; कसातरी निघून जाणें ( दिवस, इ० ) 'असें नसतें तर महेंद्राच्या घरामध्यें ती रात्र कटतीना!' –पपप्रे १८०. ५ (ल.व.) खजील होणें; शरमिंधें होणें. ६ तुटणें; छाटलें जाणें. [ ध्व. कट्; हिं. कटना=कापलें जाणें; तुल० इं. कट्. ] **कटून करणें**–झटून काम करणें. **कटून मरणें**–अखेरपर्यंत लढाई करून मरणें; हात, पाय इ० अवयव तुटून जाणें; लढाईत कापलें जाणें. 'कटून मरावें खरें असा धर्म क्षत्रियाचा। कसें रहा म्हणतीस घरीं डाग लागेल जन्माचा।' –होला १६७. **कटून लढणें**–पुष्कळांना मारीत मारीत लढणें; मोठ्या शौर्यानें लढणें.

**कटतर**—न. ( विणकाम ) खाटसरी पहा.

**कटता–ती**—पुस्त्री. मालाच्या पोत्यांत ज्या प्रमाणांत भोंगा ( पोकळपणा ) किंवा खोका असेल त्या प्रमाणांत त्या गोणाची किंमत कमी करणें; नुकसानभरपाई ( पल्ल्याच्या भावानें ); कडता पहा. [ कटणें ]

**कटतें व्याज**—न. तुटक मुदतीचें व्याज; कटमितीचें म्हणजे ( मुदतीच्या आंत सुद्धां ) ज्या मितीस परतफेड होईल तेथपर्यंतचेंच फक्त मितीवार आकारलेलें व्याज.

**कटदोरा**—पु. कमरेभोंवतीं बांधावयाचा चांदीचा, सोन्याचा, रेशमाचा, अगर साधा दोरा, गोप; सांखळी; करगोटा; करदोडा; कटिसूत्र. [ सं. कटि+म. दोरा; कटिस्त्र–कडतर–कडदर–दोर–दोरा ]

**कटपट**—पु. कमरेचें वस्त्र ( धोतर, लुगडें ). 'कटप्रदेशीं कटपटा' –वेसी ९.१६. [ सं. कटि+पट ]

**कटपट्टा**—पु. नळी घट्ट रहावी म्हणून बंदुकीभोंवतीं असणारें वेढें, कडी. 'बंदुकीला कटपट्यास नक्षी।' –ऐपो २१७. कट अर्थ २ पहा.

**कटबंद**—पु. गाडीच्या चाकाच्या तुंब्यावरील आंतील बाजूची कडी, पट्टी; बाहेरील बाजूच्या कडीला तोंडबंद म्हणतात [ कट ]

**कटबंद**—पु. कडदोरा; कटिबंध. 'कटबंध कौपीन अंगवसन.' –दावि २५३. [ कटि+बंध ]

**कटबंद**—पु. श्लोक; कटिबंध पहा. 'कटबंद वदले दासावरी' –दावि ७८७. [ का. कट्टु=रचणें; कट=कटाव+बंध ]

**कटमस्त–ता, कटमस्तान**—वि. ( हिं. ) १ धिप्पाड; गलेलठ्ठ; गबदुल; घटिंगण; बेडर. २ चढेल; मस्त; आडदांड. ३ ( व. ना. )हाडापेरानीं मजबूत; सशक्त; बळकट. 'बायको कटमस्त आहे.' [ हिं. कट+मस्त ]

**कटमिति–मुदत**—स्त्री. व्याजाच्या हिशेबाचा एक प्रकार ( ह्यांत कर्जाची रक्कम व्याजासह जसजशी फेडली जाते तसतसें मुद्दल कमी कमी होत जातें ); तूटमिती–मुदत ( तृतीयांत, षष्ठ्यंत प्रयोग–**कटमितीनें, कटमितीचा** ) [ हिं. कट+मिती=तिथी ]

**कटर**—वि. १ कापण्याचें यंत्र ( फोटोच्या बाजू, इ० ) २ कपडे कापून बेतणारा ( शिंपी ). 'कपडा उत्तम होणें हें सर्वस्वी कटरवर अवलंबून आहे.' [ इं. ]

**कटरा**—पु. ( हिं. ) चौक ( शहरांतील ); बाजार; किल्ल्याची बाजारपेठ. [ कट्टा ]

**कटरी**—वि. ( चांदा, ना. ) ठेंगणा; लहान.

**कटलरी**—स्त्री. चाकू, सुऱ्या इ० लोखंडी हत्यारें व तीं करण्याचा धंदा, कारखाना. [ इं. ]

**कटला**—पु. कडता पहा.

**कॅटलाग**—पु. १ ( इं. ) शाळेंतील मुलांचें हजिरीपत्रक. २ याद; यादी; जंत्री; टिपण; फेरिस्त. ३ माहितीपत्रक; अनुक्रमणिका; सुचिका. –के १६.४.२३.

**कटवट**—स्त्री. कमरेची किंवा मांडीची बाजू. 'लिंग आदळतां कटवटीं। आदळलें वीर्य।' –कथा २.५.६६. [ सं. कटि+वर्ती ]

**कटवणी**—स्त्री. पाथरवटाचें हत्यार; दगडफोड्याची पहार. ( सामा. ) पहार. 'कटवणीनें जमीन खोदली.' [ का. कटि=टाकीनें दगड फोडणें ]

**कटवणी**—न. १ शिजविलेल्या पुरणांतील आमटीकरितां काढलेलें पाणी; कोणत्याहि शिजविलेल्या उसळीचें पाणी काढून त्यांत ताक घालून केलेलें मिश्रण; कढ. २ गढूळ, खराब, मलिन पाणी (कपडे वगैरे धुतल्यामुळें झालेलें ). [ का. कट्टु; म. कट+वन=पाणी ]

**कटवणें–विणें**—अक्रि. ( व. ) खजील करणें. 'त्या प्रसंगीं बापूंनीं त्याला लगेच कटवला.' –उक्रि. १ कमी करणें; कापणें.

'घ्या हिशोब व्याज कटवा जी.' –होला १४३. २ तोडणें; छाटणें. 'मी ती वावडी कटविली.' [ कटणें ]

**कटवा**—पु. (व.) वेहकळीच्या लांकडाची मोठी टिपरी हिनें मुलें खेळतात. 'त्याच्याकरितां कटवा आणला नाहीं. [ कटणें ]

**कटसरी**—स्त्री. (गो.) कडोसरी कनवट-टी पहा.

**कटा**—उद्गा. हाय हाय! कटकटा! कटकटा पहा 'कटा मियां चाटिला। कुचस्वेदु।' –ज्ञा १३.५३९. 'भूप म्हणे कटा पोटा महद्भूत आलें केवें।' –दावि ४९०.

**कटा**—पु कट्टा पहा.

**कटा**—पु. १ (हिं.) वध, हत्या; कत्तल; कापाकापी; ठार मारणें. –होके १८. 'संपूर्ण कटा जाला.' –शिदि २९. २ रजपुतांचा जोहार. [ कटणें ]

**कटाई**—१ (व.) शेताची, पिकाची कापणी २ कापणीकरितां दिलेली मजुरी. [ हिं ]

**कटाकटा**—उद्गा. कटकटा पहा. 'म्हणती नाडलों कटाकटा' –रास २.२९.

**कटाकटी**—स्त्री. काटाकाटी. १ सर्वसाधारण छाटाछाट, कपात (विविध बाबी, वेतन इ० ची). २ (गु. ना.) भांडण, कटकट .[ कटणें द्वि. ] **कटाकटीनें**–क्रिवि. जेमतेम; ओढूनताणून; सरासरी.

**कटाकय, कीटाकोय**—(गो.) कोकिळ पक्षी. [ हिं. कोयल; म. कोयाळ ]

**कटाग्नि**—पु. अपराध्याच्या अंगाला गवत बांधून त्याला आग लावून जाळण्याची शिक्षा. [ सं. कट=गवत+अग्नि ]

**कटाचूर**—वि. १ (व.) पुरेपूर. 'सुधारायाला कटाचूर दोन महिने हवेत.' २ (माळवी) दोन देणारा दोन घेणारा.

**कटांजन** —न. कटंजन पहा.

**कटांदर**—पु. (कु.) ऊद; कांडेचोर; कलंदर, कलिंदर पहा

**कटाप**—पु. (गो.) उपाय; इलाज 'कटाप चलप ना.'

**कटाप**—वि. (पत्याचा खेळ) खलास; नास्तिरूप: अभावरूप. (क्रि० करणें). 'त्यानें किलावर रंग कटाप केला.' [ इं. कट् ऑफ ]

**कंटापार** —क्रिवि कांट्याबाहेर; कांट्यापार-पलीकडे. 'परि बद्रिकाश्रमी बद्रीतरु। त्यातें वर्णितां नसे पारु। कीं वाट दावी कंटापारू। तयामाजीं रिघाल्या॥' –नव १२.१७७.

**कटायी**—कलई, कटाह पहा.

**कटार-ट्यार**—स्त्री. १ सरळ व एक हात लांबीचें दोन्ही बाजूला धार व पुढें चिंचोळें टोंक असलेलें, पोटांत खुपसण्याचें एक हत्यार, हें कमरेला खोंवतात. 'तरी वायांचि कां बांधावी कटारें।' –ज्ञा ४ २३३. 'काढती मार्जीच्या कटारा। उभयांच्या कापिती शिरा।' –कथा ३.१०.१५०. २ कापडावर कट्यारीसारखी काढलेली वेलबुट्टी. ३ (ल.) दहशत; भीति; धास्ती; अंतर्यामी होणारें दुःख; आधि; मानसिक यातना; मनाला सतत बोंचणारें दुःख 'इंग्रजांचे उरावर कट्यार राहील.' –पया २५६. ४ अधिकाराचें एक चिन्ह; स्वराज्यांत मोठ्या अधिकाराचीं वस्त्रें देतांना शिक्केकट्यार सरकाराकडून मिळत असे. 'शिक्के देउन पट कटार दुसरी करा.' –ऐपो ३०५ [ सं. कट्टार; दे. कटार, कटारी; हिं. गु कटार; सिं. कटारो ] ०**जिवाला असणें-लागणें**–अतिशय दुःख काढणें; मनाला अतिशय काळजी लागणें; कट्यारीप्रमाणें दुःख, चिंता बोचत राहाणें. ०**उरावर-जिवावर-टाकणें**–(कर्ज, अपरिहार्य कर्तव्य, वाइटाची भीति, जबाबदारी इ० च्या) कचाट्यांत सांपडणें; नेहमीं आगामी संकटाच्या काळजींत असणें. 'इंग्रजांचे उरावर क० राहील' –पया २५६. ०**लावणें**–टोंचून बोलणें; निंदा करणें. ०**आरी**–स्त्री. (चांभार) काट्याची आरी, हिनें सुईशिवाय खालींवर दोरा आणतां येतो. ०**कांठ**–पु. (कापडाचा) कट्यारीप्रमाणें काढलेला कांठ. ०**वाह-हा**–वि. कट्यारवाला; कट्यार बाळगणारा (शिपाई). 'वाहाणी लाविती कटारवाहे. –उषा ११९०.

**कटारा**—पु कठडा; गरादा. [ सं. काष्ठ+द्वारक; प्रा. कट्ठद्वारय; हिं कटहरा=कठडा ]

**कटारी, कटारीदार**—वि. १ कट्यारीसारखे पेट, वेलबुट्टी, शिवण असलेलें (कापड, चीट इ० ). 'चोळी अंजिरी जरिकाठाची रंग कटारी नवा।' –पला ४.२१. २ कट्यारीप्रमाणें वीण असणारा (गोफ, दागिना, शिवण इ०). –स्त्री. १ लहान कट्यार. २ डोंगरकांठ, कपार; बाजू. 'डोंगरकटारीचे किल्ले.' –शिदि २८५. –शे ७ १५९. [ कटार, दे. कटारी ]

**कटाव**—पु १ व्यवस्थित बांधणी; डौलदार रचना; थाट; मेळ; देखावा (सैन्य, परिवार इ० चा). –शिल्पवि ५३९. २ (ल) आटोपशीरपणा; भारदस्तपणा; प्रौढपणा (भाषण, निबंध इ० चा). ३ व्यवस्थितपणा. तरतरीतपणा; भपका (पोषाख, चेहरा, चाल. रुवाब इ० चा) ४ सघ. कट, जूट 'आनंद घटाव ब्रह्म कटाव। थोर बिटाव हे गुरु कृपा।' –दावि ३१३,४७६. ५ एक प्रकारचा कवितेचा छंद. कटावाची कविता, ही एक धांवती रचना असुन यांतील गटांच्या पंक्तींची संख्या निश्चित नसते. अमृतरायकवीनें या छंदांत बरींच पदें केलीं आहेत कटिबंध पहा. ६ (ल) कत्तल; लढाईतील जोराचा हल्ला. 'कटाव करीत चालले जेव्हां तिराचे मार बसविली॥' –ऐपो २७८. [ सं. कृत्; अर. कट्= आकार, रूप, कापणी (कोट इ०) ची ] ०**गरी**–स्त्री. घालून

पाहून बोलणें. 'बहुतचि बोलिला कटावगरीनें' -दावि १८४.

**कटावणी**—स्त्री. १ व्याजकटावणी; कटमिती पहा. २ कटि बंध पहा. ३ कटवणी पहा.

**कटास**—पु. कष्ट; त्रास; संकट ( अन्न वस्त्र, घरदार इ० च्या अभावामुळें); काबाडकष्ट; कुत्तेघाशी; अंगमोड ( आजारी, त्रासिक, असंतोषी माणसाच्या शुश्रूषेमुळें, श्रमामुळें होणारी ). ( क्रि० काढणें; सोसणें; निघणें )

**कटासणी-णें**—उक्रि. कडासणी-णें पहा.

**कटासणें**—अक्रि. १ त्रास, संकट सहन करणें; हाल सोसणें. [ कष्ट ] २ दमणें; थकणें; भागणें. [ कटास् ]

**कटासन**—न. दर्भ, मोळ किंवा गवत यांची लहानशी एका माणसापुरती चटई; तृणासन; दर्भासन. [ सं. ] **०घालून बसणें**—१ तपश्चर्या करणें. २ ( ल. ) तपश्चर्येचें ढोंग करणें.

**कटाह**—पु. कढई; कटायी (कढई उलटी केली असतां तिचा आकार आंतून आकाशासारखा दिसतो. वेदांतांत ब्रह्मकटाह, अंडकटाह अशी आकाशास उपमा दिलेली असते ). 'तेथें ब्रह्मकटाह शतकूट। हो पाहत असे ॥' -ज्ञा १.१४७. [ सं. ]

**कंटाळ**—पु. १ कंटाळा; थकवा. २ वीट; शिसारी; तिरस्कार. कंटाळा पहा. **०खोर**-वि. कंटाळा करणारा; आळशी; टिवल्याबावल्या करणारा; सुस्त. [ कंटाळा+फा. खोर=करणारा ] **०वाणा-वाणी**-वि. कंटाळा आणणारा; त्रासदायक. [ कंटाळा+वान ]

**कंटाळणें**—अक्रि. १ त्रासणें; दमणें; भागणें. २ आळसणें. ३ शिसारी येणें; विटणें. [ सं. कठ् (=कृच्छ्रजीवनें)-कट-काटाळणें -भाअ १८३२; सं. कंटकिल; प्रा. कंटइल ? -कांटाळ ]

**कंटाळा, कटाळा**—पु. १ थकवा; शीण; भाग. ( क्रि० येणें). २ अरुचि; वीट; चिळस; खंती; शिसारी. ( क्रि० येणें ). 'पापा जयाचा कंटाळा।' -ज्ञा १६.४१९. ३ आळस. ४ भय; त्रास; कांटाळा पहा. 'कां हातीं घेतलिया माळा। फिटे सर्पाभासाचा कंटाळा।' -ज्ञा १५.५६०. [ कंटाळणें ]

**कंटाळ्या**—वि. लवकर त्रासणारा; कंटाळणारा ( काम, करमणूक, धंदा, इ० स ). [ कंटाळा ]

**कटाक्ष**—पु. १ डोळयाच्या कोपऱ्यांतून पाहणें ( साभिप्रायानें ); अपांगदर्शन-दृष्टि; डोळा घालणें, मारणें; वांकडी दृष्टि. 'काय चंचळु मासा। कामिनीकटाक्षु जैसा।' -ज्ञा १४.१७०. २ ( ल. ) व्यंग्यार्थाचें भाषण; छद्मीपणा; उपरोधिक भाषणाचा रोख. ३ दांत; राग; वैर. 'जेव्हां तेव्हां त्याचा माझ्यावर कटाक्ष ! मी काय त्याचें असें घोडें मारलें आहे ?' ४ क्रोधदृष्टि; गैरमर्जी. 'त्यानें माझ्याकडे कटाक्षानें पाहतांच मी भ्यालों.' ५ मुद्दा; ओर; रोख; कल; प्रवृत्ति. 'मोटमोठया रसिकांचाहि वरीलप्रमाणें कटाक्ष आढळेल.' -नि. 'गीतेचा सर्व कटाक्ष याच तत्त्वावर आहे.' -टि ४.५२३. [ सं. ]

**कटाक्ष**—वि. काटक; सहनशील (शरीर, माणूस). 'मेंढरापेक्षां बकरें कटाक्ष असतें.' -मराठी ३ रें पु. ( १८७३ ). ११८. -पु. कणखरपणा; सोशिकपणा; ( श्रम वगैरेचा ) काटकपणा. [ सं. काष्ठ+अक्ष=आंस; प्रा. कट्ट+अक्ष ? ]

**कटि**—स्त्री. १ कंबर; देहाचा मध्य भाग; माजी. २ कड ( कडेवर घेण्याचें ठिकाण ). 'कर कटीवरी ठेऊनिया।' ३ (नृत्य) नृत्यामध्यें कटिकर्में पांच आहेत:-कंपित, छिन्न, विवृत्त, उद्वाहित, व रेचित. [ सं. ] **०कांची**-कंबरपट्टा. 'कटिकांची वरी हिरे थोर। जैसे दिनकर जडियेले ॥' -रावि ८.८९. **०छिन्न**-न. (नृत्य) दोन्ही हात दोन्ही बाजूस वर उचलून पताकाहस्त करून मनगटांत सैल करून कंबर पुढें मागें हलविणें. **०तट**-न. कंबर; ढुंगण; कनवट. 'वंशी नादनटी तिला कटितटीं खोवोनि पोटीं पटीं।' -वामन, वनसुधा १८. **०न्हाण**-न. ( गो. ) कमरेपर्यंतचें स्नान. **०बंद**-वि. १ कटबंद पहा. २ संयमी; ज्यानें कामविकार आटोक्यांत ठेवला आहे असा (पुरुष, स्त्री.) **०बद्ध**-वि. १ कंबर कसलेला. २ तयार. ( क्रि० होणें; असणें ). **०बंध**-पु. १ कंबरपट्टा; कटिबंद; मेखला; कांची. २ भूमेखला; भूवलय; पृथ्वीच्या गोलावरील वातावरणाचा कल्पिलेला पट्टा, प्रांत; अयनवृत्तें आणि ध्रुववृत्तें यांच्यामुळें झालेले भूपृष्ठाचे भाग; हे पुढील प्रमाणें आहेत:-१. उष्णकटिबंध-कर्कवृत्त आणि मकरवृत्त यामध्यें ( ४७ अंश ) आहे. यांत उष्णता फार असते. २ समशीतोष्ण कटिबंध-अयन वृत्त आणि ध्रुववृत्त यांच्यामध्यें ( प्रत्येक ४३ अंश ) आहे. उत्तरेकडील तो उत्तरसमशीतोष्ण आणि दक्षिणेकडील तो दक्षिण समशीतोष्ण. यांत उष्णता व थंडी समसमान असते. ३ शीत कटिबंध-ध्रुववृत्त आणि ध्रुव यांच्यामध्यें ( प्रत्येक २३॥ अंश ) आहे. यांत थंडी फार असते. ३ कटाव; विविष्ट प्रकारची पद्यरचना. **०बंधन**-न. कंबरपट्टा; करदोडा. 'कटिबंधनें, अंगझोल परिधानपीतांबर प्रावरणें हे सामग्री आणावी.' कटिबंध पहा. **०भ्रांत**-न. (नृत्य) उजवा पाय सूचीकरून मग अपविद्ध करणांप्रमाणें करून कटिरेचित करणें. **०वात**-पु. कंबरेंत शिरणारा वात; कंबर धरणें. **०शूल**-पु. ( ल. ) अतिशय कामवासना; विषयलंपटता ( पुरुषाबद्दल वापरतात ). **-शूलाची व्यथा**-स्त्री. बाहेरख्यालीपणाचा छंद. **०संधी**-स्त्री. प्रत्येक गात्राचा आदिम भाग. ( इं. ) कॉक्स. ? **०सम(करण)**-न. ( नृत्य ) पायांचें स्वस्तिक करून पाय काढून घेणे व दोन्ही हात कटीवर ठेवणें व कमरेची एक बाजू थोडी वर करणें. **०सूत्र**-न. करगोटा; करदोडा; कंबरपट्टा; कटिबंद. [ सं. ] **०स्नान**-कटिन्हाण; पायापासून कंबरेपर्यंतचें अंग धुणें; स्नानाचा एक प्रकार.

**कटिंग**—न. १ ( शिवणकाम ) घेतलेले कपडे कापणें; शिवण्यासाठीं कापणें. २ केंस कापणें; केंस राखणें. 'हेअर कटिंग सॅलून. [इं.]

**कटिता-टा, कटेटा**—पु. (व.) जिम्मा; मक्ता; कंत्राट; करार. 'आम्हीं असा कटिता नव्हता केला.'

**कटिंदर**—पु (कु.) कलिंदर; कांडेचोर; ऊद; काळमांजर; हें झाडाच्या ढोलींत रहातें.

**कटिंजन**—कटंजन पहा.

**कटिबंध**—पु. कटिबंद; कटबंद; कटावाची कविता; यांत प्रास, अनुप्रास, यमकें यांची रेलचेल असते. कटाव पहा. उदा० 'श्री शुकयोगींद्रानें रंभेचा गर्व हरिला॥' ध्रु०॥ तरीच एथें जन्मा यावें, तरुणी कुचद्वय पेटे घ्यावें, मन्मथसरिता तरुनी जावें, तरुणीसंगें निसंग व्हावें, व्यर्थचि कां तारुण्य हरावें? तृणासनाला काय करावें? सुखमंचकीं मंदिरीं भरावें, गाढालिंगनिं शयन करावें,' इ० इ०. -अमृत २५. [कट+बंध]

**कटी**—कटि पहा.

**कटु**—वि. १ तिखट (मूळ अर्थ तिखट असा असुन पुढें कडू असा झाला). 'संस्कृतांत कटु म्हणजे तिखट आणि तिक्त म्हणजे कडू असा अर्थ असून ...' -गीर ८२१. तिक्त याचाहि मूळ अर्थ कडू असा असुन पुढें तिखट असा झाला. २ कडू. 'कटवम्ल लवण मेळें। गर्भवतीचे पुरती डोहळे।' -एभा १०.४३०. ३ तीव्र; उग्र; भयंकर. ४ अप्रिय; वाईट; दुःखदायक; मर्मभेदी ( भाषण इ० ). ५ (ल.) आवेशपूर्ण; जळजळीत; जहाल; तापट. [सं.] **०करंज**-पु. करंजाचें झाड व फळ; हें कडू व ज्वरनाशक असतें. **०तुंबी**-स्त्री. कडू भोपळा. **०फल**-न. १ कारली. २ कडू पडवळ; कंकोळ इ०. **०रोहिणी**-स्त्री. काळी कुटकी, कटुकी. **०वाण**-न. (रत्ना.) १ नापीक जमिनीची कायमधारा पद्धतीनें वंशपरंपरागत दिलेली देणगी. २ अशी देणगी दिलेली जमीन. [सं.]

**कटुकी**—स्त्री. कुटकी; एक औषधी झाड.

**कटुता**—स्त्री. १ कडवटपणा; तीव्रता. २ तिखटपणा; तीक्ष्णता. 'अंतर्मलिन द्रवतें चक्षु जसें पाहतांचि कटुतेला।' -मोआदि २४.२८. ३ अप्रियता. [कटु]

**कटुवण**—न. (क.) वाडवडिलांचें ठिकाण.

**कटुळतें, कटोळतें**—न. सराफाचा किंवा सोनाराचा गोल झोळणा; बटवा ( दागिने, वजनें, तराजू इ० ठेवण्याचा ). [का. कट्टले=सोनाराचीं वजनें, कट्टलेचील=वजनें, इ० ठेवण्याची पिशवी]

**कंटुली, कंटोली, कंट्टल**—स्त्री. करटोली; करंटुली.

**कटोत्रा**—कटमिती पहा. 'कटोत्र्याचे दोन आणे याज पासून घेऊं नये.' -विक्षिप्त २.५८.

**कटोरा**—पु. १ मोठी वाटी; मोठ्या तोंडाची पसरट वाटी; वाडगा; द्रोण. २ कडू भोपळा; जव्हेरी नारळ, लांकूड इ० चें ... [illegible] पात्र. 'कटोऱ्यांत दुग्ध श्वानीचें काढून।' -रामदासी २.७३. ३ (भरतकाम) वाटीप्रमाणें खोलगट जरीची टिकली. -वि. (ल.) लहान; सुंदर (स्त्री, मूल, गाय इ०). **कटोरी जनावरें**-१ (माण.) लहान जातीचीं जनावरें. २ ठुसका; ठेंगणा ( माणूस, जनावर इ० ). [सं. कटोरा; प्रा. कटोरग; हिं. कटोरा; सिं. कटोरो; गु. कटोरी-रो]

**कटोरी**—स्त्री. लहान कटोरा.

**कटोल** (व.), **कंटोलें-कंटोळ-ळी**—न. कटुलें (भाजी); करटोली, काटले.

**कटोळजें**—(कों.) कटुळतें पहा.

**कट्, कट्सीन**—पु. (नाटक) महालाचे नुसते खांब; जंगलाचीं नुसतीं झाडें, पाण्याचे नुसते प्रवाह, पर्वताचे चढउतार, इ० दाखविणारे पडदे किंवा पडद्याचे तुकडे. हे त्या त्या आकाराच्या चौकटी करून व त्यावर कापड ठोकून रंगवितात. जसें:- जंगलकट; महालकट इ०. [इं.]

**कट्ट**—न. (गो.) कवच; करवंटी.

**कट्ट**—स्त्री. १ कंबर. 'लवथवित मलपे दोंद। वेष्टित कट्ट-नागबंद।' -दा १.२.१६. [सं. कटि]

**कट्ट**—न. १ वेढें; अंगठी. 'रत्नजडित कट्ट झळके येकदंत.' -दावि ३७;४०४. २ एकोपा; जूट. 'कट्ट घालून राजकारणा। लोक लावी॥' -दा १५.२.२५. [का. कट्टु=बंधन, बांधणें] **०बंद**-जूट; एकत्रितपणा.

**कट्ट**—पुन. एक प्रकारचा आवाज (विशेषतः तार देण्याच्या यंत्रावर होणारा); खट्ट, खुट्ट आवाज; याशिवाय बाकीचे अर्थ कट शब्दामध्यें पहा.

**कट्ट-कन-कर-दिशीं**—कट-कन-कर-दिशीं पहा.

**कट्टर**—वि. १ (गो.) कटेर; जुनेंपुराणें; जीर्ण; फाटकें; नष्टप्राय. २ पुराणमतवादी; सनातनी. ३ (हिं.) हट्टी; दुराग्रही; निर्दय. ४ कट्टा; पक्का; पूर्ण; अट्टल; बिलंदर. [हिं.]

**कट्टा**—वि. १ बळकट; धिप्पाड; कंटक. २ हुषार; चतुर; निपुण; तज्ज्ञ; चपळ ( लेखक, वक्ता, योद्धा, स्वार, इ० ). ३ वीरश्रीयुक्त; शूर; उत्साहपूर्ण; तल्लख; धाडशी ( माणूस, मसलत, युक्ति ). -शिदि ३४३. ४ घनघोर; भयंकर; कडाक्याची; आवेशाची; कटाकटीची; जोराची (लढाई, कज्जा, भाषण, मेहनत). ५ थोर; अफाट; मजबूत; साहसी; बळकट (सैन्य, व्यूह). ६ अंत:करणापासुनचा; निग्रही; पक्का. 'औरंगजेब कट्टा मुसलमान होता.' ७ पूर्ण; पुरा; जाज्वल्य. उ० -कट्टा सुधारक; कट्टा

अभिमानी. [कट=अति, पुष्कळ; कटखादक=कट्टा खादाड. –भाअ १८३४]

**कट्टा**—पु. १ ओटा. 'घरापुढील कट्टा;' 'जकातकट्टा;' 'देऊळकट्टा.' २ (क.) ओझेंकऱ्यांनीं ओझें ठेवण्यासाठीं मोठ्या रस्त्याच्या बाजूला खांद्याइतका उंच बांधलेला ओटा; धर्मधक्का. ३ जूट. [सं. कट=आवरणें; ते. कट्टु=ओटा, बांध] ४ दुकानांची रांग, जसें–सराफकट्टा. [का. कट्टु=बांधणें; कट्टे=ओटा]

**कट्टा**—पु. कापाकाप; कत्तल; नाश –पया ३११. [अर. कत्अ; सं. कृत्=कापणें; प्रा. कट्ट] **०कट्टी घालणें**–(क.) पतंगांची काटाकाट. 'मी त्याच्या पतंगाशीं कट्टाकट्टी घातली.'

**कट्टी**—स्त्री. (कर्ना.) सोंगट्यांच्या पटातील कट, कट अर्थ ७ पहा. 'सोंगटी कट्टीला बसवा.' **०धरणें–गांठणें–बसणें**–(क.) निर्भय ठिकाणावर असणें. 'त्यानें कट्टीला धरली आहे. [सं. कटि; म. कट]

**कट्टी–ट्टे**—स्त्री. (गो.) करवंटी (नारळाची) हिचा उपयोग भांड्याप्रमाणें करतात. 'लेकांनो एक एक कट्टी फेणी तर आगाऊच वसूल केली आहांत।' –सह्याद्री २०१. [सं. कवच; म. कवटी] **०खायरो**–वि. (गो.) दरिद्री; भिकारी; दैवहीन.

**कट्टी करणें**—अक्रि. (कु.) मैत्री तोडणें.

**कट्टिमणी–नी**—पु. कट्टीमती. १ (भामटी बोली) भामट्यांचा नाईक; तालमड; तालदरू. –गु १३. २ (विजापूर) महारांवरील एक अधिकारी. [का.]

**कट्टेर**—कट्टर अर्थ १ पहा.

**कट्टेल**—न. (गो.) करवंटीचें तेल [कट्टी+तेल]

**कट्टो**—न. (गो.) फुटकें भांडें.

**कट्यार**—कटार–ट्यार पहा. 'फरस मुरज माड कट्यार।' –नव १२.१७०.

**कट्व**—वि. कटु, कडू. 'कटव तिक्षणें सर्वांग पोळे।' –दा ३.१.३१. [सं. कटु]

**कठ**—न. १ यजुर्वेदाची एक शाखा. कठऋषीनें ही रचिली. २ कटवल्ली नामक कृष्णयजुर्वेदाचें उपनिषद्. [सं]

**कंठ**—पु. १ गळा (हनुवटीच्या खालील व खांद्याच्या वरील शरीराचा भाग). 'कंठीं झळके माळ मुक्ताफळांची' –गणपतीची आरती. २ (गायन) गळ्यांतून निघणारा ध्वनि; आवाजी. 'स्वरावरुनि समजे कंठ.' 'तिचा कंठ फार मधुर आहे.' ३ (पोपट, कबूतर, चिमणा इ०) पक्ष्यांतील नराला तारुण्यावस्था प्राप्त झाली असता गळ्याभोंवतीं जी एक काळी रेषा उमटते ती. (क्रि० फुटणें). ४ भांडें वगैरेंच्या तोंडाखालचा आवळ भाग; काठ ५ श्वासनलिकेचें वरचें तोंड, मणका; नरडें; घसा. 'दुःखामुळें कंठातून शब्द निघेना.' [सं.] **०दाटणें–भरून येणें–सद्गदित होणें**–दुःख किंवा आनंद यांच्या उमाळ्यानें घसा दाटणें, त्यामुळें तोंडांतून शब्द न निघणें; आवेग येणें; सद्गदित होणें. 'दासाकडे हनुमंत पाहे। तों गहिंवरें कंठ दाटलाहे।' –संवि २.८५. 'सांगू जातां मुखानें। तों कंठ आला भरून।' –नव २२.४५. **०फुटणें**–(गायन) १ चिरका आवाज होणें. 'फार उंच स्वरांत म्हणूं नकोस, कंठ फुटला तर पंचाईत होईल.' २ कंठ (अर्थ ३) येणें (पोपट, इ० पक्ष्याला). ३ खणखणीत शब्द निघणें. 'त्याला नुकताच कंठ फुटला आहे.' ४ वयांत येणें; प्रौढदशा प्राप्त होणें. **०बसणें**–घसा बसणें; आवाज (गाण्यांत, भाषणांत) स्पष्ट न निघणें. 'उष्णकाळीं तेल तिखट खातां। तेणें बद्धक जहालें बहुतां। म्हणती कंठ बैसले आतां। नये गातां कीर्तनीं॥' –संवि २२.१२२. **०मोकळा करून रडणें**–मोठ्यानें रडणें; मनमुराद रडणें; ओक्साबोक्शीं रडणें; भोंकाड पसरणें. 'मोकळा करुनि कंठ तेधवां। आठवूनि मनिं जानकीधवा।,' –(वामन) भरतभाव १४.

**कंठास–कंठीं–प्राण येणें**–१ (भीतीनें, दुःखानें) अर्धमेलें होणें. 'प्रतिवचनप्रसंगीं प्राण कंठास आला।' –सारुह २.१०३. २ दुःखानें किंवा भुकेनें व्याकुळ होणें. **कंठास लावणें**–मिठी मारणें; आलिंगन देणें. 'कंठास त्यास लावून।' –संग्राम १५. **कंठीं प्राण उरणें**–आसन्नमरण होणें; धुगधुगी राहणें. 'त्याच्या नुसता कंठीं प्राण उरला आहे.' **कंठीं प्राण ठेवणें, धरणें–राहणें**–एखादी इच्छा किंवा आशा सफळ झाल्यावर मरूं अशा इराद्यानें जीव धरून राहणें. 'अस्थि शिरा दिसती नयनीं। प्राण कंठीं धरिले त्यानीं।' –संवि २०.७७. –ह २१.७२. 'तुम्हाविण कंठीं प्राण राहिला असे॥' –रत्न ४.३. 'मुलगा येईपर्यंत म्हातान्यानें कंठीं प्राण धरून ठेविला होता.' **कंठीं धारण करणें**–१ गळ्यांत घालणें (माळ, अलंकार, इ०). २ जपणें; स्मरण करणें. ३ अति प्रिय असणें. **०कार्कश्य**–न. कर्कश आवाज; आवाजाचा कर्कशपणा **०कोकिला–ळा**–स्त्री. (ल.) सुकुमार, मधुर आवाजाची स्त्री; पिककंठी. [सं.] **०गत**–वि. १ गळ्यांतील (दागिना, वस्तु इ०) २ नेहमीं तोंडपाठ असलेला (अभ्यास, वचन इ०); मुखोद्गत ३ गळ्याशीं आलेला. [सं.] **०गत प्राण**–वि. धुगधुगी असलेला; ज्याचा प्राण गळ्याशीं आला आहे असा. **०चामीकर न्याय**–पु गळ्यांत सोन्याचा दागिना असुन तो हरवला अशा समजुतीनें घरभर हिंडणें. समानार्थकः–काखेंत कळसा, गांवाला वळसा; गांडीखालीं आरी, चांभार पोर मारी. **०नाळ**–न. गळ्याची नळी. मान 'मग कंठनाळ आटे।' –ज्ञा ६.२०७ 'तदा कंठनाळांतुनी शब्द झाला' –गणपतिजन्म. [सं.] **०नाळ छिरणें**–गळा कापणें; ठार करणें. **०पाठ**–वि. तोंडपाठ; मुखोद्गत. 'धौम्य म्हणे तुज यावें शास्त्रासह कंठपाठ वेदानीं।' –मोआदि

२.५१. ०भूषण–न. गळयांतील दागिना. ०मणी–पु. १ गळयांतील हारामधील मुख्य मणी; गळयांतलें रत्न. २ गळयाचा मणका, घांटी. ३ (ल.) अतिशय लाडका; गळयांतील ताईत (माणूस, वस्तु). 'आवडते कंठमणी ही.' –संग्राम २९. ०मर्याद–क्रिवि. गळयापर्यंत. आकंठ पहा. 'आज मी कंठमर्याद जेवलों.' ०माधुर्य–न. (गायन) सुंदर गळा; गोड आवाज. [सं.] ०माळ–स्त्री. (गो.) गंडमाळा. ०रव–पु. आवाज. [सं.] ०रवानें, ०रवेंकरून–१ मुद्दाम; निश्चयानें; स्पष्टोक्तीनें. २ मोठमोठयानें ओरडून; घसा फोडून; कंठशोष करून. ०रवोक्त–वि. निश्चयानें सांगितलेलें (भाषण इ०). ०शोष–पु. १ (तहानेनें) घशाला पडणारी कोरड. २ (ल.) ओरड; उगीच घसा कोरडा करणें घसाफोड; व्यर्थ समजूत (काढणें); (क्रि० करणें). 'वादी प्रतिवादी कडून अतोनात कंठशोष होत असतांहि ...' –टि ४.१३१. [सं.] ०सूत्र–न. १ जानवें. २ मंगळसूत्र. [सं.] ०स्थ–वि. १ घशात अडकलेलें (बेडका, प्राण). २ गळयांतील (दागिना इ०) ३ (ल.) जिव्हाग्रीं, पाठ असलेला (अभ्यास, पाठ, इ०). ४ कंठस्थ वर्ण (गळयांतून ज्यांचा उच्चार होतो ते:–अ, आ, क, ख, ग, घ, ङ, ह). [सं.] ०स्थान–न. गळा. –वि. कंठस्थ पहा. ०स्नान–न. १ गळयाखालचें स्नान (विशेषत. बायकांचें), (क्रि० करणें). २ (ल.) मान छाटणें; शिरच्छेद करणें. (शीर छाटल्यानें आंतून वाहणाऱ्या रक्तानें होणारें स्नान); नागवणें; लुटणें. (क्रि० घालणें). 'थोंडी वाघासारख्या काळपुरुषास ज्यानें कंठस्नान घातलें, त्या बापू गोखल्याच्या पराक्रमाचें वर्णन काय करावें!' [सं.] कंठाग्र–न घसा; ध्वनि इंद्रिय. कंठ अर्थ ५ पहा. (सामान्यतः सप्तम्यंत प्रयोग), कंठाग्रीं. 'कंठाग्रीं संभ्रानीं धरियेला हरी। अवघ्या विकारीं व्यापियेला।' [सं.] कंठाभरण–न. १ गळयांतील एक अलंकार. 'सौभाग्यद्रव्यें कंठाभरणें.' –एरुस्व ६. ८७. २ घोडयाच्या मानेखालीं असलेला शुभदायक भोंवरा ३ गळयांतील ताईत; प्रिय. कंठावरोध–पु घसा दाटून येणें. घसा धरणें, बसणें. [सं.]

कंठक–वि. काटक; कंटक; चिम्मा; सोशीक, धाडशी [कंठणें]

कठडा–पु १ गरादा; गजे बसविलेली चौकट; गजाचें काम (पलंग, गाडी, दार, खिडकी इ० चें); कटारा. २ खोगिराचें खोड; खोगिराच्या बाजू ३ (बुरुडी) कुंडीच्या तोंडाला पेल्याच्या तोंडासारखा सभोंवार केलेला कामटयांचा कांठ. ४ कामटयांचा पिंजरा (आंत जनावर ठेवण्याचा). 'चित्त्यास बसण्यासाठीं एक कटडा केलेला असतो, तो घोडयावर ठेवितात.' –चिमा ३४. ५ गॅलरी; सज्जा. [काष्ठ+कट=आवरण; सिं. कट हडो] –ड्याचें खोगीर–न. चौकटीचें खोगीर; भोंवतीं कठडा किंवा गाद्या, गिर्द्या असलेलें खोगीर; खोड.

कठण–न. कटवणी पहा.

कंठणें–उक्रि. १ सहन करणें; सोसणें (आजार, दुःख). 'कैसा कंठूनिया राहों संवसार।' –तुगा ५६५. २ कष्टानें घालविणें, संपविणें; कसातरी काढणें (दिवस, काळ). 'रामदास हनुमंतासि म्हणे। मज सर्वथा न कंठे रामविणें।' –संवि २.८६. ३ गतीनें मार्ग अतिक्रांत करणें, तोडणें, चालणें (अंतर, रस्ता, प्रवास). 'तें मार्ग न कंठे तेणें। परी कष्टणें अनिवार।' –एभा ११.३७. [सं. कठ्, कंठ किंवा सं. कष्ट; प्रा. कट्ठ; का. कंटिसु=दुखणें, दुःख होणें]

कठरडा–पु. कठडा.

कठवणी–न. कटवणी पहा.

कंठा–पु. सोन्याच्या मण्यांचा, मोत्यांचा, हिऱ्यांचा किंवा इतर रत्नांचा गळयात घालावयाचा हार; माळ; कंठभूषण. २ फुलांचा गोलः एक प्रकारचा तुरा. तुरा पहा. [कंठ]

कटांजन–कटंजन पहा.

कठाड–डा–रा–पु. कठडा पहा.

कठाडीखोगीर–कठड्याचें खोगीर पहा.

कठाण–न, कठाणमठाण–न. १ मूग, उडीद, तूर वगैरे कडधान्य; कडदण, काठण पहा. २ (व.) रब्बीचें पीक. 'यंदा कठाण बरें आहे.' कठाणी ठेवणें–१ कडधान्यासाठीं, रब्बीसाठीं जमीन राखून ठेवणें. २ उपाशी ठेवणें. [सं. काष्ठ; प्रा. कट्ठ+दाणा]

कठाणी–स्त्री. बाबर. –शे ७.९१. (–नाको.)

कंठाळ–ळी–स्त्री. जनावराच्या पाठीवर दोहों बाजूस सारखी बसेल अशी पडशी, गोणी, बारदान. 'भरोनिया कंठाळ स्वामीपाशी यावें।' –रामदासी २.५७. 'भाऊ कंठाळीस गुंतला। चाकर पळाला।' –ऐपो ३३४. –वि (ल) पुष्कळ विषयांचा समावेश करणारा (ठराव). 'घोड्यावरील कंठाळींत ज्याप्रमाणें निरनिराळया वस्तू ठेवलेल्या असतात त्याप्रमाणें कंठाळी ठरावांत निरनिराळया विषयाचा समावेश केलेला असतो.' –टिव्या. [का कंट=पडशी, गोणी (जनावराच्या पाठीवरील); कंठतल+अंसिका–राजवाडे] ०लादणें–१ तट्टावर भारी गोण, ओझें ठेवणें. २ (ल) एखाद्यावर जबरदस्तीनें एखादी गोष्ट लादणें म्ह० तुम्ही आम्ही एक आणि कंठाळीला मेख; किंवा कंठाळीला हात लावूं नको=कामापुरतें नातें जोडणें; खोटी मैत्री, स्वार्थी स्नेह. [का. कटले]

कठाळू–पु. (व. ना.) सांड; पोळ. [सं. कठि=शोके, कृच्छ्रजीवने]

**कंठाळू**—पु. अळवाची एक जात. याचीं पानें मोठीं असून राजाळवापेक्षां लहान असतात. पानाचा रंग हिरवा असून देंठास लाल कंठ असतो. [ कंठ+आळू ]

**कंठाळया**—वि. १ कंठाळ, ओझीं वाहणारा, वाहण्याच्या लायकीचा ( पशु ). २ ( ल. ) मंदबुद्धीचा; जड ( माणूस ).

**कठिण-ठीण-न**—वि. १ अवघड; अशक्यप्राय; दुष्कर. २ संकटपूर्ण; आपद्ग्रस्त; कष्टप्रद ( गोष्ट, बनाव, प्रसंग). 'कठिण समय येतां कोण कामासि येतो.' –र १०. ३ घट्ट; बळकट; टणक; नरम नव्हे असें; जें तोडण्यास बळ लागतें असें. 'लोखंड कठीण असतें.' ४ करण्यास वाईट 'ही गोष्ट ( चोरी ) कठीण आहे!' ५ दुःखप्रद; सोसण्यास अवघड; जिवावरचें; मरणप्राय ( आजार, रोग, स्थिति ). ६ क्रूर; कठोर; दयाशून्य ( माणूस, कृत्य ). ७ मनास लागेल असें; कडक; कठोर ( शब्द, भाषण ). 'आपले झांकी अवगुण। पुढिलास बोले कठिण।' –दा ५.३.१२. 'वचन जयाचें कठीण। तो येक पढतमूर्ख॥' –दा २.१०.११. ८ समजण्यास अवघड ( ग्रंथ, अभ्यास, व्यवहार ). [ सं. कठिन; गु. सिं. कठण; पं. कटण–न ] **०वाटणें**–अवघड वाटणें; दुःख होणें. **-नोत्तर**–न. ( काव्य ) दुर्भाषण; शिवीगाळ; निर्भर्त्सना. 'म्हणोनि भांडे दिवस रात्र। कठिनोत्तर बोलत।' [ कठिण+उत्तर] **०मर्जी**–स्त्री. गैरमर्जी; इतराजी. **०वर्ण**–पु. ट वर्ग आणि जोडाक्षरें.

**कठिणत्व**—न. कठिणपणा; काठिण्य. 'यास्तव भाषांतराचें कठिणत्व यांत इतकें दिसुन येणार नाहीं.' –नि १९७६. [ सं. कठिनत्व ]

**कंठी**—स्त्री. १ पुरुषांच्या गळ्यांतील सोन्याचा किंवा मोत्याचा तीन किंवा चार पदरी माळेसारखा एक अलंकार, माळ. कंठा पहा. 'तैशी घेतां कंठीं मजसि तत्र कंठी धरियली.' –विविध ८.१.२०. [ कंठ ] २ तुळशीच्या मण्यांची केलेली माळ. ( सामा. ) माळ. ( विशेषतः पंढरीच्या वारकऱ्यांच्या गळ्यांतील ). 'लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठी। हिंडे पोटासाठीं देशोदेशीं।' –तुगा २७३०. ( क्रि० बांधणें=शिष्य करणें, बनविणें ). ३ सतारीचा किंवा विण्याचा भोपळा व दांडी यांच्या सांध्यावरील वर्तुळाकार हस्तिदंती काम. ४ अंगरख्यास गळ्याच्या ठिकाणीं शिवून जी हारासारखी एक प्रकारची नक्षी करतात ती. [सं. कंठिका; प्रा. कंठिआ] **०दार**–वि. कंठी असलेला ( अंगरखा ). अंगरख्याचा एक प्रकार. 'कंठीदार अंगरखा दुपेटा भरनक्षी भरजरी।' –होला १२१.

**कंठी**—स्त्री. ( गु. ) भाताचें लोंगर, कणीस.

**कंठीदार**—वि. धष्टपुष्ट; रुंद पुठ्ठ्याचा. 'म्हशी दोन सहस्र कंठिदार बाणीच्या.' –ऐपो ३०९. [ सं. कटि? ]

**कंठीरव**—पु. सिंह. 'वृद्ध म्हणे पांच पांडव। द्वैत काननीचे कंठीरव।' –पांप्र ३१.२१. [ सं. ]

**कठे-थे**—क्रिवि. ( खा. ) कोठें. [ सं. कुत्र; प्रा. कुट्ठ–कुत्थ; म. कुठें, कोठें; गु. कठे; सिं. कथे ]

**कंठेर**—पुवि. ( गो. ) सुंदर तांबडया कंठाचा; पोपट. [ सं. कंठ ]

**कठोर**—वि. १ टणक; कठिण ( दगड, लांकूड, इ० ). 'विस्तीर्ण वर्तुळ उदग्र कठोर भारी। वर्धिष्णु ते स्तन तिचे कनकानुकारी।' –र १५. २ निर्दय; दयाशून्य ( अंतःकरण, मन ). ३ तीक्ष्ण; बोचणारें; मर्मभेदी ( भाषण ). ४ कर्कश; भसाडा ( आवाज ); याच्या उलट कोमळ; मृदु. ५ सक्तीची; कडक; निष्ठुर ( शिक्षा, वागवणूक ). [ सं. ] **०वर्ण**–पु. कवर्गादि पांच वर्गापैकीं प्रत्येकांतील आरंभींचे दोन व शषस हे वर्ण.

**कंठ्य**—वि. १ गळ्यासंबंधीं; कंठांतून बाहेर पडणारा (उच्चार). २ कंठवर्गीय; कंठस्थानाचे (वर्ण). [सं.] **०वर्ण**–पु. कंठस्थ वर्ण; अआ, कवर्ग आणि ह. **०स्वर**–पु. अ आणि आ हे स्वर.

**कड**—स्त्री. कंबर. [ सं. कट, कटि ]

**कड**—पुस्त्री. १ बाजू; पक्ष. 'तूं सदानकदा त्याची कड घेऊन बोलत असतोस.' २ बाजू; टोंक; कांठ; शेवट; मर्यादा ( शेत, तळें इ० ची ). 'सुर्याची चकचकीत कड दामुस लवकरच दिसुं लागली.' ३ दिशा; प्रदेश; विभाग ( चतुर्थ्यंत, षष्ठ्यंत प्रयोग–ह्याकडेस; त्याकडेस; इकडचा; तिकडून इ० ). 'नये मंत्रादिक तयाकडे।' –ज्ञा १७.१९२. ४ ( व. ) बरगडयांची एक बाजू; कूस. ५ सीमा; पराकाष्ठा. 'तंव देओ भपती साचची। परि कड केलें आम्हीची।' –शिशु २००. ६ निकाल; शेवट ( आरंभिलेल्या कार्याचा ). 'अरे! असें करण्यानें तुझी कड लागेला का?' [ का. ते. कड=जागा, बाजू, दिशा; का. कट=शेवट ] **०ओढणें-घेणें-धरणें**–एखाद्या( माणूस, कार्य )ची बाजू धरणें; पक्ष स्वीकारणें. **०करणें**–( व. ) टिकाव धरणें. 'तुमचा भाऊ कड नाहीं करूं शकत यापुढें.' **०काढणें**–एका सपाटयांत, दमांत शेवटास नेणें; आरंभून संपविणें ( काम इ० ). **०चा**–वि. शेवटचा; कांठावरचा; कडेचा. **०चा रविवार**–पु. शेवटचा रविवार ( म्हणजे कधींच नाहीं ). **०लावणें**–तडीस लावणें; शेवटास नेणें. 'कडे लावूं आपुला काळ। सोडोनि तळमळ चित्ताची।' –भवि ५०.१४०. **कडावर ठेवणें**–( ना. ) उपाशीं ठेवणें; दुर्लक्ष करणें; उपेक्षा करणें.

**कड**—पु. कड्, कड् असा आवाज, ध्वनि (तारायंत्राचा इ०). [ ध्व. ]

**कड**—पु. ( राजा. ) कढ; उकळी; उसळी ( तापलेलें पाणी, राग वगैरेचा ); आंच; उष्णता. कढ पहा. **०काढून रडणें**–( राजा. ) ओक्साबोक्शी रडणें.

**कड**—पु. एक प्रकारचा रेतीचा दगड. [ का. कडु–कडल= दगड ]

**कंड**—स्त्री. १ खाज. २ खरूज. ३ ( ल. ) तीव्र इच्छा; स्फुरण; सुरसुरी; चेव ( लढाई, भांडण वगैरेची ). [ सं. कंडू ]

**कंड**—न. ( गो. ) बांबूची कांब. [ सं. कांड ]

**कँड**—न. ( गो. ) ज्वाळा. [ पोर्तु. इं. कँडल; लॅ. कॅंडेर= चकाकणें ]

**कडक**—वि. ( कडक असा मारतांना होणारा आवाज, यावरून ). १ टणक ( लांकूड, माती ); कमी चिकण. २ महाग ( भाव, दर ). 'विलायती हुंडीचा भाव घसरल्यामुळें सरकार कृत्रिम उपायांनीं नाणेंबाजार कडक राखून ठेवतें.' –के १०. ६.३०. ३ शिस्तीचा; तापट. 'आपले वडील मोठे कडक आहेत.' –विवि १०.५–७.१२४. ४ (ल.) कठोर; उग्र; रागीट. 'त्याची मुद्रा बरीच कडक दिसत आहे.' –विवि ८.१.५. 'ठाऊक नाहीं कडक मर्जी आमची.' –कफा १७. ५ जलाल; प्रखर ( भाषण, लेख, ऊन इ० ). 'उष्ण कटिबंधांत एकादे वेळेस उन्हाळा कडक होऊन सर्व पदार्थांचा सत्यनाश होऊन जातो' –पाव्ह ५५. ६ तेजस्वी; पाणीदार. 'कृष्ण पुरःसर पांडव आले हांकीत हय कडक डोहा।' –मोगदा १.१९. ७ वाळलेलें; आर्द्रता नाहींशी झालेलें (धान्य, भाकरी). ८ सणसणीत; जोराचा. 'अधिकाऱ्यानें त्याच्याविरुद्ध कडक रिपोर्ट केला.' ९ टणक पण ठिसूळ ( लोखंड, सोनें किंवा शिसें यांच्याशीं तुलना करतांना ). १० जहाल; झोंबणारें; उष्ण ( तिखट ). ११ कच्चेपणामुळें दडस ( फळ, भाजी ). १२ दणगट; निकोप ( माणूस, जनावर ). १३ ( ल. ) कडू; तीव्र ( औषध, तपकीर, विडी ). १४ तीक्ष्ण; बोचणारें ( थंडी ). १५ कर्कश; कानठाळ्या बसणारा ( आवाज, संभाषण ). [ ध्व. कड; तुल० सं. कड्डु = कठिण होणें. हिं. कडा= कडक; किंवा सं. कक्खट–वर्णव्यत्यय होऊन ] –क्रिवि. (ध्वनि) झपाट्यानें; चटदिशीं; चटकन; मोकळेपणानें ( उद्योग इ० होणें, करणें; माणसे इ०नीं धांवणें, चालणें ). ०**झोंप**–स्त्री. गाढ झोंप; शांत झोंप; तब्बल झोंप. ( क्रि० घेणें ). ०**बिजली**–स्त्री. १ कडक वीज. २ ( ल. ) चलाख; चपळ; तडफदार; तापट (घोडा, घोडी, स्त्री ). ३ ( ल. ) त्वरेनें मारा करणारी तोफ. ०**लक्ष्मी**–स्त्री. लक्ष्मीच्या ( देवीच्या ) उग्र स्वरूपाचें सोंग घेऊन भिक्षा मागणारा; आसुडवाला भिक्षेकरी- ( हा आसुडानें कडक असा आवाज काढतो म्हणून ). ०**बीज**–स्त्री. ( ल. ) कडक; तापट; चपळ ( मनुष्य, जनावर ). ०**सावित्री**–स्त्री. कडक, तापट, तडफदार, चलाख स्त्री. ०**हजामत**–स्त्री. राठ केस असल्यामुळें त्रास होणारी हजामत.

**कडक**—कडाका पहा.

**कडक**—पु (हिं.) (जंबिया, बांक) आपल्या हातांतील जंबियानें जाडादाराच्या उजव्या पायाच्या बाहेरील घोट्यावर मारणें.

**कडक**—पु. ( हिं. ) समुदाय; गर्दी; गोंगाट. 'पायदळ निशाण कडक पुढें उडाला।' –ऐपो ११०. [ सं. कटक ]

**कडक-का, कडाका**—पु. ( हिं. ) हिंदी भाषेंतील एक वृत्त, छंद. ह्या वृत्तांत भाटांचें गाणें असतें. याला वीर असेंहि दुसरें नांव आहे. अमृतरायाची कांहीं कविता या छंदांत आहे. याचें उदा० 'ध्रुवागमन ऐकतांचि भूप हर्षे मानितसे, तट तट तुटति कसे, पूर्व दिशे पूर्ण चंद्र समुद्रासि जसा दिसे, उचंबळूनि गर्जतसे.' –अमृत ११. 'नाना पदें नाना श्लोक। नाना वीर नाना कडक।' –दा १२.५.५. [ हिं. कडका–खा=यशोगीत, युद्ध गीत ] ०**भार**–पु. कडका गाणाऱ्या भाटांचा समुदाय. 'कडकभार निघाले।' –वेसीस्व ६.५६.

**कडकड**—पु. नगारा; ताशा; टाळ; ढोल इ० चा आवाज; वाद्यांचा ध्वनि; गोंगाट; कडकडाट. [ ध्व. ]

**कडकड**—पु. ( गो. ) हुडहुडी; थंडीचा कांकडा. [कडकड]

**कडकडां**—क्रिवि. नगारा, ताशा इ० वाद्यें वाजणें; वाळलेला पदार्थ मोडणें, संतापून शिव्या देणें, झाड मोडणें वगैरेच्या आवाजाप्रमाणें किंवा उकळणाऱ्या तेलाच्या कडकड आवाजाप्रमाणें; कडकन ( क्रि० वाजणें, फुटणें ). 'कडकड फाटतें गगन।' –विक १०९. कडकड शब्द उडाला गडगड गगनांत खांब जो चिरला॥' 'प्रगटे सिंह नराकृति ... '; 'कडकडां जांभया येती।' –दा १८.६.३. [ ध्व. कड द्वि. ] ०**दांत खाणें**–त्रासानें किंवा रागानें जोरानें दांतावर दांत घासणें; जोरांत दांत खाणें. ०**भेटणें**–जोरानें आलिंगन देणें; मिठी मारणें; कडकडून भेटणें.

**कडकडणें**—अकि. कडकड आवाज होणें ( वीज इ० चा ). 'कडकडिला भडभडिला।' –दावि २७८. २ अतिशय उकळणें, तापलें जाणें (पाणी, तेल, रागांत असलेलें माणूस). 'बहु कडकडे परशें, जैसा अति तैलपाक थेंबानें।' –मोभीष्म ११.५६. ३ वादळ होणें; प्रलयकालाप्रमाणें स्थिति होणें. 'बारा सूर्य कडकडिले।' –दा १३.४.७. ४ जोरानें रागावणें; तणतणणें; खवळणें. 'धिक्कारिति किति कीं या बाहिर सोडूनि भय कडकडो हा' –मोगदा १.१९. ५ मोडणें; तुटणें; आदळणें; आपटणें. ६ रागावून मोठ्यानें बोलणें; शिवीगाळ करणें. –न. भांडण; कज्जा; कलह. [ कडकड ]

**कडकडविणें**—उक्रि. (गो.) कांपविणें; थरारविणें; धास्ती उत्पन्न करणें.

**कडकडाट**—पु. १ कडकड असा मोठा शब्द; कडाका; दणका; गर्जना. कडकड पहा. 'राक्षसांचा भार कडकडाट।

वाद्यांचा होय दणदणाट ॥' २ (ल.) निष्ठुरपणा; कडक स्वभाव; तापटपणा. ३ (ल.) आक्रोश; धडपड (नाखुषीमुळें). 'सात्विक त्याग करी विवेकनिष्ठें। तामस त्याग करी कडकडाटें।' -एभा १३.१५२. [कडकड]

**कडकडाटणें**—अक्रि. कडकड असा आवाज होणें; मोठ्यानें शब्द होणें (धनुष्याच्या दोरीचा, मोडण्याचा, तुटण्याचा, इ०). 'सीत ओढिता आकर्णे। कडकडाटें घोष दारुण।' [कडकडाट]

**कडकडा वाल**—पु. (कों.) भाजल्यामुळें कडकड वाजणारा वाल; भाजलेला कडवा वाल.

**कडकडी**—स्त्री. १ कडकडीतपणा; ताठरपणा. २ जास्त वाळल्यानें होणारा (कापड, पानें, कागद, इ० चा) कडकड आवाज; फडफडी. ३ तापानें अंगीं येणारी कचकच, कांटा, हींव; कापरें; कंप; हुडहुडी. [कडकड]

**कडकडीं**—स्त्रीअव. (गो.) डोक्यांत घालण्याचीं सोन्याचीं लहान फुलें. [ध्व. ?]

**कडकडीत**—वि. १ दाताखालीं फोडतांना आवाज देणारा, कुडकुडीत; कुडुंकुडं वाजणारें (तळलेलें वाटाणे वगैरे). २ अतिशय उष्ण; कढत (ऊन, पाणी इ०). अति प्रखर; ऐन (दुपार). 'कडकडित दुपारीं चेतला अग्निभारी।' -मुंव १२६ ३ ताजी; तयार; पक्की; चांगली अवगत (विद्या, ज्ञान); त्या विद्येनें भूषित (माणूस). ४ भाडभीड न ठेवतां केलेलें; स्पष्ट; मोकळें; खुलें (भाषण, व्यवहार); अशा स्वभावाचा; स्पष्टवक्ता; तापट (मनुष्य). ५ अक्षरशः शास्त्रोक्त आचारविचार पाळणारा; फार सोंवळा; अत्यंत शुद्ध; पवित्र; कट्टा (माणूस, सोवळें). 'रामायणाचें वैशिष्ट्य स्थापन करणाऱ्या अनेक गोष्टींपैकीं कडकडीत चातुर्वर्ण्य ही एक गोष्ट असल्यामुळें आम्ही या गोष्टीस फार महत्त्व दिलें आहे.' -मसाप २.२.११. 'स्वतः पंतचरित्रकारहि तत्पूर्वीच्या पंतलेखकाचे बाबतीत कडकडीत सोंवळे राहिले आहेत असें नाहीं' -भक्तमयूर केका प्रस्तावना १५. ६ वाळलेलें आणि कडकड आवाज करणारें; शुष्क (कापड). ७ नैष्ठिक; अत्यंत नियमित; न चुकतां पाळलेलें; अतिशय कठिण (व्रत, ब्रह्मचर्य, तपश्चर्या, वैराग्य इ०). ८ खरेखुरें, जागृत (पिशाच्च, वारें, सचार). ९ (काव्य) खडबडीत; रखरखीत. 'तंव वल्कलें कडकडीत कठिन। नेसतां नये सीतेलागुन।' -रावि १०.१४९. [ध्व. कडकड]

**कडकडून**—क्रिवि. १ जोरानें आवळून; गच्च; दृढपणें (बांधणें, आवळणें, मिठी मारणें). २ (गो.) भिडून; थोपटून. ३ आवेशानें; जोरानें; रागानें; त्वेषानें; चवताळून (अंगावर जाणें). ०चावणें-रागानें, धावून जावून, जोरानें, चावणें. 'पुच्छ रगडिता नागें धावाव कडकडोनि चावावें।' -मोकर्ण १४.३. [कडकडणें]

**कडकणा-णी-णें**—पुस्त्रीन. १ नवरात्रांत (अगर इतर वेळीं) देवीच्या वरील मंडपीला टांगलेले कागदाचे नक्षीदार वाटोळे तुकडे. २ वरील आकाराच्या तळलेल्या पुऱ्या; तेलच्या; फुलोरा. 'कृष्णालागीं तेलवणें। आणलीं कडकडीत कडकणें।' -एरुस्व १५९०. -वेसीस्व ८.११७.

**कडकणी**—स्त्री. क्षयासारखा एक रोग; झडी; हाडीज्वर. (क्रि० बमणें). [कडक]

**कडकणें**—अक्रि. १ वाळणें; सुकणें; कडकडीत होणें (कापड, भाकर, इ०). २ अतिशय सुकल्यानें तडकणें; उलणें. ३ शुष्क होणें; आकसणें; करपणें (थंडीनें, उष्णतेनें उभें पीक इ०). ४ पक्कें होणें; वाळणें; कापणीला तयार असणें (गवत, धान्य इ०). ५ अशक्त, दुबळें होणें (माणूस, जनावर). ६ कडकड वाजणें (चावतांना भाकरी; कापताना गवत; जळतांना कांटे, वाळलेले कपडे, कागद इ०). 'बहु वाद्यें मेळा कडकत भरें व्योम भरलें।' -दावि २२३. ७ खूप रागावून मोठ्यानें भांडण करणें; ताशेरा झाडणें. 'गोदूबाई पुन्हां कडकल्या.' -हांकाध ९९. ८ कडकड वाजणें; गडगडाट होणें (मेघ, वारा, वीज यांचा). 'वीज कडकडली.' 'तया तेजापेक्षां कडकत बळें वात सुटला।' -दावि २५५. ९ महाग होणें; जास्त वाढणें (बाजारभाव). -शे ८.१८७. **कडकून सांगणें-बोलणें**-मोठ्यानें, जोरानें सांगणें; बोलणें, ओरडणें, शिरा ताणून बोलणें. [कडक]

**कडकतवाला**—वि. कडका गाणारा (भाट). कडका छंद पहा. 'गवई, गाणारणी, कडकडतवाले भाट, धाडी, नाटकवाले व भांडांचे तमाशे वगैरे जास्त नोकरींत ठेवण्यांत आले.' -ऐरा ६९.

**कडका**—पु. कडाका-खा. १ अतिशयपणा; तीक्ष्णपणा; भर; तीव्रता (ऊन्ह, थंडी इ० चा). 'उन्हाचा-थंडीचा कडका.' 'आज थंडीचा मोठा कडका पडला आहे, नाहीं?' २ एकाएकीं झालेलें अतिशय दुःख (अंग भाजलें, पलिस्तर मारलें असतां होतें तसें). ३ कडकडाट; गर्जना (मेघांची); दणदणाट; खणखणाट; घोष; गजर (अनेक वाद्यांचा). 'टाळी भजनाचा करवूनि कडका' -दावि २६८. 'मंगळतुराचा कडका।' -वेसीस्व ६.६९. ४ जोराचें भांडण; रागाचा आवेश. 'आला क्रोधाचा कडका।' -दावि ३१४. ५ ओरडा, रड (अतिवृष्टि, अनावृष्टि, दुष्काळ, सांथ, परचक्र वगैरेबद्दल). अधिक अर्थासाठीं कडाखा व तडाखा पहा. ६ थाट; मौज. 'आरंभला उत्छाह कडका' -दावि २४८. ७ ज्वारीवरचा एक रोग (यानें पीक वाळतें). (क्रि० पडणें). -शे ७.१९५. ८ (कातकरी) आवाज; चाहूल. 'रथाचा

कडका लागतांच राजाच्या मुलानें धांवत जाऊन देवाचा रथ धरला.'–मसाप १.३.३१.–क्रिवि. सपाट्यानें; तडाख्यानें; त्वरेनें; तत्परतेनें (काम, माणसाचें बोलणें किंवा क्रिया चालणें). [कडक]

**कडका**—पु. (हिं.) हिंदी पदाचा एक वीररसप्रधान, उत्तेजनपर प्रकार; पोवाडा; वीरश्रीचें कवनः एक छंद. 'भाट बोलती कडका। धडाधडी होतसे।' –दावि ४९६. कडक पहा.

**कंडका**—पु. (बे.) खांड; तुकडा; ओंडका (लांकडाचा). (क्रि० पाडणें). 'लांकडाचा एक कंडका फोड.' ०**पाडणें**–(क.) तोडून टाकणें; भानगड मिटविणें. [सं. खंडक]

**कडकांगी**—वि. सडपातळ; किडकिडीत; किरकोळ. [कडक+अंग

**कडकावणी**—स्त्री. फटका; तडाखा. [कडकावणें]

**कडकावणें-विणें**—अक्रि. १ चापणें; हजेरी घेणें; रागावून बोलणें; खरडपट्टी काढणें (रागें भरणें, निषेध करणें; ताकीद देणें अशा वेळीं). २ आवेशानें बोलणें; गर्जना करणें. 'तो जेव्हां कडकावला, धनुवरी ठेला उभा भूतसा।' –आसी ३५. –उक्रि. १ (थप्पड) मारणें; (चाबूक) लगावणें; सडकून काढणें; चोपणें. 'मालकानें आपल्या नोकराला चांगलाच कडकावला.' २ निर्भयतेनें, स्पष्ट बोलणें, सांगणें; झोकून देणें; म्हणून दाखविणें; (उत्तर, आधारवाक्य इ०). [कडका]

**कडकावून, कडकून**—क्रिवि. १ त्वरेनें; लागलीच; झपाट्यानें. २ धमकावून; धडकून; न भीतां. कडकडून पहा. [कडकाविणें]

**कडकिंद**—पु. डांग; आकारानें व चवीनें शिंगाड्यासारखा पांढरा कंद. याचे काप उकडून खातात. [कुडा+कंद ?]

**कडकी**—स्त्री. १ अंगांत भिनलेली अतिशय उष्णता (उपदंश, उग्र औषध, विष, ताप इ० ची); मुरलेला, भिनलेला ताप; हाडीज्वर. (क्रि० बसणें). २ आग; दाह; ताप. (कु.) क्षयरोग. 'तेका कडकी लागली हा.' =त्याला क्षयरोग झाला आहे. [कडक]

**कंडकी**—स्त्री. (क.) (न्हावी) हजामतीच्यावेळीं मांडीवर, अंगावर घालण्याचा कापडाचा तुकडा. 'अरे तुझी कंडकी फार घाण आहे.' [सं. खंडक; कर्ना. कंडका]

**कडकुसर**—स्त्री. (व.) काटकसर; कसोशी. 'मोठ्या कडकुसरीनें त्यानें संसार चालविला.' [कड+कुसर, काटकसर]

**कडक्या**—पु. ज्वारीचा एक रोग; कडका पहा. –शे ११. १५५.

**कडंग**—वि. १ वाळलेलें; कडकडीत (अनावृष्टीमुळें अगर अतिपक्वतेमुळें बनलेला–तांदूळ इ०). २ फार भाजलें असतां, चावतांना किंवा दळतांना कडकड वाजणारें; कठिण; खट्टर (धान्य, भाकरी). 'ताक घालशील तर कडंग भाकरी खाईन.' ३ खरपूस; पक्कें. –पु. धान्यांतील टणक दाणा; गणंग. [ध्व.]

**कडंग**—स्त्री. थोडासा ताप; अंग कोंबट होणें; कणकण. [कडत+अंग]

**कडंगणें**—अक्रि. १ कडंग होणें (भात, पोळ्या वगैरे वाळल्यामुळें). २ अतिशय तापल्यामुळें किंवा कांडण्यामुळें कणी होणें, चुरा होणें. [कडंग]

**कडंगी-डांगी**—स्त्री. (राजा.) तापाची कणकण; कणकणी; अंग माडल्यासारखें होणें. (क्रि० येणें; लागणें; भरणें; जाणें; निवणें). [कडंग]

**कडगुलां-लें**—न. १ (राजा.) कडें; कांकण; बांगडी. 'अडगुलंमडगुलं, सोन्याचं कडगुलं.' २ आधेल्याच्या(सापाच्या) अंगावरील काळें वर्तुळ, रेषा [कटक]

**कडगें**—न. कडें; वांकी; एक अलंकार; दागिना. 'वांकि, साखळें अनंत, हस्तकडगें.' –ऋ १३८. [सं. कटक; प्रा. कडग]

**कडचा**—(व.) सराटा; कलथा; उलथणें. –महाराष्ट्र १९१९. [?]

**कडचा**—वि. १ कडेस असणारा; कांठचा; कडेचा; बाजूचा. २ कडील. ३ पक्षाचा. 'दर्यावाई आपल्याकडची फार दिवस राहील असें साबाजीस वाटलें नाहीं.' –विवि ८.६.१११. [का. कडे] ०**आदितवार**–पु. शेवटचा आदितवार (कधींच न येणारा), (जी गोष्ट कधींच करावयाची नसते ती करावयाची असें वरवर दाखविण्यासाठीं ठरविलेला दिवस). 'कडच्या आदितवारीं.' ०**पोहणारा**–पु. १ नदीच्या तीराजवळच्या उथळ पाण्यांत पोहणारा. २ (ल.) फाजील सावधगिरी बाळगणारा (माणूस, व्यापारी, सट्टेबाज, घोडेस्वार इ०). २ लांबून, दुरून मदत करणारा; प्रत्यक्ष संकटांत उडी न टाकणारा.

**कडची**—स्त्री. लहान कढई. [दे. कडच्छु; गु. कडची; सिं. कर्छु; हिं. कर्छी]

**कडची, करछी**—(खा. व.) पळी (आमटी वाढण्याची). 'पितळेची एक कडची पाहिजे.' [गु. कडछी]

**कडझील**—चिकारी (तार) पहा.

**कडडड**—उद्गा. (झाड, वीज वगैरे पडतांना होणारा) धडाडाडा आवाज; गडगडाट. –क्रिवि. धाडदिशीं; धप्पकन्; काडकन्. [ध्व.]

**कडण**—स्त्री. १ (राजा.) नदीचा किंवा पर्वताचा कडा; दरड; टोंक; कड. २ शरीराची एक बाजू; सैन्याची एक बगल; बरगड्यांची बाजू किंवा कडसणी याअर्थी कडणपेक्षां कडणी (अव.) असा प्रयोग राजापुराकडे आढळतो. कोंकणांत कांहीं

ठिकाणीं ह्याच शब्द एकवचनींहि आढळतो. ३ नेसलेल्या वस्त्राच्या घासण्यानें कुशीना होणारी खरूज. [ कड ]

**कडण**—न. ( गो. ) मुगाची डाळ व गूळ एकत्र शिजवून केलेली आमटी; कढण. [ कढणें ]

**कडण-णें**—स्त्रीन. ( कों. चि. ) चटईप्रमाणें विणलेला नारळीचा झाप; झावळी; साऊळ. [ सं. कटन; प्रा. कडण=घरावरील पांजरण, ओमण ]

**कंडण-न**—न. कांडणें; मार; कांडण पहा. 'अश्वासहित वीरकंडन एकसरें मांडिलें।' [ सं. कंडन ]

**कडणी**—स्त्री. १ ( कु. ) ओमणाच्याखालीं आधार म्हणून घरावर घालावयाची बांबूची काठी. २ कडण पहा.

**कंडणी-नी**—स्त्री. मुसळ. [ सं. कंडन ]

**कडणें-नें**—शअ. कडून; बाजूनें; पासून; ज्या दिशेनें. [कड]

**कडत**—( कर्ना. ) ( सोंगटी ) उडतपगडयाच्या डावांत एका पक्षानें दुसऱ्या पक्षाची सोंगटी प्रथम मारणें. 'त्याचें अद्याप कडत झालें नाहीं.' [ का. ]

**कडतर**—न. १ जुनी-मोडकी टोपली, शिप्तर, चटई, चाळण इ०. २ जुनें, रद्दी, चिंध्या झालेलें वस्त्र. 'जैसें जीर्ण कडतर। परी म्हणाया वैभवी थोर छत्र।'—नव १७.१३३. ३ नारळाचा जुना झांप; खडतर. [ सं. कट+तर ]

**कडतर**—खडतर पहा.

**कडतरणें**—अक्रि. १ अंगीं भिनणें, बोचणें; खडतरणें पहा. 'कुसी कडतरतांती भाले।'—शिशु ९७१. २ बाजूस पडणें. 'जीव्हार भेदलें कडतरला।'—उषा १४०६. [ सं. कट=कड+तरलित=बाजूस पडलेला ]

**कडतरी**—स्त्री. शेताचा लहानसा तुकडा; लागवडीस योग्य असें लहान शेत.

**कडता**—पु. ( चाळीस शेरांचा ) वजनी एक मण जिन्नस विकला असतां त्याच्यावर द्यावयाचा वर्ताळा ( उदा० तूप, गूळ, तेल यांच्या दर मणामागें १॥ शेर कडता मिळतो. ०कांटा-पु. अडत्याला अर्ध्या पल्ल्यावर किंवा एका आख्यावर जो वर्ताळा मिळतो तो. कांहीं ठिकाणीं हा कडता दर वजनी पल्ल्यास १०॥ शेर असतो आणि कांटा २॥ शेर असतो, मिळून १३ शेर, हे कच्च्या पल्ल्याच्या १२० शेरांत मिळविले म्हणजे १३३ शेरांचा पक्का पल्ला होतो. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं कांटा व कडता यांचें प्रमाण निरनिराळें आढळतें. पुण्यांत गूळ वजन करतांना १ मणाच्यापुढें ढेपेचें वजन भरल्यास मणामागें चार शेरप्रमाणें कडता ( वजन ) कमी करतात. [ का. कडत=छाट ]

**कडता**—वि. ( ना. ) ऊन; गरम; कढत पहा. ०**कडता**-क्रिवि. गरमागरम; कढतकढत; ऊनऊन. [ कढणें ]

**कडतेल**—( कों. ) ( नाविक ) तेलांत थोडीशी राळ कढवून तयार केलेलें तेल. हें गलबतांस पाण्याच्या वरील भागाला लावतात. [ कढणें+तेल ]

**कडदण-दाण-धण-धान्य**—न. द्विदलजातीय, डाळी करण्याचें धान्य ( मूग, मठ, उडीद, तूर, मसुर, हरभरा, पावटा, वाटाणा इ० ) [ सं. काष्ठ+धान्य; प्रा. कट्ठ+धन्न ]

**कडदोर( मणदोर )**—पु. ( जुन्नरी ) वाघुर ( एक जाळें ) वरचे व खालचे बाजूनें ज्या दोऱ्यांतून ओवून घेतलेलें असतें त्या दोऱ्या; कडेचे दोर. [ कडा+दोर ]

**कडदोरा**—पु. करगोटा; कट(टि)दोरा पहा. 'पायीं घागरिया सरी। कडदोरा वांकी।'—तुगा १२५. 'कडदोऱ्याला घागऱ्या शोभत नाहींत.'—कमं १.३२. [ सं. कटित्र, किंवा कटि+दोरा ]

**कडनाळ**—न. ( बे. ) तांब्याचें भांडें.

**कडनिकड**—स्त्री. १ निकडीचा प्रयत्न. 'ते कड-निकड करून कच्चे चाळीस कोस भुई चालून चार घटका रात्र आहेतों लष्करापासोन दोन कोसांवर दाखल जाहले.'—भाव १३१. २ शेवट; तड. 'कडनिकडीला निर्वाणीला।'—संग्राम ८८. [ कड+निकड ]

**कडप**—न. १ हरभऱ्याचीं, तुरीचीं वगैरे झाडें काढल्यानंतर तीं वाळण्यासाठीं त्यांची घातलेली लहान रास ( पेंढया बांधण्यापूर्वीं ); शेत कापतेवेळेस शेतांतच बांधल्यावांचून जे कवळे टेवीत जातात ते प्र. कडपी-पें. —शे ६.१८५. २ ( कांहीं ठिकाणीं ) धान्याची कापणी. [ प्रा. कडप्प=समूह, निकर ]

**कडप**—( गो. ) गुळानें भरलेली काहील. [ सं. कटाह ? ]

**कडपल**—न. ( बे. ) कडदण पहा. [ सं. काष्ठ+फळ; प्रा. कट्ठ+फल ]

**कडप वळणें-बसणें-होणें**—क्रि. अशक्त, रोड होणें; वाळणें.

**कडपा, कडपा पाग**—न. ( कों. ) एक प्रकारचें जाळें.

**कंडपास**—पु. ( गो. ) काढणीचा फांस.

**कडपी-पे**—स्त्रीन. पीक कापून जमिनीवर टाकलेल्या जुडया, त्यापैकीं प्रत्येक; कडप पहा.

**कडप्या**—स्त्री. ( अव. ) सूर्य चित्रा नक्षत्राजवळ असणें व त्या वेळचा पाऊस ( हा पाऊस पडतो तेव्हां शेतामध्यें बाजरीच्या कडप्या वाळत टाकलेल्या असतात ); [ कडप ]

**कडबंची**—कडवंची पहा.

**कडबड**—स्त्री. गुरानें कांहीं खाऊन व तुडवून टाकलेला कडबा; गुराचा उष्टा कडबा. [ कडबा ]

**कडवडीत**—वि. कडकड, सळसळ असा वाळलेल्या पदार्थासारखा आवाज करणारा; कडकडीत अर्थ ६ पहा. [ ध्व. ]

**कडबा**—पु. १ कणसें कापून घेऊन उरलेलीं जोंधळयाचीं वाळलेलीं ताटें ( गुरांना खाण्यासाठीं ); वैरण; कडबाड; कडबी. २ ( ल. ) निरुपयोगी पदार्थ; गाळ; गदळ. [ सिं. कड्ब; हिं. कडबी; का. कडबे; तुल० सं. काष्ठ+वृध्; प्रा. कड+वड्ढ–कडवाढ–कडबाड ]

**कडबाड**—न. धान्याचें ताट; कडबा. 'हीरवीं कडबाडें। तेंचि तोडीतु आलें चहूंकडे।' –शिशु ९६५.

**कडबानायकीण**—स्त्री. ( कडब्याप्रमाणें क्षुद्र किंवा कडबा वाहणारी ) स्वस्त रांडरूं; म्हातारी–जख्खड कुंटीण.

**कडबी**—स्त्री. १ जोंधळा कापल्यानंतर त्याच्या ताटास पुन्हां येणारी फूट ( ही उन्हाळयांत गुरांना खावयास घालतात ). २ ( चुकीनें ) कडबा.

**कडबू**—पु. १ कणकीच्या पापडींत चण्याच्या डाळीचें पुरण घालून तळलेली मोठी करंजी; पुरणाची करंजी; एक पक्वान्न. २ ( ल. ) यःकश्चित माणूस; फालतू मनुष्य. ३ ( थट्टेनें ) कानडी लोकांस म्हणतात. [ का. कडबु, कडुबु ]

**कडबोळें, कोडबुळें–बोळें**—न. १ भाजणीच्या पिठाचा तेलांत तळून केलेला एक पदार्थ; हा वाटोळा, अर्धवाटोळा असतो. २ कडबोळयाच्या आकाराचा पदार्थ. ३ शोभेच्या दारूचा केलेला एक कडबोळयाचे आकृतीचा प्रकार. –अग्नि ३. **अठराधान्याचें कडबोळें**–अठरा शब्द पहा. [ सं. कट+वलय ]

**कडमड–डां, कडमोड–डा**—स्त्रीपु. १ तापापूर्वी किंवा त्यानंतर येणारी कणकण; ( क्रि० येणें; भरणें ). कडंगी–डांगी पहा. 'आंगास तीच्या कडमोड आला।' –सारुह २.६९. २ दुखणें गेल्यानंतर वाटणारी हलकता; रोगाच्या झटक्यानंतर येणारी ग्लानि; ( क्रि० राहणें; येणें; होणें ). ३ गळवाची ठसठस; पाय, डोळे, दांत यांची होणारी आग; अतिशय परिश्रम केल्यानंतर अस्वस्थता वाटणें इ०. [ सं. कृष्; प्रा. कड्ढ; किंवा सं. क्रथ्; प्रा. कढ्; काढणें+मोडणें ]

**कडमडणें**—अक्रि. १ ताप येण्याचीं पूर्वचिन्हें होणें; अंग रसरसणें; शिरशिरी येणें; अंग कुसमुसणें. ( वाप्र. ) **हिंवानें, तापानें, कडमडणें, कडमडत निजणें, पडणें, कडमडून येणें.** २ आग होणें; दुखणें; ठसठसणें ( गळूं, पाय, दांत, इ० ). कडमड अर्थ ३ पहा.

**कडमणी**—पु. (सोनारी) जाळीच्या मण्याशेजारीं ( दोन्ही बाजूस ) असणारा सोन्याचा अष्टपैलू मणी; करमरा मणी. [ कडा=बाजू+मणी ]

**कडय**—न. ( तंजा. ) हातांतील कडें; वलय. कडें पहा.

**कंडरा**—पु. गळयाचा दोर; काढणी. [ सं. कंधरा ]

**कडलग**—न. १ कडें. 'कंठीं कडलग सोनसळें।' –मुसभा १५.२१३. 'भुजीं केयूर हातीं कडलगें।' –स्वानु ५.१.२२. [ सं. कटक ]

**कडलगी**—पु. कडें; लोखंडाचें वलय ? 'प्रेमाचा कडलगी टाकौनि कैवल्य दुर्गे।' –भाए १६५.

**कडव**—पु. दारावरची देवडी. 'मेळविले थोवे–कारीं। कडवांपाशीं॥' –शिशु ५०२. [ कवाड ? ]

**कडव**—वि. कडू. 'पीत मनोहर वृंदावन। वरी चांगलें आंत कडव पूर्ण।' –जै ५३.११६. [ सं. कटु; हिं. कडवा ]

**कडवई, कडवी**—स्त्री. १ उडदाचा डाहळा. कडव्या वालाचा वेल. ? २ कडूपणाची अवस्था; कडवटपणा. [ सं. कटु ]

**कडवकें**—न. कडकपणा ( ? ). –शर.

**कडवंची**—स्त्री. कडवंची; जोंधळयाच्या शेतांत उगवणारा एक वेल. याच्या मुळाशीं कांदा असतो. याचीं फळें सुकलेल्या मनुकासारखीं बारीक व हिरव्या रंगाचीं असतात, त्यांस कडवंच्या म्हणतात व त्यांची भाजी करतात. [ सं. कटु+द्रा. हंची=गवत; हिं. कडवंची ]

**कडवट**—वि. कडसर; किंचित् कडू. [ सं. कटुवत; हिं. कडवाहट ]

**कडवणी**—स्त्री. कडू पाणी. –खिपु. [ कटु+वन=पाणी ]

**कडवर**—क्रिवि. कडेपर्यंत; शेवटपर्यंत; समाप्तीपर्यंत. [ कड=शेवट+वर=पर्यंत ]

**कडवली**—स्त्री. ( कु. ) एक प्रकारचें मातीचें भांडें.

**कडवसा–सें**—पुन. अंधार; आडबाजू. 'आणि ललाटपटाचिये खोळे। कैसे भयातें भेडविताती डोळे। हो कां जे महामृत्यूचे उमाळे। कडवसा राहिले।' –ज्ञा ११.३६४. 'फिटलें भेदाभेदाचें कडवसें।' –ज्ञा ७.११२. [ कूट+वास ? कडा=बाजू+वास ? ]

**कडवसा**—पु. प्रतिबिंब. कवडसा पहा. 'जो अमृताचा कडवसा।' –ज्ञा ४.१७४. 'तेज सूर्य जयाचेनि उजाळे। कडवसेनी।' –अमृ २.२३. [ कवडसा ]

**कडवसी**—स्त्री. कडोसरी; क० 'देशोदेशींची पाटौळी भरिया फोडलिया कडवसी।' –धवळे ४०.

**कडवळ**—न. १ उन्हाळयांत पाणथळ जमिनींत गुरांना घालण्यासाठीं केलेला ओला चारा ( बाजरी, ज्वारी, मका यांचा ); चाऱ्यासाठीं पेरलेलें शेत. 'तैसें कडवळ फोकिलें नोव्हे। सोंपटचि राहे वाढोनियां॥' –निगा १९७. –शे ६.२५५. २ मक्याचीं ताटें. [ सं. काष्ठ+म. वल, प्रत्यक्ष; हिं. कडवी=बी ? ]

**कडवळ**—न. ( गो. ) कोठा व आंतडें यांचा अंतर्भाग; कुस ( शरीराची ). 'तुझेया कडवळाची संधी। जी अमृताची

निधी। ती सबळ करें अगाधें। दुखंडी केली॥' -ख्रिपु २.५४.१९. [सं. कटि+वलय ?]

**कडवळीया**—वि. कैवारी; कळवळ बाळगणारा. 'ना तो शृंगाराचा कडवळिया।' -शिशु २.६४,

**कडवा**—वि. १ कडू; (गोड, याच्या उलट, भाजी पाला वगैरे शब्दास लावतात). गोडा पहा. २ जहाल; रागीट; तापट. ३ ज्याच्या अंगीं भांग, अफू, इ० कैफ जिरून गेले आहेत असा; दुखणें, रोग इ० ज्याच्या सरावाचा झाला आहे असा; नाजूक, कोमल राहिला नाहीं असा. ४ उपदंशादि विकार न बाधणारें ज्याचें शरीर आहे असा. ५ शूर; निर्भय; धाडसी. (खून, मारामारी, लढाई इ०मध्यें). घनचक्कर; घोर (लढाई, तंटा). ६ रानटी; आडमुठा; व्यवहार करण्यास कठिण. ७ क्रूर; निर्दय; पाषाणहृदयी; कठोर. -पु. १ वालाची एक जात. २ बदामांतील कडू जात. ३ खाजरा सुरण. ४ अनौरस; अवैवाहिक संतति; कडू जात. [सं. कटु; प्रा. कडु; हिं. कडवा]

**कडवां**—क्रिवि. कडेवर 'ऐसें म्हणनि दासिचिया कडवा। पुत्र बैसविला बरवा।' -कथा १.१०.१४७. [सं. कटि]

**कडवॉ-वो**—पु. (गो.) कांबीची वई; कूड; बांबू, कांबी इ०चा पडदा. [कूड]

**कडवाय**—वि. (गो.) कडवट. 'दोडगीं कडवाय आस.' [कडवा]

**कडविखा**—स्त्री. कडवटपणा. -शर.

**कडविड**—स्त्री. किडुकमिडुक; (सोन्याचा) चाराचुरा. 'करूनि कडविड जमा। घडली लगड।'-तुगा ३४८४. [स. कृत; प्रा. कट्ट-कड द्वि.]

**कडवी**—स्त्री. १ कडव्या वालाची वेल; कडवा. २ (ल.) अफू; अफीण.

**कडवी जात**—स्त्री. १ कडू जात; जारज वंश. २ क्रूर; रांगडी; अडाणी जात. [कडु]

**कडवें**—न. आंकणकडव्यानें किंवा पालुपदानें जेथें गाण्याचा एक भाग संपतो तो भाग; पद्यविभाग. [कड=शेवट]

**कडवेळ**—न. कडवळ पहा.

**कडस**—क्रिवि. जोरानें; खेंचून, (क्रि० बांधणें).

**कडस**—न. पाडस; लहान गुरूं. 'वेउलीं त्रशिलें वच्छ। कीं पाशमुक्त कडस।' -ऋ ६१. [का. कडसु=लहान गाय]

**कडसणी-नी**—स्त्री. १ (काव्य) चौकशी; विचार; वाटाघाट; परीक्षा; शोध; निवड. 'ये युक्तीचि कडसणी। नाहीं जयाच्या अंतःकरणीं।'-ज्ञा २.३४२. 'बैसउनि केली कडसणी। निज निष्ठेची।' -रास ४.२९१. 'नित्यमुक्त आणि जीवन्मुक्त। हेंहि कडसणी हे निभ्रांत। ते उपाधि आरोपित। म्हणूनच॥' २ नाडा; दोरी (बटव्याची, गाडीवरील बोजा आवळण्याची, पडद्याची, तंबूच्या कनातीच्या वरच्या भागाची इ०). 'ऐसा सद्गुरु पूर्णपणी। तुटे भेदाची कडसणी॥' -दा ७.१.१८. ३ (ल.) मंथन; घुसळणें. 'करितां दधिकडसणी। मग नवनीत निर्वाणीं। दिसे जैसें॥' -ज्ञा २.१२९. ४ (ल.) विचार; भेद; भेदभाव. 'मी तूं हे कडसणी।' -विपू २.४१. 'देव भक्त हे कडसणी। निरसोनि गेली॥' -दा ८.८.१८. ५ (ना.) धाकदपटशा; तंबी; दटावणी; काच. 'तेथें द्वैतबुद्धीची कडसणी।' -परमा २.१९. ६ चातुर्याची रचना (बोलण्याची, लिहिण्याची). [सं. कृष्; प्रा. कड्ढ=खेचणें; का. कडे=घुसळणें ?] ०देणें-(व) पखवाज किंवा तबला आवळून बांधणें. ०घालणें, **कडसणींत धरणें**-अडचणींत घालणें, पेचांत आणणें; घोटाळ्यांत पाडणें. -स लागणें-उतरती कळा लागणें.

**कडसणी**—स्त्री. १ (कों.) बाजू; बगडया; कूस. 'त्याच्या कडसण्या तटाटल्या.' 'हें गुरूं कडसण्या हाणतें.' २ कनवट; कडोसरी; कमरेजवळचा नेसलेल्या वस्त्राचा भाग (हिच्यांत लहानशी वस्तू खोचून ठेवतात) (क्रि० खोचणें, खुपसणें). 'कडसणीचा पैसा, सुपारी, डब्बी.' [सं. कटि]

**कडसणें**—उक्रि. १ जोरानें बांधणें, आवळणें (गांठोडें, पखवाज, तबला इ०). २ कस लावणें, निक्षून करणें. 'श्रीगुरु-कडसुनि गोष्टी पुमतां ऐसी। शिष्य अंतरीं चमकला॥' -स्वानु ११.३.२६. ३ घुसळणें. ४ (ना.) घट्ट बांधणें; मारणें; चोप देणें. [कडसणी पहा]

**कडसणें**—उक्रि. १ विचार करणें; कसास लावणें; परीक्षा घेणें. 'आतां दया ते ऐसी। पूर्णचंद्रिका जैसी। निववितां न कडसी। सानें थोर।' -ज्ञा १६ १५४. २ (ल.) निवड करणें. 'परी तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयांतें कडसावें।' -ज्ञा ६.२७.

**कडसणें**—अक्रि. क्षीण होणें; अशक्त होणें; वाळणें. [दे. कड=क्षीण, दुर्बल]

**कडसणें**—उक्रि. १ कढविणें; अग्निशोधन करणें; तावून सुलाखून घेण, कसास लावणें. 'मग ज्ञानाग्निसंपर्कें। कडसिलें विवेकें।'-ज्ञा १.५२. २ (ल.) निवडणें; शुद्ध करणें. 'ज्ञानाग्निहुताशीं कडशिलें वोजा। आत्मसिद्धी काजा लागूनियां।' -तुगा ३९५८. [सं. क्वथ्; प्रा. कढ; का. कडसु=कढविणें]

**कडसर**—वि. कडवट; किंचित कडू. [कटु+सदृश]

**कडसर**—पु एक प्रकारचें झाड. घोडयास होणाऱ्या कृमिरोगावर याच्या बियांचें चूर्ण दुसऱ्या कांहीं औषधांच्या चूर्णाबरोबर देतात. -अश्वप २.४६.

**कडसर**—स्त्री. टेकडीची उतरती बाजू; उतार. [कड+सरणें]

**कडसरणें**—अक्रि. १ एका बाजूस जाणें; एकीकडे होणें. २ (ल.) अंग काढून घेणें; मागें हटणें. [कडे+सरणें]

**कडसरा**—पु. (धान्याच्या) मुढयाभोंवतीं बांधावयाचा दुहेरी दोर. [कड+सर]

**कडसरी**—स्त्री. १ पाटीच्या, दुरडीच्या, कांठाचा वरचा घट्ट विणलेला भाग; कड; कांठ. २ पाटीच्यामध्येंहि मजबुतीसाठीं अधिक सरी घालून घट्ट वीण करतात ती. ३ पर्वताच्या कडयांचा प्रदेश. ४ (हेट.) घराच्या ओटयावरचें (काठाचें) भाडवें लाकूड. ०स येणें-अवघड कार्यें करीत असतां मेटाकुटीस येणें. [कड+सरी]

**कडसरी**—(गो.) बांबूच्या बारीक काठया दोरांनीं विणून केलेलें जाळें. [प्रा. कडसक्करा-बांबूची काठी, वांसा? कड+सरी]

**कडसरी**—कडोसरी पहा.

**कडसाण-र**—वि. (गो.) कडवट; कडसर पहा.

**कडसूत**—न. करगोटा. 'म्हणून पुच्छ वज्रानें केलें कडसूत रामदामा।' –पला ३८. [सं. कटि+सुत्र]

**कडसूर**—न भात कापल्यावर त्याचे जमिनींत राहिलेले खुंट.

**कडळ**—न. कडवळ पहा.

**कडळ**—करड पहा. ०काढणें-पर्यायापर्यायानें पद्धतशीर रीतीनें न करतां एकदमच सरासरी करून टाकणें (काम).

**कडा**—पु. १ डोंगराचा सुळका; खडपा; डोंगराची तुटलेली बाजू, कड; पर्वताच्या धारेखालचा नीट उभा प्रदेश. (क्रि० तुटणें). 'आणि शोकाचा कडा उपडता' –ज्ञा ७ ८७. [सं. कट-आवरणें; कट-ड. कटक-कडअ-कडा-भाअ १८३१; हिं. कडाडा-कडा]

**कडा**—पु (व.) तुराटयांचा किंवा वेळूचा तट्टया, कूड. 'मध्यें कडा लावून एका खोलीच्या दोन खोल्या बनविल्या' [सं. कट]

**कंडा**—(गो.) विणलेल्या चुडताचें इरलें. [सं. कट; प्रा. कड=तृण?]

**कंडा**—पु. १ खोटया अभिमानानें ताठणें, फुगणें; स्वतःच्या महत्वाचें प्रदर्शन; दिमाख; डौल. [कंड्]

**कंडा**—पु. वरून सकलाद किंवा चांदीचा पत्रा मढविलेला दोराचा तुकडा: (घोडया-बैलाच्या गळयांतील) शोभेचें चन्हाट; कंठभूषण 'सजें तोडर पाखरा सजहुमे कंडे पटे चांगले।' –साुरह ३.४५ [कंठा] १ (मुलांच्या खेळांतील विजयसूचक शब्द) मात; कडी. (क्रि० लागणें; लावणें) 'आज आमचा तुमच्यावर देखील कंडा झाला कीं नाहीं सांगा?' –खरादे १०. [कंड्] ०पट्टा-पु. घोडयाच्या गळयांतील व डोक्यावरील अलंकार. 'सभोंवती कंडेपटे साज घोडे उभे केले।' –सप्र १८.२२.

**कंडा**—पु. (मावळी) गोवरी. [हिं.]

**कडाऊ**—वि. विटेचा एक प्रकार. –शिल्पवि ८५.

**कडाकड-डां**—क्रिवि. (फोडण्याचा, मोडण्याचा, मारण्याचा) अवाज करून, होऊन; कडकड पहा. [ध्व.] **कडाकडा करणें**-(क.) कडमडणें; धडपडणें.

**कडाकडी**—स्त्री. मोडण्याचा, तोडण्याचा, फुटण्याचा इ० मोठा आवाज; भांडण, लढाई यांतील गर्जना. कडकड पहा. 'भाऊनानाच दुःख ऐकतां हृदय फुटलं कडाकडी।' –ऐपो १३२.

**कडाका**—पु. १ कडाखा पहा. 'सुटती तोफा एक कडाका गणति नाहीं बायाला।' –ऐपो १७७. २ एक छंद; कडक–का पहा.

**कडाकूट**—पुस्त्री. १ एखादी गोष्ट सिद्ध करण्याविषयीं करावयाचा जोराचा प्रयत्न, मेहनत, दगदग. २ बारीक शोध; काथ्याकूट. ३ अतिशयपणा; लयलूट; समृद्धि; कडेलोट. 'काय हो, आज आंब्यांची–गुळाची–तुपाची–लाडवांची–पिकाची–धान्याची कडाकूट!' 'पावसानें–वाऱ्यानें–थंडीनें कडाकूट केली!' ४ मनस्वी आवेश: जोर. (कडाकोट शब्दाहून हा शब्द भिन्न आहे). [सं. कड्ड=कठिण, कडक असणें; कड+कूट=रास; गु. कडाकुट=त्रास; खडा+कुटणें] –क्रिवि. १ अतिशय; फार; गडद; धो धो; जोरानें; तडाख्यानें (पडणारा पाऊस, जमणारे ढग, वाहणारा वारा, वादळ, अंधार इ०). २ झाडून सर्व जोर, पूर्णत्व इ० दाखविण्याकरितां हा शब्द योजतात. 'आज कडाकूट पंडित मिळाले होते.'

**कडाकोट**—पु. १ कडे तुटलेली अथवा तट घातलेली अशी कोंडून ठेवण्याची जागा [कड=कांठ+कोट=किल्ला] २ कडया–कुलुपें लावून उत्तम बंदोबस्त करणें. 'घरांत जिकडे तिकडे कडाकोट केला.' ३ एखादी जागा बंदोबस्ताच्या साधनांनीं सुरक्षित करणें; नाकेबंदी करणें; असा बंदोबस्त; नाकेबंदी. 'फौजेचा कडाकोट' 'निवडुंगाचा–शेराचा कडाकोट.' 'वाघाच्या भयामुळें धनगर म्हशींचा कडाकोट करतात.' ४ व्यापणें; झांकणें; आच्छादन; आवरण. 'मेघाचा–पावसाचा–आभाळाचा कडाकोट.' यावरून सर्वत्र पसरण्याची क्रिया; अतिशयपणा; धुमाकूळ (जुलमांचा, कृत्यांचा, उत्पादनांचा, जिन्नसांचा). 'लढाईचा–मारामारीचा–तोफांचा–वाद्यांचा–अध्ययनाचा–गाण्याचा–बोलण्याचा–मंडळीचा–समारंभाचा–धान्याचा–पिकाचा–पक्याचा कडाकोट.' ५ केव्हां केव्हां कडाकूट या अर्थीहि चुकीनें उपयोग करतात. –वि. (समासात) भक्कम; भारी; मोठा. 'कडाकोट बंदोबस्त.' [सं. कड्=रक्षण करणें; कडा=कट्टा+कोट=किल्ला]

**कडाखा**—पु. १ (ध्वनि) मारण्याचा, मोडण्याचा मोठा आवाज; कडकडाट. २ तडाखा (ठोसा, बुक्का, गुद्दा इ० चा); फटका; फटकारा. इतर अर्थी तडाखा पहा. 'मोठा कडाखा जाला; धुराची व धुळीची धुंदी जाली.' –भाब १२. ३ (ल.)

तीक्ष्णता; जोर; आधिक्य; तीव्रता; भर; झपाटा, ( गुणांचा, कृत्यांचा वाचक ). जसें:–थंडीचा, उन्हाचा, पावसाचा, रागाचा, धारणेचा कडाखा. ४ उणीव; दुर्मिळता; महर्गता. 'धान्याचा कडाखा.' ५ ( ल. ) थाट; धडाका पहा. 'लग्नाचा कडाखा झाला.' ६ वेग; आवेश; पराक्रम ( पेंढारी, परचक्र, सेनापति इ० ). 'विजयाधिक भीष्माचा परिहरतां सायकां कडाखा तो।' –मोभीष्म ५.६. 'कडाखा सेनापतीनें केला.'–ऐपो ७९. ७ भयंकर हल्ला; उपद्रव; नासधूस. 'महामारीचा कडाखा.' ८ उंसावरचा एक रोग. –शे ७.२२२. [ ध्व. ]

**कडांगी**—स्त्री. ( राजा. ) तापानें अंग मोडून येणें; शिरशिरी ( क्रि० येणें; जाणें; भरणें; लागणें; निघणें ). कडंगी पहा. [ कढ+अंग ]

**कडाचूर**—पु. १ चक्काचूर; तुकडे तुकडे; मोडतोड; फोड मोड. २ ( ल. ) खाऊन फस्त करणें; ताट धुवून ठेवणें; फन्ना. 'खाऊन खाऊन कडाचूर करून टाकला.' [ ध्व. कड–कड+चुरा ]

**कडाड**—पु. १ ( ध्वनि ) कडड; कडकड पहा. २ धक्का, तडाखा. ३ ( ल. ) कठिण प्रसंग; दुष्काळ. ४ जोर. 'मन निज-कल्पना कडाडीं। नाचवी धांदडी त्रैलोक्या।' –एभा २३.६७८. –क्रिवि. कडकड आवाज करून. 'उलथला वृक्ष तुटोनी कडाड' –दावि २१८. [ ध्व. ]

**कडाड**—वि. ( ल. ) जाणता; ज्ञानी; पढिक. 'म्हणोनि विश्वरूप तूं सहसा। दाविसी हा कीर भरंवसा। कां जे कडाडां आणि गहिंसा। माझीं नित्य नवा तूं कीं।' –ज्ञा ११.९७. [ कट्टा ? ]

**कडाड**—पु. पर्वताचा कडा; कडाडी. 'तरीं कडाडीं लोटला गाडा। तो आपणपें न मनीं अवघडा।' –ज्ञा १८.६४६. [ हिं. ]

**कडाडणें**—अक्रि. १ कडकड असा मोठा आवाज होणें (मारण्याचा, मोडण्याचा इ०); कडकणें. 'शशीसूर्य नक्षत्र माळा कडाडी।' –राक ८८. २ काडकन् मोडणें, कोसळणें. 'कळंब खांदी कडाडली बाई।' 'कडाडतां चाप भयानका ही। करी असा उग्र जनास कांहीं॥' –वामन सीतास्वयंवर ४९. ३ गर्जना करणें; ओरडणें. 'कपी वीर तो थोर कोपें कडाडी.' –राक ७२. ४ (ल.) खडसावून बोलणें ( रागानें ); आवेशानें बोलणें; ओरडणें. 'ती कडाडली–माझ्या प्रियकराच्या नालस्त्या करितोस ...... चल नीघ मेल्या!' –दरोडेखोर ( तीन आणे माला ). [ ध्व. कडाड ]

**कडाडी**—पुस्त्री. ( ल. ) धार, प्रवाह; जोर; कडाड. 'मोह नदीची कडाडी। माझीं समळ जळ प्रबळ वोढी' –एभा १२.५७७. [ हिं. कडाड ]

**कडाडां-डीं-डून**—क्रिवि. कडाकडा; काडदिशीं; झपाटयानें; एकदम जोरानें. 'अभ्यासाच्या गडाडीं। प्राण खवळल्या कडाडी।' –एभा १४.४३०. 'वोघ वेगाच्या कडाडी। पाडित आयुष्याच्या दरडी।'–एभा ७.५२३. [ ध्व. ]

**कडाडी**—स्त्री. १ तीव्रता; झपाटा. 'मज नाहीं वैराग्य-कडाडी।' –एरुस्व ५.५२. 'खवळला अति कडाडी। तपाच्या कोडी निर्दाळित।' –एभा २३.२५२. –वि. कडक; कडकडीत-पणाचें. [ कडाड ]

**कडाडोंगर**—१ कडपा; मुळका; डोंगराची चढण. २ चढणीचे श्रम. 'बाबा म्हातारा झाला, त्याला कडाडोंगर होत नाहीं.' [ कडा+डोंगर ]

**कडाण**—न. १ ( कु. ) चटईप्रमाणें वळलेला नारळाचा झांप; वळलेलें चुडत. कडण–णें पहा. २ ( गो. ) कडधान्य पहा.

**कडाणी**—स्त्री. १ ( बे. ) छिनीचा एक प्रकार. २ ( क. ) चाकाची कुणी ( चाक कण्यांतून निसटूं नये म्हणून त्यास घालतात ती ). [ का. कडाणी=कुणी ]

**कडाफोड**—स्त्री. आदळ; आपट. 'कडाफोडि होतांच येतांचि झोडी.' –राक ३०. [ ध्व. कड+फोडणें ]

**कडाबीन**—स्त्री. रुंद तोंडाची आखूड बंदूक; दामा. 'त्यांना पुण्यास कडाबिनीचे पाहाऱ्यांत ठेविलें.' –विक्षिप्त ३.१७७. [ इं. कॅराबिन; फ्रें. काराबिन ]

**कडामोड**—स्त्री. ( गो. ) आळेपिळे ( ताप येण्यापूर्वीचे ); शिरशिरी; कडमड पहा.

**कंडारणा**—वि. मोठा आणि सुरेख; जाडजूड आणि सशक्त; मोठा; भरींव आणि दिखाऊ ( माणूस, जनावर, दोर, खांब इ० ). [ सं. कांड; प्रा. कंड=दंड, लाठी ]

**कंडारणें**—अक्रि. १ लठ्ठ होणें; भरणें ( उंस, धान्याचें कणीस, माणूस, जनावर इ० ). २ ( ल. ) मोठा व धट्टाकट्टा होणें ( माणूस, जनावर, झाड, इ० ). [ सं. कांड ]

**कंडारणें**—न. १ शेतकऱ्याच्या आसुडाचें दांडकें, मूठ. २ दाव्याचा मधला जाडा भाग. ३ दांडकें; सोडगा. ४ एक अलंकार; जाड, ओबडधोबड वेढे, कडी, सरी, इ०. 'सरीचें कंडारणें.' [ सं. कांड; प्रा. कंड=लाठी ]

**कंडारणें**—उक्रि. करांडणें; कुरतडणें; तोडणें ( उंदरानें वस्त्र, कागद इ० ). [ सं. कांड ]

**कंडारणें**—न. १ सोन्याचांदीच्या पत्र्याला ठोकून आकार आणण्याचें सोनाराचें एक हत्यार. २ कागदाच्या जाळ्या करण्यासाठीं कात्रे पाडलेलें एक हत्यार. ३ न्हाव्याची नराणी, नखोरें. [ प्रा. कंडार=खोदणें, ठीक करणें ]

**कडालिंगी**—पु. भटक्या हिंदु बैराग्यांचा एक पंथ; सेवर (शबर) पंथ. (हे लोक स्वतःचें जननेंद्रिय कडींत अडकवून ठेवतात). [सं. कटक=कडें+लिंग; म. कडें+लिंग]

**कडालोट-टी**—कडेलोट पहा. 'कडालोट करितां सिंधूंत बुडवितां।' -दावि २७७.

**कडाशी-स**—स्त्री. (कु. गो.) भिंतीवरील छपराच्या खालचा पोकळ भाग; पागोळी; सरीवरील छपराचा भाग; छपराखालचें अखेरचें बहाल.

**कडाशीण**—स्त्री. १ कैदाशीण; कैकाडीण (कैकाडी स्त्री). २ (ल.) कर्कशा; कृत्या; तोंडाळ; जहांबाज स्त्री.

**कडासणी-नी**—स्त्री. कडसणी पहा.

**कडासणें**—उक्रि. कडासून बांधणें; आवळणें; कडसणें पहा.

**कडासन**—न. गवताचें अगर जनावराच्या कातडयाचें बसावयाचें आसन. 'कडासन मृगासन तृणमयी शेजा।' -वसा ५. 'कडासनावरुनीयां मग मी सडाचि धडधड धांवत आणिन।' -अमृत २१. [सं. कट=गवत+आसन]

**कडाळणें-सणें**—सक्रि. (गो.) दूर करणें, सारणें.

**कडाळी**—पु. एक इमारती लाकडाचें झाड; तमन कडाळी.

**कंडाळी**—स्त्री. कंडी; गप्प; हूल; बाजारबातमी; अफवा. (क्रि० उठणें; पिकणें; उडणें.) [कंडी+आळी]

**कडाळू**—(व.) ज्वारी-बाजरीचा चारा; कडवळ पहा.

**कडिबंद**—पु. कटिबंध पहा.

**कडिया**—वि. कडवा; शूर; काटक. 'पठाण कडिये फौजेमधीं नित्य झडती' -ऐपो ३५८. [कडु]

**कडिया**—पु. (गु.) गवंडी 'खानगींतील कडिये नसल्यास ...' -स्वारीनियम (बडोदें) ७४.

**कडियाळ-ळी-ळें**—नस्त्री. १ सांखळी; गोल कडें; कडी; 'जैसें लोहाचें कडियाळें'-ह १७.१८४. २ कटिलगाम(घोडयाचा). 'तुझे तोंडी मी कडियाळें घालुनि।' -पंच ४.६. ३ (ल.) वेढा; वेष्टण. 'जाहली चौदाहि भुवनांसि कडियाळी।' -ज्ञा ११.३१७. ४ माळ; हार; जाळी; जाळीचा अंगरखा. 'लेइलीं मोतियांचीं कडियाळीं।' -ज्ञा ९.५२९. [सं. कटक; प्रा. कडय; म. कडी-डें=आळ]

**कडिये, कडियेला**—क्रिवि. (काव्य) कडेवर. 'झणी दृष्टी लागेल माये। म्हणोनि कडिये घेतली॥' -एरुस्व १.९०. 'राधे हा मुकुंद कडिये। उचलुनि घेई घेई॥' [सं. कटि; प्रा; कडि]

**कडिलु**—क्रिवि. कडेला; बाजूस. 'ऐलिची कडिलु' -मुरा ६१.७९. [कडे]

**कडिवळपण**—न. आंबट, कडु तोंड. 'जेयाचें देखौनि बरवेपण। उच्चैश्रवा करी कडिवळपण।' -शिशु ५०६. [सं. कटु; प्रा. कडु; कडवट-ळ+पण]

**कडिवळें**—न. हातांतील कडें. 'सोनें परिणामलें सांखळें। कीं साडेपन्हरें जालें कडिवळें' -ऋ ९३ [कटक+वलय]

**कडी**—स्त्री. १ धातूची लंबवर्तुळाकृति सांखळी (दाराला लावावयाची); कडीचा दुवा; हंडया वगैरेचे हूक ज्यांत अडकवितात तें वेढें. २ (विणकाम) कापसाच्या बारीक दोऱ्याची गुंडाळी किंवा वेढें, लड (ही १०।१२ हात लांबीची व खुंटयाभोंवतीं गुंडाळलेल्या १०० ते २०० वेढयांची असून चार पुंजाबरोबर असते. असल्या आठ दोऱ्यांच्या गुंडीला चिवट म्हणतात); कडिये. [का. कडी] ३ लांकडी अरुंद व लहान चौरस किंवा गोल बहाल, तुळवट (पाटणीच्या खालीं घालण्याचें). [हिं. कडी.] ४ वळण; चाल; रीत; कृत्य, तऱ्हा (कृत्याची). 'दिव्य लावणीची कडी लीहून घ्या अभय पत्रावरी' -होला ११५. ५ (गवंडीकाम) कमानीची कडी. -शिल्पवि १६९. [सं. कटक; प्रा. कडअ] **०कुलूप करणें**-कुलूप लावून पक्का बंदोबस्त करणें; अगदीं सुरक्षित, बंदिस्त ठेवणें. 'तींत (अंधार कोठडींत) शुद्ध मेंढराप्रमाणें कोंबून भरिलें, आणि दरवाजा लावून घेऊन कडीकुलूप केलें.' -हिंक १४०. **०पाट**-पु. लांकडांच्या फळयांचें छत; तक्तपोशी; पटई; पाटणी; कडेपाट. [कडी+पाट] **०बंद**-वि. कडीपाट केलेलें (याच्या उलट किलचबंद). **०भोंवरा-भौंरा**-पु. जंगी भोंवरा; ह्याच्या डोक्यावर कडी असते. ह्या कडीच्या भोंकांत भोंवऱ्याच्या डोक्याचा खिळा फिरतो.

**कडी**—स्त्री. मात; तोड; ताण. 'रामानें गोविंदावर कडी केली.' [कड]

**कंडी**—स्त्री. गप्पा; हूल; बाजारअफवा; भुमका; अवई; वदंता; कंडाळी पहा. (क्रि० उडणें; उठणें; पिकणें). २ कुभांड; थाप; थोतांड. 'जड झालें पातळ कुसुंबी नाहीं सांगत कंडी।' -प्रला १८८. [सं. कूट=खोटें?] **०खोर**-वि. गप्पिष्ट, हूल उठविणारा. 'सुधारक थोडया महिन्यांनीं अजिबात बंद होणार... म्हणून जी कंडी उठली होती व कंडीखोरांच्या कृपेनें जी कंडी पुन्हांही उठण्याचा संभव आहे...' -आगर.

**कंडी**—कंडू पहा.

**कंडी**—(हिं.) (माळवी) गोवरी. 'कंडया काय भाव दिल्या?' [हिं.]

**कंडी**—स्त्री. (हिं.) करंडी; वेळूची उंच टोपली; हींत माणूस बसतो व ही मजूर आपल्या पाठीवर बांधून घेऊन डोंगरावर चढतात. 'बरोबरील मंडळीस बसण्याकरतां कंडया ...घेतल्या.' -तीप्र ३३. [सं. करंडी]

**कडीकाळ**—पु. कठिण वेळ; कलिकाळ (अप.) ' कास घालुनि बळकट । होय कडिकाळावर नीट ॥ ' [कडु+काल ?]

**कडीकोट**—पु. (कड्यांचा कोट, किल्ला.) बंदिस्तपणा; सुरक्षितता; कड्या–कुलुपें लावून केलेला बंदोबस्त. कडाकोट पहा –वि. १ गर्द; धोधो; भरपूर; खूप. उ० कडीकोट–पाऊस–आभाळ –फौज–सभा–मारामारी पीक इ० ' तो (महमद कासिम) मोठ्या कडीकोट तयारीनें देवल शहराजवळ येऊन उतरला. ' –हिंक २०. २ तयार; सज्ज; साधनयुक्त; सिद्ध (विशेषतः बंदोबस्त शब्दाबरोबर योजतात). –क्रिवि. गर्दीनें; पुष्कळपणें; पूर्णपणें; मनस्वी. [कडी+कोट]

**कडीत**—स्त्री. (महानुभाव) धूळपाटी. ' पृथ्वी एसनी कडीत आन मेरू एसनी खडी । ' –सूत्रपाठ २७२. [का. कडत= कोळशानें रंगविलेले कापडाचें पुस्तक. यावर हिशेब लिहीत असत.]

**कडील**—वि. कडचा; बाजूचा. (स्थळ किंवा दिशा या संबंधीं) उ० ' इकडील, तिकडील, गांवाकडील, घराकडील इ० ' [कड]

**कडु**—पु. कड; बाजू. ' दक्षिणे श्रीमुकुटाचा कडु केला ' –ऋ १३५; –अमृ २.४८. (कांहीं प्रतींत). [कडे]

**कडु-डू**—वि. १ कडवा (गोडाचे उलट, कडुनिंबाच्या चवीप्रमाणें). २ बेचव; पित्तविकारामुळें बदलणारी (जिभेची रुचि). ३ न रुचणारें; अप्रिय; कठोर (वाक्य, भाषण इ०). ' आधीं कडु मग गोड. ' ४ ज्यास कीड लागत नाही, जें कीड खात नाहीं असें (विशिष्ट झाड, वनस्पति). ५ जारज संतति (गोडच्या उलट). ६ गोड नसणारें; अशुद्ध (विशिष्ट तेल). ७ कठिण, गांठयाळ (बाभळीच्या लांकडाचा आंतील भाग; नार; वरचा भाग ठिसूळ, नरम किंवा गोड असतो). ८ निर्दय; कडक; ताठर (माणूस, स्वभाव). ९ नापीक; लागवडीला प्रतिकूल (जमीन). १० झोंबणारी; कडक; तिखट (विशिष्ट भाजी). –न. १ (ल.) अफू. २ कात (रात्रीच्या वेळेस कातानें नांव घ्यावयाचें नाहीं म्हणून त्याबद्दल म्हणतात). ३ मृताशौच; कडु विटाळ या शब्दाचा संक्षेप. –स्त्री. डोळयाचें दुखणें (डोळयांत माती गेल्यानें, जाग्रण केल्यानें येणारें). (क्रि० येणें. उ० डोळयांला कडू येणें). –पु. १ दासीपासून झालेली संतति; अनौरस, जारज संतति; लेकवळा (याच्या उलट गोड). ' त्याच्या राज्यांत मल्हारराव नामक त्याच्या एका कडू सापत्न भावानें जें बंड माजविलें होतें ... ' –हिंक ८४. २ पाटाची संतति. [सं. कटु; प्रा. कडु; गु. कडवु; हिं. कडुवा; सिं कडो] ०**इंद्रायण**—न. कुंपणावरील एक वेल; ह्याचीं फळें तांबडीं, विषारी व रुचीस कडू असतात; कवंडळ; इंद्रावण; इंद्रवारुण; कडूवृंदावन. २ (ल.) तुसडा, माणूसघाण्या; एकलकोंडा माणूस. ०**करांदा**—पु. एक कडवट तपकिरी रंगाचा कंद. ०**कारलें**—न. १ कारलें. २ (ल.) वाईट स्वभावाचा व न सुधारणारा माणूस. ' तो एक कडू कारलें आहे, त्याची संगत धरूं नको म्हणजे झालें. ' म्ह० कडू कारलं, तुपांत तळलें, साखरेंत घोळलें तरी तें कडू तें कडूच. ' ०**कारळी-ळें**—स्त्रीन. कारळे तीळासारखें औषधी बीं; कडु जिरें; काळें जिरें. याचें झाड दोन तीन हात उंच असून ह्यास बोंडें येतात व त्यांत बीं असतें. हें कृमिनाशक आणि वातनाशक आहे. –शे ९.२३४. ०**काळ**—पु. वाईट दिवस; अडचणीची स्थिति; साथ; दुष्काळ; दुर्गति. (क्रि० येणें; असणें; चालणें; वाहणें; जाणें; टळणें; चुकणें; चुकविणें). ०**घोसाळें**—न. घोसाळयाची एक जात. –शे ९. २३५. ०**जहर**—वि. अतिशय कडु; विषासारखें कडू. ०**जिरें**—न., कारळी पहा. ०**झोंप**—स्त्री. अपुरी झोंप; झोंपमोड; झोंपेनें खोबर. (क्रि० करणें). ०**तेल**—न. १ करंजेल. करंजाच्या बियांचें तेल. २ उंडिणीचें तेल; (हेट.) पुन्नागफळांचें तेल. ४ (सामा.) न खाण्यापैकी तेल (चोखटेल किंवा गोडें तेल याच्या उलट). ०**दोडका**—पु. १ कडवट दोडका. २ दासीपुत्र; लेकवळा. ३ (ल.) पंक्तिबाह्य; जातिबहिष्कृत माणूस. कडु भोपळा पहा. ०**दोडकी**—स्त्री. भाद्रपद महिन्यांत फुलणारी एक वेल; दिवाळी; हिचीं पानें औषधी असून. फळास दिवाळें म्हणतात. –शे ९.२३५. ०**निंब**—पु. बाळनिंब; बाळंतनिंब; हा वृक्ष फार मोठा असून सर्वत्र होतो. याचीं पानें गुढीपाडव्याला खातात. हा अनेक व्याधींवर उपयोगी आहे. याचें लांकूड इमारतीच्या उपयोगी आहे. आर्यवैद्यकांत याला रसायन म्हटलें आहे. म्ह० १ गूळ चारणारापेक्षां निंब चारणारा बरा होतो. २ (कऱ्हेपठारी) कडु निंबाच्या झाडाखालून उठून आला=ज्याच्या जवळ कांहीं पैसा नाहीं असा; भणंग; (उपहासार्थी योजितात). ०**पडवळ**—न. कडु असलेलें पडवळ. –शे ९.२३५. ०**पाणी**—न. १ पाण्यांत कडुनिंबाचे किंवा निरगुडीचे टहाळे घालून उकळलेलें पाणी (यानें आजाऱ्यास, बाळंतिणीस वगैरे स्नान घालतात). २ विटाळ संपल्यानंतर बायका ज्या पाण्यानें डोक्यावरून स्नान करतात तें पाणी. अशा स्नानालाहि म्हणतात. (क्रि० घेणें). ३ मृताशौच किंवा कडूविटाळ संपल्यानंतर माणसानें स्नानार्थ घ्यावयाचें पाणी. (येथें कडू म्हणजे दुःखदायक प्रसंगाशीं आलेला संबंध). (क्रि० घेणें). ४ भाजीपाला शिजविलेलें पाणी. ०**पाणी काढणें**—(बायकी वाप्र.) वरील विटाळ फिटल्याचें स्नान झाल्यानंतर तें स्नान नाहींसें करण्यासाठीं पुन्हां दुसऱ्या साध्या पाण्यानें स्नान करणें किंवा अंगावर पाणी घेणें. ०**पाला**—पु. कडू पाण्यांत घालावयाचीं करंज, लिंब, निर्गुडी, जांभळी इ० चीं पानें. ०**भोपळा**—पु १ कडवट रुचीचा भोपळा; दुध्या भोपळयाची एक जात (याचा उपयोग सतार, वीणा, वगैरे वाद्यांच्या कामीं व सांगड, तुंबडी इ० च्या कामीं करतात).

२ (ल.) दासीपुत्र. ३ (ल.) पंक्तिबाह्य; हलक्या जातीचा; बहिष्कृत माणूस. ०भोपळी–स्त्री. कडू भोपळ्याची वेल; कडू भोपळा अर्थ १ पहा. –शे. ९.२३६. ०वट–टु–वि. (काव्य) कडवट पहा. 'कैलासवन कडुवट। उमावन तुरट।' –शिशु ६१५. 'जैसा निंब जिभे कडुवटु।' –ज्ञा १८.१८६. 'कडुवट हरिनामे वाटती पापियाला।' –वामन, नामसुधा १.४.३४. ०वाघांटी–स्त्री. कडवट फळें येणारी एक वनस्पति; आषाढी द्वादशीस हिच्या फळांची भाजी करतात. ०विख–वि. कडूजहर; विषाप्रमाणें कडू. ०विटाळ–पु. १ मृताशौच; सुतक. २ बाळंतपणाचा विटाळ; बाळंतिणीला येणारा दहा दिवसांचा विटाळ; जननाशौच. (क्रि० येणें; जाणें; सरणें; फिटणें; ). ०वृंदावन–न. कडू इंद्रायण पहा. 'कडु वृंदावन। साखरेचें आळें।' –तुगा.

**कंडुलो**—पु (गो.) १ लहान कंड्डो. २ (ल.) मोठें पोट.

**कडुवा**—वि. कडवट; दुःखकारक. कडवा पहा. 'कडुवा संसार दुःकाळु। दारें नीगतु दिसें॥' –शिशु ५८७. [सं. कटुवत्]

**कडुवाळ, कोडवाळ**—(गो.) कडू मासळी. [स. कटु+व्याल; प्रा. वाल]

**कडुसा**—पु. (माण.) संधिप्रकाश. [कवडसा]

**कंडू**—पुस्त्री. १ खाज; खाज सुटण्याचा रोग. २ खाल्ल्यावर किंवा स्पर्श केल्यावर खाज उत्पन्न करण्याचा धर्म (वनस्पति, भाजीपाला यांचा) ३ (ल.) शिरशिरी; खुमखुम; उत्कंठा; आवेश; ईर (लढाई, भांडण इ० ची) 'जेसु तुवां उत्तमु प्रेत्नु केला। महापवित्रु बावतिस्मु रचिला। तेणें पापाचा कंडु फेडिला।' –ख्रिपु १.१.३८. ४ मस्ती; माज; चळ. 'घोडयाला नगाऱ्या-खालीं घाला म्हणजे त्याची कंडू जिरेल.' ५ कोरडी खरूज [सं.]

**कडून**—शअ. १ पासुन. 'त्याकडन रुपये घ्या.' २ दिशेनें; बाजूनें. 'हा हिंदुस्थानाकडून आला.' ३ करून; नें; वारी (साधन दाखविणारें अव्यय.) 'त्यानें शस्त्रेकडून मारलें.' ४ करवीं; द्वारां; परत्वें; मार्गानें; मुळें; साहाय्यानें; मदतीनें; ज्या योगानें. (प्रयोज्य कारण दाखविणारें). 'मी त्याकडून घर बांधवीन.' 'पर्जन्येंकडून सर्वांस सुख होतें.' 'विचारें कडून' –पया ८७. [का. कड, कडे]

**कडूसें**—न. (क.) संधिप्रकाश; कडुसा पहा. 'आतां कडूसें पडलें आहे.'

**कडे**—शअ. १ बाजूला; दिशेला. 'हातीं धरुनि तियेसी। कडे काढी व्योमकेशी।' –गुच ३३.११०. 'यंदा तुमच्या कडे धारण कशी आहे?' २ पाशीं; जवळ; ताब्यांत; हातांत; हाताखालीं; दिमतींत; व्यवस्थेंत. 'त्याजकडे शंभर शिपाई आहेत.' ३ आंत; खालीं; संबंधीं; निसबत. 'हा पागेकडे चाकर आहे.' ४ हवालीं; स्वाधीन (करणें, देणें). 'ज्याचें त्याकडे दे.' ५ पक्षाला; वांटयाला. 'सरदारांनीं तलवार मारावी, परंतु यश धन्याकडे;' 'कौरव–पांडवांच्या युद्धांत श्रीकृष्ण पांडवांकडे गेला.' ६ हातांत; पाशीं; जवळ. 'त्याकडे माझे रुपये आहेत.' ७ (ल.) पलीकडे; पार. 'स्वामी तारका गुरुनाथा। संसारसागराकडे लावी।' –गुच ४५.१०६. ८ जबाबदारी; पत्कर. 'हें काम माझ्याकडे लागलें.' ९ (कुण.) काळ, वेळ यासंबंधीं निरर्थक अव्यय; स; ला. 'तूं उद्यांकडे मला भेट.' [का. कडे; म. कड]

**कडे**—क्रिवि. (काव्य) कडेवर; कमरेवर. 'विवाहहोमालागीं श्रीहरी। वेगें चला बोहल्यावरी। कडे घ्यावी नोवरी।' –एरुस्व १६.१९. 'रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे' –केका १२१. [सं. कटि]

**कडें**—न. १ हातांत, पायांत किंवा दंडांत घालावयाचा एक वाटोळा कंकणाकृति अलंकार. २ (ल.) वेढा; घेर; भोंवताला घेर; सभोंवतालीं वर्तुलाकार रांग (सैन्य, डोंगर इ०ची) 'भोंवतें आवर्णोदका कडे।' –दा १६.३.१०. 'जमलें भ्रमरांचें हो कडें।' -रप्र १०. 'कठिण दिवस म्हणून कुणब्यानें पितराला एकाद–दुसरा जातिबांधव सांगितला कीं दारापुढें माहारांचें कडें पडतें.' –गांगा १०३. ३ विहिरीच्या तळचा लाकडाचा गोल थर (ज्यावेळीं खालीं धर लागत नाहीं त्यावेळीं कडें घालून त्यावर बांधकाम करतात). ४ पोवाडे गाणाऱ्यांचें एक चर्मवाद्य; डफ; हें लांकडी एक–सव्वा हात व्यासाचें कडें घेऊन त्यावर चिकण मातीनें कातडें चिकटवून वर चौफेर कागदपट्टी लावतात. 'रामजोशी यांनीं आपल्या वयाचीं वीस वर्षे तमाशा पाहण्यांत व कडें वाजविण्यांत घालविलीं.' –राला २. ५ (ल.) बेडीस पायांत अडकवावयाचीं वलयें असतात तीं प्रत्येकी. (सामा.) बेडी. 'माझे भक्तीचिया आवडीं। अहं सोहं दोनी कडी। तुटली अभिमानाची बिडी। विषयगोडी निमाली।' –एभा १४.३११. ६ (व.) (ल.) गुदद्वारांतून पडणारें लेंडूक. ७ वर्तुळाकार कांठ, सीमा, कड (तंबोरा, चाळण इ०ची). ८ खळयांतील धान्य बाहेर जाऊं नये म्हणून त्याभोंवतीं वेलींचें किंवा गवताचें घातलेलें वेटोळें. १९३०. ९ मोट ज्याला बांधतात तें लोखंडी गोल वलय. [सं. कटक; प्रा. कडअ; गो. कु. चि. कडां]

**कडेकपाट–र**—न. १ दरड व गुहा; दरीखोरें; गिरीगव्हर; डोंगरांतील खबदाड; खोरें; दरीकंदर; गुहा; भुयार. (प्रथमेंत क्वचित प्रयोग, बहुतेक कडेकपारांत, कडेकपाटीं असेच प्रयोग आढळतात.) 'कडेकपाटीं धांवती जनें।' –सप्र ३.३४. २ (ल.) दुर्गम, अवघड ठिकाण. 'कडेकपाटीं जाऊनि। महासोवे दडाले।' [कडा+कपाट]

**कडेकांठ**—पु. १ शेवट; बाजू. २ लांब; दूरवर. (सामा.) कडेकांठास; कडेकांठेंस असेहि प्रयोग आढळतात. [कड+कांठ]

**कडेकोट**—वि. कडाकोट पहा.

**कडेपाट**—पु. कडीपाट पहा.

**कडेल**—न. रेशमी लुगडें. [सं. कटि; दे. कडिल्ल=कटिवस्त्र]

**कडेलग**—क्रिवि. अगदीं शेवटाजवळ. 'जेथ हटिये सांडिती होडा। कडेलग ॥' –ज्ञा ६.५६. [ कड+लग=पावेतों ]

**कडेलोट**—पु. १ कडेपात; मुक्ति मिळण्यासाठीं योग्यानें कडयावरून घेतलेली उडी; अपराध्यास कडयावरून लोटून देणें; अशी दिलेली शिक्षा. (क्रि० करणें). २ (ल.) परमावधि; शिकस्त, अतिरेक; कमाल ( पाऊस, पीक, संपत्ति, कृति इ० ची) (क्रि० होणें). 'ही (जॉन्सनची) भ्रमावस्था स्थाईक होऊन मुळींच आपला बुद्धिभ्रंश होईल कीं काय याची त्यास अतिशयित भीति वाटे ... पण या कडेलोटावर गोष्ट येऊन ठेपली नाहीं.' –नि ७०२. ३ ( ल. ) ऱ्हास; अधःपात; उतरती कळा. ४ पराकाष्ठेच्या तिरस्कारानें वागविणें. ५ घालवून देणें; काढून टाकणें ( जागा, अधिकार, इ० वरून ). ६ शेवट करणें. –वि. खालच्या प्रतीचा, दर्जाचा; हलका ( माणूस, वस्तु ). [ कड+लोटणें ]

**कडेवाला**—वि. कडें ( वाद्य ) वाजविणारा; तमासगीर; डफवाला. [ कडें ]

**कडेशेवट**—क्रिवि. कमींत कमी; कांहीं नाहीं म्हटलें तरी; सरतेशेवटीं; पराकाष्ठा; कड शेवटीं, कडे शेवटचा असेहि प्रयोग आढळतात. 'मी तुला कडेशेवटची गोष्ट सांगतो.' [कड+शेवट]

**कडेशेवटचा**— वि. १ अगदीं अखेरचा; अंतिम; अगदीं कडेचा; सीमेचा. २ पराकाष्ठेचा ( मूर्ख, वृद्ध, दुर्दैवी, इ० ). ३ अगदीं शक्य तों कमी ( किंमत, खर्च, नफा, इ० ). 'कडेशेवटचा उपाय–उपचार–मसलत–योजना–तोड–मनसुबा इ०.'

**कडेस–सी**—शअ. कडेला; बाजूस. कडे पहा. 'बापाच्या उजवे कडेसि बसली म्यां पाहिली नोवरी।' –र ६.

**कडो, कोडो**—पु. (गो.) भात ठेवण्यासाठीं तट्टया वगैरे लावून केलेली जागा; कणगा. [ कडा ]

**कडो**—पु. ( गो. ) काढा. [ कढ, कढणें ]

**कडोकडीं**—क्रिवि. १ जोरानें; नेटानें; झपाट्यानें. कडोविकडी पहा. 'आले अवघे नवलक्ष गडी। बळकाविली यमुनाथडी। हुमामा घालिती कडोकडीं।' –ह १०.९५. –दावि ४९२. [कड]

**कडोजी**—स्त्री. एक वनस्पति; कुत्र्याचें मूत.

**कंडोरा**—पु. ( कों. ) उसाचा करवा; गंडेरी. [ सं. कांड; प्रा. कंड ]

**कडोविकडी**—स्त्री. ( कडयांत कडया; त्यापासून झालेली गुंतागुंत ). १ भाषणांतील डावपेंच; (ज्यांत मुद्दापत्ता लागणार नाहीं असें ) अनिश्चितपणाचें व खाचाखोचीचें भाषण; दुटप्पी बोलणें; ( कडोविकडीचा असा षष्ठ्यंत प्रयोग रूढ आहे ). २ ( कुस्ती ) पेंच; कौशल्य. 'मल्लविद्येच्या कडोविकडी। जीमूती दाविता पडेपाडीं।' –मुविराट २.६८. ३ युक्त्या; खुब्या; मसलती. 'तेवीं उत्तमोत्तम ज्ञाननिर्वडी। उद्धव कडोविकडीं शृंगारिला।' –एभा २८.६९८. –वि. उत्तम; व्यवस्थित; बंदोबस्तीचें. 'राखण ठेवी कडोविकडी।' –कथा १.२.१७८. –क्रिवि. १ अति जोरानें; झपाट्यानें, निकरानें; नेटानें. 'शस्त्रें मुटतील गाढीं। वीर भिडतील कडोविकडीं।' –एरुस्व ७.७४. –दा २०.८.१९. २ नाना प्रकारांनीं, रीतींनीं. –एभा १५.२५. 'पुच्छ नाचवी कडोविकडी.' –रावि २०.४९. ३ दुटप्पी, खुबीदार भाषणें करून; मोठ्या युक्तीच्या बोलण्यानें. **–डीचा**–वि. १ कडोविकडीनें भरलेलें, केलेलें ( भाषण, अर्थ, कल्पना, लिहिणें, गाणें, नाचणें, वाजविणें इ० ); अन्योक्तिव्याजोक्ति–व्यंगोक्तीचा; उपरोधिक; औपरोधिक. 'कडोविकडीचे विचार सुचले।' –ऐपो २१४. २ युक्त्या; मसलती; डावपेंच यांनीं युक्त ( क्रिया, हावभाव, वागणूक इ० ). शिताफी इ० नें भरलेलें. 'कडोविकडीचीं विवरावीं। अंतःकर्णी॥' –दा १९.१०.१०. ३ खुबीदार; कुशल; चतुराईनें अलंकृत; झील, कंप, आघात, छाया, उडणी, झोक इ० नें भरलेलें ( गाणें, नाचणें, वाजविणें ). 'ठेवी कडोविकडिची ठिवण हो। अक्षरीं मोत्यांची ववण। लय लाऊन करती श्रवण हो।' –प्रला १२२. [ कडी द्वि. ]

**कडोविकडीचा**—वि. १ कडचें; शेवटचें; पराकाष्ठेचें; परमावधीचें ( भांडण, लढाई, वाद इ० ). २ कडक; रागीट; उग्र; जहाल ( भाषण, निंदा इ० ). ३ सक्त; भारी; निश्चयाची ( मागणी, बोलावणें, इ० ). [ कड=शेवट ]

**कडोसरी, कडोस्त्री–सा**—स्त्री. १ कमरेस बांधलेल्या ( लुगडें, धोतर इ० ) वस्त्राचा कमरेजवळ खोवण्यांत येणारा भाग ( यांत पैसा, सुपारी इ० जिन्नस ठेवतात). 'कडोसरी नसला तरी कनवटीला खास आहे.' –तोबं १४. २ शरीराची ( उजवी, डावी ) जागा; कमरेचा भाग. ३ वस्त्राच्या आवळण्यानें काळवंडलेली, वाईट झालेली कमरेची जागा. ( सामान्यतः चतुर्थ्यंत व षष्ठ्यंत म, चा इ० प्रत्यय लागून प्रयोग). **कडोसरीस खोवणें, खुपसणें, कडोसरीचा पैसा.** [स. कटि; म. कड+सरी; किंवा कटिवस्त्र.] (वाप्र.) **कडोसरी–सरीस येणें**–अगदीं जेरीस येणें.

**कडोसा**—पु. संधिप्रकाश. कवडसा पहा. 'मेरुभोंवते कडे कापले। असंभाव्य कडोसे पडिले।' –दा १६.३.१७.

**कडोळ**—न. कडवळ पहा. 'न राहे खोंडया मका कडोळ।' –अफला ६६.

**कडोळ–ळी–ळें**—न. स्त्री. १ वेढें; आंगठी. २ ( व. ) स्त्रियांच्या पायांतील चांदीचें कडें. [सं. कटालिका; प्रा. कडोली]

**कन( कान )पट्टी**—स्त्री. (मल्लविद्या) जोडीदाराच्या हाताचा पंजा धरून तो झटक्यानें ढकलून देऊन आपल्या हाताच्या तळव्याला किंचित् खड्डा करून जोडीदाराच्या कानाच्या भोंकावर मारतात तो डाव. [ कान+फट ]

**कनभानिन**—न. (शाप.) एक रासायनिक द्रव्य; उदिल अमिदिनाचे स्फटिक उष्ण केले म्हणजे ते पृथक् होऊन अम्न आणि कनभानिन तयार होतात. ( इं. ) सायन फेनाइन.

**कनला**—अ. ( बा. ) कशाला ?

**कनव**—स्त्री. १ करुणा; दया; कणव पहा. २ दयेविषयीं प्रार्थना; काकुळती; कन्हव पहा.

**कनवट**—स्त्री. कणवट; कडोसरी, कणवट पहा. ' कडोसरीला नसला तरी कनवटीला खास आहे. ' –तोबं १४. २ कनवटीला होणारा खरजेसारखा रोग.

**कनवळ, कनवळा, कनवाळा, कनवाळु, कनुवाळ**—कन्हवळा–वाळु पहा.

**कॅनवास, कॅनव्हस**—न. १ कितान; एक तऱ्हेचें जाड कडक कापड; शर्ट वगैरे कपडयांच्या बाह्यांगास कडकपणा येण्यास व टोप्या, बूट वगैरेत घालण्याकडे उपयोग करतात. ' कॅनव्हस कापतांना तें शिवणीची माया सोडून कापलें असल्यास चूक येण्याचा संभव आहे !–काप्र १२. २ खळ लावलेलें गोणपाट; याचीं शिडें, बूट इ० करतात. ३ एका तऱ्हेचें जाळीदार कापड; यावर नक्षीचें भरतकाम करतात. ४ एक तऱ्हेचें जाड कापड हें तैलचित्राकरितां वापरतात. [ इं. ]

**कॅनव्हसिंग**—न. १ मालास गिऱ्हाईक मिळवणें; माल खपविणें. २ प्रसार करणें; सहानुभूति, मदत मिळवणें; मतें मिळविणें. [ इं. ]

**कनशा**—वि. कणशा पहा.

**कनहसलि**—पु. घोडयाच्या अंगावरील एक भोंवरा. हा कानापासून निघून मानेवर गेला असल्यास चांगला व मानेपासून कानाकडे गेला असल्यास वाईट. –अश्वप १.१०२. [ कानसल ? ]

**कना**—पु. कणा पहा.

**कना**—पु. १ ( व. ) पाय असलेली सापाची एक जात. २ ( व. ) डेळी( दुबेळकें )च्या दोन टोकांपैकीं एक. [ हिं. कन्ना ]

**कनागरा**—पु. ( व. ) (बैलगाडी) दाबखुंटा; एकंदर दाबखुंटे तीन असतात, पैकीं मधल्यास दाबखुंटा म्हणतात, बाजूच्या दोन खिळयांना कनागरे असें नांव आहे.

**कनात**—स्त्री. १ खस्ता; त्रास; कष्ट (द्वाड मनुष्याच्या चाकरींतील ). २ तुसडेपणा किंवा वाईट वागणूक सहन करणें. ( अंजारी किंवा छांदिष्ट मनुष्याची ), ( क्रि० काढणें; सोसणें ). [ अर. कनाअत=समाधान ]

**कनात–थ**—स्त्री. तंबू, डेरा यांची कापडी भिंत; किंवा त्यांच्या भोंवतालचा कापडी पडदा. ' शिबिर कनाथ पडप थोर। ' –नव १६.२४. [ अर. कनात् ]

**कनांदणें**—अक्रि. ( राजा. ) व्याकूळ होणें; हाल होणें; मद्यास येणें; पेंचांत सांपडणें ( दारिद्र्य, देणें वगैरेमुळें ). [ सं. कु+नंद्; म. नांदणें ]

**कनानी**—स्त्री. (व.) तापाची कसर; शिरशिरी; अंग मोडून येणें. ' तापाची कनानी येते. ' [ कणकण ]

**कनारो**—पु. ( कु. ) एक कंद व फळ; करांदा पहा.

**कॅनाल**—पु. कालवा; पाट; पन्हळ ( पाण्याचा. ) ' मुठाकॅनाल. '; ' आज कॅनालला पाणी नाहीं. ? ' [ इं. ]

**कनाळ**—( व. ) शेतांतील पिकाच्या तासांतील प्रत्येक झाडामधील अंतर, जागा. [ ? ]

**कनाळी**—स्त्री. कणाळी पहा.

**कनिद**—न. (रसायन, शाप.) ( इं. ) सायनाइड. नत्र आणि कर्ब यांपासुन तयार झालेलें जें सायनोजन द्रव्य त्यापासुन हें रासायनिक मिश्रण बनलें आहे.

**कनिष्ठ**—वि. १ सर्वात धाकटा; लहान; वयानें कमी. २ कमी योग्यतेचा; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा ( गुणानें ). ' विरक्तें न व्हावें कनिष्ठ। पराधेनपणें। ' –दा २.९.२७. ३ अगदीं खालचा; कमी; तिसऱ्या प्रतीचा; शेवटचा (उत्तम, मध्यम, कनिष्ठ या तीन प्रतींपैकीं ). 'येती तुझिया भजना आड। दाविती प्रपंचाचें कोड। कनिष्ठीं रुचि ठेवूनी गोड। ' –तुगा ७३४. ४ अल्प; थोडा; लहान. –पु. (लय) (संगीत) द्रुतलय पहा. ०पक्ष–पु. उत्तम, मध्यम याच्या खालचा पक्ष; कमींत कमी प्रमाण, स्थिति, अनुक्रम. –क्रिवि. कमींत कमी; किमान पक्षीं; नाहीं म्हटलें तरी. ' याचे लग्नाला कनिष्ठपक्ष शंभर रुपये लागतील. ' [ सं. ]

**कनिष्ठिका**—स्त्री. करंगळी [ सं. ]

**कनी, किनी, किनई**—अ. (बायकी), (लडिवाळपणें बोलतांना वाक्यांत केवळ अर्थपूरणार्थ ). कीं नाहीं ( संक्षेप ). ' सरू आक्का कनी गर्भार आहे. ! '; ' तिला किनी आण्णा, तो नवराच पसंत नाहीं म्हणे ! ' –झांमू.

**कनी खाणें**—क्रि. (व.) कच खाणें; हिंमत सोडणें; धीर सुटणें. ' तेव्हांपासुन कनी खाली आपण. ' [ कण ? ]

**कनीनिका**—स्त्री. डोळयांतील बाहुली. [ सं. ऐ. ब्रा. २४. ३,२२ ]

**कनुधार**—स्त्री. पिचकारींतून उडणारी पाण्याची बारीक धार. ' अवो दुजी कनुधार लागती। तरी पाणिअे वाति पाजळति। जलकेळी होती। निकी कीरूं। ' –शिशु ६७५. [ सं. कन, कण+धारा ]

**कनेकड**—न. रहाटाचा आंस; कणेकड पहा. 'राहाटाला यंदा नवें कनेकड घेतलें पाहिजे.'

**कनोजा, कन्होजा**—पु. कनोज (अंतर्वेदी) देशांतील ब्राह्मण; कनोजी ब्राह्मणांची जात. (हिं.) कनौजिया. 'वऱ्हाडास येती कनोजे विदेशी।'—साह्रह ६.४१. [सं. कान्यकुब्ज]

**कनोजी**—वि. कनोजसंबंधीं; कनोजचें (अत्तर, इ०).

**कनोशी**—एका जातीचा मासा.

**कन्ना**—पु. (ना.) पतंग समतोल उडण्याकरितां पतंगाच्या कमानदार कामटींत खोंचलेली लहान चिंधी; कणू पहा. [हिं. कन्ना=जेथें दोरा बांधतात तो पतंगाचा भाग] **०काटणें**—प्रसंग निभावून नेणें, टाळणें.

**कन्ना, कन्नाकाळ**—क्रिवि. (गो.) केव्हां; केव्हांशा.

**कन्नमेरें, कान्नमात्रें**—वि. (गो.) ऐकलें न ऐकलें करणारें; दुर्लक्ष करणारें. [कान+बधिर]

**कन्यका**—स्त्री. कन्या; मुलगी; कुमारी. [सं.]

**कन्या**—स्त्री. १ कन्यका; कुमारी; आठ वर्षांची मुलगी; (सामा.) पुत्री; मुलगी. 'कन्या सासुरासी जाये। मागें परतोनि पाहे।'—तुगा ८४३. २ (ज्यो.) बारा राशींपैकीं सहावी रास; कन्यारास. ३ (रामदासी) शिष्यीण. 'इतरां कन्येसी सभेसी कीर्तन आज्ञा नाहीं।'—सप्र २०.३१. **०इत्यर्थ**—पु. वधूनिश्चिति; मुलगी ठरविणें. 'कन्या इत्यर्थु करऊन संभ्रमें'—दावि ३३. **०कुमारी**—स्त्री. १ दुर्गा; पार्वती; गौरी. २ हिंदुस्थानचें दक्षिण टोंक, भूशिर; केपकामोरिन (हा अपभ्रंश आहे). **०गत**—पु.न. कन्याराशीस गुरु येतो तो काल; हा काल सुमारें तेरा महिने असतो. हा सिंहस्थानंतर येतो. हा फार शुभ समजतात. सिंहस्थांत राहिलेलीं विवाहादि कार्यें यांत करतात. या कालांत भागीरथी नदी कृष्णा नदीस भेटावयास येते अशी समजूत आहे. कृष्णातीरावरील क्षेत्रांतून (उ० वांई इ०) कन्यागतचें माहात्म्य पाळण्यांत येतें.—न. हुंडा. **०ग्रहण**—न. विवाहांतील कन्येचें पाणिग्रहण. [सं.] **०दान-प्रदान**—न. वधूच्या मातापितरांनीं वरास करावयाचें कन्येचें विधियुक्त समर्पण; विवाहसंस्कारांतील एक विधि. सर्व दानांमध्यें हें श्रेष्ठ मानितात. 'कन्यादान करी अश्वपति।'—वसा ५०. 'पुनर्विवाहांत कन्यादान करून पंक्तिप्रसादाची चुकवाचुकवी करण्यास फारशी अडचण येत नाहीं.'—टि ४.११३. **०दूषण**—न. कौमार्यभंग; कुमारिकेवर हात टाकणें; बलात्कार करणें. [सं.] **०दोष**—पु. कुमारिकेच्या अंगीं असलेला उणेपणा, एखादें व्यंग किंवा रोग. [सं.] **०धन**—न. उलट हुंडा; वधूच्या बापानें विवाहप्रसंगीं वराकडून घेतलेलें द्रव्य; शुल्क; आंदण. [सं.] **०निरीक्षण**—न. ज्या कुमारिकेशीं लग्न लावावयाचें तिचें शहाणपण, तिचे गुण, वगैरे पाहण्याची क्रिया; विवाहांत वाङ्निश्चयाचे वेळीं हा विधि होत असतो. [सं.] **०पुत्र**—पु. कुमारिकेस कौमार्यावस्थेंत झालेला मुलगा; कानीन. [सं.] **०भाव**—पु. कुंवारपण; कौमार्य. 'प्रसवें कन्याभाव न मळला पळ लागलें न सुटकेला।'—मोआदि ८.४१. [सं.] **०रत्न**—न. (गौरवार्थी) कन्या; पुत्री. 'कन्यारत्नं प्रासूत, असें मुलीच्या कुंडलींत लिहितात.' 'बाळंतीण होऊन कन्यारत्न झालें' **०रास**—स्त्री. बारा राशींपैकीं सहावी राशि. कन्या अर्थ २ पहा. —वि. १ (मुलींतील) षंढ; नपुंसक (मनुष्य). २ (बायकी) दुर्बल; भागूबाई. **०शुल्क**—न. कन्याधन पहा. [सं.] **०हरण**—न. विवाहास योग्य अशा मुलीस बलात्कारानें पळवून नेणें. [सं.]

**कन्याळ**—स्त्री. केळीची एक जात. कणेरी केळ पहा.

**कन्याळें**—न. कन्याळ जातीचें केळें.

**कन्हणें**—अक्रि. कुंथणें; विवळणें; कण्हणें. म्ह० 'कन्हतो कुंथतो मलिद्याला उठतो, किंवा कामाला मरतो.' (आळशी व खादाड मनुष्याबद्दल योजतात). [सं. कण्=दुःखाचा शब्द, आवाज काढणें; कणन]

**कन्हव**—स्त्री. प्रार्थना; दयेची याचना; विनवणी; काकलूत. 'पारख्याची करावी कन्हव' [कण+रव]

**कन्हवळणें**—अक्रि. कळवळणें; करुणा येणें; दयार्द्र होणें.

**कन्हवळा-वाळा, कनोळा**—पु. कळवळा; अनुकंपा; दयेचा उमाळा, पाझर. (क्रि० येणें.) [कन्हणें+वळणें]

**कन्हवाळू**—वि. मायाळू; ममताळू; प्रेम, दया करणारा.

**कन्हाटणें**—अक्रि. (व.) अत्यंत मलिन होणें; खराब होणें. 'हा परकर कन्हाटून गेला.'

**कन्हारणें**—उक्रि. १ लचकणें; अवघडणें (अंग, शरीरावयव). २ तिडीक निघणें; शिणका येणें; कांटा येणें (दुखणें, आल्यानें दाताखालीं खडा सांपडून किंवा शरीरावर ताण पडून वगैरे). ३ दुखविणें; कष्टविणें; त्रास देणें; जर्जर करणें (दाबामुळें, संकोचल्यामुळें अंग, अवयव) 'फुलांचेनि भारें ए मृणाळेचे आंगु कन्हारे'—शिशु ६८८. [सं. कण्=शब्द करणें]

**कन्हारी-कन्हेरी**—स्त्री. १ कण्ह; विवळ; कण्हण्याची क्रिया; किरकीर (हा शब्द बहुधा अनेकवचनीं कन्हाऱ्या, कन्हेऱ्या या रूपांत येतो). (क्रि० करणें) **नावानें कन्हारी गाणें**—क्रि. एखाद्याबद्दल तक्रार करणें; रडगाणें गाणें.

**कन्हावणें**—अक्रि. (व.) कण्हणें; कुंथणें; विवळणें.

**कन्हाळ**—न. (चांभारी) जुनी मोट सोंडेला फाटल्यावर तिच्या दोन्ही बाजूंस शिवलेलें नवीन कातडें. [सं. कर्ण+आलि]

**कन्हे**—न. कण्ह; विवळ. (क्रि० चालणें; होणें; करणें).

**कन्हेर**—कण्हेर पहा.

**कन्हैया, कन्हया**—पु. (हिं.) कृष्ण. —वि. (ल.) (कृष्णलीलेवरून) खेळाडू; शोकीन; रंगेल; क्रीडासक्त. 'कन्हया

माधवराव फुलांचा झेला।' –ऐपो २५२. [सं. कृष्ण; प्रा कण्ह; हिं. कन्ह]

**कप**—पु. (कों.) १ सुरमाड किंवा भेरला नांवाच्या नारळीसारख्या झाडाच्या अंगास येणारा कापसासारखा बुरा; झाडांच्या सोपांस असणारी मऊ लोंकर; याचा उपयोग रक्तस्राव बंद करण्याकडे, व विस्तव पेटविण्याकडे करतात; कापूस. कर्नाटकांत चिलीम पेटविण्यासाठीं याचा उपयोग करतात. 'कपाचें नळकंडे बाहेर काढलें आणि ठिणगी काढण्यासाठीं पोलाद आणि गार काढली.' –कोरकि २९५. ०तयार करणें–(माण.) चकमकीनें विस्तव पाडण्यासाठीं सुरमाडाचा, पाणसराच्या कणसाचा किंवा शेवरीचा कापूस तयार करणें. [सं. कार्पास; प्रा. कप्पास; हिं. कपास]

**कप**—पु. १ पेला; चहा पिण्याचें पात्र. 'खुशीलेनें चहाची केटली आणली होती ती हातांत घेऊन कपांत चहा ओतण्यापूर्वी त्याच्याकडे पाहून विचारलें ...' –सुदे ११०. २ पेलाभर पातळ पदार्थ. (दूध, चहा इ०) 'सिंगल कप,' 'डबल कप' ०बशी–चहाचा पेला व तो ठेवावयाची ताटली. 'आमचीं मातापितें मूल जन्मलें कीं त्याच्या तोंडांत कपबशा खुपसतात.' [इं. कप]

**कप**—पु. शर्टच्या अस्तनीच्या शेवटास असलेली पट्टी. [इं. कफ; तुल० अर. कफ=हात]

**कप**—स्त्री. (यंत्र) (इं.) कॅप. टोपी; झांकण; सायकलच्या चाकांतील ट्यूबमध्यें हवा भरावयाच्या नळीवरील टोपण, किंवा ॲक्सल वगैरेवरील झांकण; सायकल, मोटार, तांगा, वगैरेच्या चाकाच्या तुंब्यावरील टोपण. [इं. कॅप.]

**कप**—स्त्री. नदीचा किंवा विहिरीचा आंत गेलेला भाग; कपी. दरड; कपार पहा. [सं. कल्प; प्रा. कप्प=विवर, गुहा; का. कप्पु=जमिनींतील खड्डा, बीळ]

**कॅप**—न. (गो.) (एखाद्या पदार्थावर मळ, कीट सांचून झालेली) खपली; कपची; कपचा पहा.

**कॅप**—स्त्री. १ डोक्यास घालावयाची टोपी; बसकी टोपी. २ टोपण; झांकण. [इं. कॅप]

**कंप**—पु. १ थरकांप; कांपरें; हलणें; थरथरणें; वात, भय इ०कांनीं शरीर, वृक्ष, इ०कांस जें चलन मिळतें तें. 'मस्तक आदरीं शिरो–। भार्गीं कंप।' –ज्ञा १३.७५६. २ (ल.) धाक; दहशत; भीति. 'आणि जयाचा अहा कंपु। तापसांसी॥' –ज्ञा १८.१०५७. ३ (संगीत) गातांना कंठांतून निघणारा कांपरा आवाज, तान. [सं.]

**कँप**—पु. १ छावणी; तळ; गोट (सैन्याचा). काप. २ युरोपियन वस्तीचें ठिकाण (शहराजवळील); लष्कर. [इं.]



**कपचा-ची**—पुस्त्री. १ (कों.) कपरी; दगडाचा निघालेला–उडालेला तुकडा; भिंगाचा तुकडा; (सामा.) पदार्थाच्या अंगचा निघालेला तुकडा; चीप. २ खपली; कवची; बाहेरचें आवरण (खरूज, फोड, वगैरेवरील). ३ (वास्तु.) चीप; पातळ, सपाट दगडाचा तुकडा; फरशी. 'दगडाच्या पोकळ जागेंत चुना घालून त्यांत कपच्या ठोकून बसवाव्या.' –मॅरट ३०. कपची झड–स्त्री. (मूर्तिशिल्प) मूर्ति घडतांना वाया गेलेला दगड. [सं. कवच]

**कपट**—न. १ छद्म; लबाडी; लुच्चेगिरी; ढोंग; कावा. २ खोटेपणा; असत्यता. ३ मत्सर; हेवा; कृत्रिम भाव; द्वेषबुद्धि. ४ (कायदा) फसवणूक; भुलथाप; फसविण्याच्या इराद्यानें केलेलें कृत्य. ०कुभाव–पु. मत्सर आणि दुष्टबुद्धि; वाईट वासना; द्वेष. ०नाटक–न. कपटी व्यूह, योजना; कपटीपणाचा खेळ. 'कलह नाटक कपट नाटकापेक्षां पुष्कळ बरं!' –कृयु ११. ०निंदा–स्त्री. व्याजनिंदा; गर्भित स्तुति; बाहेरून निंदा पण खरी स्तुति. याच्या उलट कपटस्तुति. ०पाश-फांसा–पु. १ इच्छित दान पडावें म्हणून मंत्रादि विद्येनें बनविलेला खेळाचा फांसा; लबाडीचे फांसे. 'तरी पांडव जिंकावया बळ। एकयुक्ति आहे सबळ। तरी कपटपाश केवळ। वश मज असती।' –पांप्र २०.६१. २ फसविण्याकरितां केलेली घटना; कट; गुप्त मसलत. ०बाब–स्त्री. (कायदा) मत्सरानें किंवा दुष्टपणानें उत्पन्न केलेला निराधार खटला; खोटा खटला. ०मूर्ति–वि. अति लुच्चा, लबाड मनुष्य; कपटाचा मूर्तिमंत पुतळा. ०युद्ध–न. १ गनिमी काव्यानें चालविलेली लढाई; छद्मी लढाई. २ गनीमिकावा; युद्धाचे कपटी डावपेंच. ०रूप–न. खोटें रूप; लबाडीचा वेष; छद्मवेष; ढोंगी रूप. ०विद्या–स्त्री. लुच्चेगिरीचे डावपेंच; ठकबाजी; कावा; खोटीं कृत्यें आचरणें. ०वेष–पु छद्मवेष; स्वतःचें रूप पालटून, घेतलेला अन्य वेष; सोंग. –वि. सोंग घेतलेला; रूप पालटलेला. ०सिंधु–१ (गणित) गुणाकाराची एक पद्धत; गुणकाच्या पहिल्या आंकड्यानें गुण्यास गुणून आलेल्या गुणाकारांत गुणकाच्या राहिलेल्या आंकड्यांचा गुणाकार मनांतल्या मनांतच मिळवून एकदम गुणाकार मांडणें. गुणाकार पहा. २ फार कपटी मनुष्य; अतिशय लबाड, खोटा, घातकी मनुष्य. ०स्तुति–स्त्री. व्याजस्तुति; बाह्यतः स्तुति पण आंतून निंदा; व्याजनिंदा; याच्या उलट कपटनिंदा.

**कपटरांव**—पु. (गो.) गालगूट.

**कपटा**—पु. तुकडा (केळीचें पान, कागद, दगड, लांकूड वगैरेचा) [सं. कृप; प्रा. कप्प=कापणें?]

**कपटाई**—स्त्री. १ लुच्चेगिरी; ठकबाजी; कपटीपणा. २ मत्सर; द्वेष; हेकेखोरपणा. 'तुमचे मनीं कपटाई म्हणोन तीनदां मजवर रुसता, जाऊन घरीं बसता' –होला १२४. [कपट]

**कपटी**—वि. १ ढोंगी; खोटा; लुच्चा; गळेकापू. ' कपटी पूर्ण दुरात्मा । ' २ हेकेखोर; मत्सरी; कपटानें वागणारा. [ कपट ]

**कपट्या**—पु. (हेटकरी) हुतूतूचा खेळ. ? खेळतांना तोंडानें म्हणावयाच्या कपटी, कवटी वगैरे शब्दावरून [ ध्व ]

**कपडछान**—वि. ( हिं. ) वस्त्रगाळ. ( क्रि० करणें ). –शे १०.४८. [ कपडा+छाननें ]

**कपडलेप**—पु. कुपी, बाटली, बरणी, मडकें वगैरेंत कांहीं औषधें घालून त्यांची भट्टी लावण्यासाठीं तें भांडें व त्यावरील झांकण याच्या भोंवतीं मातीनें भरलेल्या ओल्या कापडाचा द्याव-याचा लपेट, लेप. [ कापड+लेप ]

**कपडा**—पु. कापड; वस्त्र; चिरगूट; प्रावरण. [ सं. कर्पट; प्रा. कप्पड; सिं. कपिडो ] ०**लत्ता**–पु. कापडचोपड; वस्त्रप्रावरण; पोषाखाचे सर्व प्रकारचे कपडे. [ कपडा+फा लत्ता, म. लक्तर= चिंधी ] **कपडे करणें**–१ कपडे अंगांत घालणें; पोषाख करणें. ' चंद्रशेखरानें कपडे केले '–निचं ५३. २ नवे कपडे शिवणें, शिवावयास देणें. ' परवांच मी त्यास कपडे केले. '

**कंपण, कंपणकांटा**—पु. ( सोनें, मोतीं वगैरे ). सूक्ष्म पदार्थांचें तंतोतंत वजन दाखविणारा ताजवा [ सं. कंप+कांटा ] २ ( सोनारी ) पेटीच्या मध्यावर उभा लोखंडी दांडा बसवून त्यावर पेलणारा ( भारधडीच्या कामाचा ) मोठा ताजवा.

**कंपणें**—अक्रि. ( प्र. ) कांपणें; थरथरणें; लटलटणें ( भीति वगैरेमुळें ); कापणें पहा. [ सं. कंप्, कंपन ]

**कपद्री**—स्त्री. ( कों. ) खपदडी; वेडेंवांकडें बीळ; खोल व पोकळ जागा; दरी; गुहा; विवर; कपार; खोल, एकांताची जागा. [ कु+पदर; सं. द्रु–दारय; तुल० गु पाद्रा ? ]

**कःपदार्थ**—उद्गा. ( तिरस्कारार्थी ) त्याची काय किंमत–काय योग्यता ! ; तुच्छतादर्शक प्रयोग. [सं.] –वि. तुच्छ; क्षुद्र.

**कंपन**—न. कांपरें; कांपणें; थरथरणें; लटलटणें; हालणें ( भीतीनें, क्रोधातिशयानें ) [ सं. ] ०**अधर**–( नृत्य ) ओंट कांपविणें. हा अभिनय रागावणें, थंडी वाजणें, रोगग्रस्तता दाखविणें, भीति वाटणें व जयप्राप्ति इत्यादिकांचा द्योतक असतो. ०**ऊरु**–न. ( नृत्य ) पाय वारवार उद्धटित करून मांडीला कंप उत्पन्न करणें; चालण्याची क्रिया दाखविणें झाल्यास हा अभिनय करतात.

**कंपनी**—स्त्री. १ मंडळी; टोळी; संघ; मंडळ. २ लष्करी शिपायांची एक तुकडी ( १०० ते २०० पर्यंत शिपायांची ). ३ व्यापारधंदा करण्यासाठीं कायद्यानें एकत्र झालेली मंडळी; कुंपनी. ' समाईक भांडवलाच्या कंपन्या ', ' लिमिटेड कंपनी. ' [ इं. ]

**कंपमान, कंपायमान**—वि. थरथरणारा; लटलटणारा; कापणारा; हलणारा. [ सं. ]

**कपर**—स्त्रीन. ( कों. ) कपरी; दगडाचा फोडलेला लहान तुकडा; कपचा. कपरा पहा. ' लागाला कसूं घालण्यासाठीं मला हजार कपरें पाहिजे आहेत. ' [ सं. कृप् ]

**कपरथूल-ळ**—पु. ( हिं. ) जाळीदार व मलमलीसारखें पातळ कापड. [ कपडा+ ? ]

**कपरा-री**—पुस्त्री. चीप; दगडाचा तुकडा; कपचा–ची पहा. कपरी ( लहान कपरा ) हें कपऱ्याचें लघुत्वदर्शक रूप आहे. ( क्रि० निघणें; जाणें; उडणें ). –शिल्पवि ५८३. [ सं. कृप् ; प्रा. दे. कप्परिअ=विदारलेलें, चिरलेलें ]

**कपरेदार दगड**—पु बारीक मातीच्या गाळाचे थर, एका-वर एक बसून झालेला दगड. –भू २५. [ कपरा+दगड ]

**कपर्दक, कपर्दिका, कपर्दीक**—पुस्त्रीपु. कवडी. हिचा नाण्याप्रमाणें उपयोग होत असे. 'कपर्दीक हो प्राप्त होतां न दीसे । बहु आपुल्या प्राक्तनालागि रूसे । ' –कचेसुच १५. [ सं. ]

**कॅपल**—न. ( गो. ) लहान चर्च, इगर्जे. [ पो. कापेला; इं. चॅपेल ]

**कंपवायु**—पु. कंपवात; ज्याच्यामुळें अंग कापतें असा वात; एक रोग. खंजवायु. [ सं. ]

**कपळ**—न. ( गो. ) कपाळ. ? **कपळाच्यो किडी**=मद, भ्रम.

**कपळा**—पु. मोठा कपचा, कपरा; दगडाचा, लांकडाचा किंवा गिलाव्याचा सुटून पडलेला मोठा तुकडा; भेतळा पहा. –शिल्पवि ५५. [ कपरा ]

**कपा**—पु. १ कप्पा; मगी; मणका. ( इं. ) पुली. २ ( कों. हेटकरी ) ( नाविक ) मोठी कप्पी, पुली; यास पांच–सहा गाळे असतात. कपी पहा.

**कपा**—पु. १ कपरा; तुकडा (कोणत्याहि पदार्थाचा) २ ठिगळ.

**कपा**—पु. १ बटवा किंवा पिशवी यांचें पुड. २ पेटीचा खण–घर. [ सं. कल्प ? ]

**कपॉ**—पु ( गो. ) मासळीचा तुकडा. [ का. कप्पु=मांस ]

**कॅपॉ**—वि. ( गो. ) बहिरा.

**कंपाउंडर**—पु. औषध तयार करून देणारा; डॉक्टराचा नोकर. [ इं. ]

**कंपाझिटर**—पु छापण्याचे खिळे ( टाईप ) जुळणारा; जुळारी. [ इं. ]

**कपाट**—न. १ कवाड; दार; दरवाजा; दरवाजाची फळी; खिडकीची झडप. ' येथे आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो । ' –तुगा १२६. ' म्हणे तो तिते जागिजे द्वारपाळीं । कपाटें दढें दुष्ट मोठे कपाळी ॥ ' –देप –कृष्ण-जन्म ५१. २ गुहा; दरी. ' कीं धर्मगिरीचे कपाटा । विवेक

सिंहाचा दरकुटा।' –ऋ ३६३. 'त्या तुझिया प्राप्तीलागीं। कपाटें सदां सेविती योगी।' –एभा ५.१६. [सं.] ०देणें–दार लावणें. 'आलें लंघुनी ब्रह्मगिरी कपाटें। तों पार्वतीनें दीधलीं कपाटें।' –उमाविलास ९. 'रात्रीं दृढ कपाटें देउनी।' –ह ७.६५. [सं.]

**कपाट**—न. फडताळ; उभी खणांची पेटी. हा शब्द इं. कप्बोर्डला प्रतिशब्द म्हणून गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत आला. १८५७ च्या मोलस्वर्थ कोशांत हा नाहीं. [सं. कपाट]

**कपात, कप्पा**—नपु. खजूर ठेवण्याकरितां शिंदीच्या पातींचा केलेला करंडा. 'खारकेचा भाव काय आहे म्हणून दुकानदारास विचारलें तर तुम्हीं किती कप्पे घ्याल असें विचारतात. –मुंव्या ५. [अर. कफ़्आत]

**कपात**—स्त्री. छाट; काट; कमी करणें; बाद करणें; काढून टाकणें. 'साडेसात टक्के कपात केल्यावांचून निभाव लागणार नाहीं.' –केसरी २.१०.२८. [सं. कृप्; हिं.; म. कापणें]

**कपार**—स्त्री. खबदड; दरड; विवर (खडक किंवा डोंगर यांमधील). 'ती दाट झाडींतील गुहेसारखी कपारीची जागा होती!' –स्वप २८४. [सं. कृप्; अर. खफर; तुल. प्रा. कप्परिअ= विदारलेले, चिरलेले; ते. कुपारमु=दरड.]

**कपारत-लत**—कफारत, कफावत पहा.

**कंपारी**—स्त्री. थरकांप; थरथराट. 'आपण राग मानाल अशी माझी मनोदेवता मला सांगूं लागली म्हणजे माझ्या शरीराची कंपारी होते.' –विक्षिप्त ३.८७. [सं. कंप]

**कंपार्टमेंट**—पु. आगगाडीच्या डब्यांतील किंवा एखाद्या मोठ्या दालनांतील बंद केलेला खण, भाग किंवा लहान डबा. [इं.]

**कपाल**—न. (संगीत) शुद्ध जातीच्या स्वरांपैकीं ज्या एका विशिष्ट स्वरसमूहापासून रागोत्पत्ति संभवते ते. [सं.]

**कपाल-ळ**—न. १ डोक्याची कवटी; डोक्याचें हाड; करटी. २ मडक्याचा अर्धा भाग; खापर; खापराचा तुकडा; श्रौतकर्मांत ज्यावर पुरोडाश भाजतात असे खापराचे तुकडे. हे ८, ११, १२, १३ असून त्यांचा एक गट असतो. ३ भिवया आणि डोक्याचे केस यामधील भाग; ललाट; भाल. ४ नशीब; प्रारब्ध; ब्रम्हलिखित (ब्रम्हदेव मनुष्याच्या कपाळावर त्याचें भविष्य लिहून ठेवितो या समजुतीवरून). 'कीं एकदांचि फुटलें त्वत्पतिपंचककपाळ पापानें.' –मोसभा ६.४. 'गडे, काय कपाळाला करूं। नाहीं घरांत एक लेंकरूं॥' –प्रला. ५ (कपाल) चपटें, पातळ हाड; खांद्याचा किंवा मांडीचा फरा. ६ भिक्षापात्र. 'कपाळ झोळी एका स्मशानींचा वास। एक जगन्निवास विश्वंभर।' –तुगा २०५०. ७ (भूगोलशास्त्र) कोणत्याहि याम्योत्तर वृत्ताच्या पूर्वेकडील किंवा पश्चिमेकडील अर्धें गोलार्ध. –उद्गा. १ नाहीं, खोटें, अशक्य हा अर्थ पटविण्यासाठीं 'माझें कपाळ! तुझें कपाळ!' इ० उद्गार काढतात. 'असें ऐकतां हासले द्वारपाळ। वदों लागले कृष्णजीचें कपाळ!।' –कचसु ६. २ दुःखदर्शक उद्गार, हाय! हाय! 'काय सांगूं, कपाळ!' ०उठणें, चढणें–डोकें दुखणें; त्रास, कटकट होणें; पीडा होणें. 'भजन करितो सर्व काळ। उठतें कपाळ आमचें॥' 'उगा करिती कोल्हाळ। माझें उठलें कपाळ।' –रामदास. ०काढणें–वैभवास चढणें; नशीब काढणें. 'तो चांगला कपाळ काढील असा मला रंग दिसत आहे.' ०खुलणें–(हिं.) दैव उदयास येणें. ०जाणें–दुर्दैवाच्या फेऱ्यांत सापडणें; भाग्य नाहींसें होणें. ०टेकणें–एखाद्यावर भरंवसा ठेवून, अवलंबून असणें; कपाळटेक करणें. ०ठरणें–नशिबांत लिहिल्यासारखी एखादी गोष्ट घडून येणें; दैवांत असणें. 'पुढें मागें ... यादी गोष्टींत सुधारकाचा वरचष्मा होऊन या हताश, विचारशून्य, मत्सरी ... लोकांस ... मुळुमुळु रडत बसावें लागेल हें यांचें कपाळ ठरलेलेंच.' –आगर. ०धुवून पाहणें–नशिबीं काय आहे तें पाहणें; नशीब पाहणें; ०पिटणें–दुःखातिशयामुळें डोकें जमिनीवर आपटणें. 'एक अवनीं कपाळ आपटिती।' –ह १८.९६. ०फुटणें–१ दुर्दैव ओढवणें; दैव प्रतिकूल होणें; सर्वस्वाचा नाश होणें; आपत्ति कोसळणें. 'कपाळीं कुंकूं लागतें आहे म्हणून हंसायला लागूं कीं कपाळ फुटलें म्हणून रडत बसूं.' २ वैधव्य येणें. 'मी गरीब कितिही असलें। जरि कपाळ माझें फुटलें।' -(राजहंस) गोविंदाग्रज. ०फोडणें–फार शोक, दुःख करणें. 'कुंतल तोडी, कपाळ फोडी, करी थोर आकांत।' –विक ५३. ०बडविण-दुःखातिशयामुळें किंवा क्रोधाच्या आवेगानें कपाळ पिटणें; कपाळावर हातानें मारून घेणें. 'कळतां वृत्त क्रोधें घे बहु बडवूनि तो कपाळाला.' –मोवन ४.८३. ०मोक्ष करणें–१ एखाद्याचा सर्वस्वीं नाश करणें. २ खूप झोडपणें; ठार मारणें. कपाळमोक्ष पहा. –ळाला लावणें–कुंकूं लावणें. (गो.) कपाळाक लावप. –ळाची रेघ-रेषा उमटणें, उघडणें–आकस्मिक रीतीनें सुदैव प्राप्त होणें; एकदम मोठेपणा, श्रीमंती मिळणें. –ळाचें कातड नेणें–विपत्तींत लोटणें; भाग्यहीन करणें; नुकसान करणें. –ळांत तिडाक उठणें–१ डोकें दुखणें. २ (ल.) त्रासणें; रागावणें. 'आडमुठयांच्या घराचें नांव काढलें कीं यशवंतरावांच्या कपाळास तिडीख उठे.' –यशवंतराव खरे. –ळांतले तीन फातर–(गो.) दुर्दैवाचे फेरे. (ढोमल, थोडयारें–थोडयारे म्हणून एक प्रकारची मासळी आहे तिच्या डोक्यांत तीन पांढरे दगड असतात यावरून). –ळाला आठ्या घालणें, चढणें-त्रासणें; अति त्रास होणें; मनाविरुद्ध गोष्ट घडणें (त्रास झाला असतां कपाळास आठ्या पडतात यावरून). 'उलट कपाळाला आठ्या

घालून म्हटलें–तुला काय त्याची चौकशी?'–उषःकाल. –ळाला किंवा कपाळावर केस उगवणें–अशक्य गोष्ट घडणें. (पुढें घडेल असें वाटणाऱ्या एखाद्या गोष्टीची असंभाव्यता दर्शवितांना हा प्रयोग योजितात. तळहाताला केस येणें याप्रमाणें). –ळावर, कपाळाला किंवा कपाळीं हात मारणें, लावणें -१ नशीबास दोष देणें. २ आश्चर्य, दुःख, काळजी प्रदर्शित करणें. 'अशींच तुम्हीं दोघंही सदोदित कपाळाला हात लावून रडत बसत असतां.' –हामुबा ८२. –ळाशीं कपाळ घासणें– १ आपल्याला लाभ होईल या आशेनें एखाद्या भाग्यवानाशीं सहवास करणें; संगतींत राहणें. २ कच्छपीं लागणें; मागें मागें असणें; गुलामवृत्तीनें अनुकरण करणें. –ळास अपकीर्ति–अपयश–दारिद्र्य–आपत्ति येणें–अपमान, गरीबी, दुर्लौकिक इत्यादि प्राप्त होणें; नांव बद्दु होणें. –ळास, कपाळीं येणें–नशीबीं येणें. 'जरि आलें पतन या कपाळाला।'–मोआदि १०.८२. –ळीं कांटी घेऊन जाणें–निघून जाणें; चालतें होणें; काळें करणें. –ळीं डाग लागणें–बेअब्रू होणें; फजिती होणें; कलंक लागणें. –ळीं भद्रा असणें–नेहमीं दुर्दैवी असणें; प्रतिकूल ग्रह असल्यामुळें दारिद्र्य येणें. –ळीं लिहिलेलें असणें–नशीबीं असणें; प्राक्तनांत असणें; योग येणें. 'माझ्या कपाळीं आपली सेवा एवढीच लिहिली होती.'–एक १२२. –म्ह० १ कपाळभर कुंकूं व हातभर बांगडया=सुवासिनीपणाची स्थिति; सौभाग्य. २ (ल.) केवळ कुंकवाचा धनि म्हणूनच जी स्त्री नवऱ्याला मानते अशा स्त्रीच्या बाबतींत योजतात. ०कटकट–स्त्री. तोच तोच विषय पुन्हां पुन्हां सांगत बसणें; कर्म कटकट. 'आतां मी जातें आणि त्या पोरीजवळ कपाळकटकट करीत बसतें.'–पिंगला नाटक. ०करटा, करंटा–वि. दुर्दैवी; अभागी; दैवहीन; जनावराच्या कपाळावर आंगठ्याखालीं झांकण्याइतपत पांढरा टिकला असल्यास तें अशुभ, कपाळकरंटें समजतात. 'काळें तोंड करी कपाळकरंटे जा, खेप आणी दुजी।'–आठल्ये. ०कष्टी–स्त्री. १ अति त्रास; अतिशय श्रम, (मूर्ख किंवा हेकेखोर मनुष्याची समजूत घालण्यासाठीं पडणारा); डोकेफोड; उरस्फोड. २ एकाच गोष्टीचा नाद, हट्ट; एकसारखी बडबड–वटवट; खिसखिस; धरणें धरून केलेली मागणी. कपाळकूट–खटखट पहा. [कपाळ+कष्ट] –वि. थकवा आणणारें; त्रास देणारें (काम); असें काम करणारा. ०काठी–स्त्री. (विणकाम) वही (ओवी) किंवा चाळा ज्यास पक्कें केलें आहे किंवा बांधलें आहे असें आडवें लांकूड किंवा दांडा. हें मागाच्या वर असतें. ०कूट–स्त्रीन. १ माथेफोड; शिकविण्याचे फुकट श्रम. कपाळकष्टी पहा. 'कपाळकुट जाहालें लोकीं बोभाट ऐकिला। सांवळें।'–भज ८. २ वटवट; बडबड; एकसारखी विनवणी, याचना. 'एकदां तिनें दाराची कडी लावली कीं कोणी कितीहि कपाळकूट करो, इला कडी काढील तर शपथ!' –इलासुंदरी १५. ०क्रिया–स्त्री. यति संन्यासी वगैरे मृत झाल्यावर समाधी देण्यापूर्वी मस्तकावर शंख आपटून मस्तक फोडण्याची क्रिया; कपाळमोक्ष. ०खटखट–स्त्री. त्रास; उद्वेग कपाळकूट पहा. –ळाचा डाग-पु. (कपाळावरील काळा डाग; दुर्लौकिक; अपकीर्ति; कलंक; (क्रि० लागणें, चुकणें, लागू होणें). ०टेंक–टेंकणी–ढोंकणी–स्त्री. (कपाळ टेंकणें). (ल.) एखाद्यावर भार; भरंवसा टाकणें; अवलंबून राहाणें; स्वतःच्या आकांक्षा–इच्छापूर्ति दुसऱ्यावर सोंपविणें. ०दुखी–स्त्री. ज्यांत सतत डोकें दुखत राहतें असा रोग; डोकेदुखी; कपाळशूळ. ०पट्टा–पु. १ घोडयाची म्होरकी किंवा सरोसरी हिचा एक भाग; कपाळावरचा पट्टा. हा मुखपट्टयाहून निराळा असतो. ०पट्टी–स्त्री. १ कपाळ; कपाळाचा भाग; ललाटपटल. 'विधात्यानें प्राणिमात्रांचें अदृष्ट डोळ्यांला न दिसणाऱ्या कपाळपट्टीवर लिहून ठेवलं आहे.' –एक ४१ २ कुंचडें, कानटोपी इ० चा कपाळावरील भाग, पट्टी; टोपीचा कपाळावरील भाग. ३ दरवाज्याच्या चौकटीचें वरचें आडवें लांकूड; गणेशपट्टी. ४ मोटेच्या विहिरीच्या धावेवरील खांबांवर असलेलें आडवें लांकूड. ५ कोणत्याहि यंत्ररचनेंतील आडवें बहाल. ६ ब्रह्मलिखित; ब्रह्मदेवानें कपाळीं लिहिलेलें; नशिबी असलेलें. [कपाळ+पट्टी] ०पांचशेरी–पांसरी–स्त्री. न टळणारी दैवगति; अटळनशीब. नशिबाचा दाखला कशानेंहि बदलत नाहीं असा. 'कोठेंहि गेलां तरी कपाळपांचशेरी बरोबर.' [कपाळ+पांचशेरी=चरितार्थ] ०पाटी–कपाळपट्टी १ पहा. 'तीची असे सज्ज कपाळपाटी।'–सारुह ५. ११०. ०फुटका–वि. कपाळकरंटा; दैवहीन, कमनशिबी; अभागी. [कपाळ+फुटणें] ०फोड–स्त्री. कपाळकूट; कपाळकष्टी पहा. (हा शब्द फार त्रासदायक कामाला लावितात). ०फोडा–स्त्री. कपाळफोडीचें फळ. ०फोडी–पु एक वनस्पति: चिरबोटी; फोपेटी. याचें फळ (कपाळफोडा) वाऱ्यानें फुगवितां येतें; लहान मुलें हें फळ कपाळावर आपटून वाजवितात (कपाळावर फोडणें–म्हणून कपाळफोडी हें नांव). ०फाड्या–पु. डोईफोडया; मनाजोगें झालें नाहीं म्हणजे कपाळ फोडून घेणारा; इष्टवस्तु मिळेपर्यंत हट्ट धरून बसणारा (भिकारी); आततायी. –वि. कपाळकूट करणारा; हट्टी; दुराग्रही; अक्रस्ताळया; अकांडतांडव करणारा. ०माळा–उद्गा. कल्पनातीत वाईट अवस्था पाहून आश्चर्य किंवा दुःखदर्शक उद्गार. –स्त्री. रुंडमाळा; शंकराच्या गळ्यांतील नरमुंडांची माळा. 'जटा विभूती उटि चंदनाची। कपाळमाळा प्रित गौतमीची।...तुजवीण शंभो मज कोण तारी।'–शिवरस्तुति. ०मोक्ष–पु.१ प्रेत जळत असतां कपाळाची कवटी फुटण्याची क्रिया. २ मृत संन्याशाच्या डोक्यावर शंख आपटून मस्तक फोडण्याची क्रिया. ३ डोक्यास आकस्मिक

होणारा एखाद्या वस्तूचा आघात; डोकें फुटणें. -करणें-ठार मारणें. 'मनोहराला स्वर्गी पाठवावें म्हणून त्याचा कपाळमोक्ष करण्याचा मी प्रयत्न केला.' -मतिविकार. ४ काशीक्षेत्रांतील पांच मुख्य तीर्थांपैकीं एक तीर्थ. -होणें-(ल.) मरणें; अंत होणें. 'खरी वेळ आली म्हणजे या भीमाच्याच लत्ताप्रहारानें त्या धर्मभ्रष्टाचा कपाळमोक्ष होणार हें मला पक्कें दिसत आहे.' -कीच. ०रेखा-रेषा-लेख-स्त्रीपु. नशीब; दैव; विधिलिखित (विधीनें कपाळावर लिहून ठेवलेलें. ०शूल-सूळ-पु. कपाळदुखी पहा.

**कपाली-ळी**—पु. शिव; शंकर. 'ये पार्वतीचे पडला कपाळीं। अद्यापि पाहे न चुके कपाळी।' -सारुह ३.३ [सं. कपालि=शिव]

**कपाली**—वि. दोन्ही खुरांवर नवाच्या आंकड्याप्रमाणें आणि कमळाकृति भोंवरे असणारा (घोडा). -अश्वप ९०.

**कपाशी**—स्त्री. (खा.) कापूस (सरकी असलेला). याच्या प्रांतांवरून बऱ्याच जाती पडल्या आहेत. -शे ६ १०७,२७०. [सं. कार्पास; प्रा. कप्पासी; हिं. कपास; गु. कपाशिआ]

**कपास**—पु. १ कापूस; कापसाचें झाड. -शे ६.५२. २ कापसाचा ढिगारा. ३ वाऱ्यानें उडण्यासारखा एखाद्या हलक्या पदार्थाचा कीट; पोल; म्हातारी. ४ भेरळी-सुरमाडाचा कापूस; कप. [सं. कार्पास; प्रा. कप्पास; हिं. गु. कपास]

**कपास करप**—क्रि. (गो.) जनावरांतील नराचें वृषण बडवणें-अंड काढणें, खच्ची करणें. [कापूस+करणें ?]

**कंपास**—पु. १ सुतार, लोहार, चांभार, वगैरे धंदेवाईक हें हत्यार वापरतात. वर्तुळ आकृति काढण्याचें दोन बाहु असलेलें साधन. 'कोशकारांनीं आपला स्वैरक्रम सोडून मर्यादेनें वागण्यास सांगणें म्हणजे नदीच्या ओघांवर व पर्वतांच्या रांगांवर रूळ व कंपास चालविणें होय.' -नि ४९७. २ होकायंत्र. 'तसेंच कितीएक देशांतील लोक ह्या यंत्रास (होकायंत्रास) कंपास असें म्हणतात.' -मराठी ६ वें पुस्तक ८०. (सन १८७५). ०घालणें-मारणें-कंपासानें आंखणें [इं. कॉंपस]

**कपि**—पु. १ माकड; वानर. 'कपिकुळ उद्धरिलें। मुक्त केले राक्षसां।' -तुगा ३९९. २ हनुमान; मारुती. ३ (ल.) मंडळींतील सर्वांत वृद्ध-अनुभवी-पुढारी मनुष्य. ४ (थट्टेनें) एकाद्या धंद्यांतील अनुभवी मनुष्य; मुरब्बी; तावूनसुलाखून तयार झालेला. (मारुती कपिकुळांतील असल्यानें त्याच्या चारीत्र्यावरून लक्षणेनें). [सं. कपि; फा. कपी] ०ध्वज-पु. अर्जुन. (याच्या निशाणावर मारुती होता. म्हणून हें नांव). 'मग ययाचि गा कपिध्वजा।' -ज्ञा १८.९५२. [सं.] ०मुख-वि. १ वानरासारखें तोंड असणारा (घोडा) ज्याचा वरचा ओठ लहान व खालचा ओठ मोठा आहे असा. हें घोड्याचें अशुभ लक्षण होय. [सं.]

**कपिंजल**—पु. कवडा; तित्तिर; चातक पक्षी. [सं.]

**कंपित**—वि. हालत असलेलें, कांपत असलेलें, थरथरणारें (शरीर वगैरे). [सं. कंप्]

**कंपित**—(संगीत) स्वर हलविणें. ०शीर्ष-न. (नृत्य) भराभर डोकें खालीं वर करणें, राग आला असें दाखविणें, प्रश्न विचारणें, विचारांत गढलेलें दाखविणें वगैरे गोष्टी व्यक्त करण्याकरितां हा अभिनय करतात. ०कटि-स्त्री. (नृत्य) चालतांना एका पायावरचा भार दुसऱ्या पायावर पडत असतां कंबर एकदां एका बाजूस व एकदां दुसऱ्या बाजूस वांकली जाईल असा अभिनय करणें. ०कपोल-पु (नृत्य) हसतांना गाल स्फुरण पावल्याचा अभिनय दाखविणें.

**कपिता**—स्त्री. माकडचेष्टा; कुचाळी; लबाडी; 'सहदेव गव्हह माझा स्पर्शोंहि न यन्मना शिवे कपिता॥' -मोसभा ४.५७. [कपि+ता प्रत्यय]

**कपितान**—पु. कप्तान; फौजेंतील एक अधिकारी. [इं. कॅप्टन]

**कपित्थ**—पु कवठीचें झाड व त्याचें फळ; कवठ. [सं] ०हस्त-(नृत्य) आंगठा व तर्जनी याशिवाय बाकीचीं तीन बोटें मिटून तळहातास चिकटून ठेवणें; आंगठा उभा ठेवून त्याच्या मागील बाजूनें तर्जनीनें त्याला विळखा घालणें.

**कपिल-ला**—वि. पिंगट; तपकिरी किंवा जर्दा (रंग). 'एकें तातलें साडेपंधरें। तैसीं कपिलवर्ण अपारें।' -ज्ञा ११.१३२. [सं.]

**कपिला**—स्त्री. १ कामधेनु; स्वर्धेनू. 'कपिलेचें म्हणावें क्षीर। मा इतरांचें काय नीर।' -एभा १.१२४. २ एक रंग असलेली; कोणत्या तरी एकाच रंगाची (गाय). 'काळी-तांबडी-पांढरी कपिला' 'काहीं सफेत कपिला व्याघ्रांबर खाणीच्या।' -ऐपो ३०९. ३ (सामा.) गाय. 'माझे घरीं पांच कपिला आहेत.' ४ रंगाकरितां कित्येक जातींच्या फुलांची वाळवून केलेली भुकटी, यांत कपिला व कपिली असे दोन प्रकार असून कपिली सरस आहे. ५ काव. ०षष्ठी, कपिल सठ-स्त्री. (कपिलखट मोल.) भाद्रपद वद्य षष्ठीच्या दिवशीं मंगळवार, रोहिणी नक्षत्र, व्यतीपात योग, सूर्यनक्षत्र हस्त, यांचा योग झाल्यास तीस कपिला षष्ठी म्हणतात. हा एक अपूर्व व पुण्यकारक योग मानतात. हा क्वचित येतो; बहुधां साठ वर्षांनीं असा योग साधतो. 'चंद्रसूर्यग्रहणांसी। वोंवाळुनि सांडी ते दिवशीं। कपिलाषष्ठी तिची दासी। मा अर्धोदयासी कोण पुसे।' -एभा ११.१२६९. **कपिलाषष्ठीचा योग**-१ ज्या गोष्टी एकत्र होणें-जमणें अशक्य त्या आकस्मिक रीतीनें एकत्र जमल्यास त्यास आनंदानें म्हणतात. दुर्मिळ सुयोग, संधी; दुर्लभ घटना. २ (उपरो.) अशक्य; असंभाव्य; क्वचित् घडणारी गोष्ट.

**कपिश**—पु. कवड्या ऊद; धूप. –वि. पिंगट रंग. [ सं. ]

**कपी**—स्त्री. १ ( कों. ) पुस्ती, जोड ( फुटलेल्या लांकडास दिलेला ). २ कलिंगड, भोपळा वगैरेचा नमुना पाहण्यासाठीं कापून काढलेली फोड. ३ ( गो. ) ठिगळ. कपा पहा.

**कपी**—स्त्री. कप्पी; मणका; पुली; खरडी, ओझें वगैरे उचलण्याचें साधन, लांकडाच्या भरींव तुकड्याला भोंक खोदून त्यांत चाकें भरून त्या चाकावरून दोरी घालून त्या दोरीस सामान बांधून यारीसारखें उचलण्यास उपयोग करतात. कपा पहा. [ ते. कप्पी=चाक ]

**कपीत**—पु. ( गो. ) कप्तान ( लष्करांतील किंवा आरमारांतील ). [ पोर्तु. कापिताव; इं. कप्टन ]

**कपुत्र**—( प्र. ) कबूतर पहा.

**कपुरकाय, कपुरी**—स्त्रीन. ( हिं. ) विड्याच्या पानांची एक जात ही जात बंगाल प्रांतांत होते. या पानास कापरासारखा वास येतो. [ सं. कर्पूर, प्रा. कप्पूर; हिं. कपूर ]

**कपुरीमेणबत्ती**—स्त्री. उत्तम पांढऱ्या रंगाची मेणबत्ती. [ कापूर+मेणबत्ती ]

**कंपू**—पु. १ तंबू देऊन, तळ देऊन राहिलेलें सैन्य. २ सैन्याचा एक विभाग, तुकडी, कंपनी, ( ११ पलटणी ). ' एकापरीस एक शिपाई रांगडा हिंदुस्थानी । दोन कंपू फिरंगाणी । ' –ऐपो २७८. ३ विशेषतः युरोपियन लष्करी पद्धतीनें तयार झालेलें देशी राजांजवळचें सैन्य. कवाईती पलटण. ' तवां कंपूनें कटाव केला मोरचे आले म्होरे म्होरे । ' –ऐपो ३५०. ' पुण्यास गारद्यांच्या ऐवजीं त्यांचे कंपू ठेवून घेण्याचें कबूल केल्यावर पुन्हां लढाईची जंगी तयारी करण्यास ते तयार आहेत. ' –भाऊ ९२. ४ विशिष्ट मताची किंवा विचाराची मंडळी; गट; समुदाय; मंडळ. ' कुटाळ कंपू. ' ' आम्ही हॅरिसन आदिकरून मंडळींच्या कंपूंत जाऊन मिळालों ' –टि १६०. [ इं. कॅंप ]

**कपूत**—पु. दुर्गुणी; अवज्ञा करणारा मुलगा. [ सं. कुपुत्र, म. पूत ]

**कपूयचरण**—न. पापाचरण, दुर्वर्तन. ' कपूयचरण म्हणजे पापाचें आचरण ' –गीर २९५. [ सं. कपूय=निंद्य+(आ)चरण ]

**कपूरकचरी**—स्त्री. कापूरकचरा पहा.

**कपेरी**—स्त्री. ( कु. ) दगडाची कपरी–तुकडा. [ कपरा ]

**कंपेश**—पु. १ कंबेश; फरक; कमी अधिक प्रमाण. ' बाजीराव कबूल होतांच त्याशीं पूर्ववत् प्रमाणें कांहीं एक कंपेश न करितां दोस्ती सरकारनें कायम ठेविली. –इनाम १४०. –स्त्री. कंबेशी. न्यूनाधिक्य; घोंटाळा; गोंधळ. –वि. १ कमीअधिक, थोडें जास्त किंवा थोडें कमी; जवळजवळ. 'कंपेश चाळीस हजार फौज' –ख ७.३२८८. २ तंतोतंत. ' सला झाल्याप्रमाणें वर्तणूक कंपेश न केल्यास पारिपत्य होईल.' –ख ५.२६०७. [ फा. कम्+बेश् ]

**कपेळफोडणी**—स्त्री. ( गो. ) कपाळफोड; डोकेफोड. [ कपाळ+फोडणें ]

**कपो**—पु. ( कु. गो. ) १ पापुद्रा ठिगळ, इ. कपा पहा. २ मासळीचा तुकडा.

**कपोक**—पु. पांढरी सावरी. याचा कापूस फार मऊ असून त्याचा गिर्दी, उशी करण्याकडे उपयोग करतात. कप पहा.

**कपोट**—स्त्री. ( कों. ) ताडाच्या पानाची केलेली पेटी. कपात पहा.

**कपोत-ता**—पु. ( काव्य ) कवडा; पारवा; कबूतर. ( स्त्री. ) कपोती. या पक्ष्याच्या मानेवर ठिपके असतात. [ सं. कपोत ] ०**कपोता वळणें**–वाळणें, खंगणें, क्षीण होणें.

**कपोतक( संयुतहस्त )**—पु. ( नृत्य ) दोन्ही हात एकमेकांजवळ आणून तळहाताकडील बाजूंनीं एकमेकांस चिकटवून एकावर दुसरा झांकण बसेल अशा प्रकारें ठेवणें. [ सं. ]

**कपोल-ळ**—पु. गाल. ' अधिष्ठानविशाळभाळीं । तैसी शोभा कृष्णकपोळीं । ' –एरुस्व १.६१. [ सं. कपोल ]

**कपोल-ळ**—न. ( चुकीनें ) कपाळ; गंडस्थळ. ' कपोलांचें वर्तुळपण।भणों ज्ञान प्रेमाचें दर्पण ॥ ' –ऋ ९५. ' कंपु लपवीसी आंगिचा । स्वेद पुसीसी कपोळीचा । ' –शिशु २२६. [ सं. कपोल=गाल ]

**कपोल( अभिनय )**—पु. ( नृत्य ) गालानें केलेला अभिनय. याचे सहा प्रकार आहेत. त्यांचीं नांवें.–क्षाम, फुल्ल, पूर्ण, कंपित, कुंचित, सम. [ सं. ]

**कॅप्टन, कप्तान**—पु. १ नाईक, प्रमुख, नेता. २ सेनापति. ३ मुख्य नाखवा, तांडेल. ' अभयलेख देणारे कपतान तरी त्यास किती भेटतील ? ' –नि ८८८. [ इं. कॅप्टन ]

**कप्तान**—न. बैलगाडींत असलेल्या मालास पाऊस वगैरे लागूं नये म्हणून केलेला आडोसा, पडदा. हा बहुदा खजूर भरून आलेल्या तट्ट्याचा असतो. [ अर. कफ्आत–कपात=( खजुराची ) शिंदीच्या चटईची पेटी ]

**कप्पा**—१ कपा पहा. ' दोन कप्प्याची बनलेली थैली म्हणजे हृदय होय. ' –आरोशा १.१४.

**कप्पा**—पु. पेटी; गठ्ठा; आंख. ' खारकेचा भाव काय म्हणुन दुकानदारास विचारलें तर तुम्ही किती कप्पे घ्याल हें सांगा म्हणजे मग आपणांस भाव सांगूं असें बोलतात. ' –मुंब्या ५०. [ कपात पहा ]

**कप्पी**—स्त्री. पुली; कपी पहा. ' शिडाला कप्पी बांधा आणि त्या दुष्ट मनुष्याचे पाय बांधून त्याला उलटा डोलकाठीवर टांगा ! ' –स्वप २९६.

**कप्पी**—स्त्री. लहान कप्पा, खण.

**कफ**—पु. १ शरीरांतील त्रिदोषांपैकीं एक. कफामुळें तोंड गुळमट चिकट होणें, तोंडाला पाणी सुटणें, झोंप फार येणें, वर्षांत

खुरखुरणें, तिखट पदार्थ खाण्याची इच्छा होणें, उष्ण उपचारांची इच्छा होणें, अग्निमांद्य, मलमूत्राचें आधिक्य वगैरे लक्षणें होतात. २ खाकरलें असतां घशांतून बाहेर येणारा पातळ बुळबुळीत पदार्थ; श्लेष्मा; खाकरा; बेडका. ३ फेंस; फेन. [सं. कफ. तुल० फा. कफ्=फेंस, थुंका] ०घ्न, नाशक, निःसारक, भेदक, सारक, हर, हारक, कफारी-वि. कफ नाहींसा करणारें (औषध वगैरे). ०ज्वर-पु. कफ जास्त झाल्यानें किंवा शरीरस्थ कफांत दोष उत्पन्न झाल्यामुळें येणारा ताप; कफप्रधान ज्वर. [सं.] ०पित्त ज्वर-पु. कफ आणि पित्त यांचें आधिक्य होऊन येणारा ज्वर. [सं.] ०प्रकृति-स्त्री. कफ किंवा कफजन्य दोष जींत अधिक आहेत अशी प्रकृति. [सं.] ०रक्त-पु. कफाबरोबर रक्त पडणें; एक रोग. 'आम्लपित्त, रक्तपित्त। वातरक्त, कफरक्त। खोकलें, खरूज अत्यंत। विसर्प एकां।' -गीता १३.२४९७. [सं.] ०वात पित्त ज्वर-पु. कफ, वात व पित्त हे तीन वाढल्यामुळें येणारा ताप, त्रिदोषजन्यताप. [सं.]

**कफ**—पु. सुरमाडाचा कापूस; भूस, रुई वगैरेंच्या फळांतील म्हातारी, इ०. कप पहा. 'लोह कफ गारा अग्निचिया काजें। येऱ्हवीं तें ओझें कोण वाहे।' -तुगा २१७४. [सं. कार्पास]

**कफ**—पु. (कों.) कप्पीचें घर, सांचा (कप्पीसह किंवा कप्पीशिवाय)

**कंफ**—पु. (प्र.) कंप (गाण्यामध्यें आवाजांत होणारा कांप. रेपणा) २ थरकांप; शरीर लटलटणें, हलणें. [सं. कंप]

**कफण-न**—न. मुसलमानाच्या प्रेतावरील वस्त्र-आच्छादन. 'त्याची कफन आणून त्यास माती दिल्ही.' -रा ६.११२. 'मयत माणसाचे कपन घेतो.' -मसाप २.२.६४. [अर. कफन् तुल० इं. कॉफिन] ०खायरा-रो-वि. (गो.) कफनाचा तुकडा सुद्धां विकून खाणारा. (ल.) अतिनीच (मनुष्य).

**कफणी-नी**—स्त्री. १ कोपरापासुन पुढील हात व डोकें यांशिवाय सर्व शरीर झांकेल असा अंगरखा, हा फकीर, साधू वगैरे लोक वापरतात; बिन बाह्यांचा अंगरखा; पायघोळ सद्रा. २ (व.) जाकीट. [अर. फा. कफनी] गळ्यांत कफनी घालणें-(ल.) १ संसारपाश तोडून विरक्त होणें, संसारत्याग करणें. २ भिक्षापात्र हातीं घेणें. भीक मागणें.

**कफल्ल, कफल्लक**—वि. अतिशय गरीब, ज्याच्यापाशीं कवडी देखील नाहीं असा भिकारी, भिकाऱ्यांचा राजा. (सामा.) कंगाल; दरिद्री; निष्कांचन. 'दोघेहि सारखेच कफल्लक.' -नि ६६८. 'आतां प्रत्येक मनुष्यास असा अधिकार (प्रत्येक मनुष्यानें मिळविलेल्या द्रव्यावर त्याचें पूर्ण स्वत्व) मिळाल्यानें, एकाजवळ लाखों रुपयांची इस्टेट, व दुसरा अगदीं कफल्लक अशी स्थिति होते.' -टि ४.२४. -पु. कफल्ल हें जगांतील आदिचोराचें नांव आहे. चोरांनीं चोरी करूं नये म्हणून लोक निजते वेळीं अस्तिक अस्तिक काळभैरव, कफल्लक' असें म्हणून याच्या नांवाचें स्मरण करतात. याला ब्रह्मदेवानें वर दिला आहे कीं तुझें जो स्मरण करील त्याला चोरापासुन भय नाहीं. 'आदिचोर कफल्लस्य ब्रह्मदत्त वरस्य च।' इ०. कोठें कफल्लाच्या तीन बायकांचें स्मरण करावें असें सांगितलें आहे. 'तिस्रो भार्या कफल्लस्येति०' [सं. कापालिक? कफल्ल]

**कफशदोज-गर**—जोडे शिवणारा. [फा. कफ्श-जोडा]

**कफारत-लत**—स्त्रीपु. १ तंटा; तेढ; कज्जा. कज्जाशब्दा-बरोबर कज्जा कफाल्त-कफावत हा विशेषतः आढळतो. 'तुम्हां-जवळ आम्हांविषयीं हरएक बाबेविशीं कफारत पडते, त्या गोष्टीवर न जावें. -पाब ९. २ आळ; तोहमत; आरोप (क्रि० घेणें आणणें). 'ही रति कफाल्त सरती त्याचि मज वरतीच संगत पडेल।' -राला ५७. 'संपादणी कौटाल कफालती ठाऊक आवध्या तुज।' -होला ३१. ३ अडचण; त्रास; संकट; पेंच; क्लेश; अरिष्ट (क्रि० येणें). गळयांत पडणें, उभा राहणें, उपस्थित होणें. ४ लचांड; झट; झेंगट; पीडा (क्रि० येणें, इ०). [अर. कुफ्रात्-कृत-घ्नता; अविश्वास]

**कफालत**—स्त्री. जामीनकी; हमी. 'हे दफा कफाल्तीचे अहदनाम्यांतील नाहींत.' -रा ७.९४. [अर. कफाल्त्]

**कफावत**—स्त्री. उघडकीस आणलेली, उमगून काढलेली चूक, दोष, गुन्हा. (क्रि० काढणें). घेणें, जाणणें. २ भांडणतंटा; कज्जा; कलह; बखेडा. 'कज्जे कफावती होऊत रस्त्यांत। असावी घरांत शांती मोठी॥' [अर. कफालत्]

**कफोदर**—न. कफाचा जोर झाल्यामुळें होणारा एक रोग. जलोदराचा एक प्रकार. [सं.]

**कबई**—स्त्री. एक प्रकारचा आंगरखा, झगा. [फा. कबा-वरचा अंगरखा किंवा जाकीट.]

**कबकबीत**—वि. पचपचीत; पाणचट (ऊंस, कलिंगड खरबूज इ०) बेचव; कवकवीत पहा.

**कंबखत-ती, कंबख्ती**—स्त्री. कमबखत-ती पहा. 'कंबखती आली आतां पण डरून काय उपयोग?' -त्राटिका. 'आली कंबख्तीची वेळ!' -भा ११८. [फा. कम्+बख्त]

**कबगीर**—पु. मोठा चमचा; पळी. 'यखनी उकळूं लागतांच तिला वारंवार कबगीरानें हालवीत जावी.' -गृशि २.१३. [अर. कब्ब्=उलथणें, परतणें+गीर]

**कबचाड**—न. (व.) कवच. [सं. कवच]

**कबज**—न. १ लेखी पावती, पोंच. 'ऐवज पावोन दीक्षितांची कबजें घेतलीं आहेत.' -रा १.२९४. 'पावले पैकियाची कबज' -भाअ १८३४.१३८. २ धनकोला देण्याकरितां जप्त केलेला माल. -जप्ती, कांहींहि माल किंवा जिंदगी यांची जप्ती. अशा

रीतीनें जप्त केलेला माल; जिंदगी; मिळकत. ३ लेखी पावती किंवा करारनामा लिहून दिल्यामुळें उत्पन्न होणारें बंधन; आळा; वचनबद्धता; लेखामुळें, वचनामुळें गुंता. ४ पाटील-पटवारी यानें साऱ्याच्या पोटीं शेतकऱ्याला दिलेली पावती. ५ मलाव रोध; सांखळा; अवष्टंभ ६ धरणें; पकडणें; (बोलण्याचा) आधार घेणें ( विशेषतः एखाद्या मनुष्याला त्याच्या भाषणांत ). (क्रि० धरणें, पाडणें). ७ ताबा, कबजा पहा. ' एकमूठ असते तर आपले हातीं कबज राहता. –रा ६.६००. –वि. स्वाधीन. 'सालगुदस्त किल्ले रायगड मोगलास कबज जाला. ' –रा १७.३८. [ अर. कब्ज़ ] ०करणें-जिंकणें; ताब्यांत घेणें. ०दस्त-वि. हस्तगत; स्वाधीन. ' मुलुख कबजदस्त केला. ' –मब १०३. ०पत्र-न. मालकी हक्क किंवा कबजा एकानें दुसऱ्याचे ताब्यांत दिल्याबद्दलचा करारनामा. –भाअ १८३२.

**कबजा**—पु. कबज; कब्जा. ताबा; अम्मल; मूठ; पकड, भोगवटा. [ अर. कब्ज़ ]

**कबजा**—पु. जाकीट; अस्तन्या नसलेली बंडी. ' तिनें डोक्यावरून घेतलेल्या किरमिजी रंगाच्या ओढणींतून तिनें घातलेला भरजरी किनखापी कबजा स्पष्ट दिसत होता.' –स्वप २४५. [ फा. कबाचा ]

**कबजा**—पु. ( ना. ) बिजागिरी. –शर.

**कबजी**—पु. कलुशाचें टोपण नांव कविजी. [ स. कवि+जी ]

**कबजी**—वि. कबजांत, ताब्यांत असलेला; हस्तगत केलेला (सरंजाम, प्रांत ). 'सरंजाम गेर कबजी' –खरे ९४२. [अर. कब्ज़] ०धरणें-क्रि. पेंचांत धरणें; पकडणें; गोवणें.

**कबजेगहाण**—न. ( कायदा ) ताबेगहाण; कर्जफेडीबद्दल धनकोनें ऋणकोची मिळकत तिच्या उत्पन्नांतून व्याज व मुद्दल फेडून घेऊन त्याचा हिशेब ठेवून परत करण्याच्या करारानें–ताब्यांत घेणें. (इं.) युसुफ्रक्टरी मॉर्टगेज. [ अर. कब्ज़+गहाण ]

**कबजिगरी**—स्त्री. ताबा, अम्मल. ' अलीकडे या राज्यांत कबज्गिरी आधीं जाली ते गांवीं ठाणें बैसवून तर्फा केलिया आहेत. ' रा. १५.७८. [ अर. कब्ज़ ]

**कंबडी**—स्त्री. कळकाची कांबीट; कामटी, फीट, भेतूक. [ सं. कमठ=वेळू ]

**कंबणें**—क्रि. ( वे. ) वांकणें.

**कबंध**—पुन. १ मस्तकविरहीत शरीर; धड. ' सुता संशय न धरीं मद्वीर कबंध-तुल्य अवशिष्ट । ' –मोकर्ण ५.४. २ मस्तक तुटून गेलें असतांहि चलन वलन करणारें धड. ' जाणो सन्मरण महा लाभें बहु नाचले भटकबंध । ' –मोभीष्म ७.३९. 'रजपूत महा पराक्रमी, शिरच्छेद झाला तरी कबंद नाचतें. ' –हिंलई २२२. [सं.] ०नाचणें—क्रि. लढाईंत अतिशय कत्तल उडणें; रक्तपात होणें. ( एक लाख सैनिक युद्धांत मेले म्हणजे एक कबंध उठून नाचूं लागतें असें पुराणांत वर्णन आढळतें. )

**कबर**—स्त्री. मुसलमानाचें थडगें, पीर. ' शेवटीं त्या प्रांतींच कबर होऊन राहिले.' –थोशा ६. [अर. क़ब्र् ] ०स्तान-स्थान-न. मुसलमान लोकांची मसणवटी' स्मशान. [ फा. कब्रिस्तान् ]

**कबर-री**—स्त्री. वेणी; बुचडा; खोपा. ' मस्तकीं कुटिलालकभार। सुमनीं, कबर शोभती । ' –एभा १४.४५४. ' परततां कबरांबर नावरे । ' –( वामन ) नवनीत १३०. ' तवकें उठोनि धांउनि पळतां कवळूनि नीच कबरीतें। ' –मोविराट १.६६. 'मोकळे झाले कबरी भार । हरिवक्त्र विलोकितां ॥ '[सं. कबरी]

**कंबर**—स्त्री. हा शब्द कमर शब्दामध्यें पहा. [ फा. कमर ]

**कबरा**—वि. १ चित्रविचित्र, ठिपक्या ठिपक्यांचा (वस्त्र, पशु वगैरेंवर असणारा रंग ) २ करडया रंगाचा (वस्त्र, पशु वगैरे). [ सं. कर्बुर; प्रा. कब्बुर; हिं. कबरा] ०बांडा-वि. चित्र विचित्र रंगाचा; अनेक रंगी, मळकट पाढऱ्या रंगाचा (घोडा वगैरे). बांडा १ पहा. [ कबरा+बांडा ]

**कंबल-ळ**—पु. कांबळा; घोंगडी; लोंकरीचें वस्त्र; धाबळी. ' मोक्षादि सर्वसिद्धिची श्रेणी । श्वेतकंबलासनीं साधकां । ' –एभा १४.४०५. [ सं. कंबल ]

**कंबल**—( संगीत ) ज्यांत न्यासस्वर षड्ज असून ग्रह, अंश व अपन्यास स्वर पंचम असतो व ज्यांत ऋषभ स्वराचें बहुलत्व व गांधार मध्यम व धैवत ह्यांचें अल्पत्व असतें अशी स्वररचना. [ सं. ]

**कंवल, कबल**—नपु. ( राजा. ) अर्धा किंवा अर्ध्याहून अधिक भाग ( फळ, दगड वगैरेंचा फुटून निघालेला). [ सं. कवल ]

**कबलात-कबलायत**—स्त्री. कबुलायत पहा.

**कंबळ**—पु. (पगडबंद) पागोट्याचा किंवा पगडीचा डोक्याभोंवतालचा भाग. हा डिंकानें कागद चिकटवून तयार करतात व त्यावर कापडी पट्टा शिवतात. [ सं. कपाल ]

**कंबळ**—स्त्री. भोंवरसाल; एक झाड.

**कबळ**—पु. केस; कबरी. 'बाळाच्या कवळानिमित्त कबळा विस्तारुनीयां बळा । ' –आसु ४. [ सं. कबरी ]

**कंबळी**—स्त्री. कांबळें; जुनी घोंगडी, पटकूर. ' काळी कंबळी गुंतुन वुथी । ' –नव १३.१२३. [ सं. कंबल हिं. कमली ]

**कबाई-यी**—कबई पहा.

**कबाड**—न. एक घोडा किंवा उंट नेऊं शकेल इतकें ओझें ( लांकडें, गवत, वैरण वगैरेचें ); वैरण, कडबा, गवत, यांचें ओझें, गुरांनीं वाहून आणलेलें जळण. ( क्रि० बांधणें ). हा शब्द कोठें कोठें आखें ( अर्धं ओझें ) या अर्थी चुकीनें वापरतात. 'कही कबाड या लष्कराचें केल्यावर. ' –खरे १७०७. [ हिं. कबाड–

र=मोडकें सामान ] ०कष्ट-काम-कष्टाचें, मेहनतीचें, श्रमाचें काम, हलक्या दर्जाचें काम. ०खोत-पु. १ (कों.) जंगलांतील जळाऊ लांकडें तोडण्याचा मक्ता ज्याकडे आहे असा खोत; अधिकारी. २ कबाड, सरपण किंवा कडबा, धान्य वगैरे (बैलावरून वाहून) पुरविण्याचा मक्ता घेतलेला ठेकेदार. ०खोती-स्त्री. कबाडखोताचें काम; अधिकार. ०हाट-पु. लांकडें गवत वगैरेंचा बाजार. 'कबाड हाट तेथ खेळु।' -ऋ १२०.

**कबाडवान्**—पु. (व.) वाण्याच्या दुकानीं मिळणाऱ्या चिल्लर औषधी व वाळक्या वनस्पती. [कबाड+वाण=प्रकार]

**कबाडी गलबत**—न. व्यापारी मालाची वाहतुक करणारें जहाज. माल गलबत. -पु. (ल.) व्यापारी.

**कबाडी-ड्या**—वि. १ ओझें वाहणारा-नेणारा (मनुष्य, बैल, घोडा वगैरे). २ श्रमाचीं, कष्टाचीं, दगदगीचीं कामें करणारा; कावाडकष्ट करणारा; कांहीं सुख नसतां केवळ संसाराची खटपट करणारा. ३ ओबडधोबड कारागिरीचें काम करणारा (मनुष्य). ४ क्षुद्र, हलका, कमी योग्यतेचा मनुष्य. [कबाड]

**कबाब**—पु. मुसलमान लोकांतील एक मांसाचें पक्वान्न. 'काय हो कबाबांचा घमघमाट सुटला आहे.' -विवि १०.१०.२३०. [फा. कबाब=भाजलेलें मांस] -वि. (व.) शुष्क झालेला; वाळलेला; रोडावलेला (मनुष्य). 'रोगानें जळून कबाब झाला.'

**कबाब**—स्त्री. १ दूधभोपळा किंवा मुळा यांची किसून केलेली गोळाभाजी. २ कोरडया मसाल्यानें तयार केलेली भाजी. 'पाकशास्त्रांत कबाब या नांवाखालीं जे पदार्थ येतात ते सर्व मसाले लावून कोरडे तयार केलेले असतात.' -गृशि २.१११. [कम्+आव=पाणी ?]

**कबाबचिनी**—स्त्री. कंकोळ; एक औषधि (कोणी चुकीनें नागकेशरासहि म्हणतात). कबाब नावाच्या झाडाचें वाळलेलें फळ. रानलंवगा. [अर. कबाब्+फा. चीनी; लॅ. पायपर क्युबेबा]

**कबालत, कबाला**—स्त्रीपु. (प्रचारांत कबाला असा शब्द येतो). १ सनदशीर विक्री; खरेदीखत; मालकी हक्कांचा कागद. 'देशमुखी आपली आपण खुश-रजावंदीनें, कबालतीनें फरोक्त करून दिल्ही.' -रा १७.१. २ (बडोदें) कबुलायत; करार; कबूलनामा; कंत्राटदारानें केलेला करार. 'जिनसा अगर माल पुरविण्याची कबाल्यांत शर्त नसेल, त्यावेळीं तशा जिनसा व माल ह्यांविषयीं स्थानिक अंमलदारामार्फत रीतसर हरराजी करून कबाले करावे.' -स्वारीनियम २९. [अर. कबालत्, कबाला]

**कबालदार**—पु. कबाला, करार करून देणारा; कंत्राटदार. 'कबालदारास एकादा शामियाना लावून देण्याची कबाल्याप्रमाणें शर्त असल्यास अथवा ती नसतांही, स्वारी कामदार यांनीं हुकूम केल्यास गोटापासुन दूर एक शामियाना लावून देऊन पाहरा लाविणें आणि आगीपासुन बचावासाठीं पाण्याच्या चार डेगा त्या मंडपाच्या बाहेर थोडया अंतरावर भरून ठेवणें.' -डुकराची शिकार १०. [फा.]

**कबालपत्र**—न. सनद; कबुलायतनामा; करारपत्र; दस्तैवज. 'दिल्हे कबालपत्र ऐसे जे.' -रा १२.१८०. [फा.]

**कबाहत**—स्त्री. १ दोष; गुन्हा; कुभांड. 'लटक्या कबाहती उठवितील.' -रा ५.७६. 'खरें बोलावयासी जावें तर कबाहत उठेल. ती आटोपणें मुषकील.' -रा ५.१६७. २ कलह; तंटा. 'आपआपल्यांत कबाहत लागल्यानें शत्रूस राजकारणें करावयास जागा होती.' -रा १९.३५. [अर. कबाहत्]

**कबित्त, कबीत**—न. १ (हिं.) कवित्व; काव्य; कविता. २ हिंदींतील काव्याचा एक भेद. भाट लोक म्हणतात त्या प्रकारच्या कविता. ३ कवितेचा एक प्रकार; पोवाडा, कटाव यासारखी सामान्यतः घनाक्षरी वृत्तासारखी रचना. [सं. कविता]

**कबिरा**—पु. उंसाची एक जात. -शे ७.२०५. [का. कब्बु=ऊंस]

**कबिला**—पु. १ कुटुंब; बायकामुलें; परिवार; जनाना. २ (विशेषतः) लग्नाची स्त्री; घरधनीण; मालकीण. [अर कबीला]

**कबिला**—पु. (कों.) (नाविक) वांक व पठाण यांस जोडण्याकरितां केलेला लोखंडी जाड गजासारखा खिळा, हे खिळे बाहेरून ठोकतात.

**कबिलेदार**—वि. कुटुंबवत्सल; बायकोमुलें असलेला; प्रापंचिक. [अर. कबिला+दार]

**कबिलेमाही**—क्रिवि. महिन्यापूर्वी. 'त्यास कबिले माही दादासाहेबाबाबें व चिखली वगैरे गांवे फत्तेसिंगराव गायकवाड यांचे मुलखाबाबद मजकूर मरकूम केला आहे.' -रा १०.१६४. [अर. कब्ल=पूर्वी+माह=महिना; फा. कब्ल+माह्]

**कबीरपंथ**—पु. कबीरसंप्रदाय; कबीर (१५ वें शतक) नांवाच्या रामभक्त साधूनें स्थापन केलेला एक भक्तिसंप्रदाय. [अर. कबीर=श्रेष्ठ, मोठा+पंथ]

**कबीरपंथी**—वि. कबीरपंथास अनुसरणारा; कबीराचा अनुयायी.

**कबीलदार**—कबिलेदार पहा.

**कंबु**—पु. शंख. 'इक्षित हास्य मनोहर। ग्रीवा सुंदर कंबु जैशी।' -एभा १४.४७८; 'श्रीद त्यजिले वरिला अदक्षिणावर्त तुच्छ कंबु कसा।' -मोसभा ४.१४. [सं.] ०कंठ-पु. शंखासारखा गळा. (हें सौंदर्याचें लक्षण समजतात). 'ओंकार मातृकांसकट। तोचि जाणावा कंबुकंठ।' -एरुस्व १.४२.

**कबु-बू-तर**—न. एक पक्षी; खबुतर; कपोत. याच्या रंगपरत्वें पाढरा, काळा, शिराजी वगैरे जाती आहेत. [फा. कबूतर्]

०खाना-पु. १ कबूतरें ठेवण्याची जागा; कबूतरें पाळण्याची, बाळविण्याची जागा. २ खुराडें, ढाबळ. [ फा. कबूतर् ] ०बाज-वि. कबूतरें पाळणारा, कबूतरें खेळविणारा. [ फा. ]

**कबुलात, कबुलायत**—स्त्री. १ ( कायदा ) कबूलनामा; करारनामा: लेखी अथवा तोंडी केलेला करार; संमतिपत्र. ( इं. ) ॲग्रीमेंट. 'कबुलातीचा मज्कूर' -ख ४.१४५७. २ ( महसुली ) वसूल, खंड किंवा सारा देणाऱ्याचा साऱ्याच्या रकमेबाबत कबुली बद्दलचा करार. [ अर. कबूलीयत् ]

**कबुली**—स्त्री. १ संमति; मान्यता; स्वीकार. २ ( कायदा ) आरोपीनें गुन्हा केला आहे अशाबद्दल अनुमान निघेल अशी कळविलेली तोंडी किंवा लेखी हकीकत. ( इं. ) कन्फेशन. [ अर. कबूल् ] ०जबाब-पु. १ ( कायदा ) वादीचें म्हणणें न्याय्य आहे असा प्रतिवादीनें न्यायसभेंत दिलेला लेख. २ आरोपीनें आरोप कबूल असल्याबद्दल दिलेली जबानी. [ फा. कबूली+जबाब् ]

**कबू**—( गो. ) उंसाची एक जात. हा जाड असून पेऱ्यांवर उभ्या लाल रेषा असतात. [ का. कब्बु=ऊंस ]

**कबूतांदूळ**—पु. एक उंची जातीचा तांदूळ.

**कबूल**—वि. १ मान्य; पसंत; संमत; राजी ( गोष्ट, वस्तू वगैरे ). २ मान्यता देणारा; संमति देणारा ( मनुष्य ); अनुकूल. ३ मान्य केलेलें, पसंत केलेलें ( कार्य, वचन ). [ अर. कबूल ] ०कतबा-(पा)-कद्बा-पु. १ वादाचा निकाल लागण्यापूर्वी पंचांनीं दिलेला निकाल आम्हांला मान्य आहे असा पंचांपुढें वादीप्रतिवादींनीं दिलेला लेख, राजिनामा. २ ( महसुली ) पाटलानें घेतलेल्या साऱ्याला कबुली देणारा रयतेचा कबूलनामा, संमतिपत्र. ३ कबुली लेख. -रा ३.४४. [ अर. कबूल+कतबा, कतपा=लेख ] ०कागद-पु. कबुली लेख. 'हा कबुल कागद लिहून दिल्हा.' -रा ६.१८०. [ फा. ]

**कबूस**—पु गलबतावरील भटारखाना-स्वयंपाक गृह. [ जर्म. कबूस, डच. कबुइस; इं. कबूस ( कॅबिन+हाउस ) ]

**कंबेश**—कंपेश पहा. 'आंहरही कंबेस दों हजारांचा आला' -मदबा. [ फा. कम्+बेश ]

**कंबेशी**—स्त्री. न्यूनाधिक्य; कमी अधिकपणा. कंपेश पहा. 'चाकरीच्या कंबेसीचे इलाजमास चिंता नाहीं, परंतु हरामखोरीचे इलाजमानें आमचे खिळास बद्धा आहे.' -होकै ३३.

**कबेशी**—पु. ( कों. )( नाविक ) नावेच्या फळीच्या घडकामास मजबुती येण्यासाठीं ठोकावयाचे खिळे, हे आंतून ठोकतात. हे खिळयांपेक्षां लहान असतात. हे फळयांस सांधकामास ठोकतात.

**कब्जा**—कबज, कबजा पहा. 'पण शत्रूचे कबजांत राहणें यापेक्षां जीव जाईल तर बहुत उत्तम !' -रा १२.९२.

**कब्जी**—कबजी पहा. 'लश्कर पावसाळे दिवसांत छावणीस आपले कब्जी देशांत यावें' -चित्रगुप्त ३६.

**कब्बू**—वि. ( प्रां. ) १ घेतलेलें ऋण परत करण्याच्या कामीं चिकट ( ऋणको ); खमक्या; धकाबुकीला तयार. २ जड हाताचा; चिक्कू. चिकट ( माणूस )

**कँब्लेट, कांब्लेट**—न. ( कु. ) कामलेट; ब्लँकेट; पांघरण्याचें वस्त्र. [ इं. कॅमल=उंट; अर. जमल; लॅ. कॅमेलस्; कॅमलेट=उंटाच्या लोंकरीचें वस्त्र; किंवा इं. ब्लँकेट=पांढरें लोंकरीचें वस्त्र, ब्लँक=पांढरें, सं. क्रमेलक=उंट ]

**कम**—पु. ( परीट ) भट्टीचें पाणी, खारें पाणी. 'कमांत कपडे भिजवा.' 'परटाकडून कम घेऊन या.'

**कम**—वि. १ अल्प; थोडें. 'आपल्यास शिबंदी कम पडे म्हणोन लिहिलें तें कळलें' -रा ६.२२९. २ उणा; कमी; उणीव असलेलें. उ० 'आण्याकम रुपया'; 'शेर कम मण'. [ फा. कम् ] ०अक्कल-स्त्री. अल्पबुद्धि; [illegible] [ फा. कम्+अक्ल ] -वि. अल्पबुद्धीचा; कमी समजुतीचा; [illegible] मति. ०असल अस्सल-वि. १ हलका; कमी योग्यतेचा. २ [illegible]; दासीपुत्र, अकुलीन. कमसल पहा. 'मी कमअस्सल नाहीं.' -चंद्रप्र ८. 'जो कम अस्सल असेल तोच दगलबाजी करतो.' ०इज्जत-स्त्री. अप्रतिष्ठा. 'अमा गैरहिसाबी जाजती सोसून कमइजतीनें व गैरमेहेरबानीनें पेशजी ही खिद्मत केली नाहीं व पुढेंही न करूं.' -इम ६७. [ फा. ] ०कस-वि. कमी कसदार; कमी दर्जाची ( जमीन ). ( क्रि० होणें ). -शे ८.१४५. ०कसर-वि. जवळजवळ; सुमारें; थोडें कमी असलेलें; कमींतकमी. 'मशारनिलेस जाऊन कमकसर एक साल गुजरलें.' -रा १०.१६४. '...फुलें त्यांजवर उधळतात तेव्हां कमकसर जमिनीवर घोटयाइतका तुळशीफुलांचा थर...पडलेला असतो.' -तीप्र ११७. [ फा. कम्+अर. कसर्=न्यून ] ०कायदा-पु. १ कायदा, शिस्त, सभ्यपणा, शिष्टाचार याची उणीव; सभ्यपणाची रीत, वळण, शिस्त इत्यादींमधील सदोषता, सैलपणा, ढिलाई; बेकायदा-शिस्त वर्तन. 'कमवेतन रहावें, पण कमकायदा राहूं नये.' 'म्यां त्याचे घरीं कमकायदा पाहिला म्हणून जाणें सोडलें.' २ दोष; उणीव; पद्धतशीर नसणें; योग्य वहिवाटी-प्रमाणापेक्षां कमी असणें. ( क्रि० करणें ) [ फा. कम्+अर. कायदा ] ०कुवत-वि. दुबळा; अशक्त; हलका; कमजोर; निर्बळ; अधु; पंगु. 'महाराष्ट्रीय मेंदू इतका कमकुवत झाला काय ?' -नाकु ३.१६. [ फा. कम्+कुवत् ] ०जयाद-वि. कमी अधिक; कमी किंवा जास्त. -पु. कमीपणा किंवा आधिक्य; उणाई किंवा फाजीलपणा; उणीव किंवा चढ. -वाडसमा २.२५८. [ फा. कम्+झियाद् ] ०जात-वि. हलक्या जातीचा; हीन कुळांतील; लेकवळा; कमसल. [ फा. कम्+ज़ात् ]

०जादा–वि. कमी अधिक. 'कमजादा होईल त्याप्रमाणें करार करून घेऊन लेहून पाठवितों.'–खरे १.४३८. [फा. कम्+झियाद्] ०जास्त–स्ती–वि. कमीजास्ती; थोडें किंवा अधिक, अधिकउणें. [फा. कम्+झियाद्] –नस्त्री. उणीव किंवा चढ. कमतरता किंवा आधिक्य. ०जोर–वि. दुर्बळ, अशक्त. कमकुवत पहा. [फा. कम्+झोर्] ०तर–स्त्री. १ कर्तव्य करण्यास चुकणें; कर्तव्य टाळणें; साधारण चूक, दोष. (क्रि० होणें–पडणें). [फा. कम्+तर्] –वि. १ उणें; कमी असलेलें; अल्पतर. २ क्षुद्र; निःसत्व. 'पातशाही कमतर पडली असें समजून राजियानें विजापूरचे किल्ले तळ कोंकणांत होते ते सर्व घेरले.'–सभासद २०. २१. ०तरपणा–वि. कमीपणा. –गल्लिवृ ३.२४. ०तरीन–वि. १ (लेखन–पत्रव्यवहारांत रूढ) कमी योग्यतेचा; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा; अतिक्षुल्लक. (लेखक स्वतःविषयीं हा शब्द सौजन्यानें योजतो.) 'बंदे कमतरीन'–रा १५.९९. २ कमींत कमी. 'सिबंदीचे कम–तरीन पन्नास साठ लक्ष देणें आहे.'–रा १२. ८७. [फा. कम्+तरीन्] ०तोल–वि. १ वजनांत कमी असलेला. २ (ल.) कमी दर्जाचा, हलका, कमी योग्यतेचा. [फा. कम्+सं. तुल्] ०दर–पु. कमी झालेला भाव किंवा दर (विशेषतः साऱ्याचा). [फा. कम्+दर] ०दरी–वि. ज्याचा भाव कमी झाला असा (विशेषतः सारा). ०दस्त–पु. कमी कर किंवा सारा. [फा. कम्+दस्त=हात] ०दस्ती–वि. जीवरील कर कमी झाला अशी, जीवरील कर कमी आहे अशी (जमीन वगैरे). ०नशीब–न. दुर्दैव. [फा. कम्+नसीब्]. ०नशिबी–वि. दुर्दैवी; दैवहीन. ०पेश(ष)बेश–कंपेश पहा. ०बक्त–बखत–वि. १ दुर्दैवी, कमी नशीबाचा; दैवहीन. २ लुच्चा; लबाड; दुष्ट. 'या कमबख्त मनुष्यास माझ्या डोळ्यांसमोरून दूर करा.' –गुलबकावली. [फा. कम्+बख्त्] ०बख्खती–स्त्री. १ दुर्दैवीपणा. २ संकट; आपत्ति; मार खाण्याचा प्रसंग; शिक्षा घडण्याची शक्यता. कंबक्ती पहा. (क्रि० येणें, भरणें) [फा. कम्+बख्त्] ०लावणें–न. १ (कों.) आगरांत दर विघा माड, पोफळी अमुक असाव्या असा शिरस्ता असतां त्याहून कमी लागण करणें (याच्या उलट भर लावणें). २ कमी लागणीमुळें कमी केलेला सारा. [फा. कम्+लावणें]

**कमकमचें**—क्रि. (गो.) थक्क होणें; आश्चर्यचकित होणें.

**कमचा–ची**—स्त्री. १ (हिं.) फोक; फोकाटी; बारीक छडी शिपटी; शिरटी. २ बांबूची बारीक कांबीट; कामटी 'गोसावी नंग पिऊन भांग हातीं घेउन समसेर कमची खबर आम्ही घेतों फिरंग्याची।'–ऐपो ३९२. ३ वेताची छडी; वेताची काठी; चमकी. 'कमचा पाठीं उडती भरी।'–(नवनीत) अमृतराय २३९. 'म्हणे गंगु हैबती हो अशी कशी प्रीती तुमची महादेव। ख्याल करती विलायती थेट कमची।'–प्रला १४३. [तु. कमची; हिं. कमची=छडी; सं. कमट=वेळू]

**कमट**—न. कमठ; कांसव; कच्छ; कूर्म; 'रूपे कमट तुझा पती तीव्र पृष्टी आकृती।'–होला ३०. [सं. कमठ]

**कमटा–ठा**—पु. धनुष्य (विशेषतः कळकाचें किंवा शिंगाचें) तीरकमटा असा संयुक्त शब्द बहुधां येतो. 'गोसाव्यानें लगट करून मार बसवी तिरकमट्याचा।'–ऐपो. ३९२. 'घा लाठी कमठा बाण।'–संग्रामगीतें २१. [सं. कमठ=बांबू; हिं. कमठा=धनुष्य]

**कमठ**—पु. कांसव; कूर्म. 'नातरी पाठी करोनि निबर। रूप धरी कमठाचें।'–एरुस्व २.१३. 'म्हणे कमठ जाहला तुझा भ्रतार। कूर्म दृष्टी पाहत परमतीव्र।'–हवि ३०.३८. [सं.]

**कमंडलु**—पुन. माती, लांकूड किंवा धातु यांचें केलेलें पाण्याचें भांडें; तुंबा; विशेषतः संन्यासी किंवा ब्रह्मचारी वापरतात. कडु भोपळ्याचाहि कमंडलू करितात. 'करिं कमंडलु दंड मृगाजिन।' –(वामन) नवनीत १०९. [सं.]

**कमडी**—स्त्री. १ (ना.) वेळूचें कांबीट. २ कोपरापासून मनगटापर्यंतचें हाताचें हाड. कंबडी पहा.

**कमत**—न. (कर्ना.) घराउ शेती; स्वतः कसलेली शेती; घरवहा शेती; कुळंबावा. 'त्या इसमाच्या घरीं दहा बैलांचें कमत आहे.' उत्तर हिंदुस्तानांत कामत (उपरी माणसाची शेती) हा शब्द यावरूनच पडला आहे. [बे]

**कमतणूक**—स्त्री. कमतरता; न्यूनता; तूट; उणीव. [फा. कम्]

**कमतनूक**—वि. १ सडपातळ; कृश; बारीक; किडकिडीत; रोड (मनुष्य किंवा जनावर). २ कमकुवत; बारीक; लेचापेचा (खांब, वासा; इमारत; वगैरे). [फा. कम्+सं. तनु]

**कमतरता**—स्त्री. उणीव; कमतणूक पहा. [फा. कम्]

**कमता**—वि. कमी; उणें; अल्प; पाहिजे त्यापेक्षां थोडें. [फा. कम्]

**कमताई**—स्त्री. उणीव; वाण; न्यूनता; कमतरता [फा. कम्]

**कमतावणें**—अक्रि. हलके होणें; उतरणें; हळु हळु कमी होत जाणें. [कमता]

**कमतावा**—पु. बट्टा; कसर. (इं.) एक्स्चेंज डिफरन्स. हुंडणावळ. 'रुपयाची किंमत वाढल्यास शेतकऱ्यांच्या साऱ्याच्या रुपयांची संख्या त्या प्रमाणानें कमी करून त्यास कमताव्याचा फायदा यावयास नको होता काय?–टि २.४०२. [फा. कम्]

**कमती**—स्त्री. तूट; वाण; कमीपणा.–वि. १ थोडें, अल्प, कमी. 'त्याला प्रसंग फार कमती असत.' म. सद्दावें पुस्तक (१८७५) १९८. २ उणें; उणीव; वाण; कमीपणा. [फा. कमती] ०बढती–स्त्री. उतारचढ, क्षयवृद्धि. [फा. कमती+सं. वृध्]

**कमन**—वि. सुंदर; प्रियकर; रमणीय; कमनीय. ' हृदयीं बाहूनि कमना । प्रेमें लाविला स्तना.' –आपू ९. [ सं. कम्=प्रेम करणें ]

**कमनीय**—वि. सुंदर; पसंत; मनोहर; तोषद; इष्ट; कमन. ' गणाधीशा ईशा परम रमणीया कमनिया ' –दावि २२२. ' कम नीय बाला ' [ सं. कम्=आवडणें; प्रेम करणें ]

**कमर**—स्त्री. १ कंबर; कटि; मध्य; माज. २ ( जंबियाचा एक डाव ) आपल्या हातांतील जंबियानें जोडीदाराच्या उजव्या बाजूच्या कमरेवर कनवटीजवळ मारणें. [ फा. कमर् , तुल. सं. ककुद्मती ] ०**कचका**–पु गुडघ्यानें पाठींत मारलेला ठोसा, गुद्दा, धक्का. ( क्रि० मारणें–देणें–बसणें–बसविणें ) ०**कोट**–( **कंबर-कोट** )–पु. ( ना. ) कंबरेपर्यंत लांब असलेला व अंगास घट्ट होणारा कोट, अंगरखा. हा आडाणी लोक वापरतात. ०**खुलाई**–स्त्री. ( हिं. ) अपराधी कुळाकडे खंड, गुन्हेगारी वगैरे कारणाकरितां आलेल्या शिपायास कंबर सोडावयाकरितां द्यावें लागणारें द्रव्य. ( सरकारी शिपाई हा पैसा त्रास देऊन उकळून घेतो, एरवीं गुन्हेगाराला कांहीं वेहधर्म इ० हि करून देत नाहीं ). ०**खोडा**–पु. (मल्लविद्या) कुस्तींतील एक पेंच. आपला एक पाय जोडीदाराच्या पोटाखालीं घालून त्या पायाचा आपला पंजा आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या खवणींत धरून जोडीदाराला आवळून धुसमडून त्याला चीत करणें. [ कमर+खोडा ] ०**गुर्दा**–पु. कमरेस बांधावयाची गदा. –इम १०. [ कमर+गुर्दा ] ०**ठाव**–वि. १ कमरेपर्यंत, कमर बुडेल इतकें ( पाणी वगैरे ); कंबरभर. –पु. २ कमरेइतकी पाण्याची खोली. ०**ताऱ्यो**–पु. ( ना. ) मुलांचा एक मैदानी खेळ. ०**पट्टा–ट्टी**–पुस्त्री. १ कमरेभोंवतीं घालावयाचा सोन्याचा किंवा चांदीचा पट्टा; स्त्रियांचा एक दागिना. २ कमरबंद. [कमर+पट] ०**पाईक**–पु. ( गो.) शूद्रांपैकीं एक जात ०**बंद्**–पु. १ करगोटा. २ काचा, कमरेस बांधावयाची वस्तू ३ तरवार लटकविण्यासाठीं कमरेस बांधावयाचा पट्टा; दाली. ४ कांहीं अंगरख्यास असणारा कमरेजवळ बांधावयाचा बंद. ५ कमरपट्टा पहा. [ फा. कमर्+ बंद्, सं. बंध. ] –वि. सिद्ध; तयार; कटिबद्ध (एकादें काम करावयासाठीं). 'आजि कमरबद होवोनि.' –मसंगी ५०. ०**बंदगी–बंदी**–स्त्री. १ सिद्धता; तयारी; मुस्तैदी ( युद्धाची, ग्रामांतराची वगैरे ). ' तमाम खुषकींतील सरदारानीं एकदिल होऊन इंग्रजांचे तंबीवरी कमरबंदी केली. ' –रा १०.१९९. २ तयार होणें; सिद्ध होणें; काचा बांधणें ( गांवास जाणें, युद्धास जाणें वगैरेसाठीं ). ०**बस्ता**–पु. १ सिद्धता; तयारी, सज्जता. कमरबंदी पहा. (क्रि० करणें, बांधणें). 'कास कासली वरून ज्यानें कंमरबस्ता केली. '–ऐपो ७०. २ कमरपट्टा काचा; कमर; बांधावयाचें वस्त्र. [फा. कमर्+बस्ता; सं. वस्त्र ] ०**बस्ती**–स्त्री. कमरबंदी. ' बरकड कंबरबस्ती करून । कल्पिल्या मार्गी चालिले ॥ ' –नव १५. ८९. [ फा. कमर्+बस्ती ] ०**मोड**–स्त्री (स्वतःची कंबर मोडणें). –वि. १ ( ल. ) अति मेहनतीचें, दगदगीचें. २ कमरमोड होण्यासारखें. [फा. कमर्+मोड ] ०**मोडकाम**–न. अति श्रम पडणारें काम; अति कष्टाचें काम. ०**मोडी इरलें**–न. ज्याचा खालचा भाग थोडा आंतील बाजूस वळविला आहे ( इरलें घेतलेला मनुष्य खालीं वांकल्यास जो वळलेला भाग पाठीच्या खालीं येईल ) असें इरलें. [फा. कमर्+मोडणें+इरलें] ०**सरी**–स्त्री. (गो.) घराचे वांसे वाकूं नयेत म्हणून मध्यें आडवें घालतात तें लांकूड. भिंतीवरील सर. –**कमरेचा कांटा**–पाठीच्या कण्याचा अगदीं शेवटचा मणका, याच्या उलट मानेचा कांटा. ( क्रि० ढिला होणें= अगदीं गळून जाणें; फार त्रास होणें ). –**खवाट–टा**–नपु. कुल्ल्याचा भाग; मांडीचा सांधा; ढुंगण. –**जोर**–पु. शारीरिक बळ ( पैसा, मित्र, बुद्धि यांच्या बळाहून भिन्न ). –**ढिला**–वि. १ शक्तिहीन; निर्बळ; कमजोर. २ नपुंसक; नेभळा; पुरुषत्वहीन. –**सांधा**–पु. कमरेचा खवाटा; कुल्ल्याचा भाग; ढुंगण. –**ची कमान**–स्त्री. कुबड; वांकलेलें शरीर. ' कमरेची कमान झाली तरी मी तरुण आहे असें त्याला वाटतें. ' ०**कसणें**–( वाप्र. ) सिद्ध होणें; तयार होणें; काच्यानें कमर बांधणें. ' संभाजी महाराजांचा पुतळा उभारण्यास या उभयतां महाराजांच्या विद्यमान वंशजांनीं कंबर कसली पाहिजे. ' –सासं २. १८०. ०**खचणें**–१ अशक्त होणें; कमरेंत जोर नसणें; कमर निर्जीव होणें. २ ( ल. ) उत्साह, आशा, धैर्य सुटणें; हिंमत, धमक नाहींशी होणें. –**रेचे टाके ढिले होणें**–अति श्रमित होणें; फार कष्ट होणें; दमणें. ' यामुळें साऱ्या नोकरांच्या कमरेचे टांके ( पांचसहा तासांत अगदीं ) ढिले होऊन जातात. ' –आगर ३.४५. ०**ताठणें**–आजारामुळें किंवा अशक्तपणामुळें कमर हालविण्याची शक्ति न राहाणें; एकसारखें बसून किंवा उभे राहिल्यानें कमरेस ताठरपणा येणें. ०**धरणें**–कमर दुखणें किंवा ताठणें; कमरेंत उसण भरणें. ०**बसणें**–कमर खचणें; धैर्यहीन होणें; घाबरणें. ०**बांधणें**–सिद्ध होणें; तयार राहणें; उत्साह बाळगणें ( एखाद्या कामास ). ' पुढें वंशवृद्धी करण्यास तव कंबर बांधा । ' –प्रला १३१. ' तेव्हां अजून जोंवर हें संकट अनिवार्य आलें नाहीं तोंवरच तिच्या कैवाऱ्यांस कंबर बांधण्यास अवकाश आहे. ' –नि ६. ०**भरणें**–१ कंबर धरणें पहा. २ ( चांभारधंदा ) टांच व टाळा यांमधील भागांत भर टाकणें. ०**मोडणें**–१ कमर खचणें पहा. २ ठुमकत–मुरडत चालणें. ' चालतां कमर ठुमकत चमकत मोडितें । ' –प्रला १५७. ०**वांकणें**–१ कुबड निघणें; वातादि विकारामुळें शरीराची कमान होणें. ' कुब्जेची कमर सतरा ठिकाणीं वांकली होती. ' २ क्षीण होणें; अशक्त, दुर्बल

होणें; पोंक येणें. ०सोडणें-१ कमरेचा बंद ढिला करणें; काढून टाकणें. २ पांषाख उतरणें. ३ (ल.) विश्रांति घेणें; जामानिमा उतरणें. 'सोडीना कंमर कधीं काढीना पायजमा।' -प्रला ६४.

**कमर**—पु. (बे.) तेलकट पदार्थ विस्तवांत जळला असतां येणारी घाण. [का. कमरु=जळकट]

**कमरक-ख**—न. एक झाड व त्याचें आंबट फळ. कर्मर; कंब्रक; कम्रक. -शे ९.२६२; ६.२६१. हें झाड फार मोठें होत नाहीं. पानें पातळ, रंग हिरवा, छाया थंड असते. फळें येतात त्यांचें लोणचें करतात. फळास चार धारा असतात. 'सगाळें, ऊंस, पुंडे, कविठ, कमरखे, वाळकें सूक्ष्म, थोरें.।' -सारुह ३.४९. [सं. कर्मरंग, हिं. कमरख]

**कमरकस**—पु. पळसाचा डिंक. हा औषधोपयोगी आहे बाळंतिणीस देतात, हा शक्तिवर्धक आहे. -प्रसूक ६. [फा. कमर्+कस]

**कमरका-गा,-कंबर्का**—पु. १ पर्वताचा मध्यभागचा भोंव तालीं पुढें आलेला विभाग.'भेटी घेऊन श्रीमंतांस खालीं किल्ल्याच्या कमरगीत चौक्या आहेत तेथें घेऊन आले.' -खरे ६.३१९३. २ सैन्याची बगल, बाजू, मध्यभाग. 'सीतर पहाड पहा जीवबादादा कंबरक्यांत सोडी बार।' -ऐपो २५८. (क्रि. मारणें.) ३ एखाद्या भांड्याचा पुढें आलेला (फुगीर) किंवा (बसकट) आंत गेलेला भाग; आवळ किंवा वाढलेला भांड्याचा भाग. ४ (क्व) कंबर, मध्यभाग. ५ (मल्लविद्या) कंबरपकड, कमरेंत धरणें. (कुस्तीं तील एक डाव) ०मारणें-शत्रूवर बाजूनें हल्ला करणें. [फा. कमर्+गाह्=जागा]

**कमरबस्तो**—वि. (गो.) निगरगट्ट; निर्लज्ज (मनुष्य) [फा. कमर्बस्ता=तयार, सिद्ध]

**कमरा**—पु. (हिं.) कोठडी; खोली. [हिं. कमरा; तुल० ग्रीक कमरा=कमानदार वस्तु: लॅ. कॅमेरा=खोली: इं. कॅमेरा, चेंबर फा. कमरा=पुढची बाजू उघडी असलेली खोली, दालन, मनोरा]

**कमरो**—वि. कमर दुखावलेला; कमरेस ताण बसलेला; कमरमोडका; अशक्त. -स्त्री. घोड्याचा एक रोग. घोडा वरून पडला किंवा पाय घसरून पडल्यानें किंवा उंच जागेवरून पडल्यानें अथवा हवेमुळें त्याची कंबर तुटते म्हणजे लव खाते व मानेच्या शिरा तुटतात व त्यास जमिनीवरून उठतां येत नाहीं, इ लक्षणें होतात. -अश्वप २.१०९.

**कमल-ळ**—न. १ तळ्यांत, सरोवरांत उत्पन्न होणारें फूल याचे कांदे असून त्यास लांबट देठ येतो व देठास फूल येतें; पान वाटोळें असतें. कमळाच्या तांबडें, पांढरें, गुलाबी, निळें अशा रंगपरत्वें जाती असून तांबड्या कमळास कोकनद किंवा निळ्या कमळास इंदीवर म्हणतात. शिवाय कल्हार, कुमुद, कमलाक्ष, पोयसर, अशा जाती आहेत. पोयसर कमळास चपटें फळ येतें. त्यांत पांच सहा बिया असतात. त्यांस कमलाक्ष किंवा कमळकाकडी म्हणतात. कमलाक्षाच्या काशीकडे लाह्या करतात. कमळाच्या देंठास भिसे म्हणतात कमळाच्या सर्व वेलास कमलिनी म्हणतात. शरीरावयवांचें सौंदर्य दाखविण्याकरितां त्या त्या अवयववाचक नामांच्यापुढें कमल शब्द घालून समासांत योजितात. जसें:-मुखकमल, नेत्रकमल, चरणकमल इ०. २ पूजेचें देव ठेवावयाचें कमळाच्या आकाराचें एक पात्र; देवाचें आसन, बैठक. ३ गर्भ. 'कमळ लागलें फिरूं पोटामधें करी कांति झळझळा।' -पला १००. ४ केळफूल. 'जैसें केळीचें कमळ। तैसें हृदयीं अष्टदळ।' -एभा १४.४६५. [सं.] ०कला-ळा-स्त्री. कमलाची कांति, सौंदर्य. (ल.) तेज; सौंदर्य; शोभा; कांति, (चेहऱ्याची इ०). ०काकडी-१ कमळांतील बी. २ एक वनस्पति. कमलाक्ष पहा. -शे ९.२३७. ०गट्ट-पु. कमळाचें बीं ज्यांत असतें तो गाभा [कमळ+गट्टा=गोळा कांदा] ०जन्मा-पु. कमलामध्यें जन्मलेला; कमलोद्भव ब्रह्मा. 'तंव म्हणे तो कमळजन्मा। भूतांप्रति।' -ज्ञा ३ ८७. [सं. कमल+जन्म] ०जा-स्त्री. कमलांतून उत्पन्न झालेली; लक्ष्मी; रमा. [सं.] ०नयन-वि. कमलासारखे सुंदर डोळे असलेला; कमलाक्ष. -पु. विष्णु; लक्ष्मीपति. 'कमळनयना कमळापती। थोर अपकीर्ती तुज तेव्हां॥' -एरुस्व ४.१७. ०नाल-न. कमळाचा देठ [सं.] ०पिंडी-स्त्री. (नृत्य) कमळाच्या आकारांत नर्तकांनीं उभें राहून नृत्य करणें. ०बीज-न. कमळाचें बीं, अठरा उपधान्यांत याची गणना होते. याचे माळेचे मणी करतात. कमलबी औषधी आहे. कमलाक्ष पहा.

**कमला-ळा**—स्त्री. १ लक्ष्मी; पद्मा. 'शिणली कमळा जेथ वावटे।' -ज्ञा ११.२१९. २ (ल.) सुंदर स्त्री. ३ भ्रमरी. [सं.]

**कमला-ळा-पति**—पु. विष्णु 'तुका म्हणे माझी विनंती। तुम्ही परिसा कमळापती।' -तुगा १८३४ 'जो सच्चिदानंद कमळापती।' -पांप्र ४५१. [सं. कमला+पति]

**कमलाकर**—न. कमळांचें तळें; सरोवर. 'कमलाकर मधुपातें जेविं प्रेपूनि वायुसह वास।' -मोसभा १.९. [सं. कमल+आकर]

**कमलावरु**—पु. कमलावर; विष्णु. 'प्रजापालनीं कमलावरु।' -मुवन (नवनीत पृ. १८२) [कमला+वर]

**कमलासन**—पु. (नेहमीं कमलावर स्थित असतो म्हणून) ब्रह्मदेव. [सं. कमल+आसन]

**कमलाक्ष**—पु. १ कमळाचें बीं, याचे माळेचे मणी करतात. कमलबीज पहा. कमळकांकडी. -शे ९.२३७. २ कमलासारख्या डोळ्याचा परमेश्वर; देव. 'तुमचे छायेसी बैसला कमलाक्ष।' -ह १८.५९ (नवनीत पृ. २२३). -स्त्री. एक फूल झाड. -न. त्याचें फूल. -वि. कमळासारखें सुंदर डोळे असलेला; कमलनयन. [सं. कमल+अक्षि]

**कमलिनी, कमळ-ळि-णी**—स्त्री. १ कमळाचें झाड. २ कमल; कमलपुष्प. ' किं रविकिरणीं कमळणी विकासति । दाता देखतां याचक हर्षती । '; ' मुक्तता होऊं पाहे, कमळिणीपासुनि भ्रमरा । '-होला १६. [सं.] ०**वरचा बिंदू**-पु. १ कमळाच्या पानावरील पाण्याचा थेंब. २ (ल.) कमलाच्या पानावर पाण्याचा थेंब पडला असतां त्याच्या गुळगुळीतपणामुळ तो वाटोळा होऊन गडगडत पडून जातो यावरून आयुष्य, संपत्ति, वैभव, ऐश्वर्य वगैरेची क्षणभंगुरता व अनिश्चितता दाखविण्याची काव्यांतील उपमा. ३ मन, हेतु, वचन यांचें चंचलत्व, असत्यता, बेभरंवसा दाखविण्यासहि योजतात. पाण्यावरचा बुडबुडा पहा.

**कमविणें**—उक्रि. १ कमावणें; मिळविणें; प्राप्त करून घेणें; कमाई करणें. म्ह० कवडीपासुन कमवावें लाखापासुन खर्चावें. २ कातडें वगैरेवर संस्कार करणें; नरम करणें. ३ मेहनतीनें, व्यायामानें शरीर तयार करणें. ४ शेतास खत घालून, नांगरून त्याची मशागत करणें; लागवडीस उपयुक्त करणें. [सं. कम्=इच्छा करणें-प्रयोजक-काम्य् किंवा कृ-कर्म; हिं. कमाना; प्रा. कम्मवण=उपभोग]

**कमशाकुनी**—वि. (व.) नाजूक, फारसे श्रम सहन न करणारा, होणारा [फा. कम्+म. शकणें]

**कमसल**—वि. १ कम-अस्सल पहा. हलका; कमी योग्यतेचा. म्ह० १ असल आपल्या असलपणावर गेला कमसल म्हणतो मला भ्याला. २ 'कमसल आपला कमसलपणा टाकीत नाहीं तर असलानें असलपणा कां टाकावा ? ' २ हलक्या कुळांतील, दासीपुत्र. [फा. कम्+अस्सल्]

**कमहिंमत**—स्त्री. भ्याडपणा; भीरुता; दुर्बलता. ' याजवरून श्रीमंतास आपली कमहिंमत दिसेल. '-दिमरा १.२२. [फा. कम्; अर. हिम्मत्]

**कमळण**—स्त्री. कमळाचा वेल. ' कमळण तळयांत. ' ?

**कमळदाँकाॅ**—पु (गो.) एक पक्षी.

**कमा**—पु घोडयाच्या पायास होणारा रोग.-अश्वप २.२८२.

**कमाई**—स्त्री. १ (हिं.) मिळकत, प्राप्ति; नफा; फायदा. कमाईस मोल येथें नका रीस मानूं । '-तुगा ३३५. जो दुवा देशील पांथा तेवढी माझी कमाई । -यशोधन-पाणपोई. २ (ल.) पुण्याई; भाग्य; पूर्वसंचित. ' घटकेंत बुडाला सरली ज्याची कमाई । ' -ऐपो ४०५. ' धन्य कमाई तयाची । '-दावि २९०. ३ मशागत, मेहनत (शेताची-नांगरून, खत घालून, पाणी देऊन, वगैरे) ४ पीठ मळणें (भाकरी करितां); तिंबणें (कणीक वगैरे); चेंचणें. ५ तुडवणें; मळणें (चुना वगैरे). एखादी वस्तु तयार करण्यासाठीं मळणें, मिसळणें वगैरे करावी लागणारी खटपट. ६ वठणीस आणणें, शिकवून तयार करणें, (घोडा वगैरे). ७ कातडें कमाविण्याची क्रिया व त्याबद्दलची मजुरी. [सं. कम्=इच्छा करणें, किंवा कृ-कर्म; हिं. कमाई; गो. कमाय] ०**पूत**-वि. (ना.) कर्ता, मिळविता, कमाई करणारा (पुरुष). [कमाई+पूत] ०**चा हीन**-दैवहीन; अभागी. ' मी तरी कमाईचाहीन । ह्यास्तव जीवीं वाटतो शीण । तूं अनाथ बंधु करुणाघन । तें साच वचन करि आतां ॥ '

**कमाऊ**—वि. १ मिळविणारा; कर्ता, जोडता (पुरुष). २ चांगला तयार केलेला, मळलेला, चिकट केलेला, कमावलेला (चुना माती रंग, वगैरे). [कमाविणें. हिं. कमाऊ] ०**पूत**-पु. कुटुंबांतील कर्ता पुरुष; पोशिंदा; कुटुंबांतील मिळविता मनुष्य. (सामा.) जोडता पूत. [कमाऊ+पूत]

**कमाच**—न. एक तंतुवाद्य. ' वीणा चिपोळया कमाच चिरक । ' -दावी १७५. [फा. कमान्चा=एक तंतुवाद्य]

**कमांडर**—पु. सेनापति. ०**इन् चीफ**-सर सेनापति; मुख्य सेनापति; सेनाध्यक्ष. [इं.]

**कमाण-न**—स्त्री. १ अर्ध वर्तुळ; मेहेराप (इमारतीच्या बांधकामांतील). (इं.) आर्च. बांधकामाचें वजन सारखें वांटलें जावें म्हणून जें दरवाजे, खिडक्या वगैरेवर गोल, निमगोल इ. प्रकारचें बांधकाम करतात तें. २ धनुष्य; कमठा; मुलतानी कमान (धनुष्य) फार प्रसिद्ध असून तिची उपमा नेहेमीं देण्यांत येते. ' आली वीरश्री हात कमान घातला । ' -ऐपो ८८. ' मुलतानी भुवया कशा कमाणा जशा बाहार मधीं कुंकाचे टिकलीचा । ' -होला १०४. ' दुरवर किर्ती हि गोष्ट आर्थी जशी काई कमान मुलतानी । ' -गापो ७. ३ घडयाळ, कुलुप, उंदराचा सांपळा वगैरेमधील दाब उत्पन्न करणारी पोलादी कंसाकृति अगर वर्तुलाकृति तार किंवा पातळ पट्टीची रचना; स्प्रिंग; आडवी पट्टी. ' घडयाळांतील कमानीचा धर्म सुटण्याचा आहे. ती सारखी सुटण्याचा प्रयत्न करीत असते. ' -सृष्टि २८. ४ (पिंजारीधंदा) पिंजारी लोकांचें कापूस पिंजण्याचें हत्यार (धुनुकली). यास तांत लावलेली असते. ५ (सुतारी, कांसारी) सामता फिरविण्यासाठीं हात दीड हात लांब काठीच्या टोकास सुतळी बांधून केलेलें हत्यार, धनुकली. ६ (ल.) इंद्रधनुष्य. ' विलसती गगनांत कमाना । ' -दावि ३७९. ७ (जरतारी धंदा) तराकांतील फिरकी दाबून धरणारें साधन; कुत्रें. ८ शरीराची विशिष्ट रचना; हात व पाय जमिनीवर टेकून तोंड वर करून पोटाचा भाग उंच उचलणें. ९ बैल गाडीस (ऊन, पाऊस लागूं नये म्हणून) तट्टया घालण्यासाठीं आंतून कळक किंवा वेत याच्या कांबी बांधतात त्या प्रत्येकी. [फा. कमान्=धनुष्य] ०**काढणी**-स्त्री. घोड्याचा दागिना. -स्वप ५३. ०**गार**-पु. १ धनुष्य बाण तयार करणारा. २ हाड वैद्य. ' खाले माकणीवर पडोन मांडी जाया जाली, मग कमानगार आणोन बांधली. ' -रा ३.११२. [फा. कमान्+गार्] ०**दार**-वि. १ मेहेराप, कमान असलेला (अंगरखा, भित, वगैरे). [फा. कमान्+दार्] २ ज्याच्या

जवळ धनुष्यबाण आहे असा; धनुर्धारी. 'मालजेठी कमानदार।' –दावी ६९. ०मारी–वि. धनुर्धारी; धनुष्य बाण धारण करणारा. चित्रगुप्त ३०.

**कमानिक**—स्त्री. कमान अर्थ ५ पहा.

**कमानीन**—पु. कमांडर पहा.

**कमाल**—स्त्री. १ आत्यंतिकता; पूर्णता; पराकाष्ठा; सर्वांत उच्च मर्यादा. २ (एकाद्या खेड्याचा किंवा प्रदेशाचा) जास्तींत जास्त सरकारी वसूल हा लागवडीच्या जमिनीवर आकारलेला नसून एकूणएक जमीन जमा धरून ती पेरली असतां तींत येणाऱ्या अति उत्कृष्ट पिकाचा अंदाज करून त्या प्रमाणांत बसविलेला असतो; कुलजमा; वसूल. 'साऱ्या प्रांतांत कमाल जमेवर रयत निस्बत दर सद्दे दहा रुपये.' –खरे ५.२४७१. –वि. आत्यंतिक मर्यादेचा; पराकाष्ठेचा; पूर्ण; अतिशय. 'त्याजवरी दिवसें दिवस कमाल मेहेरबानगी.' –चित्रगुप्त १११. 'ना. शार्पे यांचा कमाल अंदाज खरा धरला तरी फारतर तीस लक्ष रुपये होईल.' –केले १. १३०. (इं.) [अर. कमाल=पूर्ण, पूर्णता] ०करणें– कल्पनातीत वागणें, पराकोटीला जाणें. 'कमाल केलीस बुवा!' 'जेथें शूरपणा अनंत समरीं शत्रुप्रती दीपवी। तेथें भीरुपणा कमाल करुनी देशास ह्या लाजवी।' –भांडाभ ३०३. ०होणें– कळस होणें; हद्द होणें; पराकाष्ठेप्रत पोंचणें. 'आतां मात्र कमाल झाली म्हणायची!' –(फाटक) नाट्यछटा १. –पु. कमाल या शब्दाचा मूळ अरबी अर्थ पूर्णता, संपूर्णपणा, हा जमाबंदीच्या कामांत अनेक सामासिक शब्दांत येतो. जसें:– ०पत्रक, झाडा – नपु. तनखा, रगबा, कूळ, इनाम, मोजणी, वसूल, दर वगैरेंच्या एकुणात रकमांच्या तपशिलाचा पट. ०तनखा–कमाल अर्थ २ पहा. 'मराठेशाहींत दर गांवाहून जास्तींत जास्त जो वसूल आला, त्याचा दाखला काढून तोच गांवाच्या तनख्याऐवजीं कायम केला.' –गांगा ११. ०रगबा–तालुका किंवा खेडेगांव यांतील एकंदर जमीन. ०धारा–अधिकतम, जास्तींत जास्त येणें शक्य असलेला सारा. हा इ. स. १७६९त ठरला गेला. सामाशब्द ०इनाम–दर–मोजणी–वसूल– ठिकेबंदी – आकार – लावणी–बहीत–पडीत–गायरान–हडोळा–पूर्वीची एकंदर सर्व इनामें, मूळचा किंवा एकंदर सारा, मोजणी, वसूल इ. या समासांत कमाल या शब्दाचे जागीं कमाली असाहि शब्द योजतात. मुसलमानांशी संघटण असलेल्या लोकांच्या तोंडीं कमाल शब्द पूर्णत्व किंवा अतिशय या अर्थानेंच परंतु अनिर्बंध रीतीनें येतो. जसें:–कमाल-दौलत–नशीब–कृपा –पीक–भरणा –पूर– सरताई –लढाई–थंडी–ऊन वगैरे. शिवाय स्वतंत्र रीतीनेंहि जसें–जरीमरीचें कमाल, दारिद्र्याचें कमाल इ.

**कमालखानी हार**—पु. गुडघ्यापर्यंत लांबीचा व दोन ते आठपर्यंत पदर असलेला फुलांचा मोठा हार; कंठा. 'कमाल खानी हार अमोलिक तुरे तसेच राहिले।' –प्रला १००. [कमालखान=एक मनुष्य+हार] (वाप्र.) कमालखानी हार व पंचवीस लडे तुरा=१ मोठा हार व मोठा तुरा. २ (ल.) अंग अत्यंत सुशोभित करणें. (दागिने कपडे वगैरे घालून).

**कमावणें-विणें**—कमविणें पहा 'भाषा ज्यांनीं कमावली नाहीं...असल्या विद्वान् पण दरिद्री लेखकाच्या हलगर्जीपणाचें हें भयंकर प्रदर्शन नव्हे काय?' –नाकु ३.६. [सं. कम्=इच्छा करणें–प्रयोजक–कामय् किंवा कृ–कर्म; हिं. कमाना; सिं. कमाइणु]

**कमावणी**—स्त्री. जमिनीची मशागत; जमीन कमावणें –शे ८.१८०. [कमावणें]

**कमावता**—वि. १ मिळविणारा, संपादन करणारा. २ कार्यकर्ता; जोडता; घरांतील कर्ता (पुरुष). ०पूत–पु. मिळविणारा, संपादन करणारा माणूस; कर्तापुरुष.

**कमावशी**—स्त्री. (कु.) मेहनत. [कमविणें]

**कमाविशी(सी)-वीस**—स्त्री. १ (सरकारी) एकंदर झालेली वसुली. २ वसूल जमा करणें; वसुली काम; कलेक्टराचें काम; अमीनी. 'मक्त्याच्या कमाविशी करून गोविंदपंतानें सरकारचा फायदा करून दाखविला.' –रालेख १.६६. ३ कारभाराची व्यवस्था; कारभार; देखरेख (खाजगी, जहागिरी किंवा सरकारी). ४ एखाद्या हातीं घेतलेल्या कामांतील नफा, फायदा, लाभ. [कमावणें] **ऐनकमावीस**–निरनिराळ्या प्रकारच्या बागाइत मालावरचा ठराविक वसूल (हा मालाच्या रूपांत घेण्यांत येई). ०जमा–स्त्री. १ दंड, जप्ती किंवा इतर बाबींपासून झालली वसुली. २ कमाविसदारानें कमाल बेरजेच्या बाहेर केलेला वसूल. ०दार–पु. १ वसुली कामावरील मुख्य अधिकारी; जिल्ह्याचा कलेक्टर; अमीन. २ मक्त्यानें वसुलीचें काम करणारा. (ही पद्धत पूर्वी संस्थानांत होती). 'कमाविसदार म्हणजे संस्थानच्या वसुलाचा मक्तेदार होय' –बडोदें राज्यकर्ते ३५५. ०दारी–स्त्री. कमाविसदाराचें काम किंवा त्याचा हुद्दा.

**कमिटकरणें**—क्रि. (कायदा) खालच्या कोर्टानें मोठ्या अपराधाबाबत पुरावा घेऊन तो सबळ असल्यास आरोपीला इन्साफाकरितां वरिष्ठ कोर्टाकडे पाठविणें. 'सेशनकमिट करणें' [इं. कमिट्=सोंपविणें]

**कमिटी, कमेटी**—स्त्री. १ पोटमंडळ; काहीं गृहस्थांची समिति; विशेष प्रश्नांचा विचार करून निर्णय करण्याकरितां नेमलेली एखाद्या संस्थेच्या सभासदांची अगर काहीं गृहस्थांची लहान मंडळी; चौकशीमंडळ. 'ह्या कमेटीच्या आश्रयानें मराठी भाषेंत आजवर बरेच ग्रंथ झाले.' –विवि ८.७.१२१. २ व्यवस्थापक मंडळ; नियुक्तमंडळ. 'स्त्रियांमध्यें संक्षोभन करून शेवटीं एक

प्रचंड कमिटी (व्यवस्थापक मंडळी) उत्पन्न केली आहे.' -टि ४.९०. ३ पंचायत. [इं. कमिटि]

**कमिशन**—न. चौकशीमंडळ (सरकारनें अथवा लोकांनीं नेमलेलें); पंचमंडळ; कोर्ट; निवाडा करणारी कमिटी. 'कमिशनमधील सभासद इंग्रज आहेत' -के १४.६.३०. २ सनद किंवा अखत्यारनामा. ३ (दिलेला) हुद्दा किंवा अधिकार. 'यांतले २२ कमिशनहि देण्याला नालायक ठरले.' -के २१.३.३०. ४ अडत; दलाली; मालाचे खरेदीचे व विक्रीचे रकमेवर शेंकडा अमुक रुपये असा जो ठराव असतो तें-छअं १३६. अशा केलेल्या ठरावान्वयें द्यावयाची रक्कम [इं. कमिशन] ०एजंट-पु. दलाली, अडतीचें काम करणारा; दलाल; अडत्या. [इं]

**कमिशनर**—पु. १ चौकशीमंडळाचा सभासद. 'बंगाल सरकारचें हें उत्तर आल्यानंतर कलकत्ता म्युनिसिपालिटींत कमिशनरांनीं पुढें काय करावें असा प्रश्न सहजच उत्पन्न झाला.' -टि २.५२. २ सात आठ जिल्ह्यांवरील अधिकारी. कलेक्टरवरचा अधिकारी; सरसुभा. [इं कमिशनर]

**कमी**—वि. १ न्यून; उणा; वाण असलेला. २ आंखूड. त्रुटित; तुटका. [फा. कम्] ०पण-णा-पु. १ उणीव; कमतरता. २ हलकेपणा; मानहीनता. [फा. कम्] ०घेणें-स्वतःचा हीनपणा, चूक, दोष, अपूर्णता कबूल करणें; आपल्याकडे दोष पत्करणें. ०पेशी-वि. कमीजास्त, चुकभूल. कंपेशी पहा. [फा. कम्+बेश्]

**कमीज**—पु. खमीस, शर्ट; एक प्रकारचा सद्रा, कुडतें. -गलिव्र २.२०. [अर. कमीस; इटा. कॅमिसा]

**कमीन**—वि. १ हलका, कमी दर्जाचा; क्षुद्र, उपकार न स्मरणारा; बदनियत; नीच. 'कमीनाचे बाईल व मूल बनाम कमली व राम ऐसे दस्तगीर होऊन.' -भाद्वीसंग्र ५०. २ स्वतः आपण (पत्र व्यवहारांत सौजन्यदर्शन). ३ चाकर; नोकर; बंदा. 'बंदकमीन कमीन कहिया.' -दावी १३४. [फा. कमीन्] ०बच्चा-वि. (ना.) नीच; हलकट; उपकार न स्मरणारा. [फा. कमीन्=नीच, हलका+हिं. बच्चा; सं. वत्स]

**कमुनीदाद्**—स्त्री. (गो.) ग्रामसंस्था. [पोर्तु. कम्युनिदाद]

**कॅमेरा**—पु. १ छायाचित्रलेखनयंत्र; फोटो घेण्याचें यंत्र. २ न्यायाधिशाची बसण्याची खासगी खोली; चेंबर. [इं. कॅमेरा]

**कमोद्**—पु. १ तांदुळाचा एक प्रकार. या तांदुळास उत्तम वास येतो. २ (संगीत) गायनांतील एक राग. -न. एक प्रकारचें कमळ; कुमुद. [सं. कुमुद-पांढरें कमळ]

**कय**—१ (गो.) पंचमी विभक्तीचा प्रत्यय. पेक्षां; ऊन; हून. उ० मज्याकुय. २ (कों. कुण.) द्वितीया किंवा चतुर्थीचा प्रत्यय. 'पोटाकय पण माय्.' -मसाप २.४.३६८.

**कय**—(गो.) पोरेंबाळें.

**कय**—क्रिवि. १ (चित्पा. गो.) कधीं; केव्हां. २ कोठें, (कों.) खय; ख. [सं. क्व]

**कय**—स्त्री. (कु.) जहाजें लावण्याच्या सोईची जागा. [इं. की=धक्का]

**कयपंजी, करपंजी**—(गो.) हातांत वागवावयाची मोठी पणती, दिवा. [मं. कर; का. कय=हात+म. पणती]

**कयरा-री, कयवार-री**—कैमध्यें पहा.

**कयसान**—वि. (खा.) कळकलेलें. 'बेरट (लोणचें) कयसान लागतं.' [सं. कलंक+सम. ? फा. कय=कडवट ?]

**कया**—स्त्री. तजेला; टवटवी; आरोग्य; निरोगीपणा (चेहऱ्याचा, शरीराचा). [सं. कला-कळा-कया; का. कय=शोभा] ०खाऊ-वि. १ तेज नाहींसें करणारें; कळाहीन. २ बदनाम, दुर्लौकिक करणारें. ०वान्-वि. निकोप-निरोगी-टवटवीत चेहऱ्याचा. याच्या उलट; कयाहीन. ०हीन-वि. १ मंद; सुस्त; आळशी. २ निस्तेज; रोगट.

**कयार**—वि. लुब्ध; लंपट. 'जीव अस्त्रीयाचे कयार.' -उषा ५४६.

**कयाशी**—स्त्री. (व.) यंत्र. [म. कळाशी]

**कयास**—पु. १ तर्क; अनुमान; अंदाज. 'कयास पुरता करून आम्हांकडे किमपि अंतर नाहीं ऐसें समजोन' -खरे ६.३१७२. -शे ८.८५. २ मत; निर्णय; न्यायाधीशानें दिलेला निवाडा, निकाल. ३ मत; विचार. 'जो ज्याच्या कयासास येईल तसा निर्णय करील.' 'कयास मज हा लया रुद्र करि दया दृष्टि झांकली।' -ऐपो ३६८. (क्रि० ठरवणें-काढणें-ठरणें-निघणें-करणें). [अर. कियास्] ०नामा-पु. निकालपत्र; हुकूमनामा; निकालाची नक्कल. [अर. कियास्+फा. नामह्]

**कर**—पु. १ हात; हस्त. 'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी। कर कटावरी ठेवूनिया॥' -तुगा १. 'कर श्रवणिं ठेविते नुघडि नेत्र घे भीतिला।' -केका १०. २ सोंड (हत्तीची) 'गजेंद्राचे यंधू कवळुनि गजेंद्रा निजकरीं।' -र ५७. ३ किरण; अंशु. 'सहस्रकर.'; 'शिवतला चंद्रकरीं।' -ज्ञा ११. २४८. 'मनस्वानंद बोधाचे चंद्रकर।' -एभा १२.५१७. ४ सरकारी कारभाराबद्दल मोबदला; मजुरी देणें; जमिनीवरील सारा; पट्टी; मालावरील जकात; खंड; खंडणी. 'त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें स्वतंत्र सेस म्हणजे कर बसवून शिक्षण वाढवावें' -केले १.११८. ५ गांवकामगार व बलुतेदार (जोशी, कुलकर्णी, पाटील इ०) यांना सरकाराकडून दिला जाणारा ठराविक मुशाहिरा. ६ नाव, तर, रस्त्यावरील वाहतुकीचें वाहन यांकडून घेतली जाणारी दस्तुरी. ७ विशिष्ट तीर्थे व देवता यांच्या दर्शनास जाणाऱ्याकडून घेतलेली

जकात; द्रव्य. ८ (सामा.) कांहीं एक नियमानें जें घ्यावयाचें ठरविलेलें असतें तें. 'हा त्या राक्षसाचा कर त्या नगरांतील सर्व माणसांना द्यावा लागे.' 'ज्या घरीं हरीचा कर आहे। त्या घरीं हरी चाकर आहे॥' [मं.] °संपुट-न. एकास एक जोडलेले असे दोन्ही तळहात; हस्तांजुली. 'तंव करसंपुट आपसें। वामचरणीं बैसे।'-ज्ञा ६.२०१. (वाप्र.) करास कर मिळविणें-हातावर हात देणें; वचन देणें. 'मेळउनी करास कर.'-नव १३ १४. कर जोडणें, जोडून उभें राहणें-अभिवादन करणें; विनम्र होणें; सेवक म्हणून सज्ज राहणें.' 'भूतभविष्य वर्तमान ज्ञान। हें ज्यापुढें उभें कर जोडून।'-ह ३१.१०.

**कर**—स्त्री. १ ग्रहण, अयनसंक्रांति व होळी आणि ज्या दिवशीं गांवांत कोणी मनुष्य गेला असेल अशा दिवसांचा पुढील दिवस हा अशुभ मानतात. या दिवशीं कोणतेहि शुभकृत्य किंवा गमन करूं नये. 'संक्रांतीची कर.' [सं. करिदिन] २ दिव्याचा एक प्रकार. धर्मग्रंथावर तुळस व भांड्यांत गंगेचें पाणी ठेवून तें आरोपीनें डोक्यावर घेणें. ठराविक मुदतींत त्यावर कांहीं आपत्ति न आल्यास त्याचा निर्दोषीपणा सिद्ध होत असे.

**कर**—वि. (एखाद्या) गांवांत राहणारा, गांवचा, असें दाखविणारा प्रत्यय जसें:-काशीकर; पुणेंकर; होळकर इ०. [सं. (वुञ्) कः (तास्त्यार्थी) प्रत्यय. सं. अस्मत्क, युष्मत्क, पाटलिपुत्रकपासून-प्रा. अम्हकेर, तुम्हकेर, पाडलिपुत्तकेर, म. पाडलि(पुत्र)कर. -भाअ १८३३]

**कर**—वि. १ कर्तृत्वदर्शक समासांतील शेवटचा शब्द; करणारा. जसें:-प्रकाशकर; शीतकर; सुखकर. २ विशिष्ट काम-धंदा करणारा जसें:-मजूरकर=मजुरी करणारा; काटकर; पोयकर इ०. -अ. ध्वन्यनुकारी अव्ययापुढें येणारा शब्द. जसें:-झटकर; पटकर. [सं. कृ=करणें] -पु कृति; संबंध; संपर्क; हात (कामधामांत). 'ज्याला कर नाहीं त्याला डर नाहीं' =ज्याच्या हातून पाप घडलें नाहीं त्याला भीति बाळगण्याचें कारण नाहीं

**कर**—वि. (व.) करपलेले; भाजतांना अधिक होऊन काळे झालेले. 'जवस भाजतांना कर झाले म्हणून चटणी कडू लागते.' [का. करि=भाजणें, करपणें; करकु=करपलेलें]

**करक**—पु. दिंडा नांवाच्या तांबडया झाडाचा फोक. शिमग्यांत हे फोक मुलें फुपाट्यांत भाजतात व जमिनीवर आपटतात तेव्हां आवाज होतो. [सं. करीर; गु. करकटी=फांदी]

**करक**—स्त्री. आखडल्यामुळें, ताण बसल्यामुळें किंवा वातविकारानें मानेंत, पाठींत भरणारी लचक, उसण किंवा निघणारी कळ 'पाठीमधें करक भरली।'-दा १८.१०.२४. [हिं. करक=दुखणें]

**करक**—पु. १ कमंडलु; मडकें; नारळाच्या करवंटीचें बेलें (संन्याशी, ब्रह्मचारी पाणी पिण्यास उपयोगांत आणतात तें). २ झालींतील दिवा. [सं. करक]

**करक**—पु. पावसांतील गार. 'पाषाण करका वोसांडी.-नव १३.१३४. 'मग अमृतवताच्याही जीची हांसेल धूलि करकेला।'-मोआदि २.१२०. [सं. करक=पावसांतील गार]

**करकचणें, करकचावणें, करकटणें, करकसणें**—उक्रि. जोरानें घट्ट आंवळून बांधणें (पुडकें, ओझें वगैरे). २ पक्कें, गच्च धरणें. (बांधणें, आंवळणें, ओढणें, धरणें या क्रियापदांना जोडून हा शब्द येतो जसें.-करकचून बांध, धर.) [ध्व. फा. कर्=शक्ति+म. कसणें; हिं. करकस]

**करकचा**—पु. १ (रा.) करकोचा; शरीर किंवा वस्तु यांस दोरीनें आवळून बांधण्यानें उमटणारी खूण. २ एखाद्या वस्तूस दोरी बांधण्यासाठीं पाडलेली खांच. ३ ओरखाडा [फा. कर्+कसणें]

**करकटणें**—अक्रि. १ भाकरी वगैरे करतांना हातास पीठ लागून हात करवडणें; स्वयंपाकाचीं भांडीं खरकट्यानें करवडणें, बरबटणें; भरणें. २ भांड्याला चिकटणें, लागणें. (भात, पीठ, इ०) [का. करकु=कीट; (भांड्याच्या बुडाशीं भांडें जळल्यामुळें बसणारें)]

**करकभिंग**—(व) कर्क संक्रांत [स. कर्क]

**करकमळिका**—स्त्री. तबोरी. 'शीर कापून आपुलें देखा। यंत्र केलें करकमळिका।'-गुच ६ ७१. [सं. करकमल]

**करकर**—स्त्री. कटकट पहा. १ कर्कश, कानास अस्वस्थता उत्पन्न करणारा, कानठळ्या बसविणारा आवाज (कावळ्याच्या ओरडण्याचा, लोखंडी वस्तूवर कानस घासतांना होणारा, दार वगैरेचा). 'त्याचें नाम व्यर्थ करकर। जैसें कीर अनुवादती।' 'कावळ्यानें भयंकर करकर चालविली होती.'-ज्ञामू १०. २ कटकट; त्रास; आरडाओरड (भिक्षेची, रागाची, इ०) 'सदा करकर संतांसवें।'-ब ५४३.५. ३ भांडणतंटा; कचकच; कुरकुर. 'तेंही झाले कुमर। त्यांसी वाढला मत्सर। त्या दोघांची। करकर। वृद्धापकाळीं सोसावी॥'-जै ८९.४०. ४ हट्ट; तक्रार; त्रास; कुरकुर. [ध्व.]

**करकर-रां**—क्रिवि. कावळ्याचें ओरडणें; कानशीनें कानसतांना, दांत खातांना होणारा आवाज, किंवा इतर कर्कश ध्वनि काढून; तसा आवाज होऊन. (क्रि० वाजणें). 'करकरकर वाढा वाजती पाय खोडी।'-शवि ४६१. [ध्व. कर.]

**करकरणें**—उक्रि. १ (कावळ्यानें) काव! काव! शब्द करणें 'कावळा करकरला म्हणून पिंपळ मरत नाहीं.' २ करकर आवाज करणें (दार, पायांतील जोडा, दोरी, लांकूड वगैरेनीं). 'तंव तो पर्वत समग्र। एकाएकीं करकरिला।'-ह १२.७३. ३ कर्कश,

कर्णकटु शब्द उच्चारणें. -उक्रि. निंदागर्भित बोलणें; कर्णकटु बोलणें. [ ध्व. करकर ]

**करकरा**—पु. १ (गो.) एक लहान मासा. २ (गो.) एक तऱ्हेचा हलवा.

**करकराट**—पु. एकत्र कर्कश आवाज; हलकल्लोळ; मोठ्यानें करकर शब्द होणें. 'दांत खाऊनि करकराटी।' -मुसभा ७.२४. [ ध्व. करकर+आट=अतिशयिततेचा प्रत्यय ]

**करकरावणें**—उक्रि. १ करकचणें; घट्ट आवळलें जाणें. २ दातांवर दांत घासून आवाज काढणें; दांत खाणें. [ ध्व. करकर ]

**करकरीत**—वि. १ अगदीं नवा; कोरा; ऐन नवा; नवेपणामुळें कडकड, खडखड, सळसळ, आवाज करणारा (नवा जोडा. कापड वगैरे केव्हां केव्हां घर, भांडें, दागिने यांनांहि लावतात). २ सामान्यतः करकरीत हा शब्द नवा, ताजा, कोरा या शब्दांपुढें आधिक्य, जोर दाखविण्यासाठीं लावतात. जसें:- नवा करकरीत, कोरा करकरीत. ३ कुरकुरीत; खातांना ज्याचा करकर आवाज निघतो असा (पदार्थ, काकडी, आंब्याचें नवें लोणचें). [ ध्व. ] ०**तिनीसांजा**-स्त्री. अव. फुटकी सांज; ऐन संध्याकाळ; सूर्य मावळल्यानंतरचा संधिप्रकाश (ही वेळ अशुभ मानतात). 'वेळ करकरीत तिन्हि सांजाची होती.' -अभा ६३.

**करकरून**—क्रिवि. कचकावून; कचकून; रगडून; खचादून; घट्ट, जोरानें, न सुटे असें आंवळून. (क्रि० बांधणें, धरणें, खेंचणें, ओढणें). 'भस्म ललाटीं धरितों कीं करितों प्रथम बद्ध करकरुनि.' -मोसभा ५.४३. 'कर श्रीकांताचा करकरुनि माता धरि करें।' -वामन, मृत्तिकाभक्षण ४. [ ध्वनि ]

**करकऱ्या**—वि. १ किरकिऱ्या; करकर आवाज करणारा; (नवा जोडा, दार, लांकूड इ०). २ किरकिर करणारें; अशक्त; रोगट; रडवें; कटकट लावणारें (मूल). [ ध्व. करकर ]

**करकांड**—न. दंड; खांदा व कोपर यांच्यामधील भाग. 'हाणिती करकांडी गदा। मांसाचा करिती चेंदा।' -कथा ३.१०.१४०. [ सं. कर+कांड ]

**करकी**—स्त्री. १ (बे.) डोण्यांत गूळ ओतल्यानंतर काहि लीस लागून राहणारा गूळ; गुळाची खरवड. [ का. करकु= भांडें जळल्यामुळें त्याच्या बुडाशीं बनणारें कीट ]

**करकी**—स्त्री. (बे.) हरळी.

**करकुची**—स्त्री. करकोचा पक्ष्याची मादी. [ सं. क्रौंच ]

**करकुची**—स्त्री. करकोची पहा.

**करकेतन, कर्केतन**—न. एक रत्न. याचा रंग रक्त किंवा मधासारखा असतो. हें राजे लोक वापरीत असत. पूर्वीं हें फार प्रसिद्ध होतें. पण हल्लीं दुर्मिळ आहे. [ सं. कर्केतन ]

**करकोचा**—पु. एक पक्षी; भारडी. [ सं. क्रौंच ] **करकोच धाड**—स्त्री. करकोचा पक्ष्यांची (उभें पीक असलेल्या शेतावर टोळधाडीप्रमाणें येऊन पडणारी) झुंड, थवा.

**करकोचा-ची**—पुस्त्री. १ मृदु पदार्थावर दोरी वगैरेनीं आवळल्यामुळें उठणारा वण, खूण. (क्रि० पडणें). २ लांकूड, काठी वगैरेस दोरी बांधण्यासाठीं पाडलेली खांच; अवटी. [ करकचणें पहा ]

**करग**—वि. हस्तगत; करगत; स्वाधीन. 'पुण्याविणें जयश्री होईल कशी मुनीश्वरा करगा।' -मोवन ३.८०. [ सं. कर+गम् ]

**करगणें**—क्रि. (बे.) करपणें. [ का. करकु = जळक्या भांड्याच्या बुडाचें कीट, मस ]

**करंगळी-गुळी**—स्त्री. १ हाताचें किंवा पायाचें शेवटचें लहान बोट. २ पायाच्या करंगळींत घालावयाचें चांदीचें वेढणें (बहुधा मराठ्यांत वापरतात). **म्ह**० करंगळी सुजली म्हणून डोंगराएवढी होईल काय? =प्रत्येक पदार्थाच्या वाढीला कांहीं मर्यादा असतेच, कांहीं केल्या तिचें अतिक्रमण होत नाहीं; या अर्थी. 'इंग्रज केवढे, आम्ही केवढे! चालले आपले त्यांच्याशीं बरोबरी लावायला! करंगळी सुजली म्हणून डोंगरा एवढी होईल काय?' -केसरी.

**करंगुट**—स्त्री. (गो.) एक प्रकारचें भात, साळी.

**करगोटा**—पु. १ कमरेस बांधावयाचा दोरा, गोफ (रेशमी किंवा चांदी-सोन्याचा); सोन्याचांदीच्या करगोट्यास घागऱ्या असतात व मध्यें पान (शिश्नाच्छादन) असतें. करगोटा सर्व हिंदु लोक घालतात. बडोद्यास श्रावणीच्या दिवशीं मराठे मंडळींत राखी व करगोटे बांधण्याची चाल आहे. 'खासी व्यक्ति स्त्री असल्यास फक्त राखी व पुरुष असल्यास राखीबरोबर करगोटा याप्रमाणें ज्या त्या खाशाकडे तिकडील जबाबदार इसमाच्या नांवावर एखादा दिवस आगाऊ पाठवून वाटणीच्या यादीवर पावत्या घेणें.' -ऐरापुप्र १४.६६९. २ (कों.) रहाटगाडग्याच्या रहाटाच्या चक्रावर बरोबर मध्यावर बांधलेली दोरी; ही सुंभाची असते. [ सं. कटि+दोरक; हिं. करगदा ] **करगोटे बांधणें-घालणें**-(बायकी) मुलगा पांच महिन्यांचा झाल्यावर त्यास प्रथम करगोटा बांधतेवेळीं त्याचे समवयस्क अशा चार मुलांस एक एक चांदीचा अथवा रेशमी करगोटा साखर भरलेल्या (चांदीपितळेच्या अगर खोबऱ्याच्या) वाटीसह देण्याची चाल आहे.

**करग्रहण**—न. पाणिग्रहण; लग्न; विवाह. 'स्वकरग्रहणोयुक्ता त्या दोघांलाहि केशिनी कन्या।' -मोसभा ५.९५. [ सं. कर+ग्रहण ]

**करचणी**—स्त्री. द्राक्षाची एक जात. [ करचणा प्रदेशावरून ]

**कॅरचकर, करचकर, कॅरजकर, करजकर, करजगार**—पु. हत्यारें करणारा; शस्त्रकार; शिकलगार. कारंचकर पहा. –शिल्पवि ६०९. [सं. क्रकचकार]

**करंचली, करांचली**—स्त्री. (हिं.) एक प्रकारची सरळ व लहान तरवार.

**करछा-छी**—पुस्त्री. (हिं.) उलथणें; हलवाई लोकांचें दूध वगैरे आटवितांना ढवळण्याचें, पदार्थ खालीं वर करण्याचें साधन. [सं. करस्थ; हिं. कर्छा]

**करज**—(गु.) कर्ज पहा. –मौज २.६.१९३०.

**करज, करंज**—पु. एक झाड. याच्या बियांचें तेल जाळण्यासाठीं उपयोगी व औषधी आहे यास कडु वास येतो. –शे ११. ११४. [स. करंज]

**करज, करंज**—पु. मुद्रांचे झाड; करंडी पहा.

**करज**—न. (हातापासुन उत्पन्न झालेलें) हाताच्या बोटाचें नख. 'श्रीरमाकुचयुगीं करजांचे, बालचंद्र करिती कर ज्याचे।' –पार्थभाग्य (वामन) १०. [सं. कर+जन्]

**करजतकाळ, करझतकाळ**—पु. अति भयंकर मनुष्य, प्राणी, वस्तु, करदनकाळ. [सं. कृतांत+काळ; कदन+काळ?]

**करजलपुतळी**—स्त्री. दिवा व काजळ लावलेलें भांडें घेऊन शकुन पाहण्याची तऱ्हा. करपुतळी पहा. 'करजळ पुतळ्यातें नित्य चोरून पाहे.' –सारुह ६.८६. [सं. कज्जल+पुतळी]

**करजी, करंजी**—स्त्री. १ करंज झाडाची शेंग; बीं; इ०. २ एक झाड. ३ (करंजाच्या शेंगेच्या आकाराचें) एक पक्वान्न. रवा तुपांत परतून तो भिजवून त्याची पापडी करून तींत खसखस, खोबरें परतून व त्यांत साखर मिसळून तें पुरण भरतात, नंतर तें कांतून तुपांत तळतात. [सं. करंज; तुल० सं. करज=नख; का. करची–जी. करचीकाई]

**करजुचें**—क्रि. (गो.) फार वेळ पाण्यांत राहिल्यानें सर्व अंगास सुरकुत्या पडून आंखडणें.

**करजेल, करंजेल**—न. करंजाच्या बियांचें तेल. [सं. करंज+तैल]

**करंजेळी**—स्त्री. केळीची एक जात.

**करट**—पुन. कांकडीच्या जातीचें एक अतिशय कडु फळ; याच्या आंतील मगज काढून टाकून सालीचा पणतीसारखा दिवा लावण्याकडे उपयोग करतात; कडु कारंटें; करवट पहा. [सं.]

**करट, करंट**—न. अतिशय आग होणारें गळूं; उठाणु; उबाळू. 'स्तनमान काय पावे जरिहि उरीं वृद्धि पावलें करट' मोकर्ण २८.३३. [सं.]

**करट**—पु. १ मृताच्या अकराव्या दिवशीं करावयाचें श्राद्ध. २ कावळा; काक. 'परि तूं वरटेसि करट नीच कसा मान्य काय होशील।' –मोविराट १.१३२. [सं.]

**कॅरट**—पु. १ हिरे वगैरे तोलण्याचें वजन-परिमाण; एक कॅरट=एक रति किंवा एक आणा, पूर्वी हा ३½ ग्रेन बरोबर असे, पण हल्लीं ३⅙ ग्रेन बरोबर मानितात. २ सोन्याच्या शुद्धतेचें परिमाण; आपल्याकडील शंभर नंबरी सोनें २४ कॅरट बरोबर समजलें जातें. एखाद्या २४ भाग सोन्याच्या तुकड्यांत जर २२ भाग शुद्ध सोनें व २ भाग इतर हीन धातु असेल तर तें सोनें २२ कॅरटचें आहे असें समजतात. [सं. रक्तिका, रति=गुंज; अर. किरात=एक बी; ग्री. केरातिओन. इं. कॅरट; फ्रें. कॅरट; इटा. कारातो; पो. स्पॅ. किलाते]

**करंटपक्ष**—क्रिवि. कमींत कमी; किमानपक्षीं. [सं. करट+पक्ष]

**करंटलक्षण**—न. दुर्दैव किंवा अनिष्टसूचक चिन्ह, खूण, गुण. 'सुचित करुनी अंतःकर्णीं। ऐका करंटलक्षण।' –दा १९.३. १. [सं.] –वि. दुर्दैवी; अनिष्टसूचक चिन्ह दाखविणारा.

**करंटवली-लें**—करंटुली, करंटोली, करंटोल पहा.

**करटा, करंटा**—वि. १ दैवहीन; दुर्दैवी; कमनशिबी; हतभागी. 'नव्हेसी वीरवृत्तिलाठा। अति करंटा नपुंसक।' –एरुस्व ६.४२. 'पालथा घट करटा जन।' –यथा २.७५५. २ कंगाल; दरिद्री; कृपण. 'त्या सुखास लात मारून। जात आहे करंटा॥' –नव २१.११८. ३ (व्यापक) भिकार; ओसाड; नापीक; धनहीन (गांव, देश). ४ निष्फळ; बेफायदेशीर (मनांतील विचार, बेत, कल्पना, शकुन इ०). ५ नास्तिक; उदासीन. 'धर्माविषयीं फार करंटा।' –अमृतराय ५२. ६ फसगारा; निष्फळ होणारा (उपाय इ०) [सं. करट] **करंट्या कपाळाचा, हाडाचा**–वि. दुर्दैवी; भाग्यहीन; कमनशिबी. **करंटापोपट**–पु. बोलक्या पोपटाचे गुण ज्यांत नाहींत असा पोपट; रानपोपट; कुलक्षणी पोपट. **०बांगडा**–पु. समुद्रांतील बांगडा नांवाच्या माशाचा एक प्रकार.

**करटी, करंटी**—स्त्री. लहानसें करंट, गळूं, पुटकुळी (पुवानें भरलेलें क्षत). 'त्या दुर्गंधीला तोंड पडून करट्याच्या रूपानें म्हणा...पापी म्हणुन बोट दाखवितां येत नाहीं.' –भाऊ अं. २, प्र. १. [करट–करंट शद्बाचें लघुत्वदर्शकरूप]

**करटी**—पु. हत्ती. 'कीं काल व्याल करटि–घोटक–भट–भेक खावया सुटले।' –मोभीष्म ३.५९. [सं. करट=हत्तीचें गंडस्थळ; करटी=हत्ती]

**करटी, करंटी, करवटी, करवंटी, करोटी**—स्त्री. १ डोक्याची, कपाळाची कवची. २ नारळाची कवची; सगळी, अर्धी कवची किंवा तुकडा; कवचीचें केलेलें पात्र; नरटी; नरोटी. करवंटीचीं बटणें करतात. हिचें तेल गजकर्ण, नायटे यांस लावतात. [सं. करोटी=कपाळाचें हाड] **करोटी हातांत येणें**–भिकेस लागणें. **म्ह०** पोरास जेवूं सांगे वाटींत तों पोर जेवी करटींत.

**करटुलग्यां**—(कु.) दारू.

**करटुलें, करंटुली-ले, करंटोली, करटोलें**—स्त्रीन. एक वेल व तिचें फळ. ही वेल ५।६ हात पसरते. हीस आषाढांत फळें येतात. फळाचा रंग हिरवा असून वर कांटे असतात. फळांची भाजी करतात. यास कांटली, कंटोली, रानकारलें म्हणतात. –शे ९.२६१. [सं. कर्कोटकी; गु. कंटोला]

**करटें**—न. कवची; पाठ. 'चालतेयां दळाचेनी भारें। कूर्माचें करटें कुसकरें।' –शिशु ५४०. [सं. करोटी]

**करटें खाणें**—न. वाईट अन्न; कदन्न; भाजीभाकरी. [सं. करट]

**करटें लक्षण**—न. अभाग्यलक्षण; करंटलक्षण पहा.

**करड**—स्त्री. एकदांच घरटींतून भरडून काढलेलें किंवा एक दांच घाव लावलेलें भात; वरील टरफल निघालेला तांदूळ; भरड. असडी तांदूळ. [का. करडु=भरड] ०**काढणें**–क्रि. भराभर कसें तरी उरकणें, अव्यवस्थितपणें व सपाट्यानें काम करणें. [का करड] ०**भाजणी**–स्त्री. (व.) जाचणूक; छळणूक. 'तुझ्यामुळें जिवाला करडभाजणी आहे.'

**करड**—स्त्रीन. (कों) तांबूस रंगाचें, वाईट वास असलेलें एक प्रकारचें खरखरीत डोंगरी गवत; कुसळी गवत. –स्त्री केसाचा राठपणा, खरखरीतपणा (करडगवता सारखा). 'केशांचें करड झालें.' –वि. शुष्क (तुळतुळीत नसलेले); रुक्ष; खरखरीत; राठ; ताठर (केस) [का. करड=वाळलेला चारा, गवत]

**करड**—पु. (व.) उंदरानें खाल्लेला कापूस. [करडणें]

**करंड**—पु. १ करंडी; परडी; बुरुडी पात्र; विणलेलें, झांकण नसलेलें किंवा असलेलें एक पात्र (फळें, भाजी वगैरे ठेवण्यासाठीं) २ करंडा; डबा; कुंकू, दागिने, खाद्यपदार्थ, पानसुपारी, वगैरे ठेवण्याचें धातूचें, लांकडी किंवा हस्तिदंती झांकणासहित पात्र. (गो.) करण. [सं. करंड]

**करड अडुळसा**—पु. एक औषधी वनस्पती.

**करडई**—स्त्री. १ एक पालेभाजी. हें झाड ढोपराइतकें वाढतें, पानें लांबट असून त्यांची भाजी करतात. फूल पिंवळ्या रंगाचें असतें. त्यांत केशरासारखे तंतू असतात. ते वाळवून त्यांचा रंगाकडे उपयोग करतात. त्यांस कुसुंबा म्हणतात. फुलाच्या मागें बोंडांत बीं असतें. त्याचें तेल काढतात व पेंड गुरांना घालतात. तेलाचा जाळण्याकडे व खाण्याकडे उपयोग करतात. –वगु २.१६. –शे ९.२६०. २ एक उपधान्य; करडईचें बीं.

**करडकांगोणी**—स्त्री. कांगोणीचा एक प्रकार.

**करडकूट, करडगूळ**—न. करडईचें कांड किंवा भुस ('करडई बडवून बीं काढून घेतल्यानंतर राहिलेलें). [करडई+कूट=गुळीं]

**करडणें**—क्रि. पांढुरकें, भुरकट, करड्या रंगाचें होणें. 'तेव्हां करडैजे काति। डोळे कोंदनी जाती। सुढाळपणाचे भाव काढती। जाउनी टवकेपणें।' –ज्ञाप्र ८२३. [करडा]

**करडणें करंडणें**—उक्रि. कुरतडणें; चावून चावून भोंकें पडतील, फाटेल असें करणें (उंदीर, घोडा इत्यादिकांनीं वस्त्र वगैरे) 'दांत लाउनि बळें करडावें' –किंगावि २९. [ध्व ?]

**करडा**—वि. १ भुरकट; काळा व पांढरा मिश्र असा (एक रंग) २ भुरकट रंगाचा; पांढऱ्या रंगावर काळे व तांबडे ठिपके असलेला (घोडा). ३ अर्धवट पिकलेले, काळे पांढरे (केस). [करडई]

**करडा**–वि. अर्धवट सडलेला; करड, (तांदूळ) [का. करडु]

**करडा**—वि. तेल न लावल्यामुळें भरभरीत, रुक्ष, राट, ताठर झालेले (केस किंवा शरीर) [का. करड]

**करडा**—वि. १ कडक; निष्ठुर; कठोर; रानटी; पक्का (मनुष्य, जनावर). २ सख्त; जाज्वल्य; कठिण (अमल, कारभार इ०) ३ भेसळ केल्यामुळें कठिण, टणक झालेलें (लोखंड, चांदी वगैरे) [ते. करडु=कडक; म. खरडणें]

**करडा**—पु. १ (सोनारी धंदा) ठसे उठविण्याचें किंवा खांचा (रुपयाच्या कडेला असलेले चरे, रेघा) पाडण्याचें एक पट्टीसारखें हत्यार. २ सोन्याच्या तारेवर रेघा, चरे वगैरेसारखी उठविण्याची नक्षी; तरवारीच्या मुठीवर व पट्ट्यावर किंवा बुगड्यांवर अशा प्रकारची नक्षी असते. अवटीवर तार दाबून ही नक्षी वठवितात. कोंदणकामासाठीं करड्याच्या नकशी खाच्यांत तार किंवा पट्टी बेटतात. –**डाच**। **आवटी**–स्त्री. (सोनारी) करडा तयार करावयाचा ठसा, यास खाचा किंवा भोंकें असतात. ०**पट्टी**–स्त्री. (गो.) (सोनारी धंदा) सोनें, चांदी वगैरे धातूच्या लडींचे तुकडे पाडण्याचें हत्यार; (नाविक) गलबताच्या बाजूच्या भोवतीं असणारा फळ्यांचा किंवा कळकाच्या कांबींचा (पावसाच्या झडीच्या निवारणार्थ) लाविलेला पडदा.

**करडा**—खर्डा पहा.

**करडा अम्मल**—पु. १ कडक सत्ता; कठोर, निष्ठुर कारभार. [हिं. करडा+अर. अमल=सत्ता] २ धुंदी; अंधता; सामर्थ्य; उन्माद (एखाद्या कैफकारक वस्तूचा). [करडा+अमल=मादक पदार्थाचा कैफ]

**करडा हात**—पु. पराक्रम; जोराची कृति, त्वेषयुक्त क्रिया. 'ल्हान पराई होउनि शूरानें करडा हात केला.' –ऐपो ८९.

**करंडा**—पु १ करंड पहा. 'कां कापूर करंडाचा वेचे।' –विउ २.५१. 'तिच्या पाठीमागून पानसुपारीचा करंडा बाळगणारी दासी' –विवि ८.२,१९. २ झाडाच्या खोडाचा कापून काढलेला ओंडका, तुकडा. ३ (कों.) केळीचा खुंट किंवा लाकडाचा ओंडका.

४ (राजा.) पातीच्या तयार केलेल्या छत्रीचा पोकळ दांडा, ज्यामध्यें पाहिजे तेव्हां दुसरा दांडा घालतां येतो.

**करडा**—पु (पाक.) नारळाच्या खवीपासुन तयार केलेली पोळी, हिला 'सोयची पायडिश' असेंहि म्हणतात. –गृशि १. ४४६.

**करंडा**—पु. (कु.) (सोनारी) सोन्याच्या मण्यास पाडलेले करवे प्रत्येकी. करडा पहा.

**करडी**—स्त्री. करडई पहा. 'कुणास न मिळे भाजी कुणी राजी करडी मिळो आंबाडी जुनी।'–ऐपो ३७०.

**करडी**—वि. १ कठोर; निष्ठुर; करडा पहा. २ (माळवी) पक्की; आवळ. 'परकोराची गांठ चागली करडी घाल.' **०कमान**–स्त्री. १ भुवयांचें आकुंचन (कपाळास आठी पडतांना होणारें). २ वक्रदृष्टि; क्रूरता. **०नजर**–स्त्री. वक्रदृष्टि; निष्ठुरता; कडक पहारा; सक्त देखरेख; गैरमेहेरबानी; अवकृपा; क्रूरता. **०मर्जी**–स्त्री. १ खप्पा तबियत; इतराजी; राग. २ मनोवृत्तीचा कडकपणा, करडेपणा; निष्ठुरता. [ हिं. करडा+अर. मर्जी ]

**करडी-करंडी, ढोल**—पु. (बे.) एक प्रकारचें चामड्याचें रणवाद्य; करंढोल. [ प्रा. करडी=एक वाद्य; का. करडे=पखवाज; दोन्हीकडून वाजणारा ढोल ]

**करंडी**—स्त्री. १ लहानकरंडा; करंडक; करंड पहा. 'दिव्य परिमळाचेनि पवनें। विश्व केलें करंडी'–मुआदि २७.२०६. २ देव ठेवण्याची संबळी; वेताचा किंवा बांबूचा झांकणासह लहान डबा. 'जे परमात्मया शिवाची करंडी।'–ज्ञा ६.२७३.

**करंडी**—स्त्री. एक झाड; याचें फळ मुद्रेसारखें असतें, म्हणून त्याला मुद्रा म्हणतात. मराठे लोक गोपीचंदनाच्या गंधांत हें फळ बुडवून कपाळावर वगैरे गंधाच्या मुद्रा लावतात [ सं. करंड ]

**करडूं, करडें**—न. शेळीचें, बकरीचें लहान पिलूं, कोंकरूं; शेळीच्या सुमारें तीन महिन्याच्या पिलास म्हणतात. [ तुल. का. करडु=ओबड धोबड, करडी=अस्वल ]

**करंडूल**—न. लहान करंडा; करंडक.

**करडे तांदूळ**—करड अर्थ १ पहा.

**करडेल**—न. करडीचें तेल. [ करडई+तेल ]

**करढोंक-की, करडोक, कडेढोक**—पु. एक पक्षी, करकोचा.

**करंढोल**—पु. (बे.) एक चर्मवाद्य; मोठा ढोल; हें दोहीं-कडून वाजवितात. करंडीढोल पहा.

**करण**—पु. (भूमिति) (कारागिरी) काटकोन त्रिकोणांतील काटकोनासमोरील बाजू किंवा चतुष्कोणांतील समोरासमोरचे तिरपे कोनबिंदु जोडणारी रेषा; कर्ण. [ सं. कर्ण ]

**करण**—न. १ कोणतेंहि कृत्य करण्याचें साधन; साधनीभूत वस्तु; साहित्य. 'म्हणोनि इंद्रियातें आम्ही। करणें म्हणों।' –ज्ञा १३.१७८. २ शरीरावयव; इंद्रिय. 'जाणिजे तेवीं करणें। सांगती ज्ञान॥' 'कीं करणामाजीं चपल मन। तयाहून सवेग कपिउड्डाण।'–ज्ञा १८.५०६. ३ (व्या.) तृतीया विभक्ति व तिचा अर्थ. ४ (ज्योतिष) बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज, विष्टि, शकुनि, चतुष्पाद, नाग, किंस्तुघ्न इ० करणें अकरा आहेत. हीं दर तिथीस सुमारें दोन भोगलीं जातात. यांच्यापैकी प्रत्येक; अर्धी तिथि. ५ (ज्योतिष) इष्टशकापासुन ग्रहादि गणितसाधन ज्यांमध्यें सांगितलें आहे असा ग्रंथ (याच्या उलट सिद्धांत व तंत्र). ६ करणें; कृति; कार्य. 'कैसें वो तुमचें करण।' जे पुढिलां एओ पाहे मरण।'–शिशु ८२०. ७ (समासांत) करणें; करण्याचा व्यापार. जसें:–पवित्रीकरण; निर्मलीकरण; एकीकरण; शुद्धीकरण इ०. [ सं. कृ=करणें ]

**करण, करणो**—पु. (गो.) करंडा (कुंकवाचा). [ सं. करंड ]

**करण**—न. १ (नृत्य) हस्तपादांची संयुक्त क्रिया. हीं करणें १०८ आहेत. २ (नृत्य) दोन चारींचा समूह [ सं. कृ=करणें ]

**करण**—वि. (व.) उंच.

**करण**—पु. (बडोदे) दागिन्यांत उभा लटकता बांधावयाचा, लांबोळया आकृतीचा लोलक वगैरेसारखा भाग. –जनि (बडोदें) शेवटची यादी १.

**करणकुवारी**—स्त्री. (व.) कोरफड; कुंवार कांडें; कवारपाठा. [ करण+सं. कुमारी=कोरफड ]

**करणकुसूं**—न. (सांधकाम) दोन लांकडें एकमेकांत बसविण्याची पद्धत, तऱ्हा (कानाच्या आकाराचें कुसुं करून) [ सं. कर्ण+म. कुसुं ]

**करणग्राम**—पु. १ इंद्रियसमूह. २ देह; शरीर. 'कासया हा करणग्रामु। वोसु पाडावा।'–गीता १.२३४२. [ करण+ग्राम ]

**करणचौकट, करणाची चौकट**—स्त्री. करणकुसवानें सांधलेली चौकट. [ सं. कर्ण+म. चौकट ]

**करणता**—स्त्री. साधनात्मकता; साधनीभूतत्व. 'आणि आपण होउनी कर्ता। ज्ञाना आणी करणता।'–ज्ञा १८.४९४.

**करणपुतळी**—करपुतळी पहा.

**करणफूल**—कर्णपुष्प, फूल पहा.

**करणरूप**—न. (व्या.) कोणत्याहि धातुचें विधिरूप, अस्तिवाचक रूप (आहे या अर्थी) जसें:–मी आहें. तूं आहेस. याच्या उलट अकरण रूप.

**करणवाच्य**—न. (व्याक.) तृतीयांत नाम. [ सं. ]

**करणा**—पु. कर्णा. तोंडानें वाजविण्याचें, पितळेचें, तुतारीसारखें आरंभीं लहान व शेवटास मोठें होत गेलेलें एक वाद्य. याचा आवाज गंभीर व खर्जातील असतो. लांबी सुमारें चार हात. थोरलें तोंड सुमारें टीचभर व्यासाचें रुंद असून लहान तोंड, पायाच्या आंगठ्याच्या व्यासा एवढें असतें. चौघड्याचे अखेरीस करणा वाजवितात. [ हिं. करनाई; फा. कर्ना, कर्रनाय्; तुल. सं. कर्ण ] **करणा फुंकणें**–(क.) गांवांतील सर्व लोकांस जेवणास बोलाविणें: जेवणाचें जाहीर आमंत्रण देणें. 'रामाच्या मुंजींत करणा फुंकला होता.' **करणेकरी**–वि. करणा वाजविणारा.

**करणाबिद्री**—स्त्री. एक प्रकारचें नक्षीकाम. ( कदाचित् बेदरकडे रूढ असलेलें. )–देहु ८३. ( नाको )

**करणावळ**—स्त्री. एखादें काम केल्याबद्दलची मजुरी. [करणें]

**करणिक**—पु. १ कर्णिक; कुलकरणी. [ सं. करणि=लिहिणें, लेखन ] २ श्रीकरणाधिपतीच्या कचेरींतील कारकून; हें आडनांव कायस्थ प्रभूंमध्यें रूढ आहे. 'मलि मालो दत्त येकू । करणिक ।' –चौऱ्याशीचा लेख ( पंढरपूर शके ११९५ )

**करणी**—स्त्री. ( गवंडी काम ) गिलावा वगैरेचा चुना, चिखल साफ करण्याचें हत्यार; थापी. [ सं. करण=लेप देणें. ]

**करणी**—स्त्री. एक झाड.

**करणी**—स्त्री. १ कृति; क्रिया; कार्य करणें; वागणूक; आचरण. 'वीर उदंड असति परि त्यांला पार्था तुझी नये करणी ।' –मोकर्ण ४५.५१. 'ज्याची त्यासच फळासि ये करणी ।' –चंद्रहास, कीर्तनतरंगिणी भा. १ पृ. ३४. याचा उपयोग क्वचित करतात जसें:–हें करणीनें केलें; त्याची करणी वाईट आहे. **म्ह॰** १ करणी कसाबाची, बोलणी मानभावाची. २ ज्याची करणी त्याला. २ लीला; अलौकिक गोष्ट; याचा प्रयोग विस्मयकारक किंवा लोकोत्तरकृत्यासंबंधीं करतात. जसें:–'ही गोष्ट घडावी असें नव्हतें पण देवाची करणी यामुळें घडली'; 'न कळे देवाची करणी ।'–ऐपो ३५५. 'विचित्र करणी वदावी ।' 'सप्तपाताळा झाली ती करणी ऐकली नाहीं.' **म्ह॰** ईश्वराची करणी, नारळांत पाणी. ३ लग्नांत हुंड्याशिवाय वर व तत्पक्षीय मंडळींचा करावयाचा मानपान, सत्कार, देणगी ( वस्त्र, दागदागिने वगैरे देऊन ). ( क्रि॰ करणें ) 'हुंडा घ्यावयाचा नाहीं असें म्हणायचें पण करणी मात्र चोपून घ्यावयाची.' ४ एखाद्यास उद्देशून केलेलें चेटूक, जारणमारण, मंत्र तंत्र इ॰ प्रकार; कवटाळ. 'ते पतिवंचका निर्धारी । सर्व काळ करणी करी ।'–कथा ५.२.४८. ५ अचाट कृत्य; पराक्रम. 'नर करणी करे तो नरका नारायण होगा' 'कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान करणी ।'–र २. ६ (गणित) वर्गमूळ न तुटणारी संख्या, ज्याचें मूळ बरोबर पूर्णांक येत नाहीं तें पद. [ सं. कृ=करणें; करणी ]

**करणीगत**—वि. (गणित) ज्याचें वर्गमूळ पूर्णांक येत नाहीं तो ( राशी ). इं सर्ड. [ सं. ]

**करणीचा**—वि. कृत्रिम; कृतीचा ( राघू, घोडा, मनुष्य वगैरे मातीचीं चित्रें ). 'करणीचें कांहीं न मनें सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ।'–तुगा २८६३. **–चें पागोटें**–न. पगडबंदानें ठोकळ्यावर बांधून तयार केलेलें पागोटें ( डोक्यावर बांधलेलें नव्हे ) ॰**फूल**–न. कृत्रिम केलेलें फूल. **–चा रोग–ची बाधा**–पु. मंत्र तंत्र, जादूटोणा वगैरेंनीं उत्पन्न केलेली बाधा. ॰**आंबा**–पु. कलमी आंब्याचें झाड व फळ. ॰**वाघ–घोडा–कुत्रा**–पु. वाघ, घोडा, कुत्रा इ॰ चें रूप घेऊन तशी कृति करणारा मनुष्य.

**करणीय**—वि. करण्यास योग्य, उचित ( असें कर्म ). 'परी करणीया अकरणीया न देखा । आपेंपरू नोळखा ।'–ऋ ४५. 'जें कां करणीय प्रतिदिनीं'–ज्ञा १८.११५. [ सं. ]

**करणीसार**—क्रिवि. कृतीप्रमाणें; कर्मासारखें. [ करणी+( अनु )सार ] **म्ह॰** करणीसार फळ=कर्मासारखें बक्षीस.

**करणें**—उक्रि. १ उरकणें; उलगडणें; तडीस नेणें; बनविणें; जमविणें; रचणें. २ होणें; घडून येणें; बनणें ( अकर्मक प्रयोग ). जसें–मला मळमळ करतें; उन्हाळे करतात; भोंवळ करते. ३ एखाद्या पद्धतीनें वागणें; एखाद्या पद्धतीस अनुसरणें. [ सं. कृ–कर्; झेंद. कर्; फ्रें.जि. केर; आर्मेनि. कर; फा. कर्दन् ] ( वाप्र. ) **केलें केलें न केलें न केलेंसें करणें**–( एखादें काम ) निष्काळजीपणानें करणें, कसें तरी तडीस लावणें. ( वाप्र. ) ( प्राप्ति ) **करून घेणें**–एखाद्याच्या–कडून, द्वारें काम उरकून घेणें; एखाद्याच्या मार्गानें तडीस नेणें, मिळविणें, संपादणें. **करून चुकणें–टाकणें**–( एखादें काम ) पुरें करणें; संपविणें. 'ती तर अस्मादिकांना पसंत करून केव्हांच चुकली'–माझी पण तीच गत ( उषाग्रंथमालिका ) ६.

**करणें**—न. कृति; कर्म; काम. **म्ह॰** १ करणें थोडें मचमच फार. २ ( गो. ) करणें थोडें उलवणें चढ=करण्यापेक्षां बडबड मोठी.

**करणें**—शअ. पर्यंत; पावेतों; बरोबर; च्या वेळीं; त्यापेक्षां उशिरां नाहीं ( वेळ दाखविणारें अव्यय ). 'आज प्रारंभ केला तर उद्यां दोनप्रहरांकरणें संपेल.'; 'सकाळींच करूं लागत तर एव्हांकरणें आटोपलें असतें.'

**करणेर**—न. वरास द्यावयाची देणगी; मानपान; करणी अर्थ २ पहा. 'समर्थें दुबळयाचें करणेर साजिरें केलें.'–सप्र १४.३९.

**करतड**—वि. ( व., घाटी ) खरतड; खतरड; कम नशिबाचा; दुर्दैवी. खडतर पहा.

**करतल**—पु. तळ हात; हाताचा तळवा. 'प्रत्यक्बुद्धी करतळें। हातवसावें'—ज्ञा १५.२५८. [सं.] ०**भाष**—स्त्री. हातावर हात मारणें; वचन देणें. 'असें वदून करतलभाष। देऊन तुष्ट केलें त्यास।'—नव १५.१७७. ०**भिक्षा**—स्त्री. १ घरोघर जाऊन जें अन्न कोणी घालील तें तळ हातावर घेऊन तेथच्या तेथेंच उभ्या उभ्या खाणें; अशा प्रकारचें व्रत किंवा भिक्षा. २ (ल.) घरदार नसणें; फटिंग असणें; भिक्षावृत्ति. 'करतल भिक्षा। तरुतल वासः।'—चर्पटपंजरी [सं.]

**करतलामल, करतलामलक, करतलामलकवत्**—क्रिवि. (हातांत प्रत्यक्ष स्थित असलेला आवळा जसा सर्व बाजूंनीं पाहतां येतो त्याप्रमाणें) १ सिद्ध; स्पष्ट; उघड; ज्याचें सर्व बाजूंनीं ज्ञान झालें आहे असें; ज्यास दुसरे प्रमाणाची गरज नाहीं असें. असंशयित' 'वेदशास्त्राचा मथितार्थ। झाला करतलामलकवत।'—एभा ११.१०४९. 'ते करतलामलकसे दूरूनि दिसले अशेष मग तीतें।'—मोस्त्री ४.३. २ (ल.) अवगत असलेली; हातचा मळ बनलेली; अत्यंत सुलभ; साध्य (विद्या, कला, शास्त्र वगैरे). 'चतुर्दश विद्या चौसष्ट कला। करतळामळ जयासी सकळा।'—ह ३१.८. 'महाराष्ट्र व संस्कृत या दोन्ही भाषा मोरोपंताला करतलामल होत्या'—नि ७६५. ३ स्वाधीन; सुगम. 'सारा भूगोल ज्यास करतलामलकवत् आहे त्यास एखाद्या रानांत नेऊन सोडला किंवा त्याच्या हातीं जहाजाचें सुकाणूं दिलें तर काय मौज होईल बरें!'—नि [कर+तल+आमलक]

**करताल-ली, करतालिका**—नपुस्त्री. १ (वाद्य) बाहेरच्या बाजूनें निमगोल व आंतून सपाट असें कांशाचें टीचभर लांब व तीन बोटें रुंद व दोन्ही कडांना निमुळतें असें दोन दोन तुकड्यांचें वाद्य. हें आंगठा व बोटें यांमध्यें धरून चिपळ्यांसारखें वाजवितात. ताल धरण्याकडे याचा उपयोग करतात. केव्हां केव्हां मृदंगाच्या साथींत वाजवितात. (सामा.) चिपळ्या; झांज. 'नृत्यकृत्य तत्कारतान करताल झुंमकड्या अंतरीं।'—राला ३१. २ टाळी; दोन्ही तळहात एकमेकांवर आपटून काढलेला आवाज. (क्रि० वाजविणें; देणें; पिटणें). 'अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी।'—एकनाथ पदें (नवनीत) पृ. ४४९. 'कथा अन्वय लापणिका। नाम घोष करताळिका'—दा ४.२.१०. ३ चुटकी, चिटकी. (क्रि० वाजविणें) [सं. कर+तल, ताल; गु. करताल] ०**धरणें**—हातांनीं ताल धरणें; साथ करणें.

**करतुकीचा कांदा**—वि. (श्लेषार्थानें) करणारा; कर्तृत्ववान्. 'गाडे घोडे गाई म्हैशी बैल आदणधुरी। करतुकीचा कांदा तिमवां येतो आंगावरी।'—पला ८१. [सं. कर्तृत्व]

**करतुत**—स्त्री. (वे.) पराक्रम; कर्तेपणा. [सं. कर्तृत्व; हिं. करतू-त; गो. करतुव]

**करद्**—वि. कर देणारा; मांडलिक; 'पांचाळ, कुलिंद, ऋषिक केले जिंकूनि करद सस्नेह।'—मोकर्ण ६.९. 'कोची एथील राजा सामरीन राजाचा करद असतां त्यानेंही यावेळीं आपल्या अधिपतिविरुद्ध बंड केलें होतें.'—गोमंतक इतिहास ४०. [सं. कर+दा= देणें]

**करंद, करंदी**—स्त्रीन. (कु. राजा.) करवंदीचें झाड; यास फार कांटे असतात. करवंदाचें फळ पिकल्यावर काळ्या रंगाचें होतें व रुचकर लागतें. हिरव्या फळाचें लोणचें करतात. [सं. करमर्द; प्रा. करमद्द किंवा करमंद; गु. करमदां; हिं. करोंदा]

**करदनकाळ**—वि. अति क्रूर; करक्षतकाळ पहा. [सं. कदन+काळ]

**करदळ-ळी**—स्त्री. १ एक फुलझाड; कापूरकेळ. २ केळीचें झाड. [सं. कदल]

**करदा**—पु. शेतकरी; जमीन करणारा, कसणारा; स्वतः शेतीचा धंदा करणारा (मालक किंवा कूळ). हा शब्द अनेकवचनींहि उपयोगांत आणतात, जसेः–करदे पाटील. [फा. करदकार; सं. कर+दा]

**करंदा, कारंदा**—पुन. करंद पहा.

**करदाय, करंदें**—स्त्री. (गो.) १ कटकट; मोठा आवाज. २ कठोर शब्दांनीं ताडण; दुःशब्द. [ध्व. ?]

**करदावलें**—न. एक प्रकारचें गवत; याचीं फुलें पिवळीं असतात. करंदोळ पहा.

**करंदी चौकट**—स्त्री. जोड चौकट; दुहेरी चौकट.

**करदोटा-डा-रा, करधोटा-डा**—पु. १ कडदोरा, करगोटा पहा. २ कमरपट्टा. 'कटीं त्यालिसे करदोरा'—देवीदास भामावर्णन ८. ०**तोडणारा**—वि. अतिशय कडक तंबाखूला म्हणतात.

**करदोडा**—पु. (ना.) बांधीव विहिरींत उतरण्यासाठीं बांधकामास धरून राखलेला कंगोरा; हा विहिरीच्या तळापर्यंत असून सुमारें दीड हात अंतरानें ठेवतात.

**करदोडी**—स्त्री. शूद्र लोकांचा कमरेस बांधावयाचा सुती करगोटा; करदोरा-डा. [सं. कटि+म. दोरा]

**करदोडी-री**—स्त्री. मोठाले दोर वळण्यासाठीं तयार केलेला तात्पुरता सोपा; दोरशाळा.

**करदोंडी**—स्त्री. एक प्रकारचें झाड.

**करंदोळ**—न. (वे.) एक प्रकारचें गवत. करदावलें पहा [का. करंडे]

**कर न कर, कर न करी, कर ना करी, कर न कऱ्या**—वि. १ जें करावयास पाहिजे तें न करणारा व जें करावयास नको तें करणारा असा (मनुष्य). २ हट्टी; तेढा; तंटेखोर;

अकरनकर. 'हा तुझा करनकरी स्वभाव तुझ्या मावशीला आवडला नाहीं.'—बाळ २.७७. २ (गो. कु.) परोत्कर्ष न साहणारा. [करणें+न करणें] म्ह० करनकऱ्या चा वसा=करनकरेपणाचें व्रत; वरील प्रमाणें वागण्याचें व्रत, प्रकार, तऱ्हा. 'आयर्लंद जिंकल्यापासुन आजपर्यंत इग्लंदनें तेथें नुसता करनकऱ्याचा वसा चालविला आहे.'—आयर्लंदचा इतिहास.

**करनाटक**—पु. एक देश; कर्नाटक पहा. [सं. कर्णाटक; का. करि=काळा+नाडु=प्रांत] ०**ओस पडणें**-बहिरें होणें; बधिरत्व पावणें. [सं. कर्ण=कान]

**करनाटकी**—वि. कानडी (भाषा, मनुष्य वस्तु, इ०).

**करप-पी**—पुस्त्री. १ शिजवितांना करपलेलें, काळें होऊन भांड्यास चिकटलेलें अन्न, पदार्थ. २ अति उष्णतेनें जळलेलें किंवा वाळलेलें पीक. [करपणें]

**करप**—न. (रा.) कठिण पदार्थाचा धार असलेला तुकडा (काच, शिंप, दगड, खापर, कालवें वगैरेचा); कपरी. [सं. कूर्प= दगड, खडा; म. कडपा, कपरा]

**करपचंद**—पु. (गो. सोनारी) घड्याळाची सांखळी; छडा.

**करपंजी, कयपंजी**—स्त्री. (गो.) हातांत धरावयाची मोठी पणती.

**करपट**—वि. १ करपलेलें; अर्धवट जळलेलें (अन्न, भात भाकरी). २ जळका; जळकट (वास). ३ अजीर्णामुळें घशाशीं येणारें दुर्गंधयुक्त आंबट (ढेकर). [का. करि=भाजणें, करपणें; करकु-करिकु=भाजलेलें, जळलेलें ?]

**करपट**—न. वस्त्राचा फाटका तुकडा; फडकें. 'जेविं करपटशतें कृशान। विकसिजे जैसा।'—कथा ३.१६.१. [सं. कर्पट= जुनें कापड]

**करपट**—पु. (कु.) आकस्मिक येणारा, तुफानासारखा वारा व पाऊस.

**करपटसड्या, करपटड्या**—वि. पौष्टिक अन्न अथवा पदार्थ सेवन केले असतांहि जो पुष्ट होत नाहीं असा (मनुष्य). [करपट+सडणें]

**करपटाण**—स्त्री. करपलेल्या अन्नाचा वाईट वास, घाण. [करपट+घाण]

**करपणें**—अक्रि. १ भाजणें; जळणें; होरपळणें; भाजून निरुपयोगी होणें (अन्न वगैरे). २ कडक थंडी किंवा ऊन यामुळें नष्ट होणें; नासणें (शेतांतील पीक, झाडें). 'फळतीं झाडें करपती।'—दा ३.३.४६. ३ म्लान, निस्तेज, दुर्बळ होणें (भय, शोक इ० मुळें) वाळणें; झडणें; निस्तेज होणें. 'स्वास्थ्य पावे करपलिही सती.'—मोरा पृ. १९. ४ खंगणें; दुःखानें, विकारानें क्षीण होणें (शरीर). 'स्पर्शु जालेया कमळांचा। तनु करपतुसे।'—शिशु ८३३. ५ कष्टी होणें; दुःख पावणें. 'तसें तत्सौंदर्यें रतिमदन चित्तीं करपती।'—विवि ८.१.२०. [का. करकु, करपु; का. करि=जळणें, भाजणें; तुल० सं. कृप्=दुर्बल होणें]

**करपत्र**—न. करवत. 'किति दिस करपत्रीं आपला जीव घालूं।'—सारुह ३.७३. [सं. कर+पत्र]

**करपल्लव**—पु. १ (काव्य) हाताचा पंजा; हात. 'पहात करपल्लवां जंव सरला।'—ज्ञा ११.२१५. २ हातानें खुण करणें; पालवणें. [क्रि० करणें] [सं.] **करपल्लवा, करपल्लवी भाषा,** (अप.) **करपालवी**-स्त्री. अकारादि वर्ण हाताच्या बोटांवर बसवून त्या संकेतानें भाषा बोलणें; खुणांनीं बोलणें; गुप्त, गूढ भाषा. (क्रि० करणें). नेत्रपालवी नादकळा। करपालवी भेदकळा।'—दा ५.५.२७. 'माझ्या मुक्या मनाची करपल्लवी आपल्याला समजेल का ?'—भा १०७.

**करपविणें**—उक्रि. १ करपणें प्रयोजक. अन्न शिजत असतां जाळणें, भाजणें, काळें करणें. २ जाळणें; नासणें; कोमविणें (झाड, पीक इ०)

**करपक्ष्म प्राणी**—पु. पंख हेच ज्यांचे हात आहेत असे प्राणी (वाघूळ, पाकोळी वगैरे).—प्राणिमो २३. [सं. कर+पक्ष्म+प्राणी]

**करपा**—वि. करपट पहा. 'करपा ढेकर.'

**करपा**—पु. जळका; वाळलेला तुकडा, भाग; करपलेला भाग. [करपणें]

**करपा**—पु. (गो. कों.) चपटा, सपाट व पातळ शिंपला. करप पहा. [कडपा]

**करपा**—पु. द्राक्षावर पडणारी एक कीड, जंतु. [करपणें]

**करपा**—पु. काळ्या रंगाचें फूल येणारें एक झाड. —नाको.

**करपात्री**—वि. कर (हात) हेंच ज्याचें (भोजनाचें) पात्र आहे असा (परमहंस); करतलभिक्षाशी; जोग्यांचा एक वर्ग. 'परमहंस करपात्री'—वेसीस्व १२.६१. [सं. कर+पात्र]

**करपी**—स्त्री. १ जळणें; नासणें; सुकलेली, वाळलेली स्थिति (पावसाच्या अभावामुळें पीक इ० ची). (क्रि० पडणें). २ ताप, भूक वगैरेमुळें पोटांत पडणारी आग. (क्रि० पडणें). ३ भांड्याच्या बुडास लागलेली जळ, मस, काळेपणा. ४ करपलेलें अन्न. [सं. करपणें]

**करपी**—वि. (जुन्नरी) दोन्ही गालांवर पांढरा रंग असलेली (मेंढी.) 'ही मेंढी करपी आहे.'

**करपुतळी**—स्त्री. कांश्याच्या थाळ्याला काजळाचा लेप लावून त्यावर दिव्याच्या प्रकाशांत शकुन किंवा भविष्य पाहण्याची एक रीत. कोणी हाताच्या आंगठ्याच्या नखास काजळ लावून त्यावरहि पाहतात; कज्जलपुतळी. [कर+पुतळी]

**करपुष्कर**—न. ( करकमल ) १ हाताचें अग्र; बोटें. २ (काव्य) हत्तीच्या सोंडेचें टोंक. 'घे इक्षु वारण जसा करपुष्क रानें । श्रीराम चाप उचली करपुष्करानें ' –वामन, सीतास्वयंवर ३२. [ सं. कर=हात+पुष्कर=कमल, पुष्प ]

**करपृष्ठ**—न. तळ हाताचा मागचा, खालचा भाग; हाताची पाठ. [ सं. ]

**करपेल**—न. मऊ व चांगलें, गुरांनीं खावयाजोगें एक प्रकारचें गवत.

**करफग**—स्त्री. ( खा. ) ( सोनारी ) आगट्या वगैरेच्या टशाची पट्टी.

**करफस**—पु. सरडा. 'चार करफस व जवखाईचें मूळ वारीक करून करडईचे तेलांत भाजून मिळवून केंस गेले असतील तेथें लावावें. ' –अश्वप २.३०४. [ फा. ]

**करंबट**—स्त्री. १ एक प्रकारची चटणी; आलें धुवून त्यांत मीठ, हिंग घालून वाटून दह्यांत कालवून केलेली चटणी. २ आवळकाठी, केळफूल वगैरे पदार्थांत हिंग, जिरें, मिरें, अमसूल, मीठ घालून वाटून केलेली चटणी. ३ ( कु. ) आंबा, काजू यांच्या फोडीस मीठ, मसाला लावून केलेलें लोणचें. [ सं. करंभ=मिश्रण, दध्योदन, मिश्र पदार्थ, खाद्य ]

**करबड-बाड**—स्त्री. गुरांनीं खाऊन उरलेला व तुडविलेला कडब्याचा गाळ; कडबड पहा. ' जावयासवें आलें घोडें । दाणा वेती करवाडें । ' –भावार्थ रामायण, किष्कि ११.१०४.

**करबडणें**—अक्रि. खरबडीत होणें, करवडणें पहा.

**करबडी**—आउताचा एक प्रकार. –शे ७.१७.

**करबंदी**—स्त्री. कर देण्याचें बंद करणें; सरकारी कर (शेती व प्राप्तीवरील ) न देण्याबद्दलची चळवळ. ' अलाहाबाद कांग्रेस मध्यें करबंदी, जंगलसत्याग्रह वगैरे टराव पास झाले. ' –के ३१. ५.१९३०. [ कर+बंद ]

**करबपाग**—न. (को.) मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें. [ करब=? +पाग=जाळें ]

**करबल**—न. ( वे. ) मुसलमानांच्या मोहरमांत हिंदूंनीं काढलेले मेळे; लेजिमीचा खेळ. [ अर. करबला=हुसेनचें मृत्युस्थान ]

**करंबल**—स्त्री. एकझाड. हें झाड मोठें असून याचें पान मोठें हात-सव्वा हात लांब असतें; करमल पहा. ' न पाहाता सवेलें । मानससरोवरीचीं कमळें । आणि जेती करंबाळें । गुंडाळोनियां । ' –शिशु ७८६.

**करंबुटी**—स्त्री. १ (कों.) लहान, हिरवा, कच्चा, न पिकलेला, आंबा; आंब्याची कैरी. २ खारांत मुरलेल्या कोंवळया कैऱ्या ' आणि करंबुट्या रायतीं । ' –मसाप २.२४. ३ चटणी; करंबट पहा. [ कर=काळा+अंबुटी ]

**करंबें, करमजें**—न. १ भाजलेल्या आंब्याच्या बलकांत गूळ व मसाला घालून केलेलें तोंडीलावणें; चिंचेंत गूळ, मसाला घालून केलेलें तोंडीलावणें. २ रुचकर पदार्थ घालून भाजलेलें किंवा उकडलेलें फळ; रुचकर पदार्थ घालून भाजलेला किंवा उकडलेला बाठ धरलेला आंबा.

**करबेल, करवील**—पु. ( गो. ) एक झाड. याचीं पानें फोडणीस उपयोगी पडतात. करवील पहा.

**करंबेळ**—पुन. एक झाड व त्याचें फळ. हें झाड सह्याद्रीच्या उतारावर होतें. याचें लांकूड इमारत कामास उपयोगी असतें.

**करंबेळें**—न. लोणच्याचा एक पदार्थ; करंबें पहा.

**करभ**—पु. १ मनगटापासून बोटांच्या मुळापर्यंतचा तळहाताचा भाग. २ हत्ती, उंट किंवा इतर पशूंचें लहान पिलूं; छावा. [ सं. ]

**करभार. करभाग**—पु मांडलिक राजानें सार्वभौम राजास द्यावयाची खंडणी; कर. (सामा ) खंडणी, कर. (क्रि० घेणें; देणें; बसविणें ). ' श्रीमंतांस करभार देउन आले शरण रिपू पृथ्वीवरले. । '–ऐपो १९८. ' सर्व राव देती कारभार । कर जोडुनि वारंवार । ' [ सं. कर+भार, भाग ]

**करभूषण**—न. हातांत घालावयाचें रत्नजडित कडें. 'पिवळें पदक, करभूषण । ' –रामदासी भूपाळी [ सं. कर+भूषण ]

**करम**—न ( हिं. ) नशीब; दैव; कर्म पहा. [ सं. कर्म ]

**करम, करमकंद, करमकल्ला, करमकांदा, करमगड्डा, करमाचाकांदा, करमभाजी**—न.पु.स्त्री. कोबी; पानकोबी [ फा. करम्, करंब् ]

**कॅरम**—पु. एक टिकल्यांचा खेळ. यांत एका फळयावर दोन रंगांच्या ९।९ टिकल्या व एक राणी टिकली असून त्या दोन बाजूंच्या गडयांनीं आपआपल्या रंगाच्या टिकल्या चौपऱ्यांत असलेल्या खिशांत घालावयाच्या असतात. हा खेळ कलकत्ता येथील कार व महलानोबिस कंपनीनें प्रचारांत आणला व त्यांच्या आद्याक्षरांवरून त्यास नांव पडलें. ०बोर्ड–पु. टिकल्यांचा खेळ खेळावयाचा, चार खिसे असलेला चौरंग.

**करम-फर्माय-मुख्लिसान**—वि. (फा.) स्नेह्यावर कृपा करणारा ( पत्रव्यवहारांतील एक मायना )–रा ३.४५१. [ फा. ]

**करमट**—स्त्री. करंबट पहा.

**करमणूक, कर्ईमत**—स्त्री. १ (काव्य) आनंदानें, सुखानें काळ घालविणें; मनोरंजन; रमणूक. २ खेळ; मौज; आवडता उद्योग; क्रीडा. [ करमणें ]

**करमणें**—उक्रि. आनंदांत, सुखांत, मौजेंत, चैनींत काळ घालविणें; आनंदांत सुखांत, काळ जाणें. ' मला करमत नाहीं. ' [ सं. क्रम्=जाणें; क्रमण ]

**करमणें**—अक्रि. एखाद्या क्षारांत फळ वगैरे राहिल्यानें त्यास, किंवा फार वेळ पाण्यांत राहिल्यानें हात पाय वगैरेस सुरकुत्या पडणें; आकसणें; चिरमुटणें; चिरम्या पडणें.

**करमर**—स्त्रीन एक झाड व त्यास येणारें फळ; करंबळ; करमख; याचें पान आंवळयाच्या पानासारखें परंतु थोडें लहान असतें. फळ लांबट असून त्याच्या पाकळया थोड्या वर आलेल्या असतात. फळांचें लोणचें करतात. –शे ६.२२. लॅ. अव्हरोआ कॅरमबोला. [सं. कर्मरंग]

**करमरा**—वि. आकारानें करमराच्या फळासारखा (कांचेचा, सोन्याचा वगैरे मणी); बाहेरून फुगीर करवे असलेला मणी. जव्याचा (मणी). [करमर]

**करमल-ळ**—न. १ कमरक; करमर; एक आंबट फळें येणारें झाड व त्याचें फळ. लॅ. अॅव्हरोआ कॅरमबोला. २ करबेला; एक मोठें झाड; याचीं पानें मोठीं व लांबट असतात. लॅ. डिलेनिआ पेंटाजिनिआ.

**करमलवाल**—स्त्री. (गो.) भाजीच्या उपयोगी पडणारी एक वेल.

**करमाला**—स्त्री. माळेप्रमाणें बोटांचा उपयोग करणें; जपसंख्या मोजण्यासाठीं उपयोगांत आणलेलीं उजव्या हाताचीं बोटें (त्यांचीं पेरें). करांगुलीचीं तीन पेरें, तर्जनीचीं तीन पेरें व मधील दोन बोटांचीं मधल्याशिवाय दोन पेरें याप्रमाणें दहा पेरांची ही माला होते. [सं. कर+माला]

**करमीन**--पु. एक प्रकाचा मासा (हा शब्द चुकीनेंहि तयार झाला असेल. कारण याचे निरनिराळे पाठभेद आढळतात). 'शुशुमार घडियाळ मत्स्य मगर। कूर्म करमीन जळविखार।' –मुआदि २९.७७. [कर? +मीन; का. कर=वरिष्ठ, महत्]

**करमुइ**—स्त्री. कळा. –शर.

**करमुंचें**—क्रि. (गो.) मिठाच्या पाण्यांत भिजणें. करमणें पहा. [स क्षार+मुच् ?]

**करमोड**—पु. (व.) तापाची कसर; अंग मोडून येणें. 'तापाचा करमोड येतो.' [कर+मोडणें; गु. करमोडिया=गुरांचा एक रोग]

**करमोडी**—स्त्री. (वाई.) एक वनस्पति.

**करल**—स्त्री. (चि.) तांदूळ, सावे, नाचणी, राळा, वरी यांच्यावरील टरफल; (विशेषतः) बारीक तुष. [सं.]

**करल**—वि. (कु.) रोड; अशक्त; कमी दूध देणारी (म्हैस)

**करल**—वि. बरड; मुरमाड (जमीन).

**करली-लें**—स्त्रीन. (कु. कों.) पाणी उपसण्याचें लांकडी साधन. बागेंत नारळी, केळी, पोफळी यांना पाणी शिंपण्यासाठीं याचा उपयोग करतात. हें पन्हळासारखें असून कमानदार असतें. यास हातकरलें म्हणतात. पायकरल्याचीं दोन्हीं तोंडें बंद असतात. याची एक बाजू हातांत धरून दुसरी बाजू पाण्यांत टेकवून मधील भागास गुडघ्यानें धक्का देऊन पाणी उडवितात. 'करल्यान् पाणी उसाप.' [तुल० हिं. करवार=विहिरींतून पाणी उपसण्याचें साधन]

**करलावणी**—स्त्री. (कु.) चिंचेपासुन चिंचोके वेगळे करण्याची (काढण्याची) कृति; काटलणी.

**करलावणें**—क्रि. (कु.) चिंचेपासून चिंचोके काढणें, वेगळे करणें; काटलणें.

**करली**—स्त्री. (कों.) पांढऱ्या रंगाचा मासा; याच्या अंगावर कांटे असतात. लांबी सुमारें दीड हात असते.

**करली**—स्त्री. एक प्रकारचें गवत.

**करली**—वि. (कुलाबा) आखूड.

**करलें**--करली पहा.

**करवजी-जें**--स्त्रीन. एक औषधी वनस्पति.

**करवंजी**—(कु.) करंजी पहा.

**करवंजें**—न. पाण्याचा फवारा; कारंजें पहा.

**करवट**—पुन (काव्य) एक कडू फळ व त्याचें बीं, करट पहा. 'जैसें भाजिलें करवटें। तेण क्षुधा न घटे।' [सं. करट]

**करवट**—स्त्री. (ना.) एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळणें [हिं. करवट]

**करवटणें**—अक्रि. (ना.) एका कुशीवर पडणें, निजणें. [हिं. करवटना]

**करवटी, करवंटी, करोटी**—स्त्री. नारळावरील कठिण कवच; नरटी; नरोटी. (वाप्र.) **हातीं करवंटी देणें**–भिकेस लावणें. [सं. करोटी]

**करवड**—स्त्री. १ खरवड; दूध वगैरे पदार्थ तापविले असतां भांड्याच्या तळाशीं बसणारा खरवडून काढण्यासारखा भाग. २ (ल.) खोडसाळ माणूस. 'ती साऱ्या मुलखाची मेली करवड!' [खरवडणें]

**करवडणें**—अक्रि. करकटणें पहा.

**करवडी, करवंडी**—स्त्री. पोटाची खांच; पोटाची खळगी; पोट. 'बाप करी जोडी लेकराचे ओढी। आपली करवंडी वाळवूनि।' –तुगा १५८३. [स. करंड]

**करवडी, करवंडी**—स्त्री. समूह; रांगा; जमाव; थवा. 'नदी वाहतां दुथडी। झाल्या प्रेताच्या दरडी। घोडणें कमठें पृथ्वी गाढी। गज करवडी महाग्राह॥' –एरुस्व १०.८०. 'हस्तींपां महित गज करवंडी, असंख्यात पाडिल्या।' –मुआदि ४४.१०३. [?]

**करवण**—स्त्री. (गो.) १ फळाची लहान खाप–फोड–फाक. २ फळांचा घड. ?

**करवत**—पु. १ (सुतारी) लाकूड कापण्याचें हत्यार; दंतुरी पातें; अरकस. २ सोनारीहत्यार. -वि. (व.)(ल.) अतिशय गार, थंड. बोट बुडविल्या बरोबर करवतीनें कापल्या सारखें वाटण्या इतके थंड 'पाणी फार करवत आहे.' करवंद पहा [सं. करपत्र] ०**कांठ. करवती कांठ**-पु. (विणकाम) धोतर, लुगडें वगैरेच्या कांठांत करवतीच्या आकाराची नक्षी; करवती नक्षीचा कांठ. **करवता कांठी**-वि. ज्याच्या कांठांत करवतीसारखी नक्षी आहे असें (धोतर, लुगडें वगैरे). **आडवा करवत घालणें**-वाप्र. एखाद्या कार्यास अडथळा करणें; प्रतिबंध करणें; हरकत करणें. **जिवाला करवत लागणें- असणें**-अतिशय काळजी लागणें, असणें. **करवतीखालीं धरणें, करवती घालणें**-अतिशय गांजणें, जाचणें, जुलूम करणें.

**करवतणें**—उक्रि. करवतीनें कापणें (लाकूड वगैरे); अरकसणें. -शे ७.७ [करवत]

**करवती**—स्त्री. लहान करवत. ०**लगाम**-काटेरी लगाम पहा.

**करवती**—स्त्री. एक झाड; काळा उंबर.

**करवंद-दी**—स्त्री. एकझाड करंद पहा. -शे ९.२६२;११. ८८. [सं. करमर्द-करमंदी; प्रा. करवंदी]

**करवंद**—न. १ करवंदीचें फळ. २ (ल.) (करवंदाचें फळ फार आंबट शहारे आणणारें असतें यावरून) अतिशय गार; शहारे आणणारें; गारपणाचें आधिक्य दाखविण्यासाठीं गार शब्दापुढें हा शब्द योजितात 'गार गार करवंद' (हवा, दारू इ०)

**करवंदणें**—अक्रि. १ झोंबण्यासारखें, शहारण्यासारखें गार असणें; अतिशय थंडगार होणें (पाणी, ताक, हवा, हात वगैरे). [करवंद]

**करवल-ळ**—पु. करोल; बंदूकवाला घोडेस्वार. 'एकी गदा उचलोनि बळें। वीर करवले पाडिती'-एभा ३०.११५. 'चाळीस हजार करवल जमले'-ऐपो १०७. 'नामी करवळ आहे हुजुरांत।'-ऐपो २७७. [हिं. करोल; तु करावुल]

**करवला-ली**—पुस्त्री. नवऱ्या मुलीच्या किंवा नवऱ्याच्या भावास व बहिणीस लग्नांत विनोदानें म्हणतात. विवाहप्रसंगीं करवली वधू व वर यांच्या पाठीमागें हातांत कऱ्हा (कलश) घेऊन उभी रहात असते (सामा) मानकरी, मानकरीण. 'करवली सुभद्रा वेल्हाळ। चाले सुढाळा उन्मनी।'-एरुस्व १६.४२. 'करवलीचा मान. सुप्रमत्रा ठेवी घंगाळी।'-वसा ५४. [सं. करक (कलश)+वान, वती. म. कऱ्हा+वला-ली प्रत्यय]

**करवली**—स्त्री. (हिं.) बंदूकवाल्या घोडेस्वारांचें युद्धांतील कौशल्य किंवा कामगिरी. [करवल पहा.]

**करवस्त्र**—न. हातरुमाल; घाम पुसण्याचें वस्त्र. (इं.) हँडकरचीफ. [सं. कर+वस्त्र]

**करवळणें**—क्रि. (व.) कळवळणें; हळहळणें; द्रव येणें. 'हालपाहून सुद्धां त्याचा जीव करवळत नाहीं.' [कळवळणें]

**करवा**—पु. १ सोललेल्या उसाचा तुकडा; गंडेरी. [का. कब्बु, कब्बु=ऊस; तुल० सं. खर्व=लहान. खुजा] ०**पडणें**-क्रि. शरीराचा एखादा अवयव मोडणें; तुकडा पडणें; अतिशय दुखावणें; दमणें; थकण. (कंबर, हात वगैरे). 'हाताचा, कमरेचा करवा पडला.'

**करवा**—पु. १ करकोचा; दोरी वगैरे बांधल्यामुळें पडलेला वण. २ लांकूड वगैरेस दोरी बांधण्याकरितां पाडलेली वाटोळी खांच; अवटी.

**करवा**—पु. मोत्यास मध्यें खोलगटपणा असणें. मोत्यास मध्यभागीं सभोंवती पडलेला करकोचा, रेघ. हा मोत्यांत दोष समजतात. मोतीं डोळ्यासमोर धरलें असतां आंतील बाजूस चिरल्यासारखी रेघ दिसते तिला नर म्हणतात. अशा मोत्यास थोडा खोलगटपणा असल्यास करवा म्हणतात.

**करवा**—पु. नृत्यांतील एक प्रकार; कारवा, केरवा नाच. यांत वेषपरिवर्तन केलेलें असतें. 'त्या दिवशीं गाणें व करवा नाच पाहून दरबार फार खुष झाले.'-धर्माजी ९०. [सं. करव]

**करवाड-डें**—न. करबड पहा. 'वोलि जोंधळियाचीं करवाडें। खातां अत्यंत लागती गोडें।'-एभा २१.२६७.

**करवाद**—पु (कों.) त्रास; कष्ट; श्रम. [करवादणें]

**करवादणें**—अक्रि. (कु.) त्रासणें; श्रमणें; कष्टी होणें; पिरपिरणें. कंटाळा आल्यामुळें रागानें कुरकुरणें, पिरपिरणें. 'अरे, पण झालें काय तुला इतकें करवादायाला'-रत्न ५.४. [ध्व. कर+वद्-वाद=कुरकुर करणें]

**करवाल**—स्त्री. तरवार. 'फोडितु करवाळें। काढिती आंतांचें पेटोळे।'-शिशु १०४८. 'त्यांजवळ धनुर्बाण, परशु, करवाळ वगैरे हत्यारांखेरीज हत्यारें नाहींत.'-चंद्रगुप्त ६१. [सं. करवाल]

**करवाळ**—न. (कु.) सर्पादिकांच्या अंगाचा मधला भाग. [?]

**करवीं-वें**—शअ. (एखाद्या) कडून; द्वारें-साधन-मार्गे, मध्यस्थी दाखविणारें. प्रयोज्य कर्त्यापुढें कर्तृत्वबोधक हें अव्यय लागतें. 'दुर्योधीं करविलीं करतळें। भीमसेना करवीं॥'-शिशु ८५३. -अमृ ७.१२६. 'तुला करवेना तर मुलाकरवीं करीव' [सं. कृ.]

**करवीर**—पु. १ कण्हेरीचें झाड व फूल. २ कोल्हापूर. [सं.]

**करवील**—(गो.) एक वनस्पति, हिचीं पानें सुवासिक असून तीं कढींत किंवा आमटींत घालतात. करवेल, करवेली पहा.

**करवेण**—न. (गो.) लहान खाप, तुकडा. करवण पहा.

**करवेल**—न. (वायदेशी) हरळीसारखें एक गवत. करपेल पहा. -मसाप ३.२४६.

**करवेली**—स्त्री. ( कों. कुलाबा ) गाडीच्या साटीचें पुढचें व मागचें आडवें लांकूड.

**करवह**—न. ( व. ) नांगर धरण्यासाठीं मागील बाजूस लावलेलें मुठीचें लांकूड; हमणें. [ स. कर+वह् ]

**करशींग**—पु. ( गो. ) गोमंतक प्रांतांतील एक झाड.

**करशुद्धि**—स्त्री. हातावर पाणी घालणें; हात धुणें. विशेषतः श्राद्धास ब्राह्मण जेवावयास बसतांना त्यांचे हातांवर घालतात. 'खाद्य नैवेद्य समर्थ भक्षिलें। करशुद्धि देतसे भूपती।'–संवि ७.१२१. [सं.]

**करस्थापन**—न. कर बसविणें, लादणें. [ सं. ]

**करसांबळ-ळी**—स्त्री. खरसांबळी पहा.

**करहाट देश**—पु कऱ्हाड; कऱ्हा नदीच्या कांठचा प्रदेश; कऱ्हाड व त्याच्या आसपासचा प्रांत. [ सं. ]

**करळ**—पु. वाळूमिश्र, ठिसूळ दगड; बरड, कड. [सं. करक] **०लागणें**-( वांई ) पाभरीच्या फणानें जमीन जास्त खोल उकरली जाणें.

**करळ**—नस्त्री. ( राजा ) तांदूळ व इतर धान्याचें तूस, भुसा, टरफल. करल पहा.

**करळ**—स्त्री. छिद्र, ( विरळ विणलेल्या रोवळी, सूप, पाटी यांच्या मधील ) फट; चीर. [ सं. करल=वेळू; किंवा कराल=रुंद, उघडें ]

**करळ-ळा**—नपु. कुंभाराच्या भट्टींत कौलें, विटा वगैरेंच्या खालीं घातलेलें, अर्धवट जळलेलें गवत. २ अशा गवताची एक काडी.

**करळ**—वि. ( व. ) उतरतें; कलतें. 'झोपडीचें छप्पर जास्त करळ असल्यानें पाणी थांबलें नाहीं.' **०जाणें-होणें**-क्रि. एका अंगाला कलणें, जाणें ( जूं. धुरी, नांगर, गाडा, तराजू, तराजूची दांडी यासंबंधीं योजतात ). हा शब्द शेतकरी लोकांत विशेष रूढ आहे. **०धरणें**-क्रि. ( नांगर ) आडवा धरणें. **०चालणें**-आडवें जाणें, आडवें निघणें. याच्या विरुद्ध शेव ( उभें ) जाणें, चालणें.

**करळ**—काळया जमीनीचा एक प्रकार; हिच्यांत भुसभुशीतपणा नसून ही फार चिकट असते. हिच्यांतून पाणी झिरपून जात नाहीं. पाणी पडलें असतां हिच्यावर मिठासारखा पांढरा क्षार येतो. हिचे काळा करळ व पांढरा करळ असे दोन प्रकार आहेत. [ का. करल=खारटपणा; क्षारता. ]

**करळ**—वि. ( व. ) महाग; कडक; वाजवीपेक्षां जास्त ( किंमत ). 'बाजारांत उशिरां गेल्यानें गहूं जरा करळ पडले.'

**करळी**—स्त्री. मोडशी झाल्यामुळें पायांतून येणारे पेटके.

**करळी**—१ गाडीच्या साटीच्या चौकटीचें पुढचें व मागचें लाकूड प्रत्येकी. करवेली पहा. २ ( कों. ठाणें ) उभे खुंट ज्यांत बसवितात त्या दोन लाकडांपैकीं वरच्या लाकडास करळी म्हणतात; पिढ्यावरील आडवें लाकूड; करळी, दोन आडवीं लाकडें ( तरशे ) दोन लांब तुकडे ( घोडी किंवा घोडकीं ) हीं सर्व मिळून गाडीची साटी होते. ३ ( माण. ) बावकड्या व घोडबाह्या यांच्यामध्यें बसविलेल्या एक हात उंचीच्या व चार बोटें रुंदीच्या फळया प्रत्येकीं. ४ ( सुतारी ) कपाटाच्या माथ्याची फळी. ५ गाडीच्या पेटीवरील भाग.

**करळी**—स्त्री. १ कुरळी; जाळ्याचा न विणलेला भाग, धागा, तंतु. [ का. करि=दशी ] २ धोतर, लुगडें वगैरेंचा भाग; दशी. [ का. करि=दशी ]

**करळी**—वि. करळ दगडांनीं बांधलेली; करळ दगडाची ( इमारत, वस्तु वगैरे ). [ करळ ]

**करक्षालन**—न. हात धुणें; आंचवणें. 'देऊनि कृष्णासि आचमन। सर्वेचि केलें करक्षालन।'–एरुस्व १५.१५६. [सं.]

**करा, करादिया, करा दिल्याचा मान**—पु कऱ्हा पहा.

**करा**—पु. ( राजा. ) पाण्यावर आलेला तरंग, साय. –पु. जोंधळा, बाजरी वगैरेंच्या कणसावर पाऊस पडून दाण्यास येणारा मोड. अंकुर.

**करा**—पु. ( गो. ) पावसांत पडणारी गार. [ सं. करक=गार ]

**कराकर-रां**—क्रिवि. ( ध्व. ) दांत खाणें, ऊंस चावणें, काकडी खाणें यावेळीं होणाऱ्या आवाजानें युक्त; करकरां पहा. [ ध्व. ]

**करांगळा**—पु. ( व. ) खाचरा( गाडी )चा सांगाडा व आंख यांना जोडणारे दोन बाजूचे खुंट.

**करांगळी, करांगुलि-ळी**—स्त्री. हाताचें किंवा पायाचें लहान बोट; कनिष्ठिका; करंगळी पहा. [ सं. कर+अंगुलि ]

**करांचलि**—स्त्री. एक आंखूड तलवार; करंचली पहा. [ फा. कराचळी ]

**कराज**—न. ( कु. ) कर्ज ( अप. ) ऋण; कर्ज. 'कराज काढलां हां'. [ अर. कर्झ ]

**कराड**—पु. १ झटका; आवेश; लहर ( ताप वगैरे विकृतीनें येणारी). २ मनोविकाराचा क्षोभ; जोराची लहर; चीड. (क्रि० येणें.)

**कराड-डी**—स्त्री (खान. गु. व.) पर्वताची किंवा नदीची दरड; कडा. 'मोहनदीची थोर कराडी।'–एभा १३.५८१.

**कराड**—न. ( कु ) सुकलेलें रान, गवत. करड पहा. [ का. करड=वाळलेला घांस, गवत ]

**करांडणें**—क्रि. कुरतडणें; करडणें पहा. 'कामक्रोधाच्या उंदरीं पाहीं। मूळाच्या टाचीं करांडी।'–एभा १०.५१७. 'मूषकें करांडोनि दशनीं। पादहीन करावा।'–मुआदि ३४.४.

**करांडणें**—क्रि. ( कु. ) जून होणें. [ का. करडु=कठिण, रूक्ष ]

**कराडा**—पु. २ (व. घाटी) अंगावर फोड अथवा गळूं झालें असतां येणारा ताप; कणकण. ( क्रि० येणें )

**करांडा**—पु. १ (कों.) ओंडा: ठोकळा; करंडा अर्थ २ पहा. २ (कु.) करांडो; नारळाच्या किंवा केळीच्या झाडाचें खोड, खुंट.

**कराडी**—स्त्री. १ शक्ति, जोर, बळ, अवसान. (क्रि० धरणें; येणें ). २ श्रम; कष्ट. ' उपास कराडीं । तिहीं करावीं बापुडीं ।' –तुगा ६४७. ३ (अव. कराड्या ) पेटके; वांब. ( क्रि० येणें; चढणें; ओढणें; उठणें. )

**कराडूं**—न. शेळीचें पिलूं; करडूं पहा.

**कराणा**—पु. एक प्रकारची भाजी.

**कराणी**—पु. ( गो ) मुखत्यार; एजंट. [ करणें, करणारा ]

**करांतल्यो**—स्त्री. ( गो. ) गमजा; चेष्टा [ सं कृ ]

**करांती**—( कों. ) एक प्रकारची उघडी गाडी.

**करांदा-दें**—पुन. करंद; करवंद; करवंदी पहा. [सं. करमर्द]

**करांदा**—पु करंदा. ( कों. ) एक प्रकारची वेल. हीस जमीनींत येणारा कंद, व वर येणारें फळ. याचे गोड करांदा व कडू करांदा असे दोन भेद आहेत.

**कराप**—न. (कु.) १ लोहाराच्या भट्टीतील जळकट विडासारखी अशुद्ध धातु; कीट. २ सुकलेला पदार्थ. करप पहा. [करपणें]

**कराब**—न. ( कु ) आठ पाकळी कमळाच्या आकाराचें व एका पाकळीस मोत्यांचे घोस असलेलें कर्णभूषण; कराबफूल; ( अव. ) करावां. [ सं. कुरबक=तांबडी कोरांटी ]

**करावीन**—स्त्री. कडाबीन पहा. ' करावीन बकमार याची खूण. ' –ऐगो १०९. [ इं. कॅराबिन ]

**करामत**—स्त्री. १ चमत्कार; अद्भुत गोष्ट; नवल. ' म्हणे येथे करामत दिसे बहुत । मग औरंगजेबासी जाणविली मात । ' –संवि २५ ३६. ' म्हणे करामत पाहूं याची । ' –रामदासी. २ १२२. २ कर्तृत्व; कौशल्य; खुबी; चातुर्य, चमत्कार करण्याचें सामर्थ्य. ' आपली करामत कारागीरानें त्या पुतळ्यांत खर्च केली होती. ' –विवि ८ २ २९. ३ गुतागुतीची, कौशल्याची रचना. यंत्र; विविध साधनांची जुळवाजुळव [ अर. करामत् ]

**करामती**—वि. अंगीं करामत असणारा. युक्तिवान्; चातुर्यवान्; कुशल; हिकमतीचा; शोधक; कल्पक. ' मृत्य न म्हणे करामती । कंवाड जाणे ॥ ' –दा ३.९ ११. ' असती दैवत करामती । ' –दावि ४६३. [ अर. करामत ]

**करामात**—स्त्री. मदत्कृपा 'जे ये समयीं आपलें येणें गोया ( =म्हणजे ) करामात जाली. ' –रा १.१८८. [ अर. करामात् : करामत्चें अव ]

**करार**—पु १ ठराव; वचन; बोली; कबुली. 'मनसबा करार केला.' –सभासद ३०. ' जमीनच देवास करार करून दिल्ही पाहिजे. ' –मसाप २.३९५. २ निश्चय; शाश्वति; ठाम मत. 'तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी । ' –तुगा ३७३. ' राजश्री नारायणराव घोरपडे यांस पाठवणार म्हणतात, करारांत नाहीं. ' –ख ११ ५६६६. ३ ( कायदा ) कायद्यानें अंमलबजावणी करतां येईल अशी कबुलायत. ( इं. ) कॉन्ट्रॅक्ट; ' दोन इसमांमध्यें एकमेकांस वचनें देऊन जेव्हां एखादी गोष्ट ठरते तेव्हां अशा वचनाला संगनमत म्हणतात व तें संगनमत कायद्यानें अमलांत आणतां येण्याजोगें असेल तर त्यास करार म्हणतात.' –घका ९२. –वि. मुक्रर; कायम; निश्चित. [अर. करार्] **०दाद**–पु ठराव; लेखी वचन; इकरारनामा. [ फा. करार्दाद ] **०नामा**–पु. ठरावपत्र; कराराचा कागद; करारलेख. [ फा. करार+नामह् ] **०मदार**–पु. १ वचन; बोली; कागद लिहून देणें; अनुमति वगैरेबद्दल व्यापक संज्ञा. [ अर. करार+मदार ] २ ( मदारवर जोर देऊन योजितात ) खात्रीचें अभिवचन; आणभाक; वेळभंडारा. **०वाकई-वाके, वाकै**–घडल्याप्रमाणें; बरोबर; अचुकपणें. 'करारवाकई हकीकत.' –रा १८ ५१. 'त्यासी माली–गामलतीचा इतला करारवाकै देऊं. ' –रा ६ ६१२. [ फा. करारवा केई ]

**करार**—पु. ( ख्रि. ) देवाची मनुष्यजातीसंबंधानें केलेली योजना ( हिब्रू भाषेंत करार या शब्दाचा अर्थवाचक जो शब्द आहे त्याचा अर्थ कापणें अथवा बंधन असा आहे ). 'मी मेघांत धनुष्य ठेविलें आहे तें तुमच्या माझ्या मधल्या कराराचें चिन्ह समजावें. ' –उत्प ९.१३. ख्रिस्ती करार दोन आहेत: १ **जुना करार**-पु (ख्रि.) ओल्ड टेस्टामेंट या इंग्रजी शब्दाचा पर्याय; परमेश्वरानें इस्रायल लोकांशीं मोशे याच्यातर्फे जो करार केला होता तो. त्यात नेमशास्त्रासंबंधीं बाह्यविधि व नियम लाविले होते. 'कारण जुना करार वाचितात तेव्हां तेंच आच्छादन तसेंच न काढिलेलें राहतें.' –करिंथ ३ १४. –इब्री ८ ७.१३. २ ख्रिस्ती पवित्रशास्त्र या ग्रंथाचा पूर्वार्ध. **नवा करार**-पु. १ (ख्रि ) न्यू टेस्टामेंट या इंग्रजी शब्दाचा पर्याय; भविष्यवादामध्यें ईश्वर व मानवजाति यामधील ज्या नैतिक संबंधाविषयीं भविष्य वर्तविलें आहे तो संबंध. ' मी इस्राएलाच्या घराण्याशीं ... नवा करार करीन. '–इब्री ८.८. २ येशू ख्रिस्तानें मनुष्यांशीं केलेला करार, त्यानें क्रूसावर आपलें रक्त सांडून त्यावर आपला छाप मारिला. त्यायोगें ख्रिस्तावर भाव ठेवणारास तारण प्राप्त होतें. ३ पवित्रशास्त्र या ग्रंथाचा उत्तरार्ध.

**कराराचा**—वि. १ केलेल्या ठरावास जो कधीं टळत नाहीं तो; विश्वासु; प्रतिज्ञा पाळणारा.' निवडक चाळिस सहस्र बरोबर फौज कराराची । ' –ऐपो ३१५. २ निश्चयी; एकवचनी. [करार]

**करारी**—वि. १ कराराचा. २ निश्चयी; बाणेदार; विश्वासू. ३ पक्का; स्थिर मनाचा; दृढप्रतिज्ञ. ४ टिकाऊ; तग धरणारा (वस्तु,

रंग इ० ). ५ पक्का; भरपूर; खंबीर. [ फा. ] ०पणा-पु बाणे दारपणा; तडफदारपणा. 'पण जों विद्यापीठें ... सरकारच्या लायसेन्सप्रमाणें चालावयाचीं तेथें ... करारीपणा कोठून नजरेस पडणार ?' -टि २.५१७.

**करारी**—पु. शाक्त पंथाचा एक भेद. हे स्वतः देहदंड करून घेतात; काली, चामुंडा इ० दैवतें भजतात. [सं. कराल=भयंकर. फा. करारी]

**करारी**—स्त्री. १ बळ; जोर; जोम (क्रि० धरणें; येणें) कराडी पहा २ (राजा.) वचन; बोली. करार पहा.

**कराल**—न. कोंडा; तुस. करळ अर्थ २ पहा.

**कराल-ळ**—वि. भीतिप्रद; भयंकर; भीषण. 'खवळत रिपुकाळें काळकाळें कराळें।' -दावि २७८. [सं.] **०वदन**-वि. वरील दांत लांब व खालील आंखूड असणारा (घोडा). [सं. कराल+वदन]

**करालता**—स्त्री. (संगीत) तोंड वासून गाणें. [सं. कराल]

**कराली-ळी**—स्त्री. पेटका; बांध; वळ; कराडी पहा. (क्रि० चढणें; उतरणें; बांधणें). कराळया असा अव. प्रयोग.

**कराष्टमी**—स्त्री. आश्विन वद्य अष्टमी. या दिवशीं कुमारिका गंगोदकानें भरलेला करा (मडकें) हातांत घेऊन देवीची पूजा करतात; ही चाल विशेषतः काशीप्रांतीं रूढ आहे. कांहींच्या मतानें आषाढ व कार्तिक वद्य अष्टमीस हें व्रत करावें. परंतु अधिक रूढ आश्विन वद्य अष्टमीच आहे. [ कऱ्हा+अष्टमी ]

**कराहा**—पु घोडयास होणारा एक रोग; ढांस; आंतडयांतील रोगांपैकी एक रोग. -अश्वप २.१०९. [अर. कऱ्हा]

**कराळ जाणें-होणें**—करळ जाणें पहा.

**करि, करी**—पु. हत्ती. 'करीतुरंगसमाजें। सेना नाम निफजे।' -ज्ञा १३.१५२. [सं. करिन्] **०चर्म**-न. हत्तीचें कातडें. 'करिचर्म घेतसे प्रावर्ण। न कंटाळें दुर्गंधीनें मन।' **०हस्त (संयुक्त हस्त)**-पु (नृत्य) उजवा हात लताख्य करून ह्या बाजूकडून त्या बाजूकडे झुलत ठेवणें, तसेंच डावा हात त्रिपताक करून डाव्या कानावर ठेवणें. [सं.] **०हस्तक(करण)**-न (नृत्य) पाय अंचित करून डावा हात वक्षस्थलावर ठेवणें. उजव्या हाताचा तळहात तर्जनीच्या बाजूनें आरंभ करून बाहेरून आतल्या बाजूस फिरविणें.

**करिणा-ना**—पु. १ (वादीप्रतिवादींनीं) पंचायतीपुढें दिलेली स्वतःची लेखी जबानी, कैफियत. २ वर्तमान; गोष्ट; हकीकत. 'करिणा कांहीं पातशाहास समजत नाहीं.' -सभासद ३९. ३ योग्यायोग्य विचार. 'कांहीं करिणा जाहला.' -सभासद ३८. ४ अनर्थ. ५ प्रकार. [अर. करीना]

**करिणा**—पु संदर्भ; संबंध. 'आम्ही लोक कोणे करिणेयाचे व मोगल लोक कोणे करिणेयाचे हे रावसाहेब बेहत्तर जाणत असतील.' -रा १.५२. [करिणा. तुल० दे. करणि=समानता]

**करिणी**—स्त्री. हत्तीण. 'अगे गेहारण्यीं भ्रमसिल कसी मत्त करिणे!' -मराधा ३० [सं.]

**करितां, करतां**—शअ. १ कारणें; साठीं; स्तव; मुळें; प्रीत्यर्थ. 'जेणें करितां बाणे खुण। सर्वज्ञपणाची।' -दा २.२.१. २ पेक्षां; हून 'तेथ वसंतां करता चढावती। ग्रिष्मिअें केली रीगवणी।' -शिशु ६२१. [सं. कृते]

**करिंदा**—करांदा पहा.

**करियात-द**—स्त्री. दहा-बारा खेडयांचा लहान महाल; यांत कांहीं या महालांतील व कांहीं त्या महालांतील खेडयांचा समावेश होतो. कर्यात पहा. [अर. कर्यतह्. (कर्या=गांव)]

**करियाद, कर्याद**—स्त्री. (गो.) दाट जंगल व उंच असा पर्वत. [?]

**करी**—पु. कर पहा. पुढील अर्थी नामांना हा प्रत्यय लागतो. १ मालक, धनि, जवळ बाळगणारा. उदा० पैकेकरी=पैसा जवळ बाळगणारा; घरकरी=घराचा मालक; मानकरी=मानाचा अधिकारी. २ एखाद्या गावचा रहिवासी; -चा माणूस. उदा० गांवकरी. ३ एखादा धंदा करणारा; काम करणारा; एखाद्या धंद्यावर उपजीविका करणारा. उदा० भिक्षेकरी; शेतकरी; भाडेकरी. ४ वाहणारा; बरोबर घेणारा. उदा० इटेकरी (राजशस्त्रधर, इटा नावाचें राजानें वापरावयाचें शस्त्र बरोबर बाळगणारा, खेळणारा); पटटेकरी. ५ नुसतें कार्य करणारा किंवा उरकणारा. उदा० यात्रेकरी; मारेकरी. करी याचे अनेक अर्थ असून ज्या शब्दांना तो लागतो तेथें तेथें त्याचे अर्थ दिले आहेत. करी हा प्रत्यय वाला या प्रत्ययाप्रमाणें वाटेल तेव्हां उपयोगांत आणीत नाहींत. -वि. कर (शहरांच्या नांवाना लागणारा प्रत्यय) चें विशेषणात्मक रूप; संबंधदर्शक; उदा० पुणेंकरी=पुण्याचा किंवा पुण्याच्या लोकांसारखा. [सं. कृ=करणें.]

**करीं**—शअ. (काव्य) नें; मुळें; योगानें; करितां (तृतीयेचा प्रत्यय). 'ज्याचिया नामस्मरणाकरीं। सकळ पातकांतें हरि हरी।' -एभा ३.५८८. [सं. कृत्वा]

**करीणा-ना**—हकीकत; वर्तमान. करिणा-ना पहा. 'ज्याचा मला हा कळला करीणा।' -सारुह ३.८ **०रोखा**-करारनामा, अर्ज.

**करीणा**—पु. (ना.) कर्तबगारी; पराक्रम

**करीबल**—न. सैन्यांतील गजदळ; हत्तींचे पथक [सं. करि+बल]

**करीर**—पुन. नेपती (तें) नांवाचें काटेरी झुडुप व त्याचें फळ. 'करीर पुष्प शुष्कही रसार्थ चाखितो तरी।' -कक ७८. [सं.]

**करीव**—शअ. (राजा.) कडून; करवीं, करव पहा.

**करुण**—वि. १ दया उत्पन्न करणारा, पाझर आणणारा (प्रसंग). २ दयाळु; दीन; कृपावंत. [सं.] **०रस**-पु. नवरसांपैकीं एक; दुसऱ्याची विपन्न स्थिति, प्रियजनवियोग इ० कारणांनीं अंतःकरणांत जी वृत्ति उत्पन्न होते ती; दुसऱ्याचें दुःख पाहून अंतःकरणामध्यें उत्पन्न होणारी भावना व्यक्त करणारा रस. 'सांगो नवरस लक्षण। तरी शृंगार हास्य करुण।'–निगा २८५. [सं.]

**करुण(दृष्टि)**—वि. (नृत्य) दुःख झालें असतां डोळे अर्धवट मिटतात व बाहुल्या अश्रुपूर्ण होतात व नासाग्रीं नजर लागते तशी (दृष्टि). हा अभिनय करुणरसाचा आहे.

**करुण, करुणा**--पुस्त्री. दया; कृपा; माया; द्रव येणें; कींव 'मग जी जलदश्यामा करुणा बसली नवासनावर ती।'–मोउद्योग ७.९५. 'कृपाळुवा परमपुरुषा। करुणा केसी तुज नये।' –व्यं. २२

**करुणाकर**—वि. दयासागर; कृपानिधि; दया करणारा, कृपा करणारा (परमेश्वर). 'नाभी नाभी या उत्तरें। करुणाकरें शांतवीजे।' –तुगा ११५६ 'जो जगद्गुरु करुणाकर। त्यासि भक्त चरित्रें आवडती फार।' –संवि १.१६.

**करुणाकीर्तन**—न. १ (परमेश्वराच्या) दयेचें व कृपेचें वर्णन. २ (ल) गयावया करणें; काकुळत करणें; दयेसाठीं विनवणी.

**करुणांग**—वि. नम्र. 'नमन केलें साष्टांगीं। उभा राहिला करुणांगीं।' –गुच ३५.३१. [सं करुण+अंग]

**करुणा भाकणें**—क्रि. दुसऱ्यास करुणा येईल असें दीनवाणें भाषण करणें; दयेची याचना करणें; काकळूत करणें; गयावया करणें. 'देखोनिया अंतसमया। करुणा भाकिती भोगीतनया।' ह–११.१४१. 'करुणा अनुतापें भाकावी॥' –संवि ३.६५.

**करुणारस**—करुणरस पहा.

**करुणास्वर**—पु. दीनवाणा, करुणेचा, काकुळतीचा शब्द. [सं.]

**करुणाळा**—वि. दया, करुणा करणारा; कृपाळु. 'जरि तूं करुणाळा गोसावी। भणौनि विटसी ना।' –ऋ ५२. [सं. करुणा+आलुच]

**करू**—वि. करणारा. उदा० यात्रेकरू; बिऱ्हाडकरू; होतकरू 'पूर्ते हे शुभलक्षणी रत सदा धर्मेकरू रक्षणीं।' –आसीस्व १८. [सं. कृ]

**करून**--शअ. १ कडून; करवीं; मुळें; योगानें (साधन, कारणीभूत, मार्गदर्शक या अर्थी). 'क्षेमें यावा द्वारकानाथ। याचस्वार्थें करूनियां।' –ह २५.६०. २ होऊन (स्वतःच्या मर्जीनें, विचारानें) बद्दल योजतात. परंतु हा तितका शुद्ध नाहीं. होऊन पहा.

**करूब**—पु. (खि.) हे एक प्रकारचे देवदूत असून ते देवाच्या समक्षतेचे द्योतक होते असें जुन्या करारावरून दिसतें. 'एदेन बागाच्या पूर्वभागीं करूब व गरगर फिरणारी ज्वालारूप तरवार ठेवली.'–उत्प ३.२४. [हिब्रू. कुब. (अव.) कुबीम; फ्रें. चिरुबिन; इं. चीरब]

**करे**—न. (व) मडकें; करा [सं. करक.]

**करे-कऱ्हें**—न. उंट. 'अशोकाचे अंगवसे। चघळिले कऱ्हेंनि जसें।' –ज्ञा ११.४१४. [सं. करभ=उंटाचें पिलूं]

**करें**—वि. (गो.) कृश; अशक्त. [सं. कृश.]

**करेड**—न. (गो) तणाची एक जात; एक प्रकारचें गवत; करड पहा. २ तबल्याच्या चामड्यावर डकवावयाची शाई, पुडी. [का. करिडु=काळा पदार्थ, काळेपणा]

**करेणु**--स्त्री. हत्ती; हत्तीण हत्तीचें पिलूं; गजबालक 'करेणुपद चालतां दिसति पंकजाचे परी।'–गंगारत्नमाला,नरहरि १४३. नवनीत पृ. ४३२. [सं.]

**करेत**--न. (गो.) घोड्याची गाडी, बगी. [पो. करित; इं. कॅरज]

**करेप-य**—स्त्री. (गो.) तंबाखू जाळून केलेली पूड. करप पहा. [करपणें]

**करेपाक**—पु. (तंजा.) कढिलिंब. [ते. करे=काळा+वेपा =लिंब+आकु=पाला]

**करेम-करेमेट**—स्त्री. (गो.) कोणत्याहि फळाची कोशिंबीर. करंबें, करमंग पहा. 'आमाड्यां करेम.'

**करेमती**—स्त्री. (बे.) एक प्रकारचें भात, साळी.

**करेल, करेल आंबा**--पु. (गो.) कलमी आंब्यांची एक जात. [पोर्तु. कॅरेरा]

**करेला**—पु. (व्यायाम) कारलें; दोन हातांनीं फिरविण्याचा मोठा मुद्गल. याचें वजन सुमारें दीड मण, लांबी ४३ इंच, घेर २९ इंच असतो. [हिं. करेल; सं. कराल ?]

**करेळ**—पु. (कों) एक जातीचा मासा. हा आक्टोबर–नोव्हेंबरमध्यें सांपडतो.

**करो**—पु. (गो.) कर, करा पहा.

**करोट**—पु (व) शेताच्या लागवणीबद्दल येणारें धान्य [खंड?]

**करोट होणें**—क्रि. (कुण.) मरणें; स्मशानभूमिविषयगत होणें. [सं. करट; म. करोटी, कारट.]

**करोटी**—स्त्री. करवंटी; नरोटी. **करोटी हातांत घेणें**—भीक मागणें; विपन्नावस्थेस पोंचणें. [सं. करोटी]

**करोड**—वि. १ (हिं.) कोटी (संख्या), २ (ल.) असंख्य. [सं. कोटि; प्रा. कोडि]

**करोडगिरी**--स्त्री. १ करोडा याचें काम व कचेरी. २ मालावरील जकात; कर. 'निजामाला करोडगिरीचें जंगी उत्पन्न आहे.' [करोडा+गिरी]

**करोडा**—पु. १ (कांहीं प्रांतात) कमिशनर किंवा सर मामलेदाराच्या दर्जाचा अधिकारी; सुभा. २ (मोंगलाईंत) मालावरील जकात वसूल करणारा कामगार; जकातदार; नाकेवाला. [हिं. करोडा-डी; सं. कर]

**करों(रौं)डां**—स्त्री. कुरवंडी पहा. -दार.

**करोनी**—शअ. कडून; करून पहा. 'दानांबुपान करवी मधुपां करोनी।'-र ५५.

**करोनी**—क्रि. करून (कर धातूचें रूप).

**करोल-ळ**—पु. बंदुकवाला घोडेस्वार; करवल-ळ पहा. 'यांखेरीज थोर थोर गाडयांवरील भांडीं व करोळ असा चालता तोफखाना सज्जिला.'-मराआ ६. [तु. करावुल]

**करोली-ळी**—स्त्री. १ करोल्याचें काम, कसब. २ (घोड्यावरील स्वारांनीं केलेला) बंदुकीचा मारा, फैर. 'श्रीमंतांकडील बार्गीर झाडून जमा होऊन करोळी सुरू झाली.'-पया ४५.

**करोळा**—पु. कुंभाराच्या आव्यांतील जळकें गवत. करळ-ळा पहा.

**करोळी**—स्त्री. (व.) गाडीचे धुरे ज्या लांकडांत घालतात त्यास म्हणतात. करळी पहा. 'नुकतीच करोळी केल्यानें जेर झालें.'

**करोळें**—न. १ गाडीच्या साटीचें आडवें लांकूड; याच्या उलट बाजू. २ करळी पहा.

**कर्क**—पु. १ खेकडा; कुरलें-ली; खेंकडें; किर्वे. २ (ज्यो.) बारा राशींपैकीं चौथी रास. [सं. कर्क; फा. कर्क] **०वृत्त**—न. उत्तरध्रुव सूर्याकडे पूर्णपणें कलला म्हणजे २३॥ उत्तरअक्षांशापर्यंत सूर्यकिरण लंबरूप पडतात, या अंतरावरून जाणारें जें अक्षवृत्त तें. **०रेषा**—स्त्री. सूर्याच्या उत्तरेकडे जाण्याच्या मर्यादेवरील रेषा.

**कर्क**—पु. करक. वरातीच्या झालींतील दिवा. 'वंश विस्तारितां सुख । सोळा कळांचे सोळा कर्क।'-एरुस्व १६.१५९. [सं. करक]

**कर्कट-कर्कटलें**—वि. (व.) कळकट; घाणेरडें; ओंगळ; मळानें करवडलेलें. 'फडकें कर्कट होऊन गेलें, धु एकदांचें.' [करवडणेंप्रमाणें]

**कर्कट, कर्काटक, कर्कोटक**—पुन. १ (गणित) त्रिज्या. २ वर्तुल काढण्याचें साधन; कंपास. ३ कर्क पहा.

**कर्कटशृंगी**—स्त्री. एक झाड; काकडशिंगी पहा. [सं. कर्कट=कांकड-डी+शृंग=शिंग]

**कर्कणें**—क्रि. करण्याचा (वाद्य) कठोर आवाज काढणें; कठोर शब्द करणें. 'कर्णी किसीएक रणबहिरी कर्कती।'-ऐपो ११९. [ध्व.]

**कर्केर**—पु. (एखाद्या रत्नाच्या आंत दिसणारे) रजःकण, रेव; रती; कच. [ध्व. खरखर]

**कर्कश**—वि. १ कर्णकठोर; कर्णकटु; शिरशिरी भरणारा; झोंबणारा (आवाज); याच्या उलट मधुर. 'वाजों नको कर्कश रे मनीरा'-दावि १६६. २ (ल.) बोचणारें; अंतःकरणाला घरे पाडणारें (भाषण, वचन). 'कर्कश वचनें कर्कश मार।'-दा ८.२७. ३ तुरट; तिरसट; रानटी; वाईट स्वभावाचा. ४ किर्र, अतिदाट. 'झाडी हे कर्कश भयंकर.'-रामदासी २.१३७. 'तों रान कर्कश अचाट। गगनचुंबित तरु अचाट।'-नव २३.९. ५ क्रूर; कठोर; निर्दय; भयंकर. 'कर्कश वेश उभा रणरंगी राघव तसा।'-दावि ३३४. [सं. कर्कश]

**कर्कशा**—स्त्री. १ त्राटिका; कैदाशीण; कृत्या; जगनाड; तंटेखोर; भांडकुदळ स्त्री. २ कर्कश, कठोर आवाज असणारी स्त्री; मधुर भाषीच्या उलट. [सं. कर्कश]

**कर्कशा**—पु. भांडण. 'ते समयीं यांणीं भाऊपणियाचा कर्कशा केला नाहीं.'-रा १६.१५. [अर. कर्कशा; ध्व.]

**कर्कपृष्ठ (संयुतहस्त)**—न. (नृत्य) दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांच्या बेचक्यांत घालून अडकवून ठेवणें. [सं.]

**कर्की**—स्त्री. धडकी; भीति; धचक. 'समोर गातां कोणी दिसेना। मनामध्यें बसली कर्की।'-होला १८. [कडकी]

**कर्कोचा (च्या)**—पु. एक पक्षी, करकोचा पहा. 'हुमे कर्कोच्या सुतार।'-दावि २४४. [सं. क्रौंच]

**कर्कोट, कर्कोटक**—पु. १ (पुराण) कद्रूपुत्र, एक नाग; सर्पराज, याला नऊ हजार हत्तींचें बळ होतें. नल राजास वनवासांत यानें दंश केला होता. कलिदोषनाशाकरितां याचें स्मरण करतात. 'कर्कोटकस्य नागस्य......कीर्तनं कलिनाशनम्।' 'नाना सर्प उगवले काळ कर्कोट चालिले।'-दावि ५०१. २ (उप.) कऱ्हाडे जातीच्या ब्राह्मणास म्हणतात. ३ सूड घेणारा; दीर्घद्वेषी मनुष्य. [सं.]

**कर्कोटकी, कर्कोटी**—स्त्री. करटुली पहा.

**कर्कोंद**—पु. (रत्न) लसण्या; रत्नाचा एक प्रकार. हें एक उपरत्न आहे. [सं. कर्केतर=रत्नविशेष करकेतन पहा]

**कर्टांवणें**—क्रि. (गो.) नारळाचा कीस पाट्यावर घालून किंचित बारीक करणें. खरंगटणें. [ध्व.]

**कर्चूर**—पु. कचरा; कापुरकाचरी; कचोरा; एक सुगंधी व औषधि द्रव्य; हा रुच्य, उद्दीपक; कटु व गुल्मवात, कफ, कृमिनाशक आहे.-बृहन्निघंटु १२५. [सं.]

**कर्बा**—पु. हिऱ्याचा लहान तुकडा, कण; रज.-जमि (बडोदें) (परिभाषा).

**कर्ज**—न. ऋण; दुसऱ्यापासून उसनें घेतलेलें द्रव्य; खर्चासाठीं परत देण्याच्या बोलीनें काढलेली रक्कम; ठराविक व्याजानें दुसऱ्याकडून उसनवार घेतलेली रक्कम; कर्जाचे ऋणकोसंबंधीं पांच व धनकोसंबंधीं दोन असे सात प्रकार आहेत. [अर. कर्ज़्; सं. तुल० कर्ज्=पीडा देणें] **०लागणें**—क्रि. ऋणकरी होणें. 'हा माझें कर्ज लागतो.' **डोई-वरून पाणी जाई इतकें कर्ज असणें**—अतिशय कर्ज असणें; कर्जांत बुडून राहाणें. **०अमदान**—स्त्री. परत किंवा वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहींतील बाजू; कर्जफेडीसाठीं आलेली रक्कम जेथें जमा केली असते ती हिशेबाची बाजू; कर्जेदादन पहा. [अर. कर्ज़्+आमदनि] **०करी**—पु. १ ऋणकरी; ऋणको. २ धनको; कर्जाऊ रक्कम देणारा. ३ कर्जदारांना तगादा लावणारा नोकर, माणूस, शिपाई, अधिकारी. **०खत**—न. कर्ज घेतल्याबद्दल ऋणकोनें धनकोस लिहून यावयाचा कागद; कर्जरोखा; ऋणपत्र. **०दादन**—न. परतफेड म्हणून वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहींतील बाजू; कर्जफेडीसाठीं दिलेली रक्कम जेथें मांडली जाते ती जमाखर्चाची बाजू; कर्ज अमदान पहा. [फा. कर्ज़्+दादन] **०दार**—वि. १ कर्जेकरी; ऋणकरी; ऋणको. 'सबब नादारीस आलों आणि लोकांचे कर्जेदारी जाहलों.'—रा १३.९१. २ धनको. 'तर्फ मजकूरची रयत कर्जदार (ऋणको) जाली आहे त्यास कर्जदाराची (धनकोची) निकड होते आणि यावयासी अवसर नाहीं.'—वाडसमा २.२२५. [फा. कर्ज़्+दार] **०दारी**—स्त्री. ऋणकोपणा. **०पाणी**—न. कर्जवाम; कर्ज या शब्दास व्यापक संज्ञा. **०बंदी**—वि. ऋणको. 'खायावांचून बैल मेले, कर्जबंदी झाला'—पला ८६. [कर्ज+बंदी] **०बाजारी**—वि. ज्यास अनेकांचें कर्ज आहे असा; देणेदार; ज्यास फार कर्ज आहे असा (माणूस.) [अर. कर्ज़्+बाज़ार्] **०भरी**—रू—वि. कर्जबाजारी; देणेंदार. 'आपण कर्जेभरू होतात.'—बाळ २.१२९. [कर्ज+भरणें.] **०रोखा**—पु. कर्जखत पहा. (क्रि० लिहून देणें; घेणें) [फा.] **०वाम**—न. ऋण; देणें. 'साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होतें...पडले संकट प्रसंगीं कर्जवाम पाहिजे तें मिळतें.'—मराआ २०. [अर. कर्ज़्+फा. वाम्]

**कर्जाऊ**—वि. व्याजाच्या बोलीनें घेतलेलें किंवा दिलेलें (द्रव्य). [कर्ज] **कर्जी**—क्रिवि. व्याजू; व्याजानें; व्याजाच्या बोलीनें दिलेल्या किंवा घेतलेल्या संबंधानें. [कर्ज]

**कर्डा, कर्डि, कर्डी**—करडा पहा. 'गंगथडीहुन आली पुण्याला कर्डिफौज बांकी स्वारी.'=ऐपो ३२३.

**कर्डी**—करडई पहा.

**कर्डा काकडा**—वि. कडक; कडवा; कठोर. 'हम बडे कर्डे काकडे शिपाई है.'—रासक्रीडा १०. [कर्डा+काकडा]

**कर्ण**—वि. सब्जा (रंग). —अश्वप १.२७.

**कर्ण**—पु. १ कान; शब्दग्राहक इंद्रिय; ज्यानें आपणास ऐकावयास येतें तो अवयव. 'परि दूतांच्या मुखें हे वार्ता। सत्यभामेच्या कर्णीं तत्वता। प्रवेशली आद्यंत।'—ह २६.१०२. २ अंग देशचा राजा; हा फार उदार होता. 'रिपुगज पंचाननु। कर्णवीरु।'—ज्ञा १.१०५. ३ (वरील कर्ण उदार होता म्हणून त्यावरून लक्षणेनें), मोठा दाता; उदार पुरुष; (उप.) कृपण मनुष्यासहि म्हणतात. उदा० 'कर्णाचा अवतार.' ४ (भूमिती) भुजाच्या अंतापासून कोटीच्या मूळापर्यंतचें सूत्र; काटकोन त्रिकोणांत काटकोनासमोरील बाजू; काटकोन चौकोनाचे समोरील दोन कोण जोडणारी रेषा. ५ नावेचें सुकाणूं. 'त्या नावाड्यांनीं बाजीला शेकून जहाजाच्या कर्ण्यावर निजविलें.'—स्वप ३३०. [सं.] ०(कान.) **ओढणें, ओढविणें**—लक्ष्यपूर्वक कान देणें, किंवा यावयास लावणें. 'जो मायानियंता। तो वसिष्ठापुढें वोडवी कर्ण।' (वाप्र.) **कर्णे स्पृष्ट कटिं चालयति**—एक सांगितलें असतां एक करणारा; हुंब्या, टोणप्या मनुष्यास लावतात. **०कटु**—वि. १ कानाला त्रास आणणारें; कठोर; कर्कश. २ (ल.) अप्रिय (भाषण, शब्द, गाणें). [सं.] **०गत—घृष्ट**—वि. कानावर आलेलें; एकवार ऐकलेलें; कानावरून गेलेलें; उडत उडत ऐकलेलें (वाक्य वगैरे). [सं.] **०छेद**—पु. १ कान कापण्याची शिक्षा. (चोरांना दिलेली) २ कानाच्या पाळीस भोंक पाडणें; कर्णवेध. [सं.] **०जप**—पु. १ कानांत सांगितलेला मंत्र; उपदेश; उपनयनाच्या वेळीं गुरु शिष्यास सांगतो तो. 'गीत भाटींव तो श्रवणीं। कर्णजप।'—ज्ञा १७.२९७. २ कानांत गुप्त गोष्ट सांगणें. ३ कानाशीं केलेली पुटपुट; चहाडी; चुगली; चुगलखोरी; कर्णजप पहा. **०ताटंक**—न. तानिवडें; कर्णभूषण. 'भुलविल्या कृष्णवेधकें। पायीं घातलीं कर्णताटंकें।'—ह १९.६६. [सं.] **०ताळा**—पु. (कानाचें झडपणें) कानाची हालचाल. 'पाठीं निवृत्ति कर्णताळें।'—ज्ञा १७.७. **०धार**—पु. १ नावाडी; सुकाणू धरणारा; सुकाण्या. २ (ल.) पुढारी; नेता. 'कळों आलें बरे उघडले डोळे। कर्णधार मिळे तरी बरें।—तुमा ८८७. [सं.] **०नाद**—पु. कानांत एकसारखा होणारा आवाज. [सं.] **०पथ, पंथ**—पु. कानाचा मार्ग, ज्या मार्गानें कानांत ध्वनि शिरतो तो मार्ग. 'कथा गेली कर्णपथां.' [सं.] **०पाली**—स्त्री. कानाची पाळ. खालचें टोंक. [सं.] **०पिशाच**—पुन. १ मंत्रसाध्य एक पिशाच; हें उपासकास भूत, भविष्य, वर्तमान वृत्त सांगतें असा समज आहे. 'कर्णपिशाच भगलिनी। उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी।'—ह १३.६. 'मला तुझें सारें कृत्य कर्णपिशाच्चानें सांगितलें.' २ भविष्यकथन; भाग्यकथन. ३ गुप्त गोष्टी सांगणारा; [सं.] **०पिशाची**—पु. भविष्य सांगणारा; ज्योतिषी. **०पिशी**—स्त्री. कर्णपिशाच. **०पुट**—न. कानाचा बाहेरचा भाग; कान. 'या बोलाची

कांगुरटी। तिये प्रसिद्धी आलीं किरीटी। म्हणोनि तुझ्या हन कर्णपुटीं। वसों कां जे।' —ज्ञा १८.२८१. [सं.] ०पुष्प-फूल-भूषण—न. १ स्त्रियांच्या कानांतील एक दागिना; ईअररिंग. 'करीन संतांसी कर्णभूषणें।' —ज्ञा १४.१८. —देहु ५२ (नाको). २ घोड्याच्या कानांतील दागिना. —स्वप ५३. [सं.] ०पूर—एक दागिना—देहु ४६ (नाको). [सं.] ०मधुर—वि. मंजुळ; कानास गोड लागणारा; मनाला समाधान, आल्हाद देणारा; सुस्वर (ध्वनि, आवाज). [सं.] ०मात्रा—स्त्री. कर्णभूषण; कानांतील दागिना. 'हस्तमात्रा कर्णमात्रा। कृष्णासी वोपिल्या विचित्रा।' —एरुस्व १५.१४९. 'कर्णमात्रा यया देणें।'—गीता २.२४९६. ०मूळ—न. १ कानाचें मूळ; कान. 'जरा कर्णमुळीं सांगों आली गोष्टी.' —तुगा ३३४७. 'हलु हलु तनयेच्या कर्णमूळास गेली।' —सारुह २.११३. २ कानाच्या खालीं होणारें दुःख, रोग; कर्णवळ. ३ कानाच्या मागें भोंवरा असणें; घोड्याचें एक लक्षण. —अश्वप ९८. ०मैथुन—न. कानाशीं लागणें; चुगली, चहाडी, कानगोष्टी, कानमंत्र करणें. (वाईट अर्थानें योजितात). [सं.] ०रेषा—स्त्री. कर्ण अर्थ ४ पहा. —शिल्पवि ४०३. ०रोग—पु. कानास होणारे रोग. हे कर्णशूळ, कर्णनाद, बाधीर्य, कर्णक्ष्वेड, कर्णस्राव, कर्णकंडू इ० २८ आहेत. —योर २.८०. ०वेध—पु. लहान मुलाचा कान टोंचण्याचा (कानाच्या पाळीस भोंक पाडण्याचा) एक विधि. हा मुलाचें नांव ठेवण्याच्या दिवशीं करतात. [सं.] ०व्रण—पु. कानाच्या आंत पडलेलें ज्यांतून पू वगैरे वहात आहे असें क्षत. [सं.] ०शूळ—पु. कानामध्यें कांहीं विकृतीमुळें उत्पन्न होणारा ठणका. [सं.] ०श्रुत—वि. कानांनीं ऐकलेलें; ऐकींव. [सं.] ०संपुट—न. कानाच्या तीन भागांपैकीं एक भाग; पाळ व चाफा यांशिवाय जो खोलगट भाग असतो तो. [सं. कर्ण+संपुट]

**कर्णखोर**—वि. (ना.) कर न कऱ्या; कर म्हणून सांगितलेलें न करतां जें करूं नको म्हणून सांगितलें तें मुद्दाम करणारा. [कर+न+कर+खोर]

**कर्णम्, करणम्**—पु. (तंजा.) कुलकर्णी, लखदीव बेटांत करणी नांवाचे कारकून, शानभोग आहेत. [तामिळ-करणम्]

**कर्णा**—पु. एक वाद्य. करणा पहा. 'वाजंत्रें। वाजती, कर्णे बाजंत्रें वाजती'—दत्तपदें ५. ०करणें—क्रि. (क.) कर्णा वाजविणें. 'तो कर्णा करून आला.'

**कर्णाचा अवतार**—पु. १ मोठा दानशूर; उदार पुरुष. २ (उप.) कृपण मनुष्य.

**कर्णाचा पहारा**—पु. सूर्योदयापासून पहिल्या तीन तासांचा पहारा; पहिला पहारा; अति पवित्र वेळ; रामपहारा.

**कर्णांत**—क्रिवि. कानापर्यंत (लांबट डोळे, वगैरे). [सं. कर्ण+अंत]

**कर्णारूढ**—वि. कानावर आलेलें, गेलेलें; ऐकलेलें; ऐकींव शब्द, वाक्य इ०). [सं. कर्ण+आरूढ]

**कर्णार्श**—पु. कान फुटणें; कान वाहणें; कानाचा एक रोग. [सं. कर्ण+अर्श]

**कर्णावतंस**—पु. कानांतील अलंकार; कर्णभूषण. [सं. कर्ण+अवतंस]

**कर्णावळ-ळी**—स्त्री. एक फूल झाड. [सं. कर्ण+आवलि]

**कर्णिक**—करणिक पहा.

**कर्णिका**—स्त्री. १ कमळ वगैरे पुष्पांचा कोश. 'येरी म्हणती योगद्रुमा। श्रेष्ठ कर्णिका राजउगमा।' —नव २२.७१. २ हाताचें मधलें बोट. ३ कमळाची कळी. 'यंत्र उभवणि उपासकां। त्याची आंगोळियां मुद्रिका। त्रिकोण षट्कोण कर्णिका। जडित माणिका आगमोक्त।' —एरुस्व १.५१. ४ कर्णभूषण (तानवडें, ताटंक इ०). —देहु ४६. (नाको). ५ कमळाची पाकळी. 'माझें हृदय दिव्य कमळ। जें तेजोमय परम निर्मळ। अष्टकर्णिका अति कोमळ। मध्यें घननीळ विराजे।' —ह ३५.१. [सं.]

**कर्णी**—स्त्री. गवंड्याची थापी. करणी पहा.

**कर्णेकरी**—वि. कर्णा वाजविणारा.

**कर्णेजप**—वि. चहाडखोर; प्रच्छन्न निंदक. कर्णजप पहा. [सं. कर्णे सप्तमी+जप]

**कर्णोपकर्णी**—क्रिवि. या कानापासून त्या कानीं; एकानें दुसऱ्याला, त्यानें तिसऱ्याला, त्यानें चौथ्याला अशा रीतीनें; उडत उडत (ऐकलेली गोष्टी, हकीकत). 'सर्व बातम्या कर्णोपकर्णी आल्या तशा दिल्या.' —के १७.५.३०. [कर्ण+उपकर्ण; सं. कर्णाकर्णि]

**कर्तक**—वि. १ कापणारा; छेदणारा. २ कपडे बेतणारा (शिंपी). 'कर्तकानें काळजीपूर्वक कर्तकाचें काम केलें पाहिजे' —काप्र. [सं. कृत्]

**कर्तन**—न. १ छेदन; कापणें; कातरणें; कातरकाम. २ (विणकाम) सूत कातणें; सूत काढणें. ३ (शिंपी) कापडाचें कातरकाम; बेतकाम. (इं.) कटिंग [सं. कृत्] **कर्तनीय**—वि. कापण्यास, कातरण्यास, छाटण्यास योग्य. [सं.]

**कर्तब**—न. १ चातुर्य; कसब; कर्तृत्व; शिताफी, २ (हिं.) गायनांतील कौशल्य, आलाप, ताना वगैरे. [सं. कर्तव्य] ०गारी-दारी—स्त्री. १ कर्तृत्व; कौशल्य; करामत; हुशारी. २ गानकौशल्य. [हिं. कर्तब+फा. गार]

**कर्तरि**—वि. (व्या.) कर्तृ शब्दाची सप्तमी; कर्त्याला अनुसरून तें; याच्या उलट कर्मणि. धातूंना व शब्दांना लागून ज्यांच्यायोगें अनेक प्रकारचीं धातुसाधितें होतात असे प्रत्ययाचे प्रकार. [सं. कर्तृ] ०प्रयोग—पु. (व्या.) कर्त्यावरून क्रियापद फिरतें म्हणजे

४ ( सामान्यतः ) किचर, किचरट पहा. ५ भानगडीचें. 'श्री सिद्धारूढस्वामींच्या मिळकती संबंधानें असला किचरट वाद उपस्थित झाल्याचें प्रसिद्धच आहे.' -सासं २.४१०. [ सं. कृच्छ्र ]

**किचकाट**—न. ( कु. ) गर्दी; गचडी.

**किचकाड-डा, किचकाट-कडा**—वि. किचकट पहा ( प्राणी किंवा वस्तु ).

**किचकिच**—स्त्री. चिकटण; चिकटाई; चिकचिकाट. [ ध्व. चिकचिक वर्णव्यत्यास ]

**किचकिच-चां**-क्रिवि. ( ध्वनि ) रेवाळ वगैरे पदार्थ दांतां खालीं सांपडले असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें. ( क्रि० लागणें. )

**किचकिचणें**—अक्रि. १ वानरानें दांत चावून शब्द करणें. २ शब्द काढणें ( पिंगळ्यानें ). [ किचकिच ]

**किचकिचावणें**—क्रि. ( गो. ) हिणावणें; टाकून बोलणें. ( कु. ) दांत चावणें. 'दांत ओठ किचकिचावत हत.' [ ध्व. ]

**किचकिचीत**—वि. किचकिच आवाज करणारा ( कच्चा भात, रेवाळ वस्तु ).

**किचड**—नपु. चिखल; रेंदा; राड; गारा. [ बं. हिं. कीचड+र ]

**किचबिड-डीत**—वि. किजबिड-डीत पहा.

**किचम**—स्त्री. ( गो. ) खाज; कंडू. [ का. किच्च=आग ]

**किचमणी**—स्त्री. ( गो. ) कटकट; घासाघीस; दिरंगाई; किचकटपणा; चेंगटपणा.

**किचमणें**—वि. ( गो. ) त्रास देणारें; कुचंबणा करणारें. —न. त्रास. [ प्रा. कुचुंबन ]

**किचमिड**—किजबिड पहा.

**किचमुचें**—अक्रि. ( गो. ) खाजविणें.

**किचर, किचरट**—वि. वाईट; त्रासदायक; पीडा देणारें; छळणारें; त्रासदायक गोष्टींनीं परिपूर्ण ( काम, धंदा, न वाचतां येणारें अक्षर, दूरान्वयाचा व घोंटाळ्याचा श्लोक, फार महत्त्वाची नाहीं परंतु घोंटाळ्याची व त्रासदायक गोष्ट, काम ).

**किचवटणें-वंदणें-विंदणें**—उक्रि. अस्ताव्यस्त फेंकणें; विसकटणें; नासणें; टोचून, ओरखडून, चोळवटून कालवणें; चोळवटणें; चिवडणें. [ ध्व. ]

**किंचळणें**—अक्रि. किंकाळी फोडणें; आरोळी मारणें; चूं चूं, चिव चिव, कुई कुई करणें [ ध्व. ]

**किचाट-टी-चाट्या, किचाड**—पु. १ कचाट. २ गलबला. 'रांड पोर किचाड करते।' -ऐपो ३२. [ सं. कृत्या; का. किचाट ]

**किचाटी**—स्त्री. गर्दी; दाटी. [ सं. कृच्छ्र; का. किच्चाट ]

**किंचित्**—क्रिवि. ईषत्; कांहींसें; थोडें; अल्प. [ सं. ]

**किंचितदान**—न. चातुर्मासांत रोज आठ मुठी तांदूळ व एक पैसा ब्राह्मणास दान करतात तें. [ सं. किंचित्+दान ]

**किंचितज्ञ**—वि. ( प्र. किंचिज्ज्ञ ) अल्पज्ञानी; तुटपुंज्या ज्ञानाचा. 'परमात्मा तो सर्वज्ञ। जीवात्मा तो किंचिज्ज्ञ।' [ सं. किंचित्+ज्ञ ]

**किंचितज्ञान**—न. ( प्र. किंचिज्ज्ञान ) १ तुरळक माहिती; तुटपुंजें ज्ञान; अल्प ज्ञान. २ अल्प समजूत; कोती बुद्धि. [ सं. किंचित+ज्ञान ]

**किचीबिची**—स्त्री. बगळ्याच्या ( पिंगळ्याच्या ) चार आवाजांपैकी एक, कीं २ पहा. [ ध्व ]

**किचीर**—वि. किचर; त्रासदायक. [ का. किच्च ]

**किच्च**—पु. ( बे. ) १ त्रास. २ आग; शेकोटी. [ का. किच्च ]

**किच्चं, किचतं**—क्रिवि. ( क. कुण. ) किती? कितीसें? 'किच्चं खाणार?' 'किचतं बघायचं?' [ सं. कियत् ]

**किजबिज**—स्त्री. ( ध्वनि ) किलबिल; चिवचिव; किलकिलाट ( पोपट, चिमणी, मैना, पिंगळा वगैरे पक्ष्यांचा ); त्यावरून किलबिलाट किलकिलाट. [ ध्व. ]

**किजबिजणें**—अक्रि. किलबिलणें; चिवचिवणें ( पक्षी )

**किजबिड-डीत**—वि. १ खरडलेलें; गिचमिडीत; न समजेसें लिहिलेलें ( अक्षर, लेख ). २ ओबडधोबड; बोजड; विशोभित; वेडेंवांकडें ( कोरींव काम )

**किंजल्क**—पु. फुलांतील केसर किंवा तंतु. [ सं. ]

**किंजळ**—पु. एक मोठा वृक्ष; किंदळ. याचीं पानें लांब, असून लांकूड इमारतकाम व शेतीच्या औतांस उपयोगी असतें. 'ते पाईरहि खैर किंजळ तिथें आईनही वाढती।' -केक १२९. —स्त्री. साळींतील एक भेद.

**किजिलादोर**—वि. ( गो. ) भांडखोर.

**किजील-किजित्यांसांव**—( गो. ) भांडण. [ पो. क्रिसिल्ह ]

**किंजुरा**—पु. ( कों. ) एक झाड. ( लॅ. ) पॅंटाप्टेरा पॅनिक्युलाका.

**किट**—न. ( गो. ) नुकत्याच व्यालेल्या जनावराचें पहिल्या चार दिवसांतील दूध; चीक.

**किटकिट**—स्त्री. किरकिर; कुरकुर; भुणभुण. ( क्रि० करणें ) 'खुशाल तासचे तास किटकिट लावीत बसावं!' फाटक-नाट्यछटा १. [ ध्वनि; सं. किट्-त्रासे; किट द्वि. ]

**किटकिट-टो**—पु. ( गो. ) जोराचा हंशा. [ ध्व. ]

**किटकिटप**—क्रि. ( गो. ) खिदळणें. [ ध्व. ]

**किटकिटांवचे**—क्रि. ( गो. ) आदल्या दिवशीं शिजविलेले पोहे न बिघडावे म्हणून फिरून शिजविणें. [ ध्व. ]

**किटकिट्या**—वि. किटकिट करणारा.

**किटकूल-र**—पुन. ( व. ) लहानसा किडा.

**किटण**—न. १ थर रूपानें जमलेला मळ, घाण ( कुजलेलें शेण, गवत, काटक्या इ० ); जुन्या लोखंडावर गंज चढून राहिलेला

अवशिष्ट भाग; लोखंड गाळतांना अगर नंतर त्याला चढणारी जळ; सामान्यतः धातूवरील कलंक, मळ, गंज; तेलाची चिकटी; भांड्याला लागून राहिलेला जळका अन्नांश; दांतावर जमलेला मळ. २ वीट, कौल इ० जास्त भाजल्यामुळें त्यावर येणारे दग-डासारखे काळे गोळे; खंगर. ३ तापलेलें लोखड घणानें ठोकीत असतां उडणारे जळके कण; ठिणग्या. [का. किट्ट; सं. कृष्ण–किट्ट]

**किटणें**—अक्रि. १ मळानें खराब बनणें. २ गंज चढणें (धातू वगैरेवर). 'फार दिवस किटलेलीं जुनीं पानीं हत्यारें' –फाटक-नाट्यछटा ७. ३ त्रासणें; विटणें; नकोसें होणें. विशेषतः कान, हात क्वचित दांत यासंबंधें उपयोग उदा० 'मागतां मागतां माझे दांत किटले.' 'त्याचें गाणें ऐकून माझे कान किटले.'

**किटना**—पु. (जुन्नरी) वाघुर लावण्यासाठीं खुंट टोकण्याचा मोठा लांकडी हातोडा; मोगर.

**किटली**—स्त्री. चहादाणी. [इं. केटल]

**किटळ**—न. (कों.) किटाळ.

**किटा**—पु. फोडलेलीं जळाऊ लांकडें.

**किटाड–ण**—न. किटण पहा. **किटाणाची जमीन**–स्त्री. दलदलीची, पाणथळ जमीन. –भू ६७.

**किटांबर**—पु. (गो.) बुलबुल पक्षी.

**किटाळ, किटळ**—न. १ विस्तवाची ठिणगी; फुणगी (गवत, काटक्या जळत असतां अथवा परशांतून उडणारी). 'मधून मधून विस्तवाच्या ठिणग्या व किटाळें निघत.' –पाव्ह ५७. २ आळ; दोषारोप; संकट; अरिष्ट; हिणकसपणा. 'मामिसें अकल्पित घेतो किटाळी। चेंडू नाहीं मजजवळी।' –ह ८.१४७. 'ह्यानें हें आमच्यावर उगाच किटाळ आणलें आहे.' –स्वप १४८. [का. किडि=ठिणगी]

**किटूर–किटुरुं**—न. (गो.) लहान पांखरूं, पक्षी.

**किटेला कोमेला**—वि. मळकटलेला; कोमेजलेला; मळिन व निस्तेज; मलूल व अवठरलेला (म्हातारीं माणसें, जुनाट झाडें, फळें यांना म्हणतात). [किटणें+कोमणें]

**किट्ट**—न. मळ; किटण; कीट; घाण; बुरशी; गंज. [सं.]

**किट्टव**—न. (गो.) लहान चिमणी.

**किट्टांव**—स्त्री. (गो.) मोठी गोचीड.

**किट्टी**—स्त्री. (गो.) तांब; गंज.

**किड्डी**—स्त्री. जनावरांवर पडणारी तांबडी लहान गोचीड.

**किट्टली**—स्त्री. (बे.) ठिणगी. [किटळ]

**किडकलें**—न. किड्क. [कीटक]

**किडका–किडखाद**—वि. कीड लागलेलें; किड्यानें खाल्लेलें (फळ पान); 'उत्तम भूमि शोधिली शुद्ध। तेथें बीज पेरिलें किडखाद।' –दा ५.३.३. [सं. कीटक+खाद्]

**किडकालें, किडलूं**—न. १ किडा; कृमि; कीटक. २ लहान सरपटणारा प्राणी, साप इ०; किरडूं. [सं. कीटक]

**किडकिडणें**—अक्रि. खिळखिळें होणें; 'अस्थियंत्र किडकिडी।' –भाए २०४. [ध्व.]

**किडकिडीत**—वि. सडपातळ; रोड; किरकोळ; काटकुळा; कृश.

**किडकूल, किडकें**—न. सर्पाचें बारीक पिल्लूं; किरडूं. [सं. कीटक]

**किडकोळ**—वि. १ किड्यांनीं खाण्यासारखा (लांकूड, फळ). २ किड्यांनीं खाल्लेला. ३ (ल.) खरजुला. [सं. कीटक]

**किडणें, किडेणें**—अक्रि. कीड लागणें; किडखाद होणें; किड्यानें खाणें. [किडा; तुल. का. केड]

**किडविडीत–किडबिड**—वि. किजबिड–बिडीत पहा.

**किडमाकडा**—वि. चिक्कू; कद्रू. –क्रिवि. चिक्कूपणानें; कंजूषपणानें.

**किडमिडा**—वि. अस्पष्ट; संदिग्ध (भाषण).

**किडमिडें**—न. पिंगळाच्या (कुडबुडया जोशी) हातांतील व माकडाचा खेळ करणाऱ्याच्या हातांतील कुडबुड वाजणारें एक वाद्य; किडमुडें [ध्व.]

**किडयाळें**—वि. (गो.) वांकडेंतिकडें; किचबीड.

**किडरूं–रू**—न. साप. 'देखा एकी कुसीमाजी किडरूं। सामावीलि कीं।' –दाव १०४. [किडा]

**किंडला**—क्रिवि. (राजा. कुण.) कशाला?

**किडवल–ळ**—स्त्री. (कों.) इसब; गजकर्ण. [कीट+आवली]

**किडवळ**—वि. किडलेलें. [किडा]

**किडवळणें**—अक्रि. १ (कों.) किड्यानें खाणें; किडकें होणें (फळ वगैरे). २ शिजण्यांत बिघडणें; कमजास्त शिजणें (भात वगैरे). [किडा]

**किडा**—पु. एक क्षुद्र जंतु; क्षुल्लक, बारीक प्राणी, जीव. किड्यांत अनेक जाती आहेत. [सं. कीट; प्रा. कीडओ, अप. कीडउ; हिं. पं.बं. कीडा] ०**मुंगी खाणें**–कांहीं तरी खाणें; किरकोळ खाद्य; कोरडें खाणें (पोहे, लाडू वगैरे). **किडे पडणें**–कुजून कृमि पडणें; नासणें; अपवित्र होणें; भ्रष्ट होणें; 'गुरुसेवा ज्यासी नावडे। त्याच्या ज्ञानासी पडले किडे।' ०**मार**–पु. एक वनस्पति. **किड्यांचा पुंजा**–पु. (किड्यांनीं खाल्लेला भुशाचा ढीग यावरून) रोगग्रस्त माणूस; किड्यांनीं खाल्लेलें धान्य, कापड वगैरे.

**किडामाकोडा**—पु. क्षुद्र जीवजंतु; किडे आळ्या वगैरे. [किडा+माकोडा=मुंगळा]

**किडाल-ळ**—न. १ (विरू) किटाळ. आगीच्या ठिणग्या किटाळ अर्थ १ पहा. २ कुभांड; अरिष्ट; अपवाद; दुर्लौकिक; किटाळ अर्थ २ पहा. 'इयें संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाल बहुतीं परी । दिसतसे ।' –ज्ञा १.२३३. 'मजवरी रचिती किडाळ । नाना शब्दजाळ तर्काचे ।' –एरुस्व १६.१२९. ३ लोखंडाचें कीट किंवा हिणकस लोखंड. कीं अग्निमुखें किडाळ तोडोनियां चोखाळ ।' –ज्ञा २.१२८. 'जैसें परिसें नासे किडाळ । मग तें कर्णी मिरवे कुंडळ ।' –कथा ४.१३.१०२. –वि. १ डाकलग; हिणकस: वाईट; निंद्य. २ खोटें. [ सं. कीट–किडाळ ( आळ प्रत्यय ) –भाअ १८३४.; का. किडु=वाईट गोष्ट ]

**किडीं**—स्त्री. प्रेताची तिरडी.

**किडुकमिडुक**—न. बारीकसारीक दागिने, वस्तू; मोडतोड; चाराचुरा; किरकोळ जिनसा; दागिन्यांचे सुटे भाग. [कुडुक द्वि.]

**किडूक**—न. १ ल्हानसा किडा, प्राणी. २ लहान मुलांचा डूल; एक दागिना [ सं. कीटक ]

**किडें**—न. ( कों. ) जिवाणूं; एक ल्हानसा साप. [ किडा ]

**किडेमारी-रू-ऱ्या**—वि. चिक्कू; कद्रू; कंजूष (माणूस). [ किडा+मारणें ]

**किडेला**—वि. किडका; किडलला. ' किडेल्या खांबाचा तरु करुनि तोही फुलविला ।' –दत्तपदें ध्यानाष्टक पृ. १.

**किण-णें**—पुनस्त्री. घट्टा; घट्टे पडलेली चामडी; घर्षणानें शरीराच्या चामडीवर पडलेला वण. ' नमस्कार करितां ते अवसरीं । किण पडली चरणीं तेणें ।' –रावि ७.१०७. ' मुगुटघर्षणें करूनीं । किणें पडलीं दिसतीं चरणीं ।' [ सं. किण ]

**किणकिणी**—स्त्री. १ कारंजाचा तुषारः पाण्याचा कण; फवारा. २ ( कों. )(विरू.) कणकणी. तापाची शिरशिरी; कणकण; हुडहुडी; कांटा.

**किणा**—पु. १ घट्टा. किण पहा. २ क्षत; व्रण. –वि. किडे पडलेलें; क्षत पडलेलें.

**किणा**—स्त्री. एक झाड.

**किणॉ**—वि. ( गो. ) बारीक आवाजाचा ( मनुष्य ).

**किणी, किणें-ण्हे**—वि. घट्टे पडलेलें. 'सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें ' –केका १६. ' दावी रडोनि झाले जे गंध लगाळितां स्वहात किणी ।' –मोविराट १.१०६.

**किणेयचें**—अक्रि. ( गो. ) मार बसलेल्या जागचें रक्त एकवटून ती जागा निळसर दिसणें; रक्त साखळणें; घट्टा पडणें.

**किण्ण**—क्रिवि. १ किणकिण आवाजाचें. २ रातकिडयांच्या किण्ण आवाजाप्रमाणें. ' रात्र किण्ण करती ।'

**किण्व**—स्त्री. कुजण्याची क्रिया करणारी एक वनस्पति. ( इं. ) यीस्ट.

**कित**—पु. १ संशय; विपरीत भावना; किंतु; शंका; 'नाना कित निवारिले । नाना संशयो छेदिले ।' –दा १.१.१२. 'येथें न मानावा कित । हा मृत्यलोक विख्यात ।' –दा ३.९.४२. २ कंटाळा –शर. [ सं. किंतु. ]

**कितका**—वि. केवढा.

**कितकावा**—वि. कितव्या संख्येचा; कोणत्या क्रमांकाचा; कितव्या पायरीचा. 'हा मुलगा शाळेंत कितकावा आहे.' [कितवा-याचें क्रमवाचक ]

**कितकितलॉ**—पु. ( गो. ) हंसा. [ ध्व. ]

**कितन**—न. ( शाप. ) इं. केटोन; ॲसिटोन–सॅपू २. केटॉनिक अलकोहल. ०**नाम्ल**–न. केटॉनिक ॲसिड.

**कितपत**—क्रिवि. कितीसें; कोणत्या प्रमाणानें परिमित; कोठपर्यंत. [ सं. कियत्+परिमित ]

**कितला-लो-लें**—वि. ( खा. गो. ) केवढा; किती.

**कितव**—पु. १ जुगार खेळणारा; जुगारी; जुवेबाज. 'स्वाश्रयसह नरकांतचि बुडतो स्त्री–बंधुवर्ग कितवाचा ।' –मोकर्ण ४२. ४१. २ (नाटय) नायिकेशीं विश्वासु नसून दुसऱ्याच स्त्रीवर अनुरक्त असणारा नायक. ३ ठक; धूर्त माणूस. –वि. लुच्चा; कपटी; धूर्त.

**कितवा**—वि. कोणत्या क्रमाचा. कितकावा पहा.

**कितां**—क्रिवि. ( राजा. कुण ) काय ?

**कितान-तन**—न. एक प्रकारचें तागाचें, सणाचें कापड. कतान–कंतान पहा. [ अर. कतान, कत्तान ]

**किताब**—पु. पदवी; सन्मानदर्शक संज्ञा. –०**वाला**–पु. पदवीधर. 'युनिवर्सीटीचें किताबवाले तिच्या भजकांत किती सांपडतील ? ' –नि ३. [ अर. किताब् ]

**किताब**—पुस्त्री. पुस्तक; लेख. [अर. किताब्] ०**खाना**–पु. पुस्तकालय; ग्रंथालय.

**किताबत-ती**—स्त्री. १ गोष्ट; बखर. ' राजेरजवाडयांचा किताबती । दामाजीपंताच्या बखरा वाचिती ।' –अफला ९. २ पदवी. ' त्यांस हंबीरराव नांव –किताबती देऊन... ' –सभा ६२. ३ हे किताबत=पत्रव्यवहाराच्या शेवटीं लिहावयाची 'हे विनंति. ' ०रेघ–स्त्री. (कारकुनी भाषा) बंदाच्या साऱ्या जिल्हावर जी रेघ काढतात ती; यापासुन किताबती–लिहिणें–प्रकार–रीति इ० =जिल्ह्याच्या सर्व रुंदीवर लिहून मग दुसरीकडे वळणें; रेघ पहा.

**किति-ती, कितिएक, कितियेक, किती, कितीक, कितेक, कित्येक**—वि. कोणत्या संख्येनें किंवा प्रमाणानें परिमित; कितीसें; कांहीं; केवढें; थोडेंसें; थोडें. 'मत्सारिखीं हे कितियेक वेडीं ।' -साहृ १.१३. [सं. कियत; प्रा. कित्तिय] (बाप्र.)

**किती केलेंतरी**-१ कांहींहि केलें तरी. २ खरें पाहतां. 'किती केलं तरी तो पडला आडमुठ्या !

**किती तरी**—वि. पुष्कळ; अनेक.

**किती(तीं)दा**—क्रिवि. किती वेळां; पुष्कळ वेळां; अनेकदां.

**कितीशीक-सक-साक**—क्रिवि. (कुण.) किती वेळां, अजमासें किती ? कितीसा (प्रश्नार्थक व नकारात्मक रचना).

**किंतु-तू**—पु. शंका; संशय; अंदेशा; डळमळीतपणा; कांक्षा. किंत पहा. (क्रि० येणें). [सं.]

**कितुकें**—वि. किती. 'पुढें दुःख कितुकें कळेना।' -अफला १. [सं. कियत्]

**कितुला**—वि. केवढा ? किती ? 'गंधर्वांचा कितुला केवा।' -मुविराट ४.१७. [सं. कियत्]

**कितें**—क्रिवि. (गो.) काय ? 'कितें आसां थें' =तिथें काय आहे. ०**तर**-क्रिवि. कांहीं तरी. 'कितें तरी सांगातलो' =कांहीं तरी सांगत आहे.

**कितेब**—किताबत पहा. 'हिशेबकितेब.' -रा १५.२५४.

**कितोक**—क्रिवि. (व.) मनांत किंतु आणून; संताप करून.

**कित्ता**—पु. १ आदर्शभूत म्हणून पुढें ठेवावयाचा, वळणदार अक्षरें काढलेला कागद; वळण. २ हा शब्द एकाच सदराखालीं मोडणाऱ्या निरनिराळया बाबींच्या पुढें लावतात. त्यावरून या बाबी एकाच सदरांत येणाऱ्या आहेत असें समजावयाचें. ज्यांची खातीं किंवा ठोकळ नामनिर्देश एके ठिकाणीं केला असून बाकीचा विशेष तपशील किंवा माहिती दुसरीकडे लिहिलेली असते अशा-बाबी किंवा गोष्टी. ३ बाब; रक्कम; कलम; खातें. ४ (ल.) नमुना; ज्याचें अनुकरण करावयाचें असा मनुष्य, आचरण, तऱ्हा. (क्रि० घेणें; उचलणें; गिरविणें). 'कर वळविला अर्जे जें विष्णु-धृत स्त्रीस्वरूप किता तें' -मोआदि ३३.१६. ५ चिट्ठी -क्रिवि. सदरहू; उपर्युक्त; (इं.) डिटो. [अर. कित्आ] (वाप्र.) ०**घालून देणें**-अमुक गोष्ट अमुक एका विशिष्ट प्रकारें करावी म्हणून लेखद्वारा किंवा स्वाचरणद्वारा सांगणें, पुढें मांडणें. ०**वळवणें-गिरवणें**-नक्कल करणें; गिरविणें. 'कर वळविला अर्जे जे विष्णुधृतस्त्रीस्वरूप कित्ता तें।' -मोआदि ३३.१६. **कित्त्यावर घालणें**-लिहिण्यास शिकविणें. 'आपल्या इकडे मुलाला कित्त्यावर घालतात.' -ग्गारिबालडी केळकरकृत. सामाशब्द- ०**इसम**-पु. १ उपर्युक्त मनुष्य. २ (हिशेबांत) स्वतंत्र; किरकोळ स्वरूपाची बाब; कोणत्याहि सदरांत न येणारी बाब. ०**खर्च**-पु. १ किरकोळ, बिनतपशिली खर्च. २ हा खर्च भागविण्यासाठीं बसविलेला कर. ३ उपर्युक्त खर्च. ०**बाब**-स्त्री. अनियमित बाबी; कांहीं विशेष कारण नसतां बसविलेला कर. ०**वांटणी**-स्त्री. १ किरकोळ खर्चासाठीं बसविलेला कर; निरनिराळया प्रकारची तूट भरून काढण्याकरितां बसविलेला कर. २ हिशेबांतून काढून टाकलेली सरकारी वसुलांतील एक बाब (वांटणीची टक्केवारी कमी करण्या-साठीं).

**कित्ता**—पु. लहानसा मळा.

**कित्ती-त्तेक**—किती-कितेक पहा.

**कित्याक**—क्रिवि. (कु. कुण.) कां ? कशाला ? 'कित्याक हांव यों' =मी कशाला येऊं ?'

**कित्यावा**—वि. कितीकावा, कितवा.

**कित्येक**—वि. कितीएक; कांहीं; थोडे. 'कित्येक दिवस लोटतां देखा। घरां आला वैष्णव तुका।'

**कित्लो**—वि. (गो.) किती ?

**किद्रसाळ**—स्त्री. (बे.) भाताची एक जात.

**किद्री रेघ**—स्त्री. (कारकुनी भाषा) बंदाचे (अर्धा कागद) घडया घातल्यामुळें जे चार भाग होतात त्यापैकीं पहिल्या घराच्या मध्यापासून काढलेली रेघ. रेघ पहा.

**किद्वाळा**—क्रिवि. (कु.) केव्हां ? कोणत्या वेळीं ? [सं. कियत्+वेला]

**किदी**—क्रिवि. (भि.) कधीं. 'आय किदीहि मोडो वेहें।' -भि ३५. [सं. कदा]

**किर्दे**—वि. (गो.) कांहीं. [सं. कियत्]

**किनई, किनी**—क्रिवि. (बायकी) कीं नाहीं; किमानपक्षीं; निदान तरी; कमींत कमी. 'मनुष्यानें किनई कांहीं तरी धीर धरला पाहिजे हो !' -रजपूत कुमारी तारा पृ. ४६९. [सं. किम्+न+हि]

**किनखाप-ब, किन्खाब**—पु. सोनेरी, रुपेरी जरीच्या वेलबुट्टीचें काम केलेलें रेशमी कापड. 'अंगीं किनखाप घातले।' -ऐपो ३२. [फा. कमख्वाब, कमखाब, किम्ख़ाब] **किन-खापी**-वि. किनखाबाचें. 'आंगडें टोपडें किनखाबी त्याला' -पाळणेसंग्रह पृ. ९.

**किनन**—न. (शाप) (इं.) किनोन. मंगलद्विप्राणिद आणि पातळ गंधकाम्ल यांच्या योगानें गंधिलद्विभमिनाचें प्राणिदी-करण होऊन किनन तयार होतें. -ज्ञाको अ ३४१.

**किनरा**—वि. १ बारीक व उंच (आवाज). २ नाकांतील आवाजाचें (बोलणें). [सं. किन्नर]

**किनरी**—स्त्री. १ गाण्यामधील टीपेचा सूर. २ एक तंतु-वाद्य. [सं. किन्नर]

**किनरो**—वि. (गो.) नाकांत बोलणारा.

**किनला, केडला**—क्रिवि. (चि.) कशाला ?

**किनवट**—स्त्री. (गो.) कमरेस होणारा एक रोग. कनवट पहा [सं. कटि]

**किमळ**—स्त्री. ( कु. ) एक झाड; किंजळ पहा.

**किना-में-न्हें**—पुन. घट्टा; वण पडलेलें कातडें; वण; किवण, किवन. किण पहा. (क्रि० पडणें.) –वि. बधिर; स्पर्शज्ञान-रहित; किडे पडलेलें; ज्याला क्षत पडलें आहे असा; किवन्या पहा. [ सं. किण ]

**किनार-री**—स्त्री. १ कांठ; कोर; पट्टी; बारीक कांठ (रंगीत किंवा साधा, रेशमी वगैरे वस्त्राचा. ) २ ( विणकाम ) रेशीम उकलून तनसळीवर तनतात व गुंडाळून काढतात त्यास किनार किंवा वधी म्हणतात. [ फा. किनार् ]

**किनारा**—पु. तीर; कांठ, बाजू; गोट ( समुद्र, नदी, शेत पर्वत इ० चा ). [ फा. ]

**किनो लाख**—स्त्री. लाखेचा एक प्रकार.

**किन्नर**—पु. स्वर्गांतील गायक जात; एक उपदेव; एक देव-योनि; यांचें तोंड घोड्यासारखें असतें अशी समजूत आहे. 'येर सुर सिद्ध किन्नर।' –ज्ञा ११.५०६. [ सं. ]

**किन्नर**—पु. ( मोटर ) मोटर गाडी साफसूफ करणारा; क्लीनर अप. [ इं. क्लीनर ]

**किन्नरी**—स्त्री. १ किन्नर उपदेवाची स्त्री. २ एक वाद्य. किनरी पहा. [ सं. ]

**किन्निमित्त**—क्रिवि. किमर्थ? कोणत्या कारणास्तव? कशा-साठीं? [ सं. किम्+निमित्त ]

**किन्ही**—स्त्री. जोंधळ्यावर पडणारा एक रोग. काणी पहा.

**किन्हेरा**—वि. १ उंच टीपेचा ( आवाज, सुर, आलाप ). २ नाकांतील; अनुनासिकयुक्त ( भाषण. ) किनरा पहा.

**किपाशा**—पु. एक वनस्पति.

**किपळा-ळी**—पुस्त्री. ( कों. ) कपचा; ढलपी; टवका; कपटी; ( दगड वगैरेची ) उडालेली चीप.

**किंपुरुष**—पु. देवांतील एक गायक वर्ग. 'मुखा भासे दिसती पुरुष। शरीर पाहातां श्वापद वेष। ऐसे जे वानर राम-दास। त्यांसि किंपुरुष बोलिजे।' –एभा १४.५०. २ ( उपहा-सानें ) हलका; कवडीमोल; क्षुद्र मनुष्य. [ सं. किम्+पुरुष ]

**किफाइती-किफाईतवार-किफायतशीर-किफा-यती**—वि. नफ्याचा; फायदेशीर; किफायतकारक, लाभदायक. [ अर. किफायत् ]

**किफाइत-यत**—स्त्री. नफा; फायदा; लाभ. 'त्यापासून त्यास मोठी किफायत झाली. –नि ६१४. [ अर. किफायत् ] ०सर्फा-पु. फायदा. ०सर्फेवार-वि. फायदेशीर. –वाडमा १.४९.

**किबरूं-रें-किमरूं-रें**—नपु. ( कों. ) घुंगुरटें; मच्छर. कांहींच्या मताप्रमाणें किबरें, किमरें हें अनेकवचन आहे.

**किंबहुना**—अ. इतकेंच नव्हे; फार तर काय पण; फार काय सांगावें; फार कशाला; थोडक्यांत सांगावयाचें तर; 'किंब-हुना भगदत्तें अत्युग्रा शक्ति सोडिली होती।' –मोभीष्म ९.५१. प्रकारांतील एक संस्कृत म्हण० ही विशेष गोष्टींत अथवा विशेष अंशानें ज्या एखाद्या गुणाच्या अस्तित्वाचा बोलणारानें उल्लेख करावयास आरंभ केला आहे त्या गुणाच्या अतिशयत्वाचें विस्तृत वर्णन करण्याची अनवश्यकता दाखविते. तसेंच एखाद्या गोष्टीची वास्तविक सत्यता, संभाव्यता इ० दर्शविण्यासाठीं बोल-लेल्या शब्दापेक्षां ती इतकी अधिक असते कीं, त्यासाठीं अति-शय कडक, निश्चयात्मक, व्यापक शब्दांचा उपयोग करणें आवश्यक असतें किंवा केला तर अतिशयोक्ति केल्याचा दोष येईल अशी भीति नसते अशा वेळीं हा उपयोगांत आणतात. 'हा आईस भीत नाहीं, बापास भीत नाही किंबहुना देवास भीत नाही.' 'त्या लेखकाला लेखणी दिसत नाहीं, कागद दिसत नाहीं किंब-हुना सूर्य दिसत नाहीं.' [सं. किं=काय+बहुना=(बहु ची तृतीया) पुष्कळानें; येथें अधिकाची काय जरुरी आहे?']

**किबीन**—स्त्री. (नाविक) गलबताचा सुकाणूकडील (मागील) भाग; हा कांहींसा कमानीसारखा गोल असून बाकीचा भिंती-सारखा उभा असतो. [ इं. केबिन ]

**किबीर**—स्त्री. ( व. ) फिकीर; पर्वा. 'अलीकडे मजुराला अन्नाची किबीर वाटत नाहीं.'

**किब्लगाही**—वि. वंद्य; नामदार, 'किब्लगाही खान' –भावसंवृ १३५. [ फा. किब्लागाह ]

**किब्लेगाह**—वि. १ मूळ अर्थ–प्रार्थनेकरितां ज्या दिशेकडे तोंड करावयाचें ती दिशा, त्यावरून. २ वंद्य. 'किब्लेगाह नारायणराव साहेब' –खरे ७.३५६५. [ फा. किब्लागाह ]

**किब्लेनुमा**—न. होकायंत्र; दिशादर्शक यंत्र. [ फा. ]

**किंभाव**—वि. ( काव्य ) काय किंमतीचा? काय मह-त्वाचा? कोणत्या सत्वाचा? निजलोट शब्दाखालीं जास्त विवेचन पहा. 'किंभाव वैरागरीचा सुभट।' [ सं. ]

**किंमत-किम्मत**—स्त्री. १ मोल; मूल्य; बदल द्रव्य; भाव; दर. २ ( शब्दशः ) योग्यता; महत्त्व; पर्वा. 'फिर्यादीची आम्ही कांहीं एक किंमत समजत नाहीं.' –विक्षिप्त ३.१६५. 'प्रक्षेपकाचें हें एक मत म्हणून तरी त्याची कांहीं तरी किंमत असणारच.' –मसाप २.२.१२८. पुढील शब्दहि प्रश्नार्थक किंवा निषेधार्थक वाक्यांत याचअर्थी वापरतात– कथा; केवा; लेखा; पाड; प्राप्ति; प्राज्ञा; वखा; बिशात; मजकूर, मदार, मामला, मुदाला. [अर. कीमत] ( वाप्र. ) ०चुकावणें–सक्रि. मोल चुकतें करणें, देणें; भागविणें. सामासिक– ०कापणी–स्त्री. दुसऱ्यापेक्षां आपण स्वस्त देतों असें एका व्यापाऱ्यानें दुसऱ्यासंबंधानें सांगणें; भाव बिघडविणें.

—के ३.१२.२९. ०दार—वि. मौल्यवान. 'शाल्, चांदणी किंमत दार.'—अप १२८; ०वार—विकिवि. १ क्रमानें प्रत्येक जिनसाची किंमत दाखल केलेली (यादी, टिपण, हिशोब). २ किंमतीमागून किंमत ( कलमवार वगैरे यादी ). [अर. कीमत+वार ]

**किमती**—वि. मूल्यवान; बहुमोल. [फा. ]

**किमपि**—क्रिवि. ( नकारार्थी प्रयोग ) मुळींच; बिलकुल; कांहींच; थोडें सुद्धा; किंचिन्मात्र; [ सं. किम्+अपि ]

**किम(मि)या**—स्त्री. १ हीन धातूचें ( विशेषतः तांबें ) सुवर्ण बनविण्याची गूढ विद्या. ' निधी दैवें लाभल्या हातीं । किमर्थ शोधाव्या किमयायुक्ती । ' –नव २३.९०. २ (ल.) ज्यापासून फार मोठा लाभ होतो असा धंदा, व्यापार, यंत्र. [ अर. फा. कीमिया ] ०गर-गार–पु. किमया करणारा, जाणणारा. [फा. ]

**किमरूं**—न. ( गो. ) चिलट; मच्छर; किंवरूं पहा.

**किमर्थ**—क्रिवि. कां? काय म्हणून? कोणत्या कारणाकरितां? कशासाठीं? ' मज असत्य किमर्थ म्हणसिल । ' [ सं. किम्+अर्थ]

**किमसान**—न. पिवळें अगर सोनेरी रंगाचें कमावलेलें कातडें, चामडें ( जोडे, छत, पडदे यांसाठीं ).

**किमान, किमानपक्ष**—क्रिवि. निदान; कमींत कमी; थोडयांत थोडें; कनिष्ठपक्षीं; कांहीं नाहीं तरी. [सं. किं+मान+पक्ष]

**किमान मर्यादा**—क्रिवि. कमीत कमी; याच्या उलट कमाल मर्यादा.

**किमूस-मेस**—न. (गो.) मच्छर; कीटक. किंवरूं पहा.

**कियत्**—वि. किती; कितीसें. ( समासांत ) कियद्दूर=किती लांब; कियत्प्रमाण=किती प्रमाणाचा; कियत्संख्या=किती राशीचा?

**कियास**—कयास पहा. ' त्याजवरून कियास करावा कीं ' –रा ५.५२. [ अर. ]

**किर**—उद्गा. पराजयदर्शक उद्गार. 'बहिणी घाली वार। अवघ्या म्हणविते किर । ' –ब ५९३. [ध्व. ] ०खाणें–( व. ) टेकीस येणें; जिकीरीस येणें. ' मुलाच्या अशा उधळपट्टीच्या खर्चानें बाप किर खाऊन गेला. '

**किर-रू**—क्रिवि. ( काव्य ) खरोखर; खचित; खात्रीपूर्वक. ' इएचा किरूं प्राणेश्वरू। फुण ऐसा नाहीं योगेश्वरू । '–शिशु ८४७. [ सं. किल ]

**किरकणें**—अक्रि. १ किंकाळी फोडणें (हत्तीनें). २ दया येईल अशा प्रकारें गयावयां करणें; रडणें ( भिकारी, मूल वगैरेंनीं) किरकिर करणें. ३ त्रासणें; कुरकुर करणें. ' भिक्षा मागतां किरकों नये । '–दा १४.२.१८. [ध्व. ]

**किरकाडा**—वि. काटकोळा; रोड; अशक्त.

**किरकाँडें**—वि. ( गो. ) वांकडेंतिकडें.

**किरकिटणें**—अक्रि. खरकटें वगैरेनीं हात किंवा स्वयंपाकाचीं भांडीं करवडणें; बरबटणें; हाताला अथवा भांड्याला ( कणीक, भात वगैरे ) चिकटलेला असणें.

**किरकिर-कीर**—स्त्री. १ ( ध्वनि. ) पिरपीर; पुष्कळ वेळ पर्यंत चाललेला, त्रास उत्पन्न करणारा शब्द, आवाज (मुलें, भिकारी इ०चा); कटकट. ( क्रि० करणें; लावणें; मांडणें. ) २ कानांस घासण्यामुळें होणारा आवाज. –क्रिवि. कुरकुरत; मुळमुळ. ( क्रि० वाजणें; रडणें; करणें ). [ध्व. ]

**किरकिरणें**—अक्रि. कुरकुर करणें; किरकिर पहा.

**किरकिरा-रो**—पु.१ (गो.) पाकोळा नांवाचा मासे खाणारा पक्षी. २ किरकिर करणारा मनुष्य.

**किरकिरा-र्‍या**—वि. किरकिर करणारा; कुरकुर्‍या. ' मेहमीं आईच्या कडेवर वागणारें पोर जसें किचकट व किरकिरें होत जातें ... ' –नि ४२९.

**किरकिरांत**—स्त्री. किंक्रांत याचें अपभ्रष्ट रूप.

**किरकिरीत**—वि. पिरपिरें; खटपाळ; चिडखोर (मूल).

**किरकिरें**—न. १ मुलांचें एक करकर आवाज करणारें लांकडी खेळणें. २ गोफणीमध्यें दगड ठेवावयाची मधली जागा.

**किरकिसा**—पु. (कों.) किडलेल्या लांकडाचा भुसा, पीठ; लांकडास कीड लागली असतां खसखसीसारखा जो पदार्थ उत्पन्न होतो तो.

**किरकी**—स्त्री. १ नथेचा सोन्याचा आंकडा, फांसा. २ बुगडीचें मळसूत्र. ३ कठड्यामधील कांतीव लांकडी गज.

**किरकीट**—स्त्री. दांत खाणें. [ध्व. ]

**किरकीदार**—वि. किरकीप्रमाणें पट्टया किंवा वेढे असलेलें (पागोटें).

**किरकूळ-कोळ**—वि. १ रोडका; काटकुळा; बारीक; लहानसा; छोटेखानी; पाहिजे त्यापेक्षां कमी. २ फुटकळ अथवा लहान प्रमाणांत विकत घेतलेला किंवा दिलेला माल, धान्य; त्याचप्रमाणें असलेला व्यवहार. ३ चिल्लर; मोघम; अनिश्चित स्वरूपाचें; कमी महत्त्वाचें ( जिन्नस, प्राप्ति, खर्च, बाब, गोष्ट). ४ बारीक;(आवाज,स्वर.) [कीर=पोपट+कोळ=परटें] ०कागद–पु. चिल्लर खर्चाचा कागद. ०काम–न. हलकें काम; क्षुद्र काम. ०खरेदी-विक्री–स्त्री. फुटकळ खरेदी–विक्री; याच्या उलट ठोक खरेदी–विक्री. 'या शहरांत मालाची किरकोळ खरेदी कधींहि लिहूं नये. ' –मुंव्या ५०. ०नाणें–न. खुर्दा; चिल्लर; मोड. ०प्राप्ति–स्त्री. आवांतर मिळकत. ०भाव–पु. फुटकळ किंमत. ०मंडळी–स्त्री. सामान्य लोकांचा जमाव. ०वसूल–पु. अवांतर प्राप्ति.

**किरकोळ**—वि. किरकूळ पहा.

**किरकोळी**—स्त्री. किरकोळ वस्तूंचा ढीग.

**किरखाद**—वि. (कों.) किरानें, पोपटानें किंवा कोणत्याहि पक्ष्यानें खाल्लेला. [कीर+खाणें]

**किरगी**—स्त्री. (गो.) एक पक्षी. [सं. कीर]

**किरगी**—स्त्री. (बे.) साडी; चिरडी. [सं. चीर. का. किर=लहान]

**किरगुणी**—स्त्री. (क.) चिरडी; साडी, 'किरगुणी रुंदीला फार कमी आहे.'

**किरगे**—स्त्री. (गो. ख्रि.) मूग, धान्य.

**किरचण**—स्त्री. (चि.) बारीक चुरा, फोडी.

**किरट**—वि. (गो.) गोचीड.

**किरटा**—वि. १ (कों.) कृपण; कंजूष. २ बारीक टांकाची लेखणी. ३ अशा लेखणीनें लिहिलेलें गिचमिड, दुर्बोध (अक्षर). (निंदेनें म्हणतात). ४ कृश; गरीब; भिकार; किरकोळ (इमारत, लांकूड). ५ कमजोर; भिकार; लहान (आवाज, उच्चार). ६ लहान, खुरटें, निःसत्त्व (फळें वगैरे). ७ अशक्त, कमजोर (दांत, चेहेरा). 'त्याचा चेहरा लांबट व किरटा होता.' -हाकांध २०८. ८ काटकुळा, ठेंगणा (माणूस). ९ (सामान्यपणें). नष्टवीर्य; नष्टसत्त्व. [का. किर=लहान]

**किरड-डूं**—न. १ कीटक. २ लहान साप. 'जी किरड तरी कापडाचें। परि लहरी येत होतिया साचें।'-ज्ञा ११.५४. 'इतर किरडें आणि फणिपाळ।'-रावि. २५.७१. [दे. करोडि; कों. चि. का. किर=लहान]

**किरडावणें**—अक्रि. (बे.) साप चावणें.

**किरडी**—स्त्री. प्रेताची तिरडी; ताटी.

**किरडुव**—न. किडा. 'अविवेक किरडवें तत्वतां। अविद्या भ्रांति जल देवता' -रावि १५.४. [किरड]

**किरण**—पुन. १ प्रकाशरश्मि; सूर्य, चंद्र इत्यादि तेजस्वी पदार्थांपासून निघालेली प्रकाशशलाका; प्रकाशाची रेघ. २ सूर्याचें ऊन. 'किरणें कैचीं उगवतां अर्के।'-रावि १.४२. [सं.] ०चक्र-न. किरणाचें मंडळ (सूर्याभोंवतालचें). सूर्याची अंशुमाला.' 'किरणचक्रीं विराजे तमारी। चौरें वारिती हरीवरी।' [सं.] ०जाल-न. किरणांचें जाळें; रश्मिजाल. ०परावर्तक दुर्बिण-स्त्री जीमध्यें खस्त पदार्थांच्या किरणांचें परावर्तन होऊन तो आपणांस दिसतो ती दुर्बिण. (इं) रिफ्लेक्टिंग टेलेस्कोप. ०प्रतिबंधक-पु. ज्यांमधून प्रकाशकिरण पार जाऊं शकत नाहीं असा. ०वक्रीभवन-न. प्रकाशाचे किरण एका पदार्थांतून दुसऱ्या कमी अधिक घट्ट पदार्थांतून जातांना कांहींसे वांकडे होऊन जातात ती क्रिया. ०विसर्जन-न. किरण निघून जाण्याची क्रिया. (इं.) रेडिएशन. ०शलाका-स्त्री. किरणांची रेघ, स्तम्भ, ओळ. (इं.) पेन्सिल ऑफ रेज.

**किरण**—न. उडी; नेम; किराण पहा. ०साधणें-क्रि. (कों.) बरोबर, नेमकी उडी मारणें; बरोबर नेम मारणें.

**किरणें**—सक्रि. पसरणें; विसकटणें. 'जिकडे तिकडे अपुल्या वदनांतिल उग्र गरल ते किरती।'-कुंभक ७७. [सं. कॄ=विसकटणें, पसरणें]

**किरदार**—न. हिशेब वगैरेच्या पुरवणीबंदाच्या माथ्याला लिहिलेला महिना आणि वर्षे अथवा थोडेसे शब्द; पूर्वीच्या भरलेल्या बंदाचा विषय पुढें चालविण्याकरितां मिळवून आणलेला कागद. [फा.]

**किरप**—पु. (गो.) बारीक माशांचा जमाव. [सं. कृमि]

**किरपण-पाण**—वि. (राजा. कुण.) लहान; बारीक.

**किरपण-पीण-क्रिपण**—(गो.) पु कृपण, कंजूष माणूस. [सं. कृपण]

**किरपाण**—वि. कृपाण; खड्ग; शीख मनुष्य जवळ बाळगतो तें शस्त्र [सं. कृपाण]

**किरम**—पु. (व.) जंत. [सं. कृमि]

**किरमाड-डी-डें**—वि. (क.) कृपण; चिक्कू; कद्रू. 'परवाच्या समेटभंगाचे खापर किरमाड व्हाइसरायाचे डोक्यावर फुटणारें असो. कीं, हावऱ्या कॉंग्रेसच्या डोक्यावर फुटणारें असो.' -के २०.९.३०. 'त्या किरमाड्या माणसाकडून तुझी काय गरज पुरी होणार?'

**किरमाणी-ओ(वो)वा**—पु. चोर ओवा; हा इराण देशांत पिकतो. याची रुचि कडवट असते. एका रशियन वैद्यानें याचें सत्व काढून सँटोनाइन नांवाचें औषध (१८३० मध्यें) तयार केलें हें जंतावर १ ते ३ गुंजांपर्यंत साखरेशीं मिसळून रात्रीं देतात व सकाळीं सुंठीचा काढा अथवा एरंडेल देतात. [फा. किरमान+ओवा]

**किरमिजी-मीजी-मेजी**—वि. किरमिज (रंग) संबंधीं; एक प्रकारचा रंग; हा एक प्रकारच्या किड्यापासुन तयार होतो. हा लाल असतो. ०दाणा-पु. किरमिज रंगाचा किडा; गोळा, गोळी, दाणा. [सं. कृमिज; फा. किरमिझ्; इं. क्रिमझन]

**किरमीज-मेज**—न एक प्रकारचा किडा. [सं. कृमिज फा. किरमिझ्]

**किरमें**—न. (कु. गो.) पडसें; शेंबुड. [सं. कृमि?]

**किरली**—स्त्री. (कु.) हात अगर पाय यांत कांटा गेल्यामुळें पडलेला घट्टा, घर; भोंवरी.

**किरली**—स्त्री. (चि.) नुकती दिसूं लागलेली बारीक लहान कांकडी.

**किरव**—पु. (कु.) खरजेच्या पुळींतील सुईच्या अग्रापेक्षांहि लहान जंतु. [सं. कृमि]

**किरवट**—स्त्री. (कु.) कणवट.

**किरवण**—न. चित्रकाम; चित्राचें कसब. ' किरवणभूवंगा। विस्मयोत्कर्ष सारंगा।' -राला ३७. [ सं. कृ-करणें ]

**किरव(वि)णें**—उक्रि. लांकूड, धातू, माती वगैरेवर चित्र, आकृति वगैरे कोरणें.

**किरवंत**--पु. सावंतवाडीकडे राहाणारी ब्राह्मणांतील एक पोटजात व तींतील व्यक्ति. [ सं. क्रमवंत, कृमिवंत ? ]

**किरवा-वें**—पुन. १ डोंगरांत किंवा सपाटीवर आढळणारा एक खेंकडा. याचा रंग काळसर पांढरा असतो. २ गांठ, फांस. –शर.

**किरवि(व्या)जणें**—अक्रि. भात भाजी वगैरे बरोबर न शिजल्यामुळें नासणें, खराब होणें; अर्धकच्चें भाजणें.

**किरवितणें**—क्रि. १ ( दांत ) वाजविणें; किरकिर आवाज करणें. २ (ल.) मागणें; तोंड वेंगाडणें. ' आणि पव्हेसाठीं सुदामयाप्रति। दांत किरवितसां कैसे।' –स्वानु ३.३.४३. [ ध्व. ]

**किरविल**—पु. सर्प; किरडूं. ' किरविल जैसा पसरला।' –ज्ञेसीस्व ४.९९. [ सं. कृमि किंवा कीर+आवली ? ]

**किरवें**—न. १ ( कों. ) काष्ठादिकांस घासण्यासाठीं तयार केलेलें माशाच्या खरखरीत पाठीचें हाड २ खेंकडा. 'येकांगी करूनि किरवें धरूनि आणिलें।' –दावि ३५६. ३ किरिरें पहा.

**किरसाण-न, किसान**—( हिं. ) शेतकरी. ' रयत, किरसान याजवर महाराजांची दया ... ' –विक्षिप्त २.११९. [ सं. कृष्-कृषाण ]

**किरळ-ळी**—नस्त्री. १ जोंधळयाच्या कोंवळ्या सुरव्यांत उत्पन्न होणारा एक विषारी किडा. हा खाल्ला असतां गुरूं मरतें; त्यामुळें गुराला होणारा रोग. (क्रि० लागणें). ' अरे सख्यारे हा मदन अनिवार। ज्यार फार करी किरळा।' –प्रला ९४. २ जोंधळा, बाजरी यांची कापणी झाल्यावर शेतांत राहिलेले त्यांचे धस, सड. –नपु. ३ नवीन कोंब फुटलेली हरळी. ४ ( क. ) भरत येणाऱ्या जखमेचा आंतील भाग. ( क्रि० बांधणें; येणें; धरणें; फुटणें ). –न. ५ नेसीचें झाड व तिचें फळ. ६ अंकूर; ज्वानी; जोमदारपणा; 'नातु कोंवळें किरळ।' –यथादी १.२९१.

**किरळी**–स्त्री. १ पायाचा एक रोग; भोंवरी. किरली पहा. २ किरकोळ; बारीक; लहानपणची अवस्था. 'कवळी किरळी नव्हती तुमची पाहिली पंचविशी।' –पला १०४.

**किराईत-फोडशी**—नस्त्री. काडेचिराईत; याच्या काडेचिराईत व पालेचिराईत अशा दोन जाती आहेत. हें झाड हात-दीड हात उंच असून पानें लहान व लांबट असतात. चव कडू असते. वाळलेलीं पानें, फुलें, फळें, मुळें, काष्ठें हीं पौष्टिक, ज्वरनाशक व सारक आहेत. आम्लपित्तावर याचा काढा करून त्यांत मध घालून देतात. [ सं. किरात, चिराटिका; हिं. चिरायता; बं. चिरता, चिराता; गु. करियातु; इं. चिरेटा; लॅ. स्विर्टिया चिरेटा ] ०फुलकी–स्त्री. चिराइताची लहान जात.

**किरांची**—स्त्री. तोफेच्या मागची दारूगोळयाची पेटी.

**किरांटी**—स्त्री. ( गो. ) पोपटाची एक लहान जात. [ का. कीर ]

**किराड**—पु. शूद्राची एक जात. [सं. किरात; सिं. किराडु ]

**किराण**—न. १ उडी; उड्डाण. किलाण पहा. ( कांहींच्या मतें खालीं डोकें वर पाय करून मारलेली उडी ). ( क्रि० मारणें; टाकणें; साधणें ). ' उड्डाणें किराणें घेती गगनीं।' –मुवन १५. १५७. ' घेतलें किराण अंतराळ जातसे।' –दावि ४९६. २ संधान; निशाण; नेम. (क्रि० साधणें; बांधणें; चुकणें). ३ शुभग्रहयुति; संधि; योग्य समय. [ सं. किल्=खेळणें ]

**किराण**—पु. ( कुण. ) उगवत्या अगर मावळत्या सूर्याचे मंद किरण. ( क्रि० पडणें; राहणें ). [ सं. किरण ]

**किराणा**—पु. लवंग, मिरीं, मिरच्या, गूळ, तूप, साखर इ० माल; वाणजिन्नस. [ सं. क्री=विकतघेणें; सिं. किर्याणी ]

**किरात**—पु. १ अरण्यवासी एक जात; भिल्ल. ही जात शिकारीवर निर्वाह करते. 'तो भेटला गुहक नाम किरात वाटे।' –वामन भरतभाव ५०. २ किराइताची एक जात.

**किराती**—स्त्री. भिल्लाची बायको; भिल्लीण. ' आलिंगिली पुनरपी प्रमदा किराती।' –आश १९.

**किरांमोरां**—न. (गो ) पोपट, मोर वगैरे पक्षी किंवा त्यांचीं चित्रें. [ कीर+मोर ]

**किराया**—पु. भाडें ' दोन नावा तीनशें रुपयांची किराया करून पटण्यास आलों.' –पदमव ७३. [ अर. किराया=भाडें; तुल. सं. क्री=विकत घेणें ]

**किरांव**—न. (गो.) (वाघ वगैरेची) उडी; घाला. किरण पहा.

**किरावणें**—क्रि. ( गो. ) पोपटासारखें बोलणें. [ कीर ]

**किराळ**—पुन. किरळ-ळी अर्थ १, २, ३ पहा.

**किराळचें**—क्रि. ( कों. ) कावळयासारखा कर्कश आवाज काढून ओरडणें; कर्कश आवाज काढणें; किंकाळणें. [किराळी; ध्व.]

**किराळी**—स्त्री. (कों.) किंकाळी; किंचाळी; कर्कश आरोळी; हत्तीची किंकाळी. [ ध्व. ]

**किरिरें**—न. ( कों. ) शिंक्यावर भांडें घट्ट बसावें म्हणून शिंक्यास वर फास बांधतात तो.

**किरिस्ताव**—पु. (गो.) ख्रिस्ती जात व तींतील व्यक्ति. [ पो. क्रिस्ताओ; इं. क्रिश्चन ]

**किरी**—स्त्री. १ क्षयरोग. २ ( ल. ) कीड. ' मज संसारीं कैंचें चिंतेनें लागतां किरी टिकणें।' –मोसभा ३.२९. [ कीड–किडी ? ]

**किरीट**—पुन. डोक्यावरचा मुकुट. ०**कुंडलें**–न. (अव.) मुकुट व कानांतील भूषणें; पौराणिक नाटकांतील देवांच्या व राक्षसांच्या सोंगांचीं शिरोभूषणें. प्रथम मातीचा मुकुट ( किरीट ) तयार करून त्यावर कागदाचे थर चिकटवून त्याचा ठसा घ्यावयाचा. नंतर त्याला सोनेरी वर्ख लावावयाचा. त्याच्या मागें मोरांच्या पिसांची ताटी लावली म्हणजे तो सुशोभित दिसे कुंडलें अशीच करीत असत. [ सं. ]

**किरीटी**—पु. अर्जुन. 'हा तर्कांचिये दिठी। गोचर नोहे किरीटी।' –ज्ञा १.१४८. [ सं किरीट ]

**किरीम-किर्म**—पु. (कों. कुण.) जंतु; किडा ( फळ, पोट, क्षत यांतील ). [ सं. कृमि ]

**किरीम(किर्म)वातोळें**—न. ( कों. कुण. ) कृमीपासून उत्पन्न होणारा पेटका; उन्मादवायु. [ सं. कृमि+वात ]

**किरू**—क्रिवि. निश्चयें करून; खात्रीनें. 'इयेच्या किरूं प्राणें-भक्त।' –शिशु ८४७. 'मज किरू तुझा विणटु' –भाए ८३. [सं. किल ]

**किरोंटा**—पु. १ सानटी पोपट; कंठ न फुटलेला राघू. २ ( कों. ) कावळा. [ कीर+टा ]

**किर्डुचें**—क्रि. ( गो. ) दांत खाणें.

**किर्द**—स्त्री. १ रोजनिशी २ रोजच्या जमाखर्चे लिहिण्याची वही. ३ लावणी ( जमिनीची ). 'पावसाळा, कौल देऊन आज्ञा केली तर स्वतः उमेद धरून किर्दी करितील.' –रा ६.१४८. ४ लागवड केलेली जमीन. [ फा. कर्द्=काम ] ०**आबादानी**–स्त्री. लावणी संचणी. 'गांवीं राहून वसाहत करून किर्द आबादानी करणें.' –रा १६.५५. ०**महामुरी-मामुरी**–स्त्री.लावणी संचणी; लागवड; वसाहत. 'त्यांणीं तेथें किर्द महामुरी केली.' –रा १५. २०२. [ फा कर्द्+अर. मअमुर=आबाद ] ०**सार**–वि. लागवडीखालील, लागवडीस योग्य ( जमीन ). [ फा. कर्द्+सार ]

**किर्दवा**—पु. पीक; लागवडीचें उत्पन्न. [ फा. कर्द् ]

**किर्वेद**—स्त्री. ( गो. ) कनवटी.

**किर्मिजी**—किरमिजी पहा.

**किर्मीर**—वि. चित्रविचित्र. 'अत्यंत किर्मीरित कांति झाली।' –सारुह ६.२६. [ सं. किर्मीर ]

**किर्मुचें**—सक्रि. ( गो. ) १ अंकुर तोडणें. २ नखानें खरूज खाजविणें.

**किर्मूजा**—स्त्री. ( गो. ) लालसर रंग. किरमिजी पहा.

**किर्म्यी**—न. ( कु. ) पडसें; सेंबूड. किरमें पहा'

**किर्र**—वि. १ कर्कश; शहारे उत्पन्न करणारें (रातकिड्यांचा, पक्ष्यांचा आवाज). यावरून २ निबिड अरण्य अथवा दाट झाडी या अर्थानें योजतात, कारण तेथें नेहमीं रातकिड्यांचा, पक्ष्यांचा आवाज व झाडांचा करकर आवाज होत असतो. 'मोठमोठे वृक्ष वाढून किर्र झाडी झाली आहे.' –पाब्र ९. ३ थकून गेलेला; भागलेला. 'मी अगदीं किर्र झालों.' [ ध्व. ]

**किले(ल्ल)**—पु. ( गो. ) बांबूच्या मुळाला फुटलेले नवीन अंकुर. यांची भाजी करतात. ०**कातलें**–न. ( गो. ) झाडावरील फळें, पाला काढण्यासाठीं टोंकास कोयती लावलेली कांब, काठी, बांबू; आंकडी. **किलें(ल्लें)चें**–क्रि. ( गो. ) मोड येणें.

**किलीं**—(कु.) पायांत कांटा जाऊन झालेला जाड दडदडीत भाग; घट्टा; भोंवरी; ( गो. ) मोड, अंकुर.

**किलकिल-किलाट, किल्किलाट**—पुस्त्री. १ ( ध्वनि ) पक्ष्यांची चिवचिव. त्यावरून २ गडबड; गोंगाट ( माणसांचा ). 'कोठें नेणों हा फावला एकांत। सदा किलकिल भोंवतीं वहुत।' –तुगा १११. 'अभ्रीं संभ्रम किल्किलाट करिती, शोभा दिसे फार ते।' –आसेतु १०. [ ध्व. ]

**किलकिलणें**—अक्रि. किलकिल आवाज करणें; गोंगाट करणें; चिवचिवणें ( पक्ष्यांचें ). [ ध्व. ]

**किलकिला-लीत**—वि. अर्धोन्मीलित (डोळे; दार, कळी इ० ); अर्धे उघडलेलें; किंचित् उघडलेलें. ( क्रि० होणें; करणें ).

**किलकिलावणें, किलकिला लावणें**—उक्रि. ( कों. ) थोडेंसें उघडणें; किंचित उघडणें ( डोळे, दार इ० ).

**किलकिलें**—वि. अर्धवट उघडलेलें.

**किलच, किलीच-चा**—स्त्री. १ कडीपाटाच्या फटींमधून बसविलेल्या लाकडी झिलप्या, ढलप्या. 'गरुडपाचूंच्या किलचापाट।' –मुसभा २.२८. २ तुकड्यांचा कडीपाट करण्याकरितां एका कडीपासून दुसऱ्या कडीपर्यंत घातलेले फळीचे आडवे तुकडे ( जास्त लांब अधिक चांगल्या फळ्यांच्या ऐवजीं ). ३ हिऱ्याचा लांब तुकडा. ४ कापसामधील गवताची काडी, धाण इ०

**किलचण-न**—स्त्री. ( व. ) लहान झिलपी. किलच पहा.

**किलचबंदी**—स्त्री. १ किलचांची तख्तपोशी. २ तख्तपोशी; वरील प्रमाणें केलेला कडिपाट. –वि. किलचांचा केलेला ( कडिपाट ).

**किलची-चण**—स्त्री. १ किलच अर्थ १ पहा. 'शुद्ध पाचूंच्या किलच्या वरी। अभेद जोडिल्या कळाकुसरी।' –ह २.१९. २ जास्त किलचांचा ढीग. [ दे. किलिंच ]

**किलप्या**—स्त्रीअव. १ थप्पडा; थापट्या; चापट्या. ०**देणें**– (ल.) थोबाड फोडणें; 'श्रीमुखांत देणें. 'क्रोध आला हकीमाला किलप्या द्यायचा हुकुम गडयारे।' –रामाचें जुनें गाणें.

**किलबिल**—पुस्त्री १ किलकिल पहा. २ की ३ पहा.

**किलबिलाण-किलबिलाट**— किलकिल, किलकिलाणें पहा.

**किलवणें**—क्रि. हलविणें (जमीनींत गाडलेला वासा, वगैरे). [ सं कल् ]

**किलवाणा-णी-णें**—वि. १ केविलवाणा पहा. दीनवाणा; रडवा ( स्वर, भाषण, माणूस ). ' हे नरभूषण दायक अन्य दरिद्र फिरें जरि तो किलवाणें । ' -किंशुक ३८. ' मी तरी तुम्हा अनाथ दीन । येथें दिसतों किलवाण । ' -भवि ४७.९१. ' बापूनें किलवाणी तोंड करून म्हटलें. ' -बाळ २.७०. २ हलका; लहान; क्षुल्लक; कुरूप ( कपडा, दागिना, इमारत ); दुर्दैवी; कृपण; नीच ( मनुष्य, त्याची वागणूक, कृति ). [ केविल्वाणा पहा ]

**किलागॉ**—पु. ( गो. ) बारीक मासा.

**किलाण**—न. १ उडी; उड्डाण; झडप. (क्रि० मारणें; टाकणें; घालणें; साधणें). २ उड्या मारणें; खिदळणें; धिंगाणा घालणें ( लहान मुलांचें ) (क्रि० मांडणें; माजवणें). किराण पहा. [ सं किल्=खेळणें; हिं. कलान ]

**किलाफ-फा**—पु. संशय; वैर; कपट; वैषम्य; विरोध; किल्मिष. ' हर प्रयत्न करून जनकोजी शिंदे यांस भेदून त्यांचें चित्तांतील किलाफ काढून त्यांचे हातीं मुल द्यावें. ' -भाब ३७. [ अर. खिलाफ ]

**किलावर**—पु. खेळण्याच्या पत्त्यांतील एक काळा रंग. [ इं. क्लब ]

**किलावा**—पु. ( हिं. ) महाताला पाय अडकविण्यासाठीं. हत्तीच्या गंडस्थळावरून खालीं सोडलेली दोरीची रिकीब; हत्तीचा गळपट्टा; कलावा पहा. ' पायावरती चढोन किलाव्यांत बसले. ' -आयाह ११. [ फा. कलावा ]

**किलिसात**—पु. ( तंजा. ) किल्ली.

**किली**—स्त्री. किल्ली पहा. ' हातास न येतां किली । सर्वही अप्राप्त । ' -दा ७.२.१३. ' त्याची किली तूज अधीन आहे । ' -सारुह १.४.

**किलेमाणी**—वि. जात्याच्या खालच्या तळीच्या खुंट्या-भोंवतीं फिरण्यासाठीं वरच्या तळींत ज्यास वेढी बसविली आहे असें जातें. [ सं. कील+म. माणी=मायणी, वेढी ] ०**करणें**-क्रि. वरीलप्रमाणें किलेमाणी बसविणें. ' जात्याला किलेमाणी केली. '

**किलोंड**—स्त्री. ( व. ) मांजरांची झोंबी, लढत.

**किल्कारी**—स्त्री. चीत्कार; हर्षाची आरोळी; गर्जना. [ किलकारणें. ध्व. ]

**किल्बि(ल्मि)ष**—न. १ पाप; दोष; 'ऐशा किल्बिषापासूनी । सुटे यज्ञशेष तें भक्षुनी । ' -यथार्दी ३.२२३. २ ( ल. ) घाण; मळ. [ सं. किल्मिष ]

**किल्ल**—पु. ( गो. ) कोंक ( झाडांचा वगैरे ). [illegible] पहा.

**किल्ला**—पु. गड; दुर्ग; कोट; भोंवतालीं चर, तट, बुरूज इ० करून राहण्यासाठीं तयार केलेलें सुरक्षित स्थळ; गढी. [ अर. कलाह्=शिखर; किला=कोट ] (वाप्र.) ०**नेस्तविणें**-किल्याभोंवतालचें रान पेटविणें. **किल्ल्यावर चढविणें**-डोंगरी किल्ल्यांत कैदेंत ठेवणें. ' किल्ल्यावर चढवा आनंदीबाईला. ' -ऐपो १६५. सामाशब्द- **किल्लावर्ताळा**-पु. शेतकऱ्यांनीं किल्ल्यावरील शिबंदीला धान्य पुरविण्याऐवजीं त्यांच्यावर पट्टी बसविली जात असे तो. **किल्ले कोट**-पु. साधारणरीत्या किल्ला; किल्ले वगैरे मजबूत ठिकाणें. ०**जात**-क्रिवि. सर्व किल्ले. ' किल्लेजातचा बंदोबस्त ' -वाडसमा ३.१६. [ अर. किल्ला+जात ] ०**दार**-पु. दुर्गाधिपति; किल्लेकरी; याची नेमणूक राजधानींतून, मुख्य सरकारकडून होई व त्याला पगार तेथून मिळे, किल्ल्यावरील शिबंदी त्याच्या दिमतीस असे. त्याचें काम पहा. -इऐ २२.२४. [ अर. किल्ला+दार ] ०**नशीन**-वि. किल्ल्यावरील, किल्ल्यावर कैद झालेला. ' मन्सबदार किल्लेनशीन वसन्तगड. ' -रा १५.९५. 'रघुपतराव नारायणांचा पक्ष केला, ते किल्लेनशीन केले. ' -मदबा १.७८. ०**बंद**-वि. किल्ल्यास वेढा पडल्यामुळें अडकलेला. ' किल्लेबंद झालें असतां परिणाम नाहीं. ' -मराचिथोशा ३७. **किल्यानिहाय**-अ. किल्लोकिल्लीं; प्रत्येक किल्ल्यावर; ' किल्लेकिल्यानिहाय तोफा करविल्या. ' -मदरु १.१४५.

**किल्लाण**—पु. पक्ष्यांचा किंवा मुलांचा कलकलाट; गोंगाट. [ ध्व. ]

**किल्ली**—स्त्री. १ चावी; कळ. 'झाला हुकूम तोफखान्याला किल्ली जिवबादादाचे हातीं । ' -ऐपो २३५. २ एखाद्या कठिण गोष्टीचें स्पष्टीकरण किंवा उलगडा, एखाद्या शास्त्राचा सारभूत प्रास्ताविक भाग. ३ (ल.) हिकमत; कळ; युक्ति; मेख. ' विषय विशा वेडाम भुलवितील लढवून हरकिल्ली । ' -पला १०४. ' पेशवाई चालविण्याची किल्ली नानासाहेबाखेरीज इतरांस सांपडली नाहीं. ' -अस्तंभा ४. ४ (छापखाना) फर्मा आवळण्याचें साधन. [ सं. कील; फा. किलीद; फ्रें. जि. किलो ] ०**फिरविणें**-कावेबाज युक्ति काढून मथविणें, चिथविणें; गुप्तपणें बंदोबस्त करून ठेवणें.

**किल्ली**—स्त्री. ( गो. ) कांटा रुतून पायाच्या तळव्यास होणारा फोड; भोंवरी. किरली पहा.

**किल्हाण**—न. उड्डाण. किराण, किलाण पहा.

**किल्ळू**—न. ( व. ) सर्पाचें पिलूं. किरडूं पहा.

**किंव-काकळूत**—न. १ कींव; करुणा; दया. काकळूत पहा.

**किंव**—स्त्री. ( गो. ) हुकी; तल्लफ.

**किंवळा**—स्त्री. ( व. ) निंदा. -वि. निंद्य.

**किर्वचणें**—उक्रि. १ (का.) इकडेतिकडे फेकून, टोचून, बोटें घालून, चिवडणें; विसकटणें; नासणें; कुसकरणें. २ (क.) चांचपणें. (?) 'असा किवचून काय बघतोस?' [विचकणें]

**किवटा**—वि. कृपण; चिक्कू; (बाल भाषेंत) किवण.

**किवड**—पु. (सांकेतिक) पोलीस शिपाई. –गुजा.

**किंवडा-डू, किवढ्या**—पु. (तंजा.) बहिरा. [का. किवी=कान, कीव्ड=बहिरा]

**किवण**—स्त्री. कींव; करुणा; दया. [कींव]

**किंवण(न), किवान, किवोण-न, किव्येण**—न. १ (राजा.) पशूंच्या अंगावरील किडे पडलेलें क्षत; व्रण. हा रोग गुरांच्या पायांच्या गेळ्यांत किंवा कानांत होतो. 'भागीचें घोडें किवणानें मेलें.' २ तें बरें करण्याचा मंत्र. [सं. कृमि+व्रण] ०उचकवप–(गो.) घाण उघडी करून दाखविणें.

**किवण्या-न्या**—वि. किंवण पडलेला; क्षत पडलेला. [किंवण]

**किंवदन्ती**—स्त्री. उडत बातमी; बाजारगप्प; अफवा; आर्वाई. [सं. किम्+वदन्ति]

**किंवा**—उक्रिअ. वा; अथवा. अथवा पहा. [सं. किम्+वा]

**किवांटो**—पु. (गो.) संताप; जळफळाट.

**किविलवाणा, णी, णें**—वि. केविलवाणा-णी-णें; दीन; बापडा. 'कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन।' –तुगा ४५४. 'ऐसें तयाचें किविलवाणें' –दावि ४५८. [कींव]

**किशमिश**—नपु. किसमिस पहा.

**किशी**—स्त्री. (कु.) नारळाची शेंडी.

**किंशुक**—पु. पळसाचें झाड. 'वसंतीं जैसें किंशुक फुले। तैसे शोभले दोघेहि।' –जै १९.८. 'पावे कुसुमित किंशुक घन-वनपिहिताद्रिपालसादृश्य।' –मोभीष्म ५.४७. [सं.]

**किशोर**—पु. बाल; लहान मूल; पंधरा वर्षांच्या आंतील मुलगा; कायद्याच्या दृष्टीनें अज्ञान मुलगा. नऊ पासून सोळा वर्षांपर्यंत किशोर अवस्था म्हणतात. –योर १.८८. 'तूं तों तरुण किशोर। पांचां वरुषांचा पोर।' –वामन नृसिंहदर्पण ९६. [सं.]

**किशोरी**—स्त्री. मुलगी.

**किष्कु**—पु. एक प्राचीन मापनाचें परिमाण. हें ३४.२ इंचांचें होतें. –छअ १९९.

**किसकिस**—क्रा. (गो.) दुखणें; कळा निघणें; पोटांत चावणें. [ध्व.]

**किसकिर्सो**—पु. (गो.) झाडें पोखरून खाणारा एक किडा.

**किसगणती**—स्त्री. १ गणना; गुमान; पर्वा; चाड; फिकीर (मनुष्य, वस्तु, काम, पैसा यासंबंधीं); खातरजमा. २ कःपदार्थ (नास्त्यर्थी प्रयोग). 'हा सरदार त्याच्या किसगणतींत नाहीं.' 'ह्या कामांत मोठमोठे थकले मग हा किसगणती?' [हिं. किस+गनतीका=कोणत्या गणनेचा]

**किसणकाम**—न. १ (ल.) बारीक, नाजूक, कंटाळवाणें काम. २ कीस काढण्याचें काम. [किसणें+काम]

**किसणी**—स्त्री. १ कीस काढण्याची क्रिया, अथवा कीस. २ कीस काढण्याचें हत्यार; चार पाय असून त्यांवर भोकें पाडलेला लोखंडाचा किंवा पितळेचा पत्रा बसविलेलें एक हत्यार. [किसणें]

**किसणें**—उक्रि. १ कीस काढणें. २ किसणीवर खवणें (खोबरें, काकडी इ०). [सं. कृष्=ओढणें, वासणें.] ०किसून दळणें–बारीक दळणें.

**किसपट**—न. कसपट; बारीक, सूक्ष्म कण (लाकडाचा; गवताची काडी); केसपट, झिलपीचा बारीक तुकडा; कुसळ. [सं. कुश]

**किसपणें**—न. (गो.) साफ करणें; पालीश करणें.

**किसबत**—स्त्री. (हिं.) भिस्ती लोक मसकेच्या खालीं जें कातडें वापरतात तें.

**किसमिस**—स्त्री. १ बेदाणा; खिसमिस. २ त्रासदायक आणि कंटाळवाणें भाषण; कुरकुर; भांडणाचें बोलणें. [किसणें द्वि.]

**किसमूर-मोर**—स्त्री. (गो.) कोशिंबीर.

**किसर**—न. १ (कों.) केसर; किसपट; २ भात इ० धान्याचें कुसळ.

**किसवंती**—स्त्री. आंब्याच्या किसाचें लोणचें. [कीस]

**किसळचें**—अक्रि. (गो.) बिनसणें.

**किसा-स्सा**—पु. १ गोष्ट; हकीकत; इतिहास; बखर. 'याप्रमाणें किसेकिनई सांगतो.' –खरे ४३५४. २ तंटा. 'याप्रमाणें किस्सानिर्गत होऊन स्वारी माघारी फिरली.' –होकै ४. [अर. किस्सा.]

**किसान**—पु. १ शेतकरी; खेडवळ माणूस. २ हलक्या प्रतीचा माणूस; सामान्य प्रतीचा माणूस; 'तेथें अफ्‌जल् तूं किसान मजला दृष्टीपुढें दीसतें।' –चित्रगुप्त २६. [हिं. किसान; फा. किसान; सं. कृष्–कृषाण] ०काम–न. १ शेतकी; शेत-काम. २ (ल.) कमी दर्जाचें काम; किरकोळ काम; हलक्या प्रतीचा धंदा.

**किसार**—न. शल्य; कसपट. –शर सोहिमह.

**किसूळ**—पु. बारीक आणि किरकोळ तार्टें, देंठ, पातीं (कोंवळें किंवा रोगट गवत, भाजीपाला वगैरेचें). [सं. कृष्]

**किसूळ**—स्त्री. (गो.) लांकूड साफ करण्याचा रंधा.

**किस्कनड**—स्त्री. (गो.) भानगड; तिस्कनड.

**किस्कूट**—(क.) रंधा; सुतारी हत्यार. किसूळ पहा.

**किस्त-स्ती**—स्त्री. १ कर्जफेडीचा हप्ता, 'किस्तींस इतकी शर्ते कशास पाहिजे?' –रा ५.३२. 'बाकी बत्तीस लक्ष रुपये राहिले ते सावकारी किस्ती करून द्यावी.' –खरे ४.१८६५. २ शेताची मशागत. [अर. किस्त्] ०**गारी-बंदी**–स्त्री. १ हप्तेबंदी; हप्तेबंदीनें देण्याची फेड. 'किस्तबंद्या करून ...' –दिमरा १.१२४. 'याप्रमाणें किस्तबंदीचा ठराव जाला.' –रा ७.३४. २ शेतकाम, जमीनकसणी. [किस्तबंदी, किस्तकारी]

**किस्ती**—स्त्री. होडी; नौका; नाव. 'येथून एक किस्ती भाडयानें साठ रुपये करार करून निघालों. –पदमव ८०. [फा. कश्ती]

**किस्पाट**—न. (कु.) किसपट.

**किस्मत**—स्त्री. नशीब; भाग्य; दैव. 'परंतु दुनियादारी किस्मतींत थोडे दिवस होती.' –ऐटि ३.१७. 'जागें नसीब इंग्रजांची किस्मत शाबूत.' –होपो १६. [अर. किस्मत्]

**किळ**—कीळ पहा.

**किळकांटा**—पु. सामानसुमान, हत्यारें पात्यारें. 'सामायन किळकांटा जंगी।' –ऐपो २१७. [सं. कील+कंटक]

**किळकिळी-ळ्या**—स्त्रीअव. (ध्वनि.) याचनेकरितां किंवा दुःख झालें असतां विवळणें, कण्हणें; काकुळत; दीनवाणा स्वर (भिकारी, दुखावलेला कुत्रा यांचा. क्रि० देणें; मारणें)

**किळकिळीत**—वि. (कों.) कळकळीत; पचपचीत; पाण्यासारखें (ताक, दूध); बेचव; नीरस.

**किळच-ची**—स्त्री. (गो.) किंकाळी. ०**किळचीर किळची**–किंकाळयावर किंकाळया. [ध्व.]

**किळवें**—न. अर्धा छटाक किंवा एकबत्तिसांश शेराचें एक माप; अर्धे निळवें.

**किळशा, किळोशी**—वि. (राजा.) रोगट; सतत रोगी असलेला. [किळस]

**किळस-ळीस**—पुस्त्री. १ (राजा.) चिळस; कंटाळा; तिटकारा; शिसारी. 'तुका म्हणे गेला आळस किळस।' –तुगा १८५२. २ (कों.) ज्वरादि दुखण्यानें पीडित स्थिति; अशा स्थितीचें निदर्शक चिन्ह; अवलक्षण (अंगावर उवा पडणें वगैरे). (क्रि० येणें). [सं. क्लेश; प्रा. किलेस–किळस] ०**खोर**–वि. कंटाळखोर; खोडकर.

**किळसणें**—उक्रि. कंटाळणें; विटणें.

**किळांच**—पु. (कु.) बारीक, निरुपयोगी कुळीथ.

**किळावा-वो**—पु. तेज. 'रत्नीं किळावो जैसा।' –ज्ञा १४.३७३. [सं. कील]

**कीं**—उअ. १ अथवा; किंवा; संशयबोधक अव्यय. 'कीं प्रेम पीयुष मयंकु। परीपूर्ण जे।' –ऋ २७. 'भासति कुरुभटवारथदवदहनग्रस्त कुंज रानीं कीं। कपिहतलंकागृह ...।' –मोकर्ण ३७.३३. 'कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें।' –मो संशयरत्नमाला ३. २ प्रश्नावर जोर देण्याकरितां प्रश्नाच्या शेवटीं पुष्कळदां योजतात. निश्चय दाखविण्यासाठीं किंवा आश्चर्य दाखविण्यासाठींहि योजतात. जसें:–मी देतों कीं, =मी देत आहें तुला दिसत नाहीं? येतोस कीं; जातोस कीं. 'म्हणे अधिक याच कीं अखिल याचकीं हावरा।' –केका १२. याला पुष्कळदां रे जोडतात जसें:–आलों कीं रे; जातों की रे, बसतों, कीं रे. ३ काय. 'पाठ व्रतबंध कीजे। हें कीं वैराग्य देवाचें' –शिशु ७००. [सं. किल]

**कीं**—अ. स्वरूपबोधक अव्यय; जे; असें. 'ते बोलले कीं आम्हांस यावयास बनणार नाहीं.' [सं. यत्; फा. के]

**की**—न. पिंगळया(पक्षी)च्या कु, की, किलबिल, किचीबिची या चार स्वरांपैकीं दुसरा स्वर. [ध्व.]

**कीकट**—पु. एक देश; मगधाचें प्राचीन नांव. [वै. सं. –ऋग्वे ३.५३.१४.]

**कीक(का)ट**—पु. आवाज; ओरडणें. 'आणि कीकाट गजांचे।' –वेसीस्व ४.२३. [ध्व]

**कीकस**—न. हाड. 'त्वत्तोयीं जरि स्वल्प कीकस पडे पापी कृती तो घडे। तो देवेंद्रपदा चढे सुरवधूसंभोग त्यातें घडे।' –निमा (भागीरथीस्तोत्र)१.१७.

**कीच**—स्त्री. दुःखाची आरडाओरड. [ध्व.]

**कीचक**—पु. वेळु; बांबू. [सं.]

**कीचक**—पु. विराट राजाचा शालक. [सं.]

**कीजत**—क्रि. १ करीत असत; घडत असे; केलें जातें. 'स्थूल देहें कीजत असिजे।' –विउ ९.१०६. 'तरी तिहीं येतुला अवसरी। काय कीजत असे येरयेरीं।' –ज्ञा १.८७. [सं. कृ]

**कीजे**—क्रि. करावें; केलें जावें. 'कृष्ण कथेचें आलें कीजे खोलु।' –शिशु २२. 'आपण वज्राचे यां बोलिजे। वरी घडे तरी कीजे।' –ज्ञा १.२१६. 'कीजे कृपा साउली।' –निमा १.१३. 'त्वां कीजे भस्म सधनु तो मंद।' –मोकर्ण ७.१६. [सं. कृ कर्मणि विधि लिंग्–क्रियते]

**कीजो**—क्रि. करा. 'अपराधी मी मज लागून। क्षमा कीजो।' –गीता १.१८. [सं. कृ]

**कीट**—न. १ घाणीचा थर; किटण (गुडगुडीच्या नळींतील, शरीरावरील, वस्त्रावरील); चिकटा; खळ. किटण पहा. २ मातीचें मोठें आणि कठिण ढेंकूळ (जमीन नांगरतांना निघालेलें.) ३ (राजा.) ठिणगी; किटाळ. ४ हिणकस सोनें. 'आत्मानात्मकिटा। पुटें देउनी।' –ज्ञा १३.१०३५. ५ जळलेली धातु; जळकें लोखंड. [सं. किट्ट]

**कीट**—क्रिवि. काळा या शब्दाचें आधिक्य दाखविण्यासाठीं त्याच्या पुढें किंवा मागें योजतात. जसें-काळाकीट. ' वरी अंतराळें नभीं कीट काळें।' –दावि २५४.

**कीट**—पु. १ कीटक; किडा. ' तेथ कृमि कीट लोष्ट।' –ज्ञा १८.२४२. ०**स्थिति**–स्त्री. अंडस्थितीनंतरची कीटकावस्था; ' अंड्यांतून सुरवंटासारखा लहानसा किडा बाहेर पडतो, तो जलद वाढतो व वाढतांना अनेक वेळां कात टाकतो. या स्थितीस कीटस्थिति म्हणतात. ' –प्राणिमो १००.

**कीट**—न. (गो.) सुपारी शिजविलेलें पाणी; कट पहा. २ (कु.) लहान मूल.

**कीट**—पु. १ (व.) कृपण; कंजूष माणूस.

**कीटक**—पु. किडा. सबंध प्राणिशास्त्रांत हा वर्ग मोठा आहे. यास षट्पद म्हणतात. झुरळ, टोळ, माशी, पिसू, पतंग, विंचुळ, पोरकिडा वगैरे या वर्गांत येतात. हे जल, स्थल, आकाश वगैरे सर्व ठिकाणीं असतात. –ज्ञाको क ५०५. अनेक वेगळे वेगळे १५ ते २० भाग एकत्र जडून झालेला कीटक हा प्राणी असतो. त्यांमध्यें डोकें, छाती व पोट हे तीन भाग स्पष्टपणें भिन्न असतात. –प्राणिमो ९८. यांना शिंगें व पंख बहुधा असतात, शिंगांनीं स्पर्शज्ञान होतें, अन्न शोषण्यास नळीसारखी सोंड असते, सहा पाय असतात. –प्राणी आणि आरोग्य. पृ २१. 'कृमिकीटक पांडुमुता।'–ज्ञा १३.२५५. [सं.] ०**भक्षी**–पु. किडे खाणारे सस्तन प्राणी. ०**योनि**–स्त्री. किड्यांचा वर्ग, जात; जीवजंतु.

**कीटण**—न. किटण पहा.

**कीटी-कीटकी**—स्त्री. आळी; किडा. ' भृंगी जड कीटी मूढ।' –एभा ७.३६. ' चिंतितां कीटकी भिंगुरटी। तेचि ते होऊनि उठी।' –एभा ७.९९. [सं. कीटक]

**कीड**—स्त्री. १ सामान्यतः कीटक. २ लहान किडा. [सं. कीट; सीगन कीरी] ०**लागणें**–१ किड्यानें खाऊन पोकळ, खराब करणें (धान्य, फळ वगैरे). २ (ल.) उतरती कळा लागणें; क्षय पावणें. ' देशाचा विचार करणारीं माणसें निपजलीं नव्हतीं तोंपर्यंत देशास कोठें कीड लागली आहे हें समजणें कठिण होतें. –टिव्या. ०**खाद्**–वि. किडलेलें; किड्यांनीं खाल्लेलें. ०**भुंगी**–स्त्री. कृमि; कीटक; किडा; वाळवी; (सामान्यतः कोणताहि किडा). [किडा+भुंगी]

**कीड**—वि. १ खोटें; वाईट. ' तैसें शुद्ध सत्त्वा आड। आहे रजतमाचें कवाड। तें भेदणेंयातें कीड। म्हणावें का।' –ज्ञा १७.३१२. २ मळ; गंज. ' कीड झाडावया दृष्टीं। रज देऊनि पाठीं पोटीं। सुवर्ण घालितां पुटीं। झळकत उठी निजतेजें।' –एभा १०.६३. [कीट]

**कीड(भांगर)**—वि. १ (गो.) अन्यधातुमिश्र (सोनें). २ कीट.

**कीडरूं**—न. साप. किरुडव, किडरू पहा.

**कीण**—पु. घोड्याच्या खुराचा मध्यभाग. –अश्वप १.६३.

**कीण**—न. (गो.) कोयनेल. [क्विनाइन]

**कीत**—न. (तंजा. म.) झाप. [ता. कीड]

**कीदृश**—वि. कशासारखा ? कोणासारखा ? कशा प्रकारचा [सं.]

**कीनाश**—पु. यम; मृत्यु. ' वपु न बहुत पोसावें यशचि सदा खाय ज्या न कीनाश।' –मोभीष्म ७.४५. [सं.]

**कीर**—पु. १ पोपट; रावा; राघू. ' समसुत मयूरमुखी वसनामा वससि जेविं कीरांच्या।' –मोस्फुटआर्या (नवनीत पृ. २५६). २ (राजा.) पाणकोंबड्यासारखा पक्षी. [सं. का.] ०**खाद्**–वि. १ पोपटानें खाल्लेलें. २ कीडखाद पहा. ०**मुख**–वि. पोपटाच्या तोंडासारख्या तोंडाचा (घोडा). हें अशुभ लक्षण समजतात. ०**वाणी**–स्त्री. पोपटासारखा मधुर शब्द.

**कीर**—स्त्री. (व. खा.) रेघ; ओळ. [उ. लकीर]

**कीर**—उद्गा. पराजयदर्शक शब्द. किर पहा. 'अझुनी कां थीर। पोरा न म्हणसी कीर।' –तुगा १६३. ०**करणें**–(व.) त्रासून सोडणें.

**कीर-रू**—क्रिवि. १ (काव्य) निश्चयेंकरून; खात्रीनें; खचित; खरोखर. ' कीरु तुम्हीं वीरूचि धाकड।' –शिशु ४८५. ' कल्पना कीर नसे।' –विपू २.७०. ' आतां येणेंसि कवण भिडे। हें पांडवसैन्य कीर थोडें।' –ज्ञा १.११९. ' आपणपें गिंवसी। हें कीर होय।' –अमृ ३.२१. ' नाहीं दुःखाचा लेश कीर।' –रंयोवा ६.३२५. [सं. किल्]

**कीरट**—(कों.) जनावराच्या अंगावरील मोठी ऊ. [कीटक?]

**कीरवल-कीरवें**—१ खेंकडा, 'तें एका कीरवलें देखिलें।' –पंच ४.९. [सं कुलीरक]

**कीरवा**—पु. डुकर. ' किरव्या नावडे कस्तुरी।' –तुगा ३१.४९.

**कीर्ण**—पु. किरण. ' जेथवरी सूर्याचें कीर्ण।' –वेसीस्व ३.९८. ' कीर्णावेढालें कडें।' –गीता १३.३४८. [सं. किरण]

**कीर्णा**—स्त्री. एक प्रकारचा लगाम. –अश्वप १८५.

**कीर्त-र्त**—स्त्री. किर्त; कीर्ति; प्रसिद्धि, ख्याति; [सं. कीर्ति.]

**कीर्तणें**—उक्रि. वर्णन करणें; गुण गाणें; स्तुति करणें; वाखाणणें. ' कविनीं तो सुबहु कीर्तिला भरत।' –मोआदि ११.८९. ' कीर्तित मातें अवधारी।'–ज्ञा ९.२११. [सं. कृत्–कीर्तय–कीर्तन]

**कीर्तन**—न. १ गाण्या-बजावण्यासह ईश्वराचें केलेलें गुणवर्णन; पौराणिक देवादिकांचें कथानक घेऊन तें भक्तिरसानें साक्या,

दिंड्या, यांच्या साहाय्यानें सांगणें; यांत पूर्वरंग व उत्तररंग असे दोन भाग असतात. पूर्वरंगांत एखाद्या संतानें केलेला तत्त्वबोध नाना प्रसंगांसह सांगून उपदेश करतात व दुसऱ्या उत्तररंगांत एखाद्या राम, कृष्ण इ० श्रेष्ठ पुरुषाच्या चरित्रावर आख्यान लावून त्याच्या आयुष्यांतील प्रसंग गद्यपद्यादि प्रकारानें सांगतात व शेवटीं आरती होऊन सर्वांना प्रसाद वांटतात. 'सगुण कथा या नांव कीर्तन।' –दा ४.२.२३. २ ईश्वरनामोच्चार करणें. [सं.] ०भक्ति–स्त्री. देवाची स्तुति नेहमीं करावी अशा आशयाची भक्ति जी ती; नवविधा भक्तींतील एक प्रकार. [सं.] ०रंगण–न. कथेची बैठक. 'कीर्तन रंगणीं ठाकले।' –दावि २८०.

**कीर्तनी**—पु. (गो.) कीर्तन करणारा; चालचलाऊ हरिदास.

**कीर्तनीय**—वि. वाखाणण्यास, प्रशंसा करण्यास योग्य; वर्णनीय. [सं.]

**कीर्तवडा**—पु. वाईट प्रकारची कीर्ति; अपकीर्ति; कुप्रसिद्धि बोभाट. [सं. कृत्]

**कीर्ति-र्ती**—स्त्री. लौकिक; ख्याति; उत्तम प्रसिद्धि; नांव. 'हे असतिये कीर्तीसी नाशु। आणि परत्रिकासि अपभ्रंशु।' –ज्ञा २.२०. 'कीर्ति प्रगटली दूरच्या दूर। प्रतिष्ठा थोर वाढली।' [सं. कृत्–वर्णन करणें] **कीर्तित**–वि. प्रख्यात; विख्यात; वाखाणलेला; प्रशंसिलेला. [सं.] **कीर्तिमान्- वान-वंत**–वि. प्रख्यात; विख्यात. [सं.] ०**मुख**–१ देवळाच्या उंबरठयावर, दोन शिंगें असलेल्या राक्षसाचें कोरलेलें मस्तक. प्रथम याचें दर्शन घेऊन मग देवळांत जाण्याची रीत आहे. 'तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया। ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया।' –ज्ञा १५.५२६. २ वरील आकाराचा दंडावर बांधावयाचा एक दागिना, अलंकार. 'बाहुदंडीं कीर्तिमुखें। हस्तकंकणें दिव्य सुरेखें।' –ह ३.१६२ ०**स्तंभ**–पु. जय वगैरे मिळाल्यावर त्याच्या स्मरणार्थ बांधलेला मनोरा. 'मदनाचे कीर्तीस्तंभ पार्ण्हेले।' –शिशु ६१७.

**कीर्त्य**—वि. कीर्तण्यास, वर्णन करण्यास योग्य. [सं.]

**कीर्द-सार, कीर्दावा, कीर्दी**—किर्द पहा. (क्रि० करणें.)

**कीर्म-वाताळें**—किर्म वाताळें पहा.

**कील**—पु. १ मेख; खिळा; पाचर; अडसर; बहुधा जात्याच्या खुंटयास म्हणतात. २ गुडगुडींत सांचलेला मळ; मशेरी. ३ शंकु (छायायंत्रावर सावली पाडणारा). [सं. कील्=बांधणें]

**कील**—न. १ (तंजा.) डामर. २ (तंजा.) वंगण. ३ (तंजा) बिजागरी.

**कीलक**—पुन. १ जात्याचा खुंटा. २ खुंटी; खिळा; पाचर वगैरे. [सं.]

**कीलखाना**—पु. (हिं.) किरकोळ जिनसांची रास व ती ठेवण्याची जागा; अडगळीची खोली. [कीलकानटा]

**कीलना**—स्त्री. निश्चय. 'मननांतरें आणि कीलना। हीं उपक्रम लिंगें जाणा।' –मह्किथा १६.३०. [सं. कीलना]

**कीलवाणी**—वि. केविलवाणी पहा.

**कीलाकृति**—वि. खिळयाच्या आकृतीसारखें; बाणाच्या टोंकासारखें; (इं.) क्युनिफार्म. [सं. कील+आकृति]

**की(कीं)व**—स्त्री. १ रडगाणें; केविलवाणी प्राथना; करुणा भाकणें. (क्रि० करणें; दाखविणें; भाकणें; येणें). २ दया; कृपा. 'कींव दाखविल्यावांचून दया येत नाहीं.' [सं. कृपा; प्रा. कीवा–कींव] (वाप्र.) ०**करणें-येणें**–एखाद्याचें रडगाणें ऐकून दया येणें, दाखविणें (दुर्बलता, अशक्तपणा इ० पाहून). **कींवची कानू**–एकदां दया दाखवून उपकार केला असतां सतत उपकार करावा अशी अपेक्षा असते तेथें योजितात. **म्ह०** ज्याची करावी कींव तो घेतो जीव. ०**काकळूत-काकुलती**–स्त्री. करुणेची याचना; दया; करुणा; काकळूत पहा. 'माझी कींवकाकळूत तुम्हांला यऊं या, अथवा कोण करणारा!' 'भाका बहुता रीती। माझी कींवकाकलुती।' [कींव+काकळुत]

**कीश**—न. माकड. 'कोण कीश तव नांव कथीं।' –निमा १.४. [सं.]

**कीशाली**—स्त्री. वानरांचा समुदाय. 'कीशाली ढग ढीगसे जलदसे भल्लूक मल्लावली।' –आसेतु १०. [सं. कीश+आवली]

**कीस**—पु. १किसणीनें किंवा खवणीनें खवलेला चुरा, भुगा. [किसणें] –स्त्री. २ (कु.) नारळाची शेंडी. [केश] ३ (रसायन) कानशीनें घांसुन निघालेला चुरा. (इं.) फायलिंग्स. ०**काढणें-काढीत बसणें**–बारकाईनें चर्चा करणें; त्याच त्याच गोष्टी फिरून बोलणें.

**कीळ**—न. तेज; चमक (रत्नांची); किरण; प्रभा. 'पिंगटा जटैची कीळ फांकिनिली। दाहीं दीसी।' –शिशु ४३. 'किळेवरि माणिकें। लोपिजे कांहीं।' –ज्ञा १४.१२३. 'रत्नखचित मुगुटीं झळाळ। नाना सुरंग फांकती कीळ।' –दा १.२.१४. [सं कीला=ज्योत]

**कीळ**—स्त्री. (गो.) अंबर.

**कु**—स्त्री. पृथ्वी. (समासांत) कुगति=पृथ्वीची गति; कुछाया=पृथ्वीची छाया; कुज्या=पृथ्वीच्या परिघ खंडाची ज्या. [सं.] ०**परिधि**–पु. पृथ्वीचा परिघ. ०**पर्यटन**–न. पृथ्वीपर्यटन; पृथ्वीवर प्रवास करणें. ०**प्रदक्षिणा**–स्त्री. पृथ्वीपर्यटन; पृथ्वीला फेरी घालणें ०**वृत्त**–पु. पृथ्वीचा परिघ. ०**व्यास**–पु. पृथ्वीचा व्यास.

**कु**—क्रिवि. वाईटपणा दाखविणारें, अपकर्ष सुचविणारें अव्यय; हें संस्कृत भाषेंत पुष्कळ वेळां समासांत नामांच्या पूर्वी योजितात. तितकें मराठी भाषेंत नामांना लावीत नाहींत. म्हणून दिलेले मराठींतील कु लावलेले शब्द नमुन्यादाखल समजावे. ' आणि कुकर्मी संगति न व्हावी । ' –ज्ञा २.२६६. [सं.]

**कुआ**—पु. (हिं.) विहीर. [सं. कूप]

**कुआड**—स्त्री. (ताल) कोणत्याहि तालाच्या आडीची केलेली दीडपट.

**कुआंर**—पु. कुवार पहा. [सं. कुमार]

**कुइजट**—वि. कुजलेलें. ' बहुत दिवसांचें पात्रसाधन । झालें होतें कुइजटपण ' –नव २४.२५. [कुजट]

**कुइटार-रु**—न. १ गवताच्या, माडाच्या वगैरे शाकारणीसाठीं विणलेल्या सांवळ्या. २ जुनें छप्पर. –वि. (कों.) वरील सांवळ्यांनीं शाकारलेलें. [कुईट]

**कुइरा-री**—पुस्त्री. (कों.) कोंवळा फणस.

**कुइरी**—स्त्री. १ खाज उत्पन्न करणारी एक वनस्पति व तिची शेंग. हिच्या खाजरी व गोडी अशा दोन जाती आहेत. २ आंब्याची कैरी; कोंवळा आंबा, फणस. ३ शिरपेंचाची कलगी. ४ हळद, कुंकु वगैरे ठेवण्याची, आंब्याच्या आकाराची झांकणासह लहान डबी.

**कुइरें**—न. खाजकुइरीची शेंग.

**कुइला**—पु. १ खाजकुयली. हिची शेंग गाई, म्हशी यांच्या वासरांना जंतावर उपयोगी आहे. शेंगेवरील कुसें गुळांत घालून माणसांनाहि जंतावर औषध म्हणून देतात. २ लहान मुलांच्या गळ्यांतील एक दागिना.

**कुइली**—स्त्री. १ कुइरी अर्थ १, २ पहा. २ एक रानभाजी; हिची भाजी करतात.

**कुई**—स्त्री. १ (ध्वनि) कोल्ह्याची हुकी; कोल्ह्याची आरडाओरड; कोल्हेकुई. २ माणसांची आरोळी, आरडाओरड; कर्कश आवाज. (क्रि० घालणें). ' गनीम आला रे आला अशी एकच कुई होऊन जो तो घाबरेपणानें आपलीं हत्यारें व पोशाक गोळा करूं लागला.' –पटवर्धनांचे पराक्रम. ३ ससा, खार यांचा शब्द. ०**कुई करणें**–१ कर्कश गलबला करणें; आरोळी मारणें. २ (कु.) मुलांचें आनंदानें ओरडणें. [ध्व.]

**कुईट**—न. १ (कों.) नारळाच्या विणलेल्या सावळ्या; गवत. –वि. खोबरें किंवा धान्य सरदल्यामुळें किंवा कुजल्यानें त्यास येणारी घाण; अजीर्णाची घाण. ३ (ल.) एखाद्याचा दोष मनांत ठेवून तो प्रसंगीं काढावयाचा अशा कुत्सित स्वभावाचा (माणूस); कुत्सित व मर्मभेदक (भाषण). [सं. कुथ्=कुजणें]

**कुउडी**—स्त्री. (भि.) घार.

**कु(कुं)क**—स्त्री. (ध्वनि) कोंबड्याचें आरवणें.

**कुंकड**—पु. (गो.) कोंबडा. [सं. कुक्कुट; बं. कुकडा] ०**कुंभा**-(खा.) कुकुटकुंभा पहा.

**कुंकड**—न. पिंजाऱ्याचें कापूस पिंजण्याचें हत्यार.

**कुकडसों**—पु. (गो.) कोंबड्याच्या अंगावरील एक किडा. [सं. कुक्कुट]

**कुकडी**—स्त्री. जनावराचें ढुंगण; यिवकुकडी पहा.

**कुकडी**—स्त्री. (भि.) कोंबडी. 'एक कुकडी आथी.' –भिल्ली ९. [सं. कुक्कुट]

**कुकडे**—क्रिवि. (खान. व.) कोणीकडे ? ' कुकडे जास ' =कोणीकडे जातोस ? '

**कुकडें**—न. १ चातीवरील सुताची गुंडी; २ जनावरांच्या तोंडास होणारा रोग; यांत जिभेला मोठा फोड येतो.

**कुकडेकु**—न. १ लहान मुलांच्या खेळांतील शब्द; लपंडावांत सर्व मुलें लपल्यावर ज्यावर हार असेल त्यास सूचनेकरितां करावयाचा शब्द. २ कोंबड्याचें आरवणें. ३ (ल.) पोकळ बढाई. [ध्व.]

**कु(कुं)कणें**—अक्रि. (ध्वनि) कोंबड्याचें आरवणें; केकाटणें. ' वृक जंबुक नगरा आंत । दिवसां चौबारा कुंकात । ' –एभा ६.२८४. [ध्व.]

**कुकर**—पु. (हिं.) कुत्रा. ' म्हणें मी कुकर म्हणोनि भुंके । ' –एभा २१.२२५. [सं. कुक्कुर] ०**चाल**-स्त्री. घोडा किंवा कुत्रा यांची दुडकी चाल. [हिं.]

**कुकरणें**—क्रि. निंदा करणें [सं. कु+कृ]

**कुकरी**—स्त्री. कुत्री ? ' कुकरी शालाशाला कुणि त्याला उभी राहुं न देति अंगणीं । ' –ऐपो ३७०.

**कुकरी**—स्त्री. नेपाळांतील गुरख्यांचें, लहान तरवारी सारखें एक हत्यार.

**कुकर्म**—न. चोरी, चहाडी इ० वाईट काम; पाप; अपराध; व्यभिचार. [सं.]

**कुकर्मी**—वि. वाईट कृत्यें करणारा. [सं.]

**कुकल्पना**—स्त्री. दुष्ट अथवा वाईट विचार, कल्पना, बेत; शास्त्राविरुद्ध कल्पना. [सं.]

**कुकवाकू**—पु. मोर (पक्षी). [सं. कृकवाकु]

**कुका**—पु. १ (कों. बायकी) गर्भाधानाच्या दिवशीं जिचें गर्भाधान व्हावयाचें तिच्याकडून भर्त्याची पूजा करणें, विडया तोडणें इ० क्रिया भोंवतालच्या स्त्रिया करवितात त्यास म्हणतात. २ (राजा.) वयानें मोठा पण पोरकट माणसास उपहासानें म्हणतात.

**कुकाट**—न. (कु.) कोंबडा [सं. कुक्कुट]

**कु(कुं)काणें**—अक्रि. कोकलणें; ओरडणें. ‘ आडवाचि उडे मग कुकात । ’ –निगा ३०. ‘ भुंकती गाढव कुंकाति डुकर । ’ –दावि ३५८. [ ध्व. ]

**कुकाम**—न. ( कु. ) कुंकू [ सं. कुंकुम ]

**कुकारणें**—उक्रि. मोठ्यानें ओरडणें; हाका मारणें; हाका मारून बोलाविणें; हाक्मारणें; कोकलणें. [ ध्व. ]

**कुकारा**—पु. ( कु. कुकारो. ) आरोळी; ओरड; साद; लल-कारी. ( क्रि० करणें; मारणें; घालणें ). ‘ घाला घाला रे कुकारे । ’ –तुगा २३१. [ ध्व. ]

**कुकीर्ति**—स्त्री. अपकीर्ति; दुष्कीर्ति; दुर्लौकिक. [ सं. ]

**कुकुकु-कुकुचकु**—(ध्वनि) कोंबड्याचें ओरडणें. ‘ कुकुचकु कोण रे तूं ? ’ असें एक लहान मुलांचें गाणें आहे.

**कुकुची**—कुचकुची पहा.

**कुकुचीकाई**—( क. ) लहान मुलांचा एक खेळ.

**कुकुट**—पु. कोंबडा. [सं. कुक्कुट] **०कुंभा, कुकुडकुंभा -कोंभा, कुक्कुडकुंभा**–पु. भारद्वाज पक्षी; सोनकावळा. हा रंगानें काळा असून याचे पंख तांबुस काळया रंगाचे असतात.

**कुकुड-डे**—क्रिवि. कोणीकडे ? कुकडे पहा. ‘ मी तें मी तूं तें तूं । कुकुड हें लाडसी । ’ –तुगा १०२८. [ सं. कुत्र ]

**कुकुडसो**—पु. ( कु. ) कोंबडीच्या अंगावरील जीव, किडा, पिसू. कुकडसॉ पहा. [ सं. कुक्कुट ]

**कुकुत्-द्**—स्त्री. बैलाचें वशिंड. [ सं. ककुद् ]

**कुकुबाळ**—पुन. १ लहान मूल. २ कुका अर्थ २ पहा.

**कुकुभ**—पु. ( राग ) गायनशास्त्रांतील बिलावलाचा एक प्रकार; एक राग. ह्या रागास षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाती संपूर्ण संपूर्ण. वादी पंचम, संवादी षड्ज, गानसमय दिव-साचा पहिला प्रहर.

**कुंकुम**—पु १ केशर. ‘मोतियांचें घोंपे । रांविलें कुंकुमरसें।’ –शिशु १७. २ कुंकू; पिंजर. [सं. कुंकुम] **०केशर**–पु. १ (कों.) रासतुरा; सोनमोहोर, गुल्मोहोर; एक झाड व त्याचें फूल. २ कुंकू, ३ केशर. **०पत्र-पत्रिका**–नस्त्री. मुंज लग्न, अथवा इतर मंगलप्रसंगींची निमंत्रणपत्रिका; हिच्यावर शुभचिन्हदर्शक कुंकुम शिंपडतात. [ सं. ] **०रेखा-षा**–स्त्री. कपाळावर ओढलेली कुंकवाची रेघ, चिरी. [ सं. ] **०वृक्ष**–पु. ( कों. ) कमळ; शेंदरी, पुन्नाग; एक झाड. बंगाल, संयुक्तप्रांत, पंजाब यांत होतें. याच्या-पासून कुंकुमचूर्ण तयार करतात. रेशमी कपड्यांना नारिंगी रंग देण्याकरितां या चूर्णाचा उपयोग होतो. –ज्ञाको क ५१७. [ सं. ] **-मागर-रु**–पु. तांबडा चंदन; रक्तचंदन. –कृषि ७८१. [ सं. ]

**कुकुरडा**—पु. ( कु. ) कोंबड्याच्या अंगावर पिसवा पडून होणारा रोग. [ सं. कुक्कुट ]

**कुकुला-ली-लें**—वि. लहान बाल; छकुला-ली-लें. [ दे. कुकुला=नववधू ]

**कुंकू**—न. हळदीच्या कुड्यास लिंबू, टाकणखार इ० चीं पुटें देऊन रंगवून त्याची केलेली लाल पूड. हें कुमारिका व विवाहित स्त्रिया आपल्या कपाळास लावतात. हें तेलांत मिसळून डबींत भरून ठेवतात. ‘ बायकांना जसें कुंकू तसें पुरुषांना स्वातंत्र्य ’ –द्रौ ५६. [सं. कुंकुम] (वाप्र.) **०अधिक होणें-वाढणें**–कुंकू कमी होणें, संपणें, पुसटणें. **०जाणें**–१ वैधव्य येणें. २ (ल.) भरभराट, कीर्ति, उत्कर्ष यांस ओहोटी लागणें (धंदा व्यापार इ०). **०पुसून शेण लावणें**–(कुण.) ( सधवेनें ) नवऱ्याला सोडचिठ्ठी देऊन पाट लावणें; विधवेनें दुसरें लग्न करणें. **०बळकट होणें**–पुष्कळ दिवस सौभाग्य टिकणें; नवऱ्याला दीर्घायुष्य होणें. **०लावणें**–( खा. ) वधू पाहाण्याच्या वेळीं मुलाच्या बापानें अगर दुसऱ्या वडील माणसानें वधूला साखरपुडा देणें. ‘ शेनफड्याच्या पोरल्ये कुकू लावाल्ये मीन् माह्या भासा धरनगायी गेल्तु ’ (खानदेशी) **०सरसें होणें-करणें**–सौभाग्य कायम राहणें; टिकणें. **०संर-क्षणें-संरक्षण करणें**–सौभाग्याची काळजी घेणें; नवऱ्याची काळजी वाहणें; जपणें. **म्ह०** बोडकीला कुंकू वांझेला कातबोळ कशाला पाहिजे ? =विधवेला कुंकवाची उठाठेव कशाला ? सामा-शब्द– **-कुंकवाचा(ला)धनी**–पु. नामधारी, सत्त्वहीन नवरा, मालक. ‘इंदु–मला कुंकवाला धनी पाहिजे.’ –भा ९०. **कुंकूगोप-चंदन**–न. १ (ल.) मिश्र विवाहाची संतति. २ ( ल. ) चांगला न शिजलेला, गोळा झालेला भात.

**कुकूणक**—पु. दुधाच्या दोषामुळें मुलांच्या डोळ्यांना होणारा एक रोग; यानें डोळे खाजतात व त्यांतून पाणी येतें, डोळे उघडतां येत नाहींत. –योर २.६५३. [ सं. ]

**कुकूम**—न. ( गो. ) कुंकू.

**कुंकोत्री**—स्त्री. कुंकुमपत्र पहा.

**कुकोबा**—पु. बायक्या; पोरकट माणूस; मेषपात्र; नाबलि; भोलानाथ; अजागळ.

**कुक्कुट**—पु. कोंबडा ( पाळलेला अथवा रानटी ). [ सं. ] **०युद्ध**–न. कोंबड्यांची झुंज. [ सं. ] **–टासन**–न. योगशा-स्त्रांतील एक आसन. प्रथम पद्मासन घालून नंतर दोन्ही हात मांड्या व पोटऱ्या यांमधून बाहेर काढावेत व दोन्ही हातांचे पंजे जमिनीवर टेकून त्यांच्यावर शरीराचा सर्व भार तोलून मांड्या जितक्या वर उचलतां येतील तितक्या उचलाव्या व शरीराचा सर्व भार सांभाळावा. –संयोग ३३६. [ सं. ]

**कुक्कुर**—पु. कुत्रा. ‘ इतक्या पावसांत, अंधारांत जाणारा एकच चाकर कीं कुक्कुर. ’ [ सं. ]

**कुखावर्त**—वि. दोन्ही कुशींवर केसांचे भोंवरे असणारा (घोडा). हें शुभ लक्षण समजतात. –अश्वप १.९४. [सं. कुक्षि+आवर्त ]

**कुगणें**—क्रि. (बे.) ओरडणें; हाक मारणें. [ ध्व. ]

**कुगला**—पु. (बे.) कोंवळा फणस.

**कुगार, कुंगार**—न. भिक्षेकऱ्यांचा तांडा, जमाव. –वि. गरीब; कंगाल; क्षुद्र (माणूस, गांव). 'बदसुरत कुगार असिल्या तरी घरिच्या पोरग्या द्यावयासी कोण्ही रजावंद होत नाहीं.' –पेद ८.३६. [ कु=वाईट+कार–गार ]

**कुग्रह**—पु. अनिष्ट ग्रह; अशुभ ग्रह; रवि, मंगळ, शनि, राहू, केतु, यांना अशुभ ग्रह समजतात. [सं. ]

**कुग्राम**—पु. आडगांव; खेडें; वाटसरूंची जेथें गरज भागत नाहीं व जेथें अग्निहोत्री, वैद्य, सावकार, नदी हीं नाहींत असें खेडें. 'ग्राम कुग्राम पुऱ्या अग्रहारें।' –आपू १०. [ सं. कु=वाईट+ग्राम=गांव] ०**वस्ती–वास**–पुस्त्री. खेड्यामध्यें राहाणें; स्थाईक होणें. कुभोजन, कुलहीनसेवा, क्रोधमुखी भार्या व कुग्रामवस्ती या चार वाईट गोष्टी आहेत. (क्रि० करणें; काढणें; कंठणें; सोडणें.) [सं. ]

**कुंग्न्या**—वि. (व.) हलकट; दरिद्री; कवडीचुंबक (माणूस). [ कुंगार ]

**कुच**—पु. स्त्रीचा स्तन; पयोधर; थान. 'कटा मियां चाटिला। कुचस्वेदु। –ज्ञा १३.५३९. 'कुच सुकुंकुमचर्चित चांगले।' –वामन रुक्मिणीविलास २९. [सं. कुच्=संकोचपावणें; पो. जि. कुचास] ०**कसणी**–स्त्री. चोळी. 'वसन आणि कुचकसणी फेडुनि।' –अमृत २४. ०**कुंभ**–पुअव. (काव्य) मोठाले स्तन. [सं. ]

**कुच**—पु. कूच पहा.

**कुचकट, कुचका**—वि. कुजका पहा.

**कुचकणें**—सक्रि. (व.) टोचणें; भोसकणें.

**कुचकामाचा**—वि. (हिं.) अगदीं निरुपयोगी (निषेधार्थी षष्ठ्यंत प्रयोग). [ हिं. कुछ् काम का नही. ]

**कुचकुच–कूच**—स्त्री. कुजवुज; हलक्या स्वराचें भाषण; अप्रगट भुमका. 'कुचकुच सखयांची अन्यथा देखियेली।' –सारुह ३.६१. २ बाजारगप्प; अफवा. [ ध्व. सं. कुज्–अव्यक्ते शब्दे. ] ०**कुचकुचणें**–अक्रि. कुजबूज करणें.

**कुचकुची**—स्त्री. जोंधळयाचा एक प्रकार; दुधमोगरा; याचा हुरडा फार उत्तम लागतो.

**कुचकुचीत**—वि. (गो.) फार; पुष्कळ; गर्द.

**कुचकुली**—स्त्री. (राजा.) गुदगुली. (क्रि० करणें; होणें.)

**कुचंडा**—वि. (माण.) चिक्कू; कृपण.

**कुचड्डी**—स्त्री. (व. ना.) घाणेरडा बोल, गल्ली; अडचणीची जागा; बेपट. [ फा. कूचह्=बोळ ]

**कुंचडें, कुचडें, कुंचड**—न. १ लहान मुलांचें किंवा बायकांचें (बाळंतपणांतील) डोकीस घालावयाचें टोपडें; लहान कुंची. २ (ल.) संकुचित व गैरसोयीचें घर. 'हें कुंचडें घर आहे.' [ सं. कुच्=संकोच पावणें ]

**कुचणी**—स्त्री. हातभर लांबीची पहार; सबल.

**कुंचणी, कुचणी**—स्त्री. १ डुकराच्या केसांची कुंचली; कोष्ट्याची कुंचली. २ कुंची अर्थ २ पहा.

**कुंचणें**—उक्रि. कुंचलीनें साफ करणें. [ कुंची ]

**कुचंदन**—न. रक्तचंदन.

**कुचंद्या**—स्त्रीअव. (व.) खोड्या; कळ. 'लहान मुलाच्या कुचंद्या करतो.'

**कुचनिंदा–दी**—स्त्री. कुचेष्टा, कुचाळ्या; व्यंगोक्ति; वाईट आरोप करणें (क्रि० करणें.) कुचिंदी–कुचविंधी पहा, या शब्दांचा एकमेकांऐवजीं जरी उपयोग करतात तरी ते अगदीं समानार्थक मानलेले नाहींत. [ सं. कुत्स्=निंदा करणें ]

**कुचंबण–मण–णी, कुचंबन**—स्त्री. १ रोग इ० कारणानीं आलेली कष्टप्रद अवस्था; दुःखाची व पराधीनतेची स्थिति. 'ते परिमळ पाल्वी साहे कुचंबनें। श्रीचक्रधराचें।' –शिशु ६९०. २ त्रासदायक स्थिति; खोळंबा; अटकाव; अडचण; पंचाईत. [ सं. कुच्=संकोच पावणें. ]

**कुचंब(म)णें**—अक्रि. १ दुःखांत किंवा पराधीन स्थितींत तळमळणें; संकोचणें. २ त्रासदायक अडचणींत पडणें, येणें; लादलेला त्रास, अटकाव यापासून दुःख होणें; त्रास, दुःख खोटी होणें; आडकाठी येणें; अडचणींतून सुटका न होतां दुःखांत कांहीं काळ काढावा लागणें. ३ कोमेजणें –शर. ४ चुरडणें; चुरगळणें, 'कां कमळांवरी भ्रमर। पाय ठेवती हळुवार। कुचंबैल केसर। इया शंका।' –ज्ञा १३.२४७ [ सं. कुच्=संकोच पावणें ]

**कुचबीं**—क्रिवि. (व.) हिशोबांत. 'इतकें काम त्याच्या कुचबीं नाहीं.' [ हिं. कुच भी=कांहीहि ]

**कुचमण**—स्त्री. (गो.) कुचंबणा; कुचंबण–मण–णी पहा.

**कुचमुचें**—सक्रि. १ (गो.) कुचंबावयास लावणें. कुचंबणें. पहा.

**कुचमुचें**—सक्रि. (गो.) पोटांत गुरगुरणें. [ ध्व. ]

**कुचर**—वि. १ कामचुकारू; कपटी; बुद्ध्या एखादें काम वाईट रीतीनें करणारा; अंगचोर. 'जैसे कां कुचर घोडें। बरें दिसे परी आडवीं अडे।' –एभा १३.१३४. 'कुरें कुचर नठ्याळ।' –दा २.३.२३. 'कुटिल कुचर वादी निंद्य।' –तुगा २२६०.

२ (ल.) दुर्मुखलेला; द्वेषी; खुनशी. ३ न शिजणारा; मउ न होणारा; कठिण (कडधान्यांतील दाणा). ४ त्रास देणारा; लुच्चा; वाईट; खडतर (खडकाळ रस्ता, दुर्बोध लिखाण, गिचमिड पुस्तक इ०); खचरट (मागं.), [सं. कु+चर्]

**कुचर**—पुन. चाड; धान्यांतील न शिजणारा दाणा; न कांडतां येणारा दाणा.

**कुचर**—पु. बटाटा जमिनींत तयार होत असतांना त्यावरील माती निघून तो उघडा पडला म्हणजे हिरवा होतो त्यास म्हणतात.

**कुचराई**—स्त्री. अंगचोरपणा; अप्रामाणिकपणा; टंगळमंगळ; अळंटळं; (काम, धंदा, व्यापार, यत्न यांमध्यें) कसबचोरपणा. [कुचर]

**कुचलणें**—उक्रि. १ ओबडधोबड रीतीनें पीठ करणें, भरडा करणें; फोडणें; चिरडणें. २ मारणें; टोकणें; टेचणें; चेचणें; सडकणें. 'त्याला खूप कुचलला.' [हिं. कुचलना. ध्व.]

**कुंचलणें**—अक्रि. कुंचलीनें साफ करणें, झाडणें. [कुंचा]

**कुचला**—पु. काजरा; कोंकणांत होणारें एक मोठें झाड. याच्या बिया कडू असून विषारी असतात. बिया वाटोळ्या व फुगीर असतात. या औषधी आहेत. यापासून स्ट्रिक्नीन व ब्रुसाइन हे महत्वाचे अल्कलाइड तयार करतात. कुचल्याचें विष पोटांत गेल्यास धनुर्वाताचीं लक्षणें होतात. त्याचें सत्त्व हृदयास उत्तेजक, सूक्ष्मवाहिन्यांचा स्तंभ करणारें आहे. कुचल्याचीं पानें जनावरानें खाल्ल्यास जनावर मरतें. 'त्यजुनि सहकार पिकला पिक लाजेना वरावया कुचला।'—मोसभा ३.४९. **कुचलिन**—न. स्ट्रिक्नीन. **कुचली**—स्त्री. कुचल्याची बी.

**कुचला**—पु. संधला. 'विरलेल्या फकीच्या चुन्यांत समभाग विटेची पूड घालून कुचला तयार करावा.'—मॅरट ११३.

**कुंचला**—पु. रंग देण्याची मोठी कुंचली अथवा ब्रश; डुकराच्या मानेवरील केसांची तारेंत बांधलेली कुंचली (दागिने स्वच्छ करण्याची). [सं. कूर्च]

**कुचविधी-ध्या, कुचिंदी-द्या**—स्त्रीअव. चीड येण्याजोग्या भाषणानें काढलेली खरडपट्टी; उपहास; टवाळी; टर; हेटाळणी; व्यंग काढणें. (क्रि० करणें). कुचंदी, कुचनिंदा पहा.

**कुंचळणें**—अक्रि. (मोराला). पूर्ण पिसारा येणें, फुटणें. [कुंचा]

**कुचा**—पु. खराब झालेली जरतार.

**कुचा, कुच्या, गुच्चा**—पु. १ खोमा; पोंचा; किंचित खळगा; लहान भोंक (भोंवरे खेळतांना भोंवऱ्यांनीं पाडलेलें). (क्रि० मारणें). २ आंगठ्याजवळच्या बोटानें मारलेला टचका. **कुचे मारणें**—वादविवादांत टोमणा मारणें.

**कुंचा**—पु. १ मोराच्या पिसांचा कुंचला, मोर्चेल. 'उभिला जैसा देउळीं। जाणोनि कुंचा।'—ज्ञा १३.६५८. २ मोळ गवत, डुकराचे केस, ताड व इतर झाडांचीं पानें यांची केरसुणी. ३ विणकरांचा सुतास खळ लावण्याचा कुंचला, हा झाडाच्या बारीक मुळयांचा केलेला असतो. सुतास पांजण केल्यावर ह्यानें सूत साफ करतात. सामान्यतः चितार्यांच्या कुंचल्यासहि म्हणतात. [सं. कूर्च; कुच्=संकोच पावणें; सीगन कुच=पुंजका; ते. कुंचे; का. कुच्चु=गोंडा]

**कुचाग्र**—न. स्तनाग्र; थानाची बोंडी. 'कुचाग्रावरी वर्षतें नेत्रपाणी।' [सं.]

**कुचाल**—स्त्री. दुराचरण; कुमार्ग; वाईट चाल. 'मित्रा त्वां कुचाल सोडून उत्तम चाल धरली.'—बाळ २.१९९. [सं. कु+चल्]

**कुचाल-का**—वि. कुचाळी करणारा.

**कुचाळकी, कुचाळा, कुचाळी**—स्त्रीपु.स्त्री. टवाळकी; थट्टा. कुचविधी पहा. 'करुनि कुचाळा कोप तसा।'—आगो २३. [कुचाल]

**कुचाळखोर**—वि. कुचेष्टा करणारा; खोडकर; खट्याळ; त्रासदायक; निंदक; टवाळी करणारा. [कुचाल]

**कुंचाळणें**—उक्रि. कुंचल्यानें साफ करणें; उजळा, जिल्हई देणें.

**कुचाळो**—पु. (गो.) निंदा; मस्करी; खोडी. —वि. कुचाळी, निंदा करणारा.

**कुचि-ची**—स्त्री. किल्ली. 'मुक्तीचा दारवठा। उघडावेआं कुचिआं वंकटा।'—शिशु ४२०. [हिं. कुंजि]

**कुंचित(कपोल)**—न. (नृत्य.) नृत्यांत थंडी वाजणें, ताप आला असें दाखविणें; भय वाटणें वगैरे प्रसंगीं गाल आक्रसल्यासारखे दाखविणें. **कुंचित(करण)**—न. उजवा पाय पुष्कळ खालीं करणें व उजवा हात कुंचित करून डाव्या बाजूस उताणा करून ठेवणें. **कुंचित(दृष्टि)**—स्त्री. बाहुल्या व नेत्रप्रांत आकुंचित करणें, हा अभिनय अनिष्ट गोष्ट पाहण्याचें टाळण्याकरितां व डोळे दुखूं लागलेले दाखवयाचें असतांना करतात. **कुंचित(पाद)**—पु. नृत्यास उभें असतां एक पाय वर उचलून पावलाचा मधला भाग व बोटें आवळून घेणें. **कुंचित(पुट)**—न. नृत्यामध्यें खालच्या व वरच्या पापण्या एकमेकींजवळ आणून आकुंचित करणें; घाण, अप्रिय वस्तूचा स्पर्श, अनिष्ट वस्तुदर्शन यावेळीं हा अभिनय करतात. **कुंचित(मान)**—नृत्यामध्यें चवडे उचलून टांचांवर उभें राहिलें असतां सर्व शरीराचा भार खालीं दाबला जातो. अशा वेळीं डोक्यानें मान खालीं दाबली जाते ती मानेची स्थिति.

**कुचित-खोर-पात्र**—न. कुचेष्टा पहा. —वि. कुचेष्टेखोर. कुचिंद पहा. [सं. कुत्सित]

**कुचिद-खोर, कुचिदा-द्या, कुचनिंद**--वि. कुचाळी करणारा; निंदक; खोडकर; बेअब्रू करणारा; टवाळ. [ कुचिंदी ]

**कुचिंदी, कुचनिंदा, कुचुंदी**—स्त्री. १ आळ; आरोप; निंदा; बदनामी. २ उखाळयापाखाळया; व्यंग काढणें; कुचनिंदा, कुचविंधी पहा.

**कुचिद्या-चिद्या**—स्त्रीअव. हेटाळणी; टवाळी; आळ (विशेषतः लहान मुलांत रूढ ).

**कुची**--स्त्री. ( व. ) कुंची

**कुची**—वि. खोटी; लबाडीची; दिखाऊ. 'होती दृष्टी आंत उघडी आमची। बाहेरी ते वायांचि कुची झांकुं।' -तुगा ३८. [ सं. कूट ]

**कुंची**—स्त्री. १ लहान मुलांचें लहान टोपरें; लांब टोपरें; घुगी. २ रंगाऱ्यांचा; चिताऱ्यांचा, डुकराच्या केसांचा मोठा कुंचला. ३ विणकऱ्यांचा सुतास पाजण करण्याचा मोठा कुंचला. [ सं. कुच्= संकोच पावणें-कूर्च. का. कुच्चु=गोंडा; हिं. कुंची ]

**कुची भरणें**--क्रि. (व.) ठोकणें; मारणें. 'चांगली कुची भरूं कां?' [ ध्व.] **कुच्या**-स्त्रीअव. १ ( पाडणें या क्रियापदाशीं जोडून ) तुकडे करणें, खांडोळी करणें. २ जबर शिक्षा करणें; यथेच्छ कुटणें, या अर्थानें कुच्या ढिल्या करणें. ३ ( तोडणें क्रियापदास जोडून) (घोड्याच्या) मांडीच्या किंवा घोटयाच्या शिरा तोडणें. ४ ठोका; ठोसा. 'तुका म्हणे आतां लाज धरी बुच्या। टांचराच्या कुच्या मारा वेगीं।' -तुगा २९५१.

**कुचुंबणें**—अक्रि. कोमेजणें. 'कीं शिरसफूल अरुवार क्षणमात्रें कुचुंबी।' -ह २.१३५. [ सं. कुच्=संकोच पावणें ]

**कुचेदा**—पु. ( हिं. ) कारस्थान; मसलत -शर.

**कुचेष्ट(ष्टे)खोर, कुचिष्ट**—वि. टवाळखोर; कुचेष्टा करणारा; कुटाळकी करणारा. [ सं. कु+चेष्ट ]

**कुचेष्टा-कुचोदी**—स्त्री. कुचिष्टा; कुचिष्टाई; कुचाळी; कुचविदी; विडंबन; निंदा; थट्टा. 'कुचेष्टेवांचून प्रतिष्ठा वाढत नाहीं.' [ सं. कुचेष्टा ]

**कुचो**—पु. ( गो. ) झाडाचा शेंडा. कुंचा पहा.

**कुचोद्य**—न. १ कुचेष्टा. (क्रि० करणें). २ विकल्प; कुकल्पना; वाईट विचार. ( क्रि० काढणें ). ३ कुभांडी स्वभाव; कुटिल वृत्ति. 'त्याचे आंगी कुचोद्य आहे.' ४ **कुचोद्याचें पांखरूं**-कुचेष्टेखोर. [ सं. कु+चोद् ]

**कुच्चा**—पु. कुचा पहा.

**कुच्ची**—स्त्री. ( क. ) विणकऱ्याचा कुंचला.

**कुच्छरोटी, कुच्छ लंगोटी**—( हिं. ) कांहीं तरी अन्न आहे कांहीं तरी वस्त्र आहे अशी स्थिति; अतिशय बिकट परिस्थिति; दारिद्यावस्था.

**कुज**—न. १ क्षितिज. -पु. २ मंगळ ( ग्रह ). [ सं. ] **०पंचमी**-स्त्री. शुद्ध पक्षांत मंगळवारीं आलेली पंचमी. ही अशुभ मानतात. [ सं. कुज+पंचमी ] **०स्तंभ**-पु. १ ( अप. कुच स्तंभ ) मंगळाची आपल्या कक्षेतील एखाद्या नक्षत्रांत स्थिरता. २ ज्योतिषविषयांतील एक उपयुक्त योग (लौकिक दर्शक). [सं.]

**कुंज**—पुन. लतागृह; गुंफा; वेली वगैरेंनीं आच्छादित अशी जाळी; लतामंडप. [ सं. ] **०भुवन-स्थान**-न. लतामंडप; (क्रीडा वगैरे करण्यासाठीं उपयोगी). [ सं. ] **०वन**-न. १ कुंजभवन. २ गोकुळांतील श्रीकृष्णाचें क्रीडास्थान. 'हें कुंजवन अशी कल्पना कर.' -रासक्रीडा ३.

**कुंज**—पु. १ छपराच्या दोन पाख्यांनी झालेला आढयाचा कोपरा; चौकटीचा, रस्त्याचा, नदीचा कोपरा. २ छपराच्या कोपऱ्याच्या बाजूनें लावलेली गवताची झडी. [ फा. कुंझ= कोपरा. ]

**कुजकट, कुजट, कुझट**—वि. नासकट; वाशेरा; घुरट, नासलेला ( पदार्थ ). [ कुजका ]

**कुजकटाण, कुजटाण**—स्त्री. कुजलेल्या पदार्थाची दमट घाण, दुर्गंधी. [ कुजकट+घाण ]

**कुजका, कुचका**—वि. १ कुजलेला; सडका; नासका; २ ( ल. ) विश्वासघातकी; खोटा; कुत्सित; कपटी. [ सं. कुथ्= कुजणें ] **०कवंडल**-पु. ( ल. ) कुजक्या मनाचा; तिरसट; मत्सरी; खुनशी (मनुष्य.) **०नासका**-वि. घाणेरडा; निरुपयोगी.

**कुजडा**--वि. मनाचा कुचकट; मत्सरी; खुनशी. [ कुजणें ]

**कुंजडा**—पु. १ भाजीपाला विकणारी एक जात व तींतील व्यक्ति; केवटा. २ कृपण; कंजूष; हलका; क्षुद्र माणूस. [ हिं. कुंजडा ]

**कुजणें**—अक्रि. १ खराब होणें; सडणें; नासणें. २ ( सोंगटयांचा डाव) जूग न उठल्यामुळें, सही न झाल्यामुळें व कच्च्या फिरून आल्यामुळें पडलेलें दान सोंगटयांस लावतां येत नाहीं अशी स्थिति. कुजी पहा. [ सं. कुथ् ]

**कुंजणें**—अक्रि. शब्द करणें; गाणें. 'कोकिळा कृष्णवर्णे कुंजती।' -एरुस्व ३.९. 'विविध पक्षी कुंजती।' -जै ३.७०. [ सं. कुज्=शब्द करणें ]

**कुजं(जां)त्र**—न. प्राणघातक यंत्र. 'मज पांता घातैली कुजांत्रें।' -शिशु ८०१. 'आणि मज अमर करी। न मरेंचि शस्त्रास्त्रीं। काष्ठें कुजंत्रीं। नाहीं मरण।' -कथा १.२.५०. [ सं. कु+यंत्र ]

**कुजन**—पु. वाईट स्वभावाचा माणूस; दुर्जन; नीच मनुष्य. 'न निश्चय कधीं ढळो कुजनविघ्न बाधा टळो।' -केका ११९. [ सं. ]

**कुंजप्पा**—स्त्री. (सांकेतिक) गोफण. –गुजा ४२–४३.

**कुजबुज**—स्त्री. कुणकुण; हळु हळु बोलणें; अफवा; कंडी. [सं. कुज्=अव्यक्त शब्द करणें; कुज द्वि.]

**कुजबुजणें**—अक्रि. हळु हळु बोलणें; कुचकुचणें; पुटपुटणें. [कुजबुज, कुज्=अस्पष्ट शब्द करणें.]

**कुंजर**—स्त्री. एक प्रकारची रानभाजी. ही जोंधळ्याच्या शेतांत व बांधावर उगवते. कोंवळीं पानें व शेंडा यांची भाजी करतात.

**कुंजर-रु**—पु. १ हत्ती. 'कां जालें आंगधुणें । कुंजराचें ।' –ज्ञा १३.२३२. 'संगात कुंजर मस्त हत्ती ।'–ऐपो ११ [सं.] २ (समासांत) श्रेष्ठ; जसें–पुरुषकुंजर. ३ पक्षी; पिंगळा. [सं.] **०भार**–पु. गजदळ; हत्तींचें सैन्य. **०शौच**–न. गजस्नान. [सं.]

**कुंजरडा**—वि. कुंजडा अर्थ २ पहा.

**कुंजरा**—वि. १ एक भाजी; कुंजर पहा. २ भाजी विकणारा; कुंजडा अर्थ १ पहा. ३ कुंजडा २ पहा.

**कुंजरी**—स्त्री. १ हत्तीण. 'कां लवणाची कुंजरी ।' –ज्ञा १५.३१८. २ गजदळ; हत्तींचें सैन्य. [सं.]

**कुजविणें**—उक्रि. नासविणें; सडविणें. [कुजणें प्रयोजक]

**कुजघाण**—स्त्री. कुजकट घाण; सडलेल्या पदार्थाची घाण. [कुजट+घाण]

**कुजा-ज्या**—पु. १ खुजा, पाण्याचें मातीचें भांडें. २ मडकें; सुरई. [सं. कु+ज ? फा. कुजाह्]

**कुजांतर-रु**—न. कुयाडें; चेट्टक; कुजंत्र पहा. 'कुजांतरू नाहीं ऐसें । जेणें यां पुसेयांची दांतिखिळी बैसे ।' –शिशु ८४४. [सं. कु+यंत्र]

**कुंजारीण**—स्त्री. कुंजारी जातीची स्त्री.

**कुजी**—स्त्री. १ (बुद्धिबळांचा खेळ) राजास प्रतिपक्षीय मोहऱ्याचा प्रत्यक्ष शह तर नाहीं, पण शहावांचून मोकळया जागीं खेळावें म्हटलें तर तसें घर मोकळें नाहीं अशी बिनतोड आपत्ति येऊन डाव अडणें. या डावास बरोबरी मानतात. २ (सोंगट्यांचा खेळ) सोंगटी खेळावयास जागा नाहींशी होणें [कुजणें]

**कुंजी-जिका**—स्त्री. किल्ली; चावी. [हिं.]

**कुंजी**—वि. (व.) मोहोरका; पुढारी. [सं. कुंजर]

**कुंजीर, कुंजरु, कुंजुरु**—पु. कुंजर-रु पहा. एक वेलभाजी हिला पावसाळयांत बारीक फळांचे घोस येतात. फळाच्या बियांपासुन गर्द केशरी किंवा पिवळ्या रंगाचें तेल निघतें, तें खरजेवर लावतात. अफूच्या विषावर या पाल्याचा रस पाजतात.

**कुज्या**—स्त्री. (ज्यो.) ताऱ्याचा क्रांतिवृत्ताशीं कोन होतो त्याची ज्या. [सं.]

**कुझामिसरी साखर**—स्त्री. खडीसाखरेचा एक प्रकार. –कृषि ४८६.

**कुट**—न. (कों.) धान्यरूपानें द्यावयाचा हुंडा.

**कुट**—स्त्री. (गो.) हळकुंड; खुंटली; कुडें.

**कुटका-को**—पु. तुकडा; मोडलेला कटका (काठी, भाकर, नारळ, दोरी इ० चा). 'कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसे सर्वथा । कुटके जाले ।' –ज्ञा १६.३६८. 'तेथ कुटका एक यावया हाता ।' –एभा १०.३१०. **०तोडून देणें**–स्पष्ट नाहीं म्हणून सांगणें; निक्षून नाकारणें. [सं. कुट्ट्=कापणें]

**कुटकी**—स्त्री. औषधी वनस्पति; हें लहान झाड हिमालयावर ९ ते १५ हजार फूट उंचीवर विपुल होतें. हें फार वर्षे जगतें. याचें मूळ नरम असून पानें अर्धगोल, देंठाकडे बारीक व टोंकाकडे रुंदट, गुळगुळीत, कातरलेलीं असतात. झाडास निळया रंगाचे दाट घोस येतात. कुटकी फार कडु असून बहुतेक ज्वरावर काढ्यांत देतात. –वगु ७.६७. बाळकडु; हें सौम्य रेचक आहे. पाणथरी, जलोदर, कावीळ यांवर उपयोगी आहे. [सं. कटुका; हिं. कुटकी; गु. कडु; बं. कटुकी; का. केदारकटकी]

**कुटकी**—स्त्री. (कों.) लांकडी ढलपी; तुकडा; काटकी. [सं. कुटट्=कापणें]

**कुटकुट**—न. अपचन झालें असतां पोटांत होणारा आवाज. 'पोटांत कुटकुटतें.' [ध्व.]

**कुटकुटीत**—वि. (गो.) १ पूर्ण न शिजलेला. २ बारीक व सुदृढ शरीरयष्टीचा. [कुटका]

**कुटकें**—वि. तुटलेलें. [कुटका]

**कुटज**—न. कुडयाचें झाड. 'हें मोठें नवल अहो लाजविला पारिजात कीं कुटजें' –मोआदि ३२.७. [सं.]

**कुटण**—न. (ल.) ठोकणें; मारणें; बडवणें; फरमाशी मार देणें; हग्या मार देणें. (क्रि० काढणें; निघणें). [सं. कुट्ट्=कुटणें, कुट्टन; का. कॉट्टण; ते. कोट्टु]

**कुंटण**—वि. कुंटीण; मध्यस्थ स्त्री; जार व जारिणी यांचा योग घडवून आणणारी स्त्री. [सं. कुट्ट्=कुटणें, निंदा करणें; कुट्टिनी]

**कुंटणकी**—स्त्री. १ कुंटणीचें काम. २ कुटाळकी; चुगली; चहाडी. **०खाना**–पु. कोणतेंहि घर, जागा वगैरे कसब करण्यासाठीं इतर कोणत्याहि इसमास नेहमीं वापरूं देतात तो. –घका २६०. **०गिरी**–स्त्री. भडवेपणा; वेश्यांस त्यांच्या धंद्यांत मदत करणें व त्यावर निर्वाह करणें. **०मावशी**–स्त्री. चाहाडया सांगून नसत्या कलागती उत्पन्न करणारी स्त्री.

**कुटणें**—अक्रि. दुःख मानणें; कुढणें. 'हर्षे द्रोण न कोपे पुत्रोत्कर्षे कुटे न कुटिताहि।' –मोद्रोण. [सं. कूट; सीगन कुर]

**कुटणें**—उक्रि. १ चेचणें; चेचून बारीक करणें; पूड करणें. 'दांभिकता ही हळदी कुटा।' –मुआदि १.६५. २ (ल.) ठोकणें; पिटणें; मार देणें. 'कुटिल प्रजाहि जो गोपीडक तो ब्राह्मणा न कां कुटिल?' –मोविराट ३.५. ३ (ल.) एखाद्या विषयाची सूक्ष्म छाननी करणें; अतिशय चर्चा करणें. ४ (टाळ) वाजविणें. 'तूं कुटतोस कीं नाहीं रोज टाळ?' –नामना ६६. ५ (ल.) बलात्कारानें संभोग करणें. [सं. कुट्ट=कुटणें, ते. कोट्टु; फ्रेंजि. कुर]

**कुटणो**—पु. (कु.) लोखंडी बत्ता (कुटण्याचा).

**कुटतांदूळ**—पुअव. सडतांना कण्या होणारे तांदूळ; कण्या.

**कुटतुम**—पु. (कु.) काटकोन; गुण्या.

**कुटन**—न. (व.) दोन चन्हाटांच्या जोडावर बांधलेलें लांकूड.

**कुटरा**—वि. सडतांना कण्या होणारा (तांदूळ). [कुटणें]

**कुटला**—पु. (राजा.) कुटलेला भाताचा भुगा; कुंडा. [कुटणें]

**कुटलेश्वर**—पु. (गो.) कुटलाचा, आंगठ्याच्या पेराचा फटका.

**कुटल**—वि. (व.) ठोकळ.

**कुटा**—पु. १ लाह्यांचा चेचा; भुकटी. २ वाळलेल्या मासळीच्या कुटीचा भुगा. ३ (राजा.) फणसाच्या आठळींत मीठ, तिखट घालून केलेला भुगा, पूड. ४ पूड; भुकटी. ५ कारळे तिळांची कुटून केलेली चटणी. [कुटणें]

**कुंटा**—वि. लंगडा. 'काणाकुंटा व्याधिव्याप्त।' –एभा १३.२०६. [सं. कुण्ठ्=लंगडें असणें]

**कुटाई**—स्त्री. १ कुटण्याबद्दलची मजुरी. २ कुटण्याची क्रिया. [कुटणें]

**कुटाकुटी-कूट**—स्त्री. १ ठोकाठोकी; मारामारी; लठ्ठालठ्ठी. 'मीपणा होऊनि कुटाकुटी।' –दावि ३८८. २ वादविवाद; काथ्याकूट; बाचाबाची. ३ (सोंगट्या) मन लावून खेळणें; एकसारख्या खेळणें; त्यांत दंग होणें (उपहासानें). [कुटणें]

**कुटाणा**—पु. (कों. व. क.) त्रासदायक खटाटोप; अनेक उद्योगांचा एकदम अंगावर पडलेला बोजा; त्रास. [कुटणें]

**कुटार**—न. (खा. व.) धान्य काढलेल्या कणसांचा चुरलेला भाग (यांत शेंगांचीं टरफलें, झाडांचा पाला वेलाचे तुकडे मिसळलेले असतात); कूट. –बशाप ५२.१. [कुटणें]

**कुटाळ-खोर**—वि. कुटाळकी करणारा; निंदक; बेअब्रू करणारा; उपहास, टवाळी करणारा; कुचेष्टेखोर. [सं. कुट्ट=निंदा करणें; कुटिल; कूट+आळ]

**कुटाळकी, कुटाळी**—स्त्री. कुचाळी; कुचेष्टा; बेअब्रू.

**कुटाळखोरी-गिरी**—स्त्री. (कुण.) कुटाळकी.

**कुटि, कुटिका**—स्त्री. झोंपडी. 'आल्या मोडकळीला कुटिका तुरळक कुठें कुठें असती।' –विक १०१. [सं. कुटी]

**कुटिल**—वि. १ वांकडें; वक्र. २ (ल.) दुष्ट; निंदक. (समासांत) कुटिलबुद्धि-तर्क-दृष्टि-भाषण-भाषी-स्वभाव. 'तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपदेंहि कच साच' –मोकचोपाख्यान ५७ (नवनीत पृ. २६८). 'कुटिळ कुचरवादी निंद्य।' –तुगा २२६०. ३ अपकारी; द्वेषी; खोडकर; मत्सरी. ४ कुरळे (केंस) 'आइकें कुटिलालकमस्तका। धनुर्वेद त्रिंबका।' –ज्ञा १०.२१५. [सं. कुट्=वांकडा होणें, कुटिल=वक्र] ०देह–पु. व्यंग शरीर; खोडकर, दोषयुक्त शरीर. ०देही–पु. व्यंगशरीराचा माणूस.

**कुटी**—स्त्री. झोंपडी; (सामा.) पर्णकुटी; लताकुटी. 'आणि मनसर्पाची कुटी' –ज्ञा १६.२४३. ०चक–पु. संन्यासी. 'कर्मत्यागेनि झाला संन्यासी। ज्ञानध्यान नाहीं मानसीं। अन्नालागीं स्वग्रामवासी। कुटीचक तयासी बोलिजे।' –एभा १८.१७७. [सं. कुटी=झोंपडी]

**कुटी**—स्त्री. निंदेचें भाषण; निंदा; आळ. 'तर अंगा ये कुटी कवणाचिया।' –भाए ६१३. 'न गणित कुटी बोलती। आइकतां तुज।' –ज्ञा २.२१८. 'पारखियांसी सांगतां गोष्टी। घरची कुटी खातील।' –तुगा १२४. –वि. कपटी; कृत्रिम. 'तों कुटी खगतनू जडावली।' –आशिवि ३२. [सं. कुट्=वांकडें होणें] ०चें बोट–न. निंदेचा डाग. 'रूपसा उदयलें कुष्ट। भावितां कुटीचे बोट।' –ज्ञा १६.१७८.

**कुटी**—स्त्री. १ वाळलेल्या मासळीची पूड. २ (ल.) (विनोदानें) ठोकणें; मारणें (विद्यार्थ्यांत रूढ). (क्रि० काढणें). 'आज सुटी उद्यां कुटी.' [कुटणें]

**कुंटी**—स्त्री. एक फुलझाड.

**कुंटी**—१ (बे.) लहान कुळव. २ खुंटी; कापड गुंडाळण्यासाठीं केलेला लांकडी ठोकळा.

**कुंटीण**—स्त्री. कुंटण अर्थ १ पहा. [सं.]

**कुटीमेटी**—स्त्री. घरदार.

**कुटीर**—पु. झोंपडी; लहान घर. [सं.]

**कुटीर**—वि. कुटरा पहा. [कुटणें]

**कुटींव**—वि. कुटलेलें.

**कुटीळ**—कुटिल पहा.

**कुटुंब**—न. १ घरांतील माणसें; परिवार; खटलें. २ घरधनीण. ३ सामान्यतः पत्नी; बायको. [सं.; वे. कुभण्डो] सामाशब्द– ०क(का)वाडी–वि. कुटुंबाचा भार वाहक; चाकरासारखा राबणारा; घरचा कर्ता, मिळविता. 'ईश्वरीं कानकोंडा जाला कुटुंब कावाडी।' –दा ३.४.४७. ०कलह–पु. भाऊबंदकी,

गृहकलह. ०कवि–वि. ज्याच्या कुटुंबांतील सर्वच माणसें कवी आहेत असा. ०घात–पु.-सबंध कुटुंबाचा नाश. [सं.] ०घातकी–वि. घरादाराचें वाटोळें करणारा; कुटुंबाचा नाश करणारा. [सं.] ०वत्सल-वाला-वाळा–वि. १ स्त्रीपुत्रांवर फार प्रेम करणारा. २ बायको, मुलेंबाळें असलेला. 'दरिद्री दीन कुटुंबवत्सल तयास द्रव्य देता झाला ।' [सं.] ०शास्त्री–वि. ज्याच्या कुटुंबांतील सर्व लोक शास्त्रसंपन्न आहेत असा. [सं.] -बारी–वि. कुटुंबवत्सल. ' एका जीवा वरी । होतो दोन्ही कुटुंबारी ' –तुगा ४०९०.

**कुटुंबण**—न. (गो.) महसूल ठरवून दिलेली जमीन. [कुटुंब]

**कुटुंबॉ**—पु. ( गो. ) एक पक्षी.

**कुटुंबी**—पु. १ गृहस्थाश्रमी; घरभारी. २ (कों.) दूरचा नातेवाईक; आप्त; चार पांच पिढयांचें अंतर गेलें आहे असा सपिंड, सगोत्र, नातेवाईक. [सं.]

**कुटुन्याची चोळी**—स्त्री. ( गो. ) वेश्या वगैरे स्त्रिया घालतात अशी विशिष्ट प्रकारची, घटट् बसणारी चोळी.

**कुटूर**—( गो. ) कवडयाचा ( पक्ष्याचा ) शब्द. [ ध्व. ]

**कुटूरचें**—क्रि. (गो.) कवडयाचें (पक्षाचें) ओरडणें.

**कुटें**—वि. कुबडें; लंगडें. [ सं. कुट्=वांकडें होणें ]

**कुटो**—पु. ( कु. ) मासळीचें खत. कुटी पहा.

**कुट्टक**—वि. ( व. ) कुटाळ. ' येथील लोक भारी कुट्टक आहेत.'

**कुट्टक( करण )**—न. (नृत्य) उजवा हात उजव्या खांद्यावर व डावा हात डाव्या खांद्यावर ठेवून बोटें खांद्यास टेकणें व दोन्ही पायांचीं बोटें जमिनीवर हलु हलु आपटणें. [ सं. ].

**कुट्टण**—न. १ पीठ; चूर्ण. २ कुट्टा; कुंदी; ठोक; मार; मारझोड; पदार्थाची कुटाकूट, चेंचाचेंच. (क्रि० काढणें, निघणें). [सं. कुट्टन ]

**कुट्टन(चिबुक)**—न. ( नृत्य ) दांत एकमेकांशीं घासणें (भय वाटणें, थंडी वाजणें, रोग झालासें दाखविणें यांचा द्योतक अभिनय ). [ सं. ]

**कुट्टनी**—स्त्री. कुंटीण. कुंटण पहा. [ सं. ]

**कुट्टमित**—न. सीत्कारादिक चिन्ह कपटानें करणें. ' कपटें सीत्कारादिक चिन्हे जया त्यास कुट्टमित नांव ।'–अकक गंगाधर रसकल्लोल २.१३४.

**कुट्टरें, कुडतरें**—न. ( गो. ) केसांच्या अंबाडयाखालीं लोंबकळत ठेवण्याचा एक दागिना. ०मांजर–न. ( गो. ) कुरकुर आवाज करणारें, काळें रानमांजर; ऊद; कांडेचोर.

**कुट्टा-ट्टया**—पु. १ लाह्यांचें पीठ; तिळांची कुटून केलेली चटणी; पूड; चूर्ण. [ कुटणें ] २ ठोक; मार; कुंदी. ( क्रि० काढणें; निघणें). ' बापानें मला यथास्थित कुट्टा काढून हांकून बाहेर लावलें असतें.' –बाळ २.२४८. ३ घोकंपट्टी. ( क्रि० मारणें. ) ' घोकंपट्टीची किंवा कुट्टया मारण्याची रीति तयार होते.' –ब्राह्मण व त्यांची विद्या.

**कुट्टी**—स्त्री. (गो.) सुताराचें एक लांकडी हत्यार; मोगरी; ठोकणी; पटाशी वगैरे ठोकण्याकडे याचा उपयोग होतो. [कुटणें]

**कुट्टू**—पु. (माळवी) एक उपवासास खाण्यायोग्य पदार्थ.

**कुटथाकुटथा**—क्रिवि. ( व. ) हलुहलु; जेमतेम. ' कुटया कुटया घरापर्यंत पायीं गेला.'

**कुटयाल-टयेल**—न. ( कों. कु. ) यथेच्छ चोपणें; बडवणें. ( क्रि० काढणें; निघणें. ) [ कुटणें+तेल ]

**कुठचा-ला, कुठील**—वि. कोणत्या ठिकाणचा, गांवचा, जागेसंबंधीं ? [ कुठें ]

**कुंठ(ट)चें**—वि. ( गो. ) लंगडणें.

**कुंठणें**—अक्रि. थांबणें; कुंठित होणें; खोळंबणें; अवरोध होणें, केला जाणें; बंद होणें. 'पाहा पां असमसाहास । जेथ कुंठले निर्देश ।' –ज्ञ १.२४७. ' मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ।' –ज्ञा ४१. [ सं. कुण्ठ्=लंगडे असणें ]

**कुठणें-नें**—क्रिवि. कोठून ? कोठपासुन ?

**कुंठता**—स्त्री. अटकाव; प्रतिरोध; प्रतिबंध. [ सं. कुंठ् ]

**कुठपर्यंत-पावेतों-वर**—क्रिवि. किती लांब, दूर; कोणत्या मजलेपर्यंत, अंशापर्यंत, पायरीपर्यंत, प्रमाणापर्यंत; कोणत्या काळापर्यंत.

**कुंठव(वि)णें**—सक्रि. अडथळा आणणें, करणें. 'कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ।' –ज्ञा १८.७३३. [ सं. कण्ठ् ]

**कुठार**—पु. कुऱ्हाड; परशु; लांकडें फोडावयाचें एक हत्यार. ' देत्यें हात चला जी घेत्यें फळभाजना कुठारा या ।' –मोवन १३.८९. [ सं. कुठार, कुट्ट्=तोडणें; द्राविड कुट्ट; इं. कट् ]

**कुठार**—न. कुटार पहा.

**कुठाविणें**—न. कोठाविणें पहा.

**कुंठित**—वि. १ थांबलेलें; अडविलेलें; खोळंबविलेलें; खुंटलेलें. २ घोटाळलेला; निरुत्तर; किंकर्तव्यतामूढ. [ सं. ] ०पत्र–न. कलमाकलमास लबाडी दिमोन आली सबब यापरतें बोलणें नाहीं म्हणून शेरा लेहून घेणें तें. –भाअ १८३२.

**कुठून-ठोन**—क्रिवि. कोणता देश, काल, प्रमाण, विषय यापासून ? [ सं. कुत्र ]

**कुठें**—क्रिवि. १ कोणत्या जागीं, स्थळीं ? ' कुठें जाशी भोगा तर तुझ्या पाठीशीं उभा !'-मसाप ४.४.२७२. २ (मुख्यत्वें जोरानें उच्चारलें असतां ) कोठेंनहि; कोठेंहि ? ' मी तेव्हांपासुन एथेंच आहे, कुठें गेलों नाहीं. ' [ सं. कुत्र ]

**कुठोरा**—वि. कोठारी; कोठीवाला. ' चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें नांव। दोघांचेहि पाव हात जाती।' –तुगा ३४१५. [ कोठी ]

**कुठोरी**—पु. कोठारी. ' चोर कुठोरी एकेचि ठायीं। वेगळें पाहावें न लगे कांहीं।' –तुका ३७२.

**कुठोरी**—क्रिवि. कोठवर ? कोठपर्यंत ? [ कुठे–वेरी ]

**कुड**—उद्गा. कोंबडया वगैरे पक्ष्यांना हाकून लावण्याकरितां उच्चारावयाचा शब्द. [ ध्व. ]

**कुड**—पु. १ काटक्याकुटक्या व माती यांनीं घातलेली भिंत (बांबू, कारवी इ०ची). 'ठाव नाहीं बुड। घरें वसविसी कुड।' –तुगा १३९३. म्ह० कुडास कान ठेवी ध्यान=जपून हुशारीनें कोणतीहि गोष्ट करणें. २ ( नाविक ) गलबतावरील मालाच्या रक्षणाकरितां व सावलीसाठीं डोलकाठीच्या मागें असलेली सांवळयांची झोंपडी. [ सं. कुड्य=भिंत ]

**कुड**—स्त्री. ( कु. ) ज्याच्या अंगांत देव येतो तो माणूस अथवा त्याचें शरीर. कुडी पहा.

**कुड-डी**—वि. खोटें; वाईट; कपटी. 'तुम्हीं चालिजे हें मत कुड। अपाड् कीं' –शिशु ४८५. 'गीत साळ करी कुडी।' –भाए २२. 'जेवीं रायापाशील कुडमंत्री। राजबळें अधर्म करी' –एभा २३.८९२. 'विवेकें कुडी कल्पना पालटीजे।'–राम ४०. [ सं. कूट ]

**कुंड**—न. १ पाण्याची विहीर; झरा; तळी ( पवित्र ); ( चारी बाजूंनीं दगडांनीं बांधलेला ) हौद; टाकें; पुष्करणी. २ भांडें; घट; घडा. ३ ( व. ) कामटीचें तयार केलेलें व हरमुंजी रोगण इ० लावून घट्ट व टिकाऊ बनविलेलें भांडें. ४ कुंडी ( फुलझाडांची ). ' दवण्याचे कुंड घालोनि।' –ऐपो १५. [ सं. कुंड; कुण्ड्=रक्षण करणें ]

**कुंड**—न. पवित्र अग्नि ठेवण्यासाठीं केलेलें व मातीच्या चौरस काठांचें किंवा धातूचें बनविलेलें पात्र, खळगा. **कुंड-वेदिका-वेदी**—स्त्री. यज्ञ, होम, हवन करण्याकरितां केलेली वेदी, कुंड. 'कुंडवेदिका·विध्वंसोन समग्र। यज्ञमंडप मोडिला।' [ सं. कुण्ड्=जाळणें ]

**कुंड**—पु. गोलक या शब्दाखालील कुंडगोलक पहा. [ सं. ]

**कुडई**—न. एक प्रकारचें लौकर तयार होणारें भात.

**कु(कुं)डका**—पु. ( गो. ) तुकडा ( कापड, फळ, लांकूड इ० चा ). [ कुटका ]

**कुडकॉ-को**—पु. ( गो. ) तुकडा. ( कापड वगैरेचा ).

**कुडकी**—स्त्री. १ पुरुषाच्या कानांतील एक दागिना, हा चार मोत्यांचा चौफुलीसारखा किंवा एकाच मोत्याचा चौकडयासारखा असतो. कुडया; एक मर्दानी कर्णभूषण ( पुरुष व स्त्रियाहि घालतात खानदेशांत पुरुष घालतात ). खालीं बाळी व वर त्याला माळ असून ती कानाच्या टोंकावर जाते. नुसती बाळीहि घालतात. बेळगांव, खानदेश, वऱ्हाड इकडे मोत्यांऐवजीं फक्त सोन्याची बाळीच असते. 'राम म्हणे घालाव्या कुडक्या चारीहि याच कानीं कीं। मुनि भूषवितां भासे मूर्त स्वर्वृक्ष याचकानीं कीं।' –भोविराट ७.३३.'मुक्ताफळांच्या कुडक्या तयासी।' –शशिसेना.

**कुडकी**—स्त्री. (व.) जप्ती; कुरकी. 'घरावर कुडकी आली.'

**कुडकुड**—स्त्री. १ दांताखालीं कडक पदार्थ सांपडला असतां होणारा कडकड असा आवाज. २ थंडीनें दांत कुडकुडत असतां होणारा आवाज. ३ कुरकुर; पुटपुट; पिरपिर; चिरचिर. 'धिक्कारितां करित कुडकुड।' –दावि ६५. –क्रिवि. थंडीपासून होणाऱ्या क्रियेस लावतात. 'थंडी कुडकुड वाजती.' [ध्व.; सं. कुड्] **कुडकुडणें**–अक्रि. कुरकुरणें; पुटपुटणें; खुटखुटणें; पोटांत गुरगुरणें. **०वाणा-णी**–वि. दुर्मुखलेला; खिन्न; रडतोंडया; मुखरोगी; मुखदुर्बळ; घुम्या. [ ध्व; सं. कुड्=विकल होणें. ]

**कुडकुडा-डी**—पुस्त्री. ( कों. ) थंडीनें अंग कांपणें; थंडीची कुडकुडी; कापरें. ( क्रि० भरणें ).

**कुडकुडा-डी-ड्या**—वि. १ कुरकुर करणारा; गुरगुर करणारा; कष्टी. 'कुडकुडा झाला कपोता।'–माए ३१६. २ संकोचयुक्त; लज्जित. 'तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा।' –सेवा न घडे लाजा म्हणऊनि।' –तुगा १५३८. ३ दुःखी; कष्टी. 'होताती सर्वस्वें कुडकुडी। तितुकेंच कार्य त्यांचें।'–दा ३.२. ३८.

**कुडकुडीत**—वि. कुरकुरीत; कुरकुर आवाज होणारा(पापड, धान्य ).

**कुडकुडो**—पु. ( कु. ) थंडीचा ताप; हिंवताप. [कुडकुडणें]

**कुडगा**—पु ( कु. ) ( शेती ) भात लावण्याकरितां तयार केलेला जमिनीचा तुकडा. [ कुटका ]

**कुंडगोलक**—पु. सधवेचा जारज पुत्र. 'पत्यौ जीवति कुंडःस्यान्मृते भर्तरि गोलकः।' –मनु ३.१७४.

**कुडग्ई**—स्त्री. ( कों. ) लहान व बारीक, दुबेळक्यासारखी कुडांत घालण्याची मेढ. [ कुड+गई ]

**कुडचा**—पु. एका हाताची ओंजळ; पसा.

**कुडचांफॉ**—पु. ( गो. ) खुरचाफ्याचें झाड.

**कुडची**—स्त्री. ( खा. ) सद्रा; पैरण; कुडतें. [ फा. कुर्ता=खमीस ]

**कुडची-कुट्टी**—स्त्री. ( गो. ) लाकडी घण; मोगरी.

**कुंडजार**—पु. ब्राह्मण स्त्रीस जारापासून झालेला पुत्र. कुंडगोलक पहा. –महिकथा २१.१५.

**कुडण**—न. १ कुंपण; वई. 'दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येऊं नेदी।' -तुगा ३५७. २ आवाड; वाडगें; परसूं; परडें. ३ कुंपण, वई घालण्याची क्रिया. [सं. कुडय= भिंत] **कुडणावळ**-स्त्री. कुंपण घालण्याची क्रिया व तिची मजुरी.

**कुडणें**—उक्रि. १ कुंपण घालणें; भिंतीसारखा कूड घालणें. २ बंद करणें; बुजविणें (रस्ता, मार्ग). ३ कैदेंत टाकणें; बंदींत टाकणें, घालणें. ४ अडथळा, आडकाठी, अवरोध करणें. ५ (ल.) दाबणें; दडपणें; ओशाळणें. ६ मनांत कुढणें; तळमळणें; खेद मानणें; खिन्न होणें. ७ अवटरणें; दुखणें; ताठणें (पुष्कळ वेळ एके ठिकाणीं बसल्यानें शरीर, अवयव इ०). [सं. कुण्ड्=रक्षण करणें; कुडय= भिंत]

**कुडत(ता)न**—न. छत्तीस अथवा बेचाळीस कवळयांचा विडयाच्या पानांचा गड्डा (पांचशे पानांची एक कवळी) [फा. कुर्ता]

**कुडतरणें**—क्रि. (माण) कुरतडणें.

**कुडता**--पु १ कुटका; तुकडा. २ कुडचा पट्टा.

**कुडता-ती-तें-कुडताण**—कुडतें पहा.

**कुडताळ-ळा-ळें**—न. संकुचित, अरुंद जागा. -वि. अरुंद; संकुचित (जमिनीचा तुकडा). [कुडता] **॰ळयांत येणें**-संपुष्टांत येणें (धंदा, व्यापार).

**कुडती**—स्त्री. १ उंची; जाडी (क्षेत्रफळासंबंधीं). -क्रिवि. २ उंचीच्या अनुरोधानें, जाडीच्या अनुरोधानें कडीपाटाची कडी वगैरे (वस्तु). (क्रि० लावणें; बसवणें; ठेवणें).

**कुडती**—स्त्री. जाकीट; कमरेपर्यंतचा कोट. [फा. कुर्ता]

**कुडती**—स्त्री. १ परटाची मोगरी, ही लांकडी असते. २ (कु) (सुतारधंदा) किकऱ्याची ठोकणी ३ (कों.) चौरस लाकडी ठोकळा; जातें इ० ना उपयोगी. [सं. कुट्ट=कुटणें; कुट्टी पहा]

**कुडतुडणें**—सक्रि. कुरतुडणें.

**कुडतूम**—पु. (कु.) गुण्या; काटकोन (सुताराचा).

**कुडतें**—न. (खा. व.) सद्रा. [फा. कुर्ता=सदरा]

**कुडथळ**—स्त्री. जिला पाटाच्या पाण्याची सोय नाहीं अशी जमीन.

**कुडथळ**—न. (शेतजमीन) अपुरी जमीन; ठिकें; दळें नोंदणी केलेल्या प्रमाणांत कमी येणारी जमीन. [कुडता] **-ळीबिघा**-पु. लहान बिघा; पूर्ण बिघ्यापेक्षां थोडा कमी बिघा. (सामान्य बिघा वीस पांडांचा).

**कुडनाडया**—वि. (माण.) भूत; समंध इ० नां कोपविणारा व शमविणारा (मांत्रिक) [सं. कूट+नाडी]

**कुडपण-णें**—न. लहान, जाड काठी; दांडु; लांकूड; हात-दीड हात लांब व मनगटाइतका जाड लाकडाचा तुकडा. [कुटका]

**कुडपणें**—अक्रि. १ अवठरणें; मुरडणें (पानें इ०). 'सर्वांची पानें कुडपून गेलीं.' -मराठी ६ वें पुस्तक पृ. २४३.२ आवृत्ति २ टाकणें; सोडणें. 'कुडपियला देस आतां करूं नका बळ।' -ब ६०४. 'कुडपीयेला देश आतां येऊं नेदी दुसरी।' -तुगा २९८.

**कुडबुड-डां**—क्रिवि. कुडबुडयाच्या आवाजासारखा (आवाज). [ध्व.]

**कुडबुडणें**—अक्रि. १ कुडबुड आवाज करणें (कुडबुडयाचा) २ (ल.) अस्पष्ट रीतीनें बोलणें; कुरबुरणें [ध्व.]

**कुडवुडा-मुडा-मुडया जोशी**—पु. हातात कुडबुडें घेऊन भविष्य सांगून भीक मागणाऱ्या जोशांची (अब्राह्मण) एक जात व त्यांतील व्यक्ति.

**कुडबुडें**—न. डौराहून लहान वाद्य; जिच्या टोकास चिकण मातीची किंवा मेणाची गोळी बसविलेली आहे अशी दोरी मध्य-भागीं बांधलेली आहे असें एक चर्मवाद्य. हें सरवदे, कुडबुडे जोशी, पांगुळ, भिक्षेकरी हातांत घेऊन वाजवीत भिक्षा मागतात. [ध्व.]

**कुडमुड**—स्त्री. (ना.) काकडीची किंवा मुळयाची कोशिंबीर.

**कुडय**—स्त्री. (कु.) एक जातीचें भात.

**कुंडय, कोंडय**—स्त्री. (गो.) शिंपी (जात).

**कुंडल**—न. १ कानांतील एक दागिना. २ वलय; कडें (धातूचें). [सं.]

**कुंडला**—पु. तपकीर घोटण्याचा दगडी अथवा मातीचा खल. -न. (कु.) मातीचें भांडें. [सं. कुंड+ल]

**कुंडलिनी**—स्त्री. (योगशास्त्र) शरीरांतील मणिपूर चक्राचे ठिकाणीं सर्पाच्या आकृतिरूपानें राहणारी प्राणरूप शक्ति. 'शक्ति करी उजगरा। कुंडलिनीये।' -ज्ञा ६.२२१. [सं.]

**कुंडली-ळी**—स्त्री. १ सूर्य, ग्रह, नक्षत्र यांची दशा दाख-विण्याकरितां चौरस, त्रिकोनी अथवा वर्तुळाकार भाग पाडलेली आकृति. हिचे तनु, धन, सहज, सुहृत्, सुत, रिपु, जाया, मृत्यु, धर्म, कर्म, आय, व्यय असे बारा भाग किंवा कोष्टकें असतात; राशीचक्र. २ प्रक्षिप्त वाक्य दाखविण्यासाठीं काढलेला कंस व इतर रेषा. ३ (गो.) लहान कुंडी. ४ (खा.) वर्तुळाकार व मध्यें भोंक असलेली चापट चक्की, (भोंक पाडण्यासाठीं). ५ कुंडलिनी पहा. 'हें असो तें कुंडली। हृदयांआंतु आली।' -ज्ञा ६.२७४. -पु. सर्प. 'त्या मणि प्रकाशीत वारुळीं। बैसले किती थोर कुंडली।' (नवनीत पृ. ४२१.) कडी, वर्तुळ, वेटाळें व यांसारख्या इतर अनेक वस्तू. -वि. ज्याच्या कानांत कुंडलें आहेत असा. [सं.]

**कुडव**—पु. १ (कु. गो.) सामान्यतः आठ शेर अथवा दोन पायलीचें माप. देशावर आठ पायली धान्याचें माप; कोंकणांत राजापुराकडे चार पायली; २ एक प्रस्थाचा एकचतुर्थांश; एक पक्का पावशेर. –अश्वप १.१३०; पातळ औषधें मापण्याकरितां मातीचें, कळकाचें, लाकडाचें किंवा लोखंडाचें, विस्तारानें व उंचीनें चार अंगळांचें भांडें. –योर १.३८. 'तो निजबोधाचें कुडवा।कारीं। भरील वखारी श्रवणाच्या।' –एभा ३.८७३. [सं.] ०**भरणें**–(कु.) माप भरणें, पूर्ण होणें; मरण ओढवणें. **म्ह०** मेल्या म्हशीस कुडवभर दूध.

**कुडवली**—स्त्री. १ (हेट.) भात शिजविण्याचें मडकें. २ (कु.) एक प्रकारचें मडकें. [सं. कुंड]

**कुडवळ**—पु. (गो.) एक पक्षी.

**कुडवा**—पु. भिंतीच्या तळाचा कंगोरा; निराळया रंगानें दाखविलेला वीतभर उंचीचा भाग. (क्रि० घेणें; ठेवणें.) ०**घेणें**–(व.) जमीन सारवतांना जमिनीपासून कांहीं उंचीपर्यंत भिंत सारवणें. [कूड]

**कुडवाळी**—पु. (गो.) कुळवाडी अप. 'ठिकठिकाणीं दिसणारे कुडवाळयांचे समाधानी व साधेभोळे चेहरे...'–सह्याद्रीच्या पायथ्याशीं १२०.

**कुडवी**—पु. कुडव पहा. ०**भारा**–पु. झोडलें असतां कुडवभर भात निघेल अशी पेंढी.

**कुडरू**—न. समुद्रकांठच्या डोंगरांतील कुरण.

**कुडसर**—स्त्री. (कों.) नाचणी (धान्य). –कृषि २८४.

**कुडसारो**—पु. (कु.) कापणीनंतर राहिलेले भाताचे सड; धस.

**कुडा**—पु. हें रानझाड सहा–सात हात उंच असून पान बदामाच्या पानासारखें लांबट असतें. याच्या विडया करतात. शेंग बारीक व लांब, असून बीं लांबट यवासारखें व कडू असतें, मुळांचा औषधीसारखा उपयोग होतो. त्याच्या पाकास कुडेपाक म्हणतात. कुडयाच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत. बीची उपधान्यांत गणना होते. तें कृमिनाशक आहे. कोंवळया शेंगांची भाजी करतात. [सं. कुटज]

**कुडा**—पु. १ भाताची एक जात. २ स्त्रियांच्या कानांतील एक दागिना; कुडें.

**कुडा**—वि. १ दुष्ट; शबल; कपटी; विश्वासघातकी. 'विवेकें कुडी कल्पना पालटीजे' –राम ४०. २ (काव्य) वाईट; खोटा (पैसा). 'कुडा आपुला दाम असतां पराशीं। वृथा भांडणें ख्यात हे गोष्ट कैशी।' –हरिराज मुद्गलार्यांचे भाषांतर ४७ (अकक). ३ (काव्य) मिथ्या; अशुद्ध; खोटा; वाईट, नुकसानकारक, चुकीचा. 'नृपातें कुडा मंत्र योजावयातें।' –वामनविराट ७.१३०. 'तैसी विषयेंसुखाची गोडी। गोड वाटे परी ते कुडी।' –दा ३.१०.६७. [सं. कूट] ०**भाव**–पु. द्वेष; मत्सर; अविश्वास; संशय; कपट; दुष्ट कल्पना; विकल्प.

**कुंडा**—पु. (गो. हेट.) धान्याचा कोंडा; भूस.

**कुंडा**—पु. १ मोठी कुंडी (फुलझाडाची, चांभाराची कातडें भिजत घालण्याची, रंगाऱ्याची); उंसाच्या रसाचें मांदण; भांग, तपकीर इ० तयार करण्याचें पात्र. 'जवळच वटवृक्षाची डहाळी लावलेला कुंडा ठेवला असतो. –ऐरापुप्र ८.४४५. २ माडी काढण्यासाठीं माडाला बांधलेला भोपळा. [सं. कुंड]

**कुडाक**—न. (गो.) कानांतील कुडें (सोन्याचें अगर हिऱ्या–मोत्यांचें); अव. कुडकां. [कुंडल]

**कुडाण**—न. (कों.) कुडण; गुरांचा उन्हाळी गोठा; कुडलेली जागा. ०**करणें**–(कु.) कुंपण घालणें; झांकणें. [कूड]

**कुडाण**—न. (कु.) ढोल वाजविणें.

**कुडामेढीचा**—वि. कुड व मेढी यांचें; चंद्रमौळी; फाटकें तुटकें; मोडकेंतोडकें (खोपट, झोपडी, वाडा). [कूड+मेढ]

**कुंडालें**—न. (माण.) पातेल्यासारखें मातीचें भांडें. [कुंड]

**कुडावा**—पु. १ (काव्य) कूड; कार्वी, झिलप्या वगैरेवर माती लिंपून केलेली भिंत. [कुड] २ (ल.) रक्षण; थारा; पाठपुरावा. 'करी संकटीं सेवकाचा कुडावा।' –राम ६७. 'धावोनि त्यांचा करी कुडावा।' –निगा ११८. 'तैं कुडाविला जाणा कंस। पति तुमचा।' –कथा २.२.५१. [सं. कुण्ड=रक्षण करणें]

**कुडावा**—पु. (कु.) एक खाण्यास योग्य पक्षी.

**कुडावेडा**—वि. दुष्ट हेतूनें वेड पांघरणारा. [कुडा+वेडा]

**कुडाळ**—पु. एक प्रांत. हा कोंकणांत सावंतवाडी संस्थानांतील एक तालुका आहे. ०**देश**–(प्राचीन रचना) उत्तरेस देवगड तालुका, दक्षिणेस गोंव्यांतील पंचमहाल, पूर्वेस सह्याद्री, पश्चिमेस अरबी समुद्र. हा प्रांत. –आद्यगौडब्राह्मण, वर्ष २, अंक ३–४. पृ. ३०. –**चा संत**–पु. कुडाल कोटांत जोगण प्रभु पडला तो; त्या स्थळास ब्राह्मण असेंहि म्हणतात. ०**देशकर ब्राह्मण**–पु. या प्रांतांतील आद्यगौड ब्राम्हण. ०**माप**–या देशांतील विशिष्ट माप, कोकणांतील सर्वसामान्य मापापेक्षां हें निराळें आहे. चार शेर=एक पायली, दोन पायल्या=एक कुडव, वीस कुडव=एक खंडी, चार खंडी=एक भरा.

**कुंडिका**—स्त्री. पाणी भरण्याचा लांकडी माठ

**कुंडिया**—पु. दुध्या भोपळ्याचा एक प्रकार. ज्यास कमंडलूच्या आकाराचें फळ येतें असा भोपळा.

**कुडिया, कुडया**—पु. (ना.) जनावरानां होणारा एक रोग; मानमोडी; फेपशा.

**कुडी**—स्त्री. १ झोंपडी. यावरून. २ देह; शरीर; आत्म्याचें घर; (रागानें किंवा निंदेनें) कलेवर; प्रेत. 'कुडी वाढे कुबुद्धि वाढे।' –दा १५.९.७. 'दिली कुडी टाकोनी।' –तुगा ३६१. 'कुडी साहेबाची घेऊन।' –ऐपो १४७. ३ लांकडाची झिलपी, ढलपा. ४ वनस्पतीच्या मुळाचा लहानसा तुकडा, अंकुर (सुंठ, गाजर, लसूण, हळद, आलें यांच्या कांद्याचा). ५ एक प्रकारची पाभर. ६ भाताचें काड; काटकुटी. ७ कोडी; वीस संख्या. ८ (वे.) पालवी. ९ (कु.) गवताची गंजी. [सं. कुटी; कुडीं=देह] **कुडींत जीव धरून रहाणें**–१ मरणोन्मुख होणें. २ कसें तरी जगणें. ०**तशी पुडी**–शरीर तसा आहार.

**कुंडी**—स्त्री. १ भांग, तपकीर घोटण्याचें भांडें, पात्र. २ फुलझाडें लावण्याचें मातीचें भांडें. ३ स्नानाकरितां, धुण्याकरितां पाणी सांठविण्याची दगडाची अगर लांकडाची मोठी डोणी. ४ (कों.) (सोनारी) पाणी ठेवण्याचें भांडें, पातेली. ५ (आट्यापाट्या) कोंडी पहा. ६ (ना. गोंडी) चौघडा (नागपूर येथील अजबखान्यांत या नांवाचें वाद्य आहे). [सं. कुंड]

**कुडु(डू)क**—पुन. १ सोन्याच्या तारेंत मोतीं गुंफून केलेला कानांतील एक दागिना. २ (ल.) एक झाड व त्याचें फळ.

**कुडुकें**—न. (माण.) धान्य सांठविण्याचें लहान कणगुलें. [कुड]

**कुडुपणें**—न. १ पुराणें; दांडकें; होलपाटा; सोडगें. २ ठेंगणा व मजबूत, धट्टाकट्टा, काटक माणूस.

**कुडूक-वाणा-वाणी**—वि. खिन्न; खट्टू; रडतोंड्या; असंतुष्ट; मलूल. 'त्याची मर्जी कुडूकवाणी झाली.' [सं. कूट]

**कुडें**—न. १ कुडी अर्थ ४ पहा. २ कुडा. कुडुक अर्थ १ पहा. ३ द्वेष; मत्सर; संशय; अविश्वास. ४ कपट; दुष्ट व्यूह; वाईट कचाट; कुलंगडें. 'ज्याचें कुंडें त्याजपुढेंच राहे।' –सारुह ८.४८. 'वाटे कुडें म्यां केलें।' –जै १.५३. ५ (ल.) संकट. 'निर्दाळावा तरी कैसें रीतीं। तयाच्या भक्तीस मैनावती। आहे तरी राजयाप्रती निवेदावें कुडें भावें।' –नव १४.१५०. –वि. खोटें. 'जैसें कां कुडें नाणें। खऱ्याचेनि सारखेपणें।' –ज्ञा ४.८६. ०**पावडें-कपट**–न. १ दुष्ट विचार; अंतस्थ बेत; कारस्थान. 'नावडीची साखर आळणी आसे काही कुडेपावडे।' –सला ७५. 'माझ्या मनांत कांहीं कुडें पावडें नाहीं.' २ जादूटोणा; मंत्रतंत्र; जादू; चेट्क; कुवेडें. ३ छक्केपंजे; दुष्ट कारस्थान; कावा. [कुडें द्वि] ०**शहाणपण**–न. कावेबाजपणा; कुटिल धूर्तता.

**कुडेपाक**—पु. कुड्याच्या पाळाचा तयार केलेला पाक. हा औषधोपयोगी आहे.

**कुंडेपास्ट**—वि. (गो.) कोंड्यापेक्षां कमी दर्जाचा.

**कुंडो**—पु. (कु.) कोंडा.

**कुड्डा-कुड्डो-कुरडो**—१ (गो.) आंधळा. २ (शोभेची दारू) खापरी पेरें; शोभेच्या दारूचें झाड वगैरेस असलेले दारू भरलेलें खापरी नळकांडें.

**कुड्डी**—स्त्री. (वे.) (सोंगट्यांचा खेळ) उब्तपगडें या डावांत फाशांच्या एका दानास हें नांव देतात.

**कुड्डुबकें**—न. (गो.) बगळ्याच्या जातीचा एक पक्षी.

**कुड्डूक**—स्त्री. (गो.) एक प्रकारची भाजी.

**कुड्मल-मुळ**—पु. कळा; उमलणारी कळी; कमळ. 'ऐक्य भावाची अंजुळी। सर्वेंद्रिय कुड्मुळीं।' –ज्ञा १५.२ [सं. कुड्मल]

**कुड्या-ढ्या**—वि. कुढणारा; मनांतल्या मनांत जळणारा; घुम्या. [कड(ढ)णें]

**कुंड्या**—पु. कुंडा; मोठी कुंडी

**कुड्याठ-कुर्याट**—न. (कों. राजा.) डोंगराच्या उतरणीवरील भातशेतीचीं खाचरें; हीं सुमारें १०।१५ हात रुंद व १५।२० हात लांबीचीं असतात. ह्यांत भात वगैरे पिकें करतात.

**कुढंग**—पु. लुच्चेगिरी; खोडी; चाळा; टवाळी. [सं.]

**कुढणें**—अक्रि. मनांतल्या मनांत त्रासणें; खेद पावणें; घुमेपणानें रागावणें; कष्टी होणें. 'परी या कृपेच्या वोरसें। कुढावयाचेंचि पिसे।' –तुगा १९०२. [हिं. कुढ (ना); का. कुडि= कढणें; सं. कुष्ट–कुट्ठ–कुढ; गु. कूट (वुं)]

**कुढा-ढ्या**—वि. मनाचा कुढा; कपटी; खोटा; खिन्न; कुरठा; मत्सरी.

**कुढाण**—स्त्री. कजकट घाण.

**कुढापा**—पु. १ मत्सर; द्वेष; संताप; चुरस. (क्रि० धरणें; ठेवणें; करणें). २ मनांतल्या मनांतील जळफळ, तळमळ. (क्रि० धरणें; करणें). [कुढा]

**कुढावणें**—सक्रि. रक्षण करणें. [सं. कुण्ड्=रक्षण करणें]

**कुढावणी**—स्त्री. विवेचन; स्पष्टीकरण. 'आपुलिया स्वरूपाची कुढावणी। करिते झाले स्वानंदें।' –स्वानु १२.४.८५.

**कुढावा**—कुडावा अर्थ २ पहा. 'तुका म्हणे देवा माझा करावा कुढावा।' –तुगा ११८८.

**कुढें-पावडें-कपट-शहाणपण**—कुडें–पावडें पहा.

**कुणकुण**—स्त्री. १ हळू आवाजांत बोलणें; गुणगुणणें; पुटपुट; गयावयां करणें. २ अफवा; उडत बातमी. (क्रि० करणें; लावणें) [ध्व. सं. क्वण्=शब्द करणें]

**कुणकुणणें**—अक्रि. कुजबुज करणें; हलु हलु बोलणें; गयावयां करणें. [ध्व. सं. क्वण्=शब्द करणें]

**कुणकुण्या**—वि. कुरकूर करणारा; गुणगुण करणारा; गयावयां करणारा. [कुणकुण]

